आरबी भाषेंतील

# सुरस व चमत्कारिक गोष्टी.

विद्यार्थ्यांकरितां काढिलेली संक्षिप्त आवृत्ति.

[इंग्र]जींतील ' अरेबियन् नाइट्स् एन्टर्टेन्मेन्ट्स् ' या ग्रंथावरून


कै० कृष्णशास्त्री चिपळूणकर,

कै० विष्णु कृष्ण चिपळूणकर बी. ए.

व

हरि कृष्ण दामले


यांनीं या गोष्टी मराठींत लिहिल्या.

यांतून विद्यार्थ्यांस वाचण्याला अयोग्य अशा गोष्टी गाळून टाकून


ही चित्रयुक्त संक्षिप्त आवृत्ति

पुणें येथें

' चित्रशाळा ' छापखान्यांत छापिली.

आवृत्ति २ री. ] [ इ० स० १९३८

किंमत १॥ रुपया.

# अनुक्रमणिका.



पृष्ठांक

श्रीसमर्थ.

# प्रस्तावना.

---

अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी या नामांकित ग्रंथाच्या पहिल्या पांच भागांचें इंग्रजींतून मराठींत भाषांतर कै० कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं केलें. पुढें त्यांच्या पश्चात् त्यांचे विख्यात व त्यांच्याच तोडीचे विद्वान् चिरंजीव कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या मनांत आपल्या परमपूज्य पित्याची ही अपूर्ण राहिलेली कृति पूर्ण करण्याचें येऊन त्यांनीं एका भागाचें भाषांतर पूर्ण केलें. परंतु आपल्या देशाच्या दुर्दैवामुळें त्यांच्यावर अकालीं मृत्यूची धाड पडून त्यांनीं हातीं घेतलेलें हें काम इतर अनेक महत्त्वाच्या कामांप्रमाणेंच पडून राहिलें. त्यानंतर विष्णुशास्त्री यांचे शिष्य रा० दामले यांनीं तें काम मोठ्या आवडीनें हातीं घेतलें, आणि दक्षिणा प्राइझ कमिटीकडून व इतर विद्वानांकडून त्यांस ह्या कामीं योग्य उत्तेजन मिळून त्यांनीं बाकी राहिलेले भाग लिहून सर्व ग्रंथ समाप्त केला.

ग्रंथ लिहून तयार झाला तरी तो समग्र छापून काढण्याचा योग लवकर आला नाहीं. अखेरीस १८९० सालीं रा० हरी कृष्ण दामले व रा० शालिग्राम ह्या उभयतांनीं प्रस्तुत ग्रंथाची पहिली आवृत्ति निर्णयसागर छापखान्यांत छापून काढिली. तदनंतर सदरहू ग्रंथाच्या प्रकाशनाचा हक्क रा. दामले व रा. वासुदेव गणेश जोशी यांजकडे आल्यावर त्यांनीं १९०३ सालीं ह्या पुस्तकाची दुसरी आवृत्ति छापून काढिली.

हा ग्रंथ मूळ अरबी भाषेंत असून त्याचें फ्रेंच भाषेंत भाषांतर झालें, आणि फ्रेंच भाषेंतून इंग्रजींत व इंग्रजींतून मराठींत अशी ही भाषांतरांची परंपरा व पूर्वपीठिका आहे. मूळ ग्रंथाचा सुरसपणा व मनोरंजकपणा जगन्मान्य आहे, म्हणूनच ह्या ग्रंथाचीं भाषांतरें युरोपांतील सर्व भाषांत झालीं आहेत. वाचतां येत असून ज्यानें हा ग्रंथ वाचला नाहीं असा मनुष्य युरोप किंवा अमेरिका खंडांत विरळा. तेव्हां जो ग्रंथ सर्व देशांत सर्व काळांत आबालवृद्धांस आवडला त्याच्या अंगीं मनोरंजन करण्याचें सामर्थ्य केवढें असलें पाहिजे ! ह्या ग्रंथांतील

कोणतीही गोष्ट वाचण्यास आरंभ केला असतां ती संपविल्याविना पुस्तक खालीं ठेववतच नाहीं असाच बहुतेक वाचकांचा अनुभव आहे.

आतां कोणी असें म्हणतील कीं, हा ग्रंथ सुरस आहे, चटकदार आहे, आणि वाचकांस अगदीं वेड लावून टाकणाराही आहे, परंतु असल्या कल्पित खोट्या गोष्टी वाचल्यापासून वाचकाला फायदा काय? या शंकेवर असें उत्तर आहे कीं, असल्या गोष्टींच्या वाचनानें जिवाला करमणूक तर होतेच; पण शिवाय ह्या गोष्टी कल्पित असल्या तरी त्यांतील मनुष्यस्वभावाचें वर्णन खरें असतें, म्हणून त्याच्या वाचनापासून ज्ञानप्राप्ति होते आणि अंगीं व्यवहारचातुर्य येतें. तसेंच असल्या गोष्टी मनोरंजक असल्यामुळें वाचक त्या मोठ्या उत्कंठेनें वाचतात व तेणेंकरून श्रम न होतां जलद वाचण्याची संवय होऊन मोठमोठे महत्त्वाचे ग्रंथ वाचण्याची त्यांस गोडी लागते.

ह्याप्रमाणें हें पुस्तक मुळांतच अत्यंत रसभरित व मनोवेधक आहे हें निर्विवाद आहे. त्यांतून कै० कृष्णशास्त्री व विष्णुशास्त्री ह्यांच्या हातून त्या पुस्तकाला मराठी पेहराव चढविला गेला असून त्यांचीच भाषापद्धति ज्यांनीं हुबेहुब उचलली आहे असे जे त्यांचे शिष्य रा० ह० कृ० दामले यांच्या हातून त्या भाषांतराची पूर्णता झाली असल्यामुळें मुळांतील रसहानि कोठेंहि न होतां उलट आपण हें भाषांतर वाचित नसून स्वतंत्र ग्रंथच वाचीत आहों कीं काय असें वाटण्याइतकें हें रूपांतराचें काम सफाईनें वठलें आहे.

हें सर्व झालें तें ठीकच झालें. परंतु तरुण विद्यार्थ्यांच्या हातीं तें पुस्तक देण्याला एक मोठीच अडचण होती. पुस्तकांतील अर्ध्याअधिक गोष्टी शृंगार व करुणरसानेंच भरलेल्या असल्यामुळें तें पुस्तक अल्पवयी विद्यार्थ्यांच्या हातांत देण्याला पात्र नव्हतें. बरें, तें पुस्तक मुळींच त्यांच्या हातीं देऊं नये, तर करमणुकीच्या साधनाच्या दृष्टीनें, आणि मराठी भाषांतराचा उत्कृष्ट नमुना ह्या दृष्टीनें विद्यार्थ्यांचें त्या बंदीपासून नुकसान होणार.

अशा रीतीनें कोणीकडून तरी तरुण वाचकांचें नुकसानच होत असें. तें टाळण्याकरितां ही प्रस्तुतची छोटी आवृत्ति काढिली आहे. ह्यांत शृंगारविषयक सर्व गोष्टींना अजीबात फांटा दिला असून इतर गोष्टींतही जेवढा भाग विद्यार्थ्यांच्या नजरेपुढें सतत असणें अयोग्य वाटलें तेवढाच भाग काढून टाकिला असून गोष्टींची संगति जोडून घेतली आहे. ह्याखेरीज पूर्वींच्या पुस्तकांत इतर कांहीं फेरफार केलेला नाहीं. गाळून टाकलेला भाग वजा जातां बाकीच्या ज्या गोष्टी छापल्या

आहेत त्या सर्व कै० कृष्णशास्त्री व विष्णुशास्त्री आणि रा० दामले ह्यांच्याच लेखणीं-तून उतरल्या असल्यामुळें ह्या छोट्या आवृत्तींत देखील भाषासौष्ठव अगर वर्ण-नाचा रसभरितपणा ह्यांत कोणत्याही प्रकारें न्यून पडलेलें नाहीं. पुस्तकाचीं पृष्ठें पूर्वीच्या आवृत्तीच्या निम्याहून थोडींशीं कमींच झालीं आहेत. परंतु त्या मानानें किंमत फारच अल्प ठेवल्यामुळें ह्या ' सुरस व चमत्कारिक ' गोष्टींचा आस्वाद घेणें सर्वांस सुलभ झालें, हा छाटाछाटीपासून फायदाच झाला आहे.

ह्या छोट्या आवृत्तींत ज्या गोष्टींचा समावेश केला आहे त्यांच्या स्वरूपाविषयीं थोडेसें दिग्दर्शन करणें इष्ट आहे. बगदादच्या खलिपांचें ऐश्वर्य ज्या वेळीं कळ-सास पोचलें होतें त्या वेळच्या महंमदी समाजाचें ( इ० स० ९०० ते १००० ) चित्र ह्या गोष्टींच्या रूपानें रेखाटलेलें आहे. अर्थात् ज्या मनुष्याची महत्त्वाकांक्षा तृप्त झालेली असते तो मनुष्य ऐषआरामाच्या व चैनीच्या पाठीमागें लागणार आणि अखेरीस त्याची अवनति होत जाणार. अशा अवनतीच्या प्रादुर्भावाचीं पूर्वचिन्हें प्रस्तुत पुस्तकांतील वर्णनांत जागोजाग आढळून येतात. ही गोष्ट येथें मुद्दाम नमूद करण्याचें कारण हें कीं, प्रस्तुत पुस्तकांत जें महंमदी समाजाचें चित्र दृष्टीस पडेल तें वाचकांस अनुकरणीय म्हणून दिलेलें नाहीं, तर त्यापासून चैनीच्या पाठीमागें लागलेल्या समाजानें सावध व्हावें आणि ऐषआराम व तदनुषंगिक दुर्गुणांचा आपल्या वर्तनावर पगडा बसूं देऊं नये. आतां पुस्तकांतील सर्वच गोष्टी अशा मासल्याच्या आहेत असें नाहीं. दर्यावर्दी सिंदबादच्या गोष्टींत अनेक ठिकाणच्या प्रवासांचें व नानारीतीचें वर्णन आहे, आणि इंग्लिश भाषेंतील रॉबिन्सन क्रूसो व गलिव्हर्स ट्रॅव्हल्स वगैरे पुस्तकें वाचून जशी तिकडील वाचकांच्या मनांत प्रवा-साची स्फूर्ति उद्भवली तसाच सुपरिणाम ह्या सिंदबादच्या सफरी वाचल्यापासू-नही झाला असेल असें मानण्याला कांहीं हरकत नाहीं. शृंगार आणि करुण-रसपर गोष्टी काढून टाकिल्यामुळें शिल्लक राहिलेल्या गोष्टींत हास्यरसाचें प्राधान्य दिसून येतें. न्हाव्याच्या पांच भावांच्या गोष्टी, आणि झोंपी गेलेला जागा झाला ही गोष्ट ह्यांत हास्यरसाची कमाल झाली आहे. तरीपण त्यांपासून मनुष्यस्वभावाची पारख आणि समयसूचकता ह्या गुणांची प्राप्ति निःसंशय होईल. झेन अलसनाम ह्याच्या गोष्टीपासून व्यसनाधीन झालेला मनुष्य देखील एकादा उच्च महत्त्वाकांक्षेच्या मागें लागला म्हणजे कसा सुधारत जातो त्याचें उदाहरण दृष्टीस पडतें. अतिलोभाचा दुष्परिणाम दर्शविण्याला बाबा अबदल्लाच्या गोष्टीच्या तोडीची दुसरी गोष्ट क्वचितच आढळण्यांत येईल. लक्ष्मी श्रेष्ठ की

विद्या श्रेष्ठ ह्या वादाचा निकाल खोजा हसन अल्हाबलच्या गोष्टींत दिसून येतो. अशाच प्रकारें प्रत्येक गोष्टींत कांहींना कांहीं तरी घेण्यालायक तात्पर्य आहे, आणि तसा त्यांत बोध आहे म्हणूनच त्या गोष्टींचा प्रस्तुत पुस्तकांत समावेश केला आहे; नाहींतर त्या गोष्टीस स्थळ मिळालें नसतें.

सारांश, ह्या 'सुरस व चमत्कारिक' गोष्टींच्या वाचनापासून वाचकांस करमणूक तर होईलच, पण त्याबरोबर विविध माहिती, मनुष्यस्वभावाचें ज्ञान, आणि सद्बोध प्राप्त होऊन बहुश्रुतपणा, प्रसंगावधान, समयसूचकता इत्यादि गुणांचेंही पोषण होईल. ह्यास्तव प्रस्तुत पुस्तक वाचकांस मनोरंजक व बोधप्रद होईल अशा समजुतीनें त्यांचे पुढें ठेविलें आहे; तें त्यांस पूर्णपणें पसंत होवो.



### आरबी भाषेंतील

# सुरस व चमत्कारिक गोष्टी.

## उपोद्घात.

प्राचीन काळीं पारस देशांत शाहरियार नांवाचा एक महाविख्यात पातशहा होऊन गेला. तो राज्य करीत असतां एके वेळीं त्याला आपल्या पत्नीच्या पातिव्रत्याविषयीं संशय येऊन त्यानें तिचा शिरच्छेद केला. त्या वेळेपासून त्यानें असा नियम केला कीं, दररोज सकाळीं नव्या स्त्रीशीं लग्न करावें आणि दुसरे दिवशीं प्रातःकाळीं तिचें डोकें उडवावें. अशा रीतीनें त्या पातशाहाच्या भयंकर प्रतिज्ञेनें त्याच्या राज्यांतील कित्येक थोर घराण्यांतील मुली प्राणास मुकल्या.

एके दिवशीं शाहरियारानें आपल्या मुख्य वजिरास आज्ञा केली कीं, 'सेनापतीची मुलगी मला बायको करण्याकरितां घेऊन यावी.' वजिरानें त्याप्रमाणें आणल्यावर पातशहानें दुसरे दिवशीं सकाळीं तिचा वध करण्याकरितां तिला वजिराच्या स्वाधीन केली. वजिरास पातशाहाचे असले हुकूम बजावण्याचें काम मुळींच पसंत नव्हतें. परंतु बिचारा करतो काय ? त्यानें धनी सांगेल तें डोळे झांकून करण्याचें काम पतकरलें होतें; यामुळें ते सर्व हुकूम त्यास मान्य करावे लागत. दुसऱ्या दिवशीं त्यानें एका छोटेखानी सरदाराची मुलगी पातशाहास बायको म्हणून आणिली; व तिचाही तिसरे दिवशीं सकाळीं वध केला. तिच्या पाठोपाठ त्यानें एक सुखवस्तु गृहस्थाची कन्या आणिली. सारांश, त्या शहरांत नित्य नेमानें एका कन्येचें संध्याकाळीं पातशहाशीं लग्न होई व नित्य नेमानें सकाळीं एका स्त्रीचा वध होई, असा क्रम चालला !

या क्रूर कृत्याची बातमी चोहोंकडे परसरल्यावर शहरांतील सर्व लोकांची पांचावर धारण बसली. जिकडे जावें तिकडे शोकाचा, रडण्याचा, स्वर ऐकूं येऊं लागला. कोठें पहावें तों बाप कन्येविषयीं रडत बसला आहे; कोठें आई मुलगी मेल्याबद्दल विलाप करते आहे; कोठें आपल्या मुलीवर पाळी येईल या धाकानें लोक चिंताग्रस्त व

दुःखित होऊन बसले आहेत;असा सर्वत्र एकच हाहाःकार व आक्रोश उसळला; आणि इतके दिवस सर्व रयतलोक पातशहाचे गुण गात व दुवा देत असत, तें जाऊन त्या सर्वांच्या तोंडून त्यास शिव्या व शाप देण्यांत येऊं लागले.

बायकोचा दररोज शिरच्छेद करण्याचें काम मुख्य वजिराकडे होतें;तें काम करणें त्यास फार नापसंत होतें हें वर सांगितलेंच आहे.त्या वजिरास दोन कन्या होत्या. एकीचें नांव शाहजादी,ही वडील होती. धाकटीचें नांव दिनारजादी होतें. दुसरी फारच गुणी होती, परंतु पहिली जी शाहजादी, ही मोठी धीट व समयोचित भाषण करणारी अशी होती. तिच्या अंगीं जी अक्कल व चातुर्य हीं होतीं तसे गुण पुरुषांचेही ठिकाणीं सांपडणें कठीण. इतकें असून तिचे अंगीं दुसरे गुणही पुष्कळ व अलौकिक होते. तिनें पुष्कळ ग्रंथ वाचले होते. तिची स्मृति फारच उत्तम असे;यामुळें तिनें जें जें वाचलें होतें तें सर्व तिच्या ध्यानांत रहात असे.तिनें अभ्यास करून वैद्यक,इतिहास व दुसरीं शास्त्रें यांची माहिती करून घेतली होती; तसेंच गायन,वादन नृत्य, वगैरे कलांतही ती फारच प्रवीण होती. कविता करण्याच्या बाबतींत तर त्या वेळच्या मोठमोठ्या कवींनासुद्धां तिची बरोबरी करतां येत नव्हती.

वजिराचा या कन्येवर फारच लोभ असे. व तीही त्या लोभास योग्य होती. तीं दोघें एक दिवस मोठ्या प्रेमानें बोलत बसलीं असतां, शाहजादी आपले बापास म्हणाली, ‘ बाबा, माझें आपणां-पाशीं एक मागणें आहे तें आपण कृपा करून पुरें केलें पाहिजे.’वजि-रानें उत्तर केलें कीं, ‘ बेटा, तुझें मागणें योग्य व रीतीचें असल्यास मी नाहीं म्हणणार नाहीं. ’ मुलगी म्हणाली ‘ बाबा, माझी मागणी योग्य आहे, याविषयीं तर शंकाच नाहीं,व मी आपणांजवळ कोणत्या हेतूनें मागणें मागतें, हें आपणांस समजल्यावर आपणही मागणें अयोग्य आहे असें कदापि म्हणणार नाहीं, अशी माझी पक्की खात्री आहे. या शहरांतल्या लोकांवर पातशहानें जो हा जुलूम चालवला आहे, तो बंद करून हजारों हजार आयांस आपल्या लेकींविषयीं जो

हृद्रोग लागला आहे, तो नाहींसा करावा असें माझें मनांत आहे.' वजीर बोलला, 'बेटा, तुझा उद्देश तर फारच योग्य व तारीफ करण्यासारखा आहे खरा, पण मला वाटतें हा अनर्थ बंद होणें अशक्य आहे. बरें, तूं कोणत्या उपायानें हा उद्देश सिद्धीस नेणार तें ऐकूं दे तर खरें'! शाहजादी म्हणाली, 'बाबा, पादशहास लग्नाकरितां नित्य नवीन स्त्री देण्याचें काम तुम्हांकडे आहे तर राणीपणाचा मान मला प्राप्त होईल असें आपण करावें, अशी आपल्या पायांशीं मज गरिबाची विनंति आहे.' हें तिचें भाषण ऐकून वजीर फार चकित झाला, आणि म्हणाला कीं, 'मुली, तुला वेड लागलें कीं काय, तूं मला अशी गोष्ट विचारतेस ती? एक बायको एक रात्र जिवंत ठेवून दुसरे दिवशीं सकाळीं तिला ठार मारावयाचें, अशी पादशाहानें शपथपूर्वक प्रतिज्ञा केली आहे, ती तुला ठाऊक आहेना? या तुझ्या अविचारी परोपकारबुद्धीनें तूं कोणत्या अनर्थांत पडशील याचा नीट विचार कर.' हें ऐकून त्या सुशील कन्येनें उत्तर केलें, 'बाबा, रागावूं नका. मी सर्व विचार केला आहे. मी जर या प्रयत्नांत मेलें, तर चांगली गोष्ट करण्याच्या कामांत मेल्यानें मला पुण्य व कीर्ति हीं प्राप्त होतील; आणि जर ईश्वरकृपेनें मला या कामांत यश आलें, तर सर्व देशावर माझ्या हातून मोठा उपकार होईल.' वजीर बोलला कीं, 'पोरी, तूं पाहिजे तितकी बोललीस तरी, मी तुला या आगींत उडी टाकावयास अनुमोदन देईन अशी भ्रांति मनांत काडीमात्रसुद्धां बाळगूं नको. पादशाहानें तुझ्या उरांत कट्यार मारण्याविषयीं मला आज्ञा केली म्हणजे ती मला मान्य केली पाहिजे, आणि तसें करतांना माझ्या मनाची काय स्थिति होईल बरें? मुली, तुला मृत्यूचें भय वाटत नसलें तरी तुझा वध केल्याबद्दल मरेतोंपर्यंत जो मला खेद व दुःख होईल त्याचें तरी मनांत भय बाळग!' इतकें वजीर बोलला तरी शाहजादी आपला नाद सोडीना. तेव्हां तो पुनः म्हणाला कीं, जर असा हट्ट करशील तर मला राग येईल. पोरी, तूं इतकी

जिवावर उदार कां झाली आहेस ? पुढील परिणामाचा विचार न करतां जे लोक न झेपण्याजोगें अवघड काम हातीं घेतात त्यांच्या हातून तें काम नीटपणें तडीस जात नाहीं. एक घोडा सुखानें दिवस घालवीत असतां त्यानें आपल्या अविचारानें आपणा स्वतःला दुःखांत पाडून घेतलें. त्यासारखी तुझी अवस्था होईल असें मला वाटतें.' शाहजादी बापास म्हणाली, ' बाबा, त्या घोड्यास कोणतें संकट प्राप्त झालें ? ' तेव्हां वजीर म्हणाला, ' तूं ऐकत असलीस तर, ती गोष्ट मी तुला सांगतों—

## एक शेतकरी, त्याचा घोडा व त्याचा बैल यांची गोष्ट.

एक श्रीमंत सावकार होता. त्याच्या पुष्कळ वाड्या होत्या. त्या वाड्यांत त्याचीं पुष्कळ गुरें व घरें असत. आपण एके वाडींत राहून तेथच्या शेतांची वगैरे स्वतः देखरेख करावी, अशी त्याच्या मनांत लहर येऊन, आपलीं बायकामुलें घेऊन त्या वाडींत तो जाऊन राहिला. त्या सावकारास कोणा सिद्धाच्या प्रसादानें सर्व जनावरांच्या भाषा समजत असत. परंतु त्या सिद्धाचें त्यास असें सांगणें होतें कीं, ' तूं त्या भाषांचा अर्थ कोणास सांगूं नये; सांगितलास तर लागलीच मरशील. ' या प्रतिबंधामुळें, त्यास जें कळे तें तो कोणासही सांगत नसे.

त्या सावकाराच्या वाडींतल्या घरांत एक घोडा व एक बैल अशीं दोन जनावरें एकाच पडवींत बांधलेलीं असत. घोड्याचें नांव खंड्या व बैलाचें नांव गोट्या होतें. एके दिवशीं त्या पडवीच्या ओटीवर मुलें इकडेतिकडे उड्या मारीत होतीं. सावकार, त्यांची मौज पहात बसला असतां,त्याने बैल व घोडा यांचा पुढील संवाद ऐकला. बैल घोड्यास म्हणतो, ' काय रे खंडोबा, अहाहा ! किती तरी तुला सुख ! तुजसारखा नशिबाचा पुतळा तूंच. तुला मेहनत फारच थोडी

पडते; बहुतकरून उगीच बसलेला असतोस. मोतद्दार तुला नित्य खाजवितो, तुझें अंग रगडतो, व तुला स्वच्छ ठेवतो, तुला खायला दररोज पुष्कळ चांगले निवडलेले हरभरे, व चांगला कडबा मिळतो, प्यावयास चांगलें स्वच्छ पाणी असतें. आपल्या धन्यास कधीं एकादे वेळीं कोठें जावें लागलें तर काय तें त्याला पाठीवर घेऊन न्यावयाचें तुला काम; तेवढें नसलें तर तूं अगदीं रिकामा. पण माझें नशीब पहा किती खराब आहे तें ! गड्या, तुला जितकें सुख तितकें मला दुःख आहे ! पहांट झाली ना झाली, म्हणजे गडी मला सोडून नांगरास जुंपतो, आणि तेव्हांपासून काळोख होईपर्यंत मला एकसारखा राबवतो. या कामानें मी असा थकून जातो कीं, रात्रीं येथें आल्यावर, मला उभें राहण्याचेंसुद्धां सामर्थ्य रहात नाहीं ! मी नांगर ओढीत असतां, गडी माझ्यामागें उभा राहून एकसारखें मला असुडानें बडवीत असतो. आर लागून लागून माझ्या शेपटीचें कातडेंसुद्धां किरे उरलें नाहीं! बरें, इतकी मेहनत करून घरीं आल्यावर मला कुठले भिकार किडके थोडेसे मठ देतात. त्यांत निम्मे तर खडे असतात; व चिपाडांच्या पेंढ्या मजपुढें झुगारून देतात. याप्रमाणें दगड, माती भरून पोट जाळणें झाल्यावर, मला सगळ्या रात्रभर शेणांत लोळावें लागतें. आणि तशांत पहाटेस झोंप लागते न लागते तों द्वाड गडी माझ्या बोकांडीं बसण्यास येतो. यावरून दादा, तूंच पहा मला किती दुःख आहे तें ! तुझ्यासारखें मला असतें, तर फार चांगलें झालें असतें.'

बैल बोलत असतां घोडा मध्यें कांहींच बोलला नाहीं. मग त्याचें सर्व बोलणें संपल्यावर, तो त्यास म्हणाला, 'अरे, लोक मूर्खास बैलाची उपमा देतात, ती खोटी नाहीं; अगदीं खरी आहे. तूं बेट्या फारच भोळवट आहेस. तुला वाटेल तिथें नेलें तरी जातोस; तुला वाटेल तें केलें तरी करूं देतोस; कांहींच अभिमान दाखवीत नाहींस; मग दुसऱ्याकडे काय बोल आहे ? अरे वेड्या, तूं इतका अपमान सोसतोस, त्याचें तुला काय फळ ! दुसऱ्यास स्वस्थ बसावयास

सांपडावें, त्याच्या ख्यालीखुशाली चालाव्या; त्यास पैसा मिळावा; म्हणून तूं रात्रंदिवस मरतोस आणि ते शेठ तुला फुकाचे गोड शब्दसुद्धां बोलत नाहींत कि रे? पण मी तुला खचित सांगतों कीं, तूं जसा बळकट आहेस तसा कडवा जर असतास, तर ते तुझ्याशीं असें कधीं वागतेना. तुला पडवींत ते जेव्हां बांधूं लागतात, तेव्हां अशी भळूसारखी मान कां पुढें करतोस? नाठाळपणा कां करीत नाहींस? देवानें आपल्याकडून तुला शिंगें चांगलीं दिलीं आहेत. तूं त्यास मारीत कां नाहींस? आणि इकडे-तिकडे नाचून, फुसकारून, राग आल्याचें चिन्ह कां दाखवीत नाहींस? ते जवळ आले, म्हणजे मोठ्यानें ओरडून त्यांस भेडवावें. तसें करण्यास तुला काय झालें? तुला लोकांनीं पीडा देऊं नये,तुझा मान रहावा, म्हणून देवानें तुला सर्व कांहीं दिलें आहे; पण तूं मूर्ख पडलास, त्या साधनांची बरोबर योजना करीत नाहींस, हा दोष कोणाचा? तूं म्हणतोस, ते मला कुचके मठ व चिपाडें खावयास घालतात, पण तूं तीं खातोस कां? उगीच हुंगावीं आणि टाकून द्यावीं; अगदीं खाऊं नयेत, म्हणजे झालें! मग ते आपणच चांगलें खाणें तुला आणतील. मीं तुला हा उपदेश केला, याप्रमाणें जर वागशील तर तत्काळ तुझ्या स्थितींत भेद पडेल, व तूं त्याबद्दल माझे उपकार मानशील.' हें घोड्याचें बोलणें त्यास चांगलें मानवलें आणि त्याचा त्यानें मोठा उपकार मानला. तो म्हणाला, 'गड्या रे खंडोबा, तूं जसें सांगितलेंस, तसा मी वागतों. तूं पहा बरें, मी कांहीं तरी चुकतों काय?' याप्रमाणें परस्परांशीं भाषण करून ते उगीच राहिले. त्या भाषणांतला एकूण एक शब्द ओटीवर सावकार बसला होता त्याच्या कानीं पडला.

दुसऱ्या दिवशीं पहांटेस येऊन, गड्यानें बैलास सोडून नांगरास जोडला, आणि दररोजच्याप्रमाणें तो त्यास खपवूं लागला. पण बैल घोड्याचा रात्रीचा उपदेश विसरला नव्हता. तो त्या दिवशीं नीट काम करीना. त्यानें सारा दिवसभर पराकाष्ठेची नाठाळी केली; व गड्यास मनस्वी त्रास दिला. संध्याकाळीं घरीं आणून गडी गोठ्यांत

आंत बोलावलें; व तिच्या आईबापांस व दुसऱ्या नातलग मनुष्यांस बोलावणीं पाठविलीं. नंतर तीं सर्व येऊन त्यांस बोलावण्याचें कारण समजल्यावर त्यांनीं तीस पुष्कळ सांगितलें कीं, 'तूं हट्ट करतेस हा बरोबर नाहीं.' पण ती ऐकेना. ती म्हणाली कीं, 'मी मरेन, पण नवऱ्याचा अभिमान सिद्धीस जाऊं देणार नाहीं!' मग तिच्या आईबापांनीं तिला एकीकडे नेऊन पुष्कळ उपदेश केला, व विनवणी केली; पण कांहींएक उपयोग झाला नाहीं. आपली आई रडते, हें पाहून सगळीं मुलें रडूं लागलीं. सावकाराचा बायकोवर फारच जीव होता; यास्तव तोही वेडयासारखा झाला. त्यास कांहीं सुचेना. तिला वांचविण्यासाठीं आपला जीव धोक्यांत घालण्याच्या बेतांत तो आला.

वजीर शाहजादीस सांगतो–मुली, त्या सावकाराचे घरीं पन्नास कोंबडया व एक कोंबडा होता, व एक कुत्रा होता. तो कुत्रा कोणी आल्यागेल्यांची चांगली इशारत देत असे. असो. मग त्या दिवशीं सावकार फार खिन्न होऊन आतां पुढें काय उपाय करावा, असा विचार करीत ओटीवर बसला असतां आनंदानें कोंबडा आरवतांना कुत्र्याच्या दृष्टीस पडल्यावरून तो मोठ्या रागानें त्यावर धावून जाऊन त्यास बोलला, 'अरे दुष्टा कोंबड्या, मला खचित वाटतें कीं, देव तुला फार दिवस वांचूं देणार नाहीं. अरे, आज तुला इतक्या हर्षानें आरवतांना शरम वाटत नाहीं!' कोंबडा मोठया गर्वानें पंजा वर ताठ करून त्यास विचारतो, 'काय रे, आजच ही गोष्ट करावयास काय विशेष चिंता आली आहे?' कुत्रा म्हणाला, 'तुला ठाऊक नसेल तर मी सांगतों. आपली धनीण कांहीं गुप्त गोष्ट सांगण्याचा धन्याजवळ हट्ट घेऊन रुसून रडत बसली आहे. ती गोष्ट अशी आहे कीं ती धन्यानें सांगितली असतां त्यास निश्चितपणें मृत्यु येईल. यामुळें आपला धनी आज मोठया चिंतेंत पडला आहे; व तिचा हट्ट चालविण्याकरितां ती गोष्ट सांगून तो आपल्या जिवास अपाय करून घेईल. कारण त्याचा तिजवर जीव फार आहे. यास्तव ती एकसारखी रडते, हें पाहून त्याचें धैर्य सुटलेसें वाटतें. तर आम्ही सर्व

त्या फिकीरींत पडलों असतां तूं मूर्खा, मनांत कांहींच न आणतां खुशाल मौजा मारतो आहेस ! तुला लाज नाहीं रे वाटत ? '

कुत्र्याचें हें भाषण ऐकून कोंबडा त्यास उत्तर करतो, ' काय ! आपला धनी इतका मूर्ख आहे ? त्याला तर सारी एकच बायको आहे; आणि तीदेखील बधत नाहीं ? मी पाहा कसा हुशार आहे ! मला तर पन्नास बायका आहेत; पण मला पाहिजे तें मी त्यांजकडून करवतों. त्यास आपली अक्कल अंमळ खर्चूं दे, म्हणजे पाहा, तो आतां संकटांतून मोकळा होईल. ' कुत्रा विचारतो, ' तुझ्या मतें ह्यानें काय बरें करावें ? ' कोंबडा उत्तर देतो, ' याचा विचार सोपा आहे. त्यानें आपली बायको जेथें रडत बसली असेल तेथें जाऊन दारास आंतून कडी लावून घ्यावी; आणि हातांत एक चांगली काठी घेऊन चांगली मऊ करावी, म्हणजे झालें. आपल्या धन्यास याप्रमाणें करूं दे बरें ! असें केल्यावर त्याची बायको तात्काळ शुद्धीवर येईल व त्यास सांगतां येत नाहीं ती गुप्त गोष्ट ती त्यास कधीं विचारणार नाहीं. जर विचारली तर जें सांगशील तें ऐकेन ! ' हा सर्व संवाद सावकारानें लक्ष देऊन ऐकला. त्यास कोंबडयाची युक्ति खरी वाटून तो लागलाच ओटीवरून उठून हातांत चांगली काठी घेऊन बायको बसली होती तेथें गेला. पाहतो तों ती तशीच रडत होती. मग दार लावून घेऊन त्यानें तीस अशी बडवली कीं ती अगदीं बेदम होऊन ओरडूं लागली कीं, ' आतां मारणें पुरें करा. मी चुकलें. आतां पुनः तुम्हांस ती गुप्त गोष्ट कधीं विचारणार नाहीं.' मग तिच्या मूर्खपणाचा तिला पश्चात्ताप झाला, असें पाहून त्यानें तिला मारावयाचें पुरें करून खोलीचें दार उघडलें. नंतर तिचे नातलग आंत आले; आणि तिचा हट्ट गेलेला पाहून सर्वांस मोठा आनंद झाला; व बायकोस समजावण्याची चांगली युक्ति काढल्याबद्दल त्यांनीं त्या सावकाराची मोठी तारीफ केली. वजीर इतकी गोष्ट सांगून म्हणाला, ' मुली, मला वाटतें कीं, तुला त्या सावकाराच्या बायकोसारखें झोडपल्यावांचून तूं हा हट्ट सोडणार नाहींस !'

बापाचें वचन ऐकून शाहजादी म्हणाली, 'बाबा, मी आग्रह धरितें, म्हणून तुम्हांस राग येऊं देऊं नका. तुम्ही त्या बाईची गोष्ट सांगितली; त्यावरून माझें मन फिरलें नाहीं. तुम्ही माझ्या बेताच्या आड येऊं नये. याविषयीं तुमची खात्री करण्याजोग्या मला तुम्हांस पुष्कळ गोष्टी सांगतां येतील. राग येऊं देऊं नका. मी तुम्हांस स्पष्ट सांगतें कीं, माझ्या ममतेमुळें तुम्ही माझी गोष्ट ऐकत नसल्यास मी जातीनें पातशाहाकडे जाऊन आपला उद्देश कळवीन.' सारांश, मुलीचा फार आग्रह पाहून वजीर कबूल झाला आणि मुलीचा निश्चय फिरत नाहीं हें पाहून त्यास फार वाईटही वाटलें. तथापि निरुपाय होऊन तो तात्काळ पातशाहाकडे जाऊन, 'आज रात्रीं शाहजादीस आपणांकडे लग्नास आणतों' म्हणून त्यानें त्याच्या कानांवर घातलें.

वजीर आपली मुलगी आपल्या भरीस घालतो, हें पाहून पातशाहास मोठें आश्चर्य वाटून तो त्यास म्हणाला कीं, 'अरे, ही गोष्ट करावयाचें तुझ्या मनांत कोठून आलें ?' वजिरानें उत्तर दिलें, 'महाराज, ही गोष्ट मी योजिली नाहीं, तिनेंच आपण होऊन मला आपणांशीं विनंति करावयास पाठविलें आहे. आपल्याशीं लग्न झाल्यापासून होणाऱ्या अनर्थास ती भीत नाहीं. एक रात्र आपली राणी होण्याच्या मानापुढें तिला आपला जीवसुद्धां तुच्छ वाटतो आहे, यामुळें तिनें ही गोष्ट योजिली.' पातशाहा म्हणाला, 'वजिरा, तूं मनांत भलती आशा धरूं नको. तूं पक्कें समज कीं, मी दुसरे दिवशीं सकाळीं शाहजादीस मारण्याकरितां तुझ्या स्वाधीन केली असतां तुला तिचा शिरच्छेद करावा लागेल, आणि तूं मागेंपुढें करशील तर तुझें स्वतांचें डोकें जाईल, हें तुला स्पष्टपणें बजावतों याचा चांगला विचार कर.' वजिरानें उत्तर केलें, 'महाराज, आपला हुकूम बजावतांना माझें मन मागें घेईल खरें, पण तें होऊन उपयोग काय ? माझा हात आपली चाकरी केल्यावांचून कदापि राहावयाचा नाहीं. याविषयींची खात्री मजकडे लागली.' मग शाहरियारानें प्रधानाचें

बोलणें मान्य करून सांगितलें कीं, ' तुला योग्य वाटेल त्या दिवशीं शाहज़ादीस मजकडे घेऊन ये. माझी मोकळीक आहे. '

नंतर वजीर घरीं येऊन त्यानें झालेला मजकूर शाहज़ादीस कळविला. तो ऐकून एकादी अलौकिक वस्तु मिळाल्याप्रमाणें तिला हर्ष झाला; व आपली मागणी पुरवल्याबद्दल तिनें बापाचे मोठे उपकार मानले. मग बापास फार खेद होतो, असें पाहून त्याचें समाधान होण्याकरितां त्यास म्हणाली, 'बाबा, तुम्हांस वाईट वाटूं देऊं नका. या गोष्टीपासून कांहींएक वाईट होणार नाहीं, असें मला वाटतें आणि त्याप्रमाणें ईश्वराच्या कृपेनें मला यश आल्यास केवढी उत्तम गोष्ट होईल ? तसें कदाचित् न झालें तरी तुम्हांस जेव्हां माझे उद्देशाची आठवण होईल. त्या वेळेस दुःखांतसुद्धां संतोष होईल, अशी माझी पक्की खात्री आहे. '

नंतर त्या दिवशीं सगळा दिवस तिनें पादशाहाकडे जाण्याच्या तयारींत घालवला. पण तिकडे जाण्याचे पूर्वीं तिची धाकटी बहीण दिनारजादी, हिला एकीकडे बोलावून तिला ती म्हणाली, ' ताई, मीं एक मोठें काम हातीं घेतलें आहे, त्यांत मला तुझी मदत पाहिजे; तर तूं मला नाहीं म्हणूं नको. बाबा मला पातशहाची राणी करतो आहे, ही गोष्ट ऐकून तूं भिऊं नको. मी काय म्हणतें, तें सर्व ऐकून घे. मी पातशाहाच्या वाड्यांत गेलें म्हणजे त्यापाशीं विनंति करीन कीं, माझी घरीं एक लहान बहीण आहे; आपण हुकूम द्याल तर तिला बोलावून आणीन. म्हणजे ती व मी एवढी रात्र तरी एकत्र असूं. मला वाटतें कीं, पातशाहा माझें म्हणणें मान्य करील; आणि तसें झाल्यास तूं मला सूर्योदयापूर्वीं एक तास असें म्हण कीं, 'ताई, आतां लवकरच उजाडेल; तर तुला झोंप येत नसल्यास तुला ज्या पुष्कळ सुरस गोष्टी ठाऊक आहेत, त्यांपैकीं एखादी सांग, म्हणजे मी तुला सांगूं लागेन आणि या उपायानें या शहरावर सांप्रत गुदरलेला अनर्थ दूर होईल, असें मला वाटतें.' दिनारजादीनें तसें करण्याविषयीं मोठ्या आनंदानें रुकार दिला.

नंतर संध्याकाळ होऊन पातशाहाकडे जाण्याची वेळ होतांच, वजीर शाहजादीस घेऊन राजावाडयांत गेला; आणि तिला पातशाहाचे महालांत पोंचवून घरीं परत आला. नंतर शाहजादीची पातशाहाशीं गांठ पडल्याबरोबर ती हात जोडून मोठया नम्रपणें म्हणाली, 'महाराज, घरीं एक माझी बहीण आहे. तिचा माझ्यावर व माझा तिच्यावर मोठा लोभ आहे. तर माझी अशी विनंति आहे कीं तिला आज येथें निजावयाची परवानगी द्यावी; म्हणजे माझी व तिची शेवटची भेट होईल व येणेंकरून मी तिला आपली ममता दाखविली असें होईल. तर आपण मला एवढें मागणें द्यावें. 'पातशाहानें ' होय ' म्हणून दिनारजादीस बोलावणें पाठविलें, व तीही मोठया जलदीनें संकेताप्रमाणें आली.

नंतर दुसऱ्या दिवशीं संकेताप्रमाणें सूर्योदय होण्यास दोन घटिका अवकाश राहिला, तेव्हां दिनारजादी शाहजादीस हांक मारून म्हणाली, 'ताई, आतां लवकरच उजाडेल. तर झोंप येत नसल्यास तुला पुष्कळ सुरस गोष्टी येत आहेत, त्यांतली एकादी चांगली गोष्ट माझ्या कानीं पडेल; पुढें गोष्ट सांगावयास तूं कोठें आहेस ? तर आतां नाहीं म्हणूं नकोस. '

शाहजादी आपल्या बहिणीस उत्तर न देतां पातशाहास म्हणाली, ' महाराज, माझी बहीण विचारते आहे, तिचें कौतुक पुरविण्यास आपली आज्ञा आहे काय ? 'खुशाल पुरीव' असें पातशाहा बोलल्यावरून शाहजादीनें पातशाहास लक्षून पुढील गोष्ट सांगावयास आरंभ केला.

---

## सावकार आणि राक्षस यांची गोष्ट.

महाराज, एक मोठा सावकार होता. त्याजपाशीं पुष्कळ शेतें, पुष्कळ माल, व बहुत पैसा, अशी फार मोठी दौलत होती. त्याच्या पदरीं पुष्कळ गुमास्ते, कारकून, चाकर व गुलाम होते. पुष्कळ ठिकाणीं त्याची अडत असे, यामुळें त्यास कधीं कधीं अडतवाल्यांस

म्हणून स्वतः त्यांशीं बोलण्याकरितां बाहेर फिरावें लागे. एकदां अशाच प्रकारचा प्रसंग आल्यावरून तो घोड्यावर बसून दूर जावयास निघाला. वाटेनें ओसाड रानांतून जावयाचें होतें. तेथें शिधासामग्री मिळण्याची सोय नव्हती; म्हणून त्यानें एका पडशींत कांहीं दशम्या व खजूर घालून ती पडशी घोड्यावर घेतली होती. त्यास जावयाचें होतें, त्या ठिकाणीं सुखरूप पोंहचून तेथें जें काय काम होतें, तें आटपून घोड्यावर बसून घरीं परत येण्याकरितां तो निघाला.

निघाल्यापासून चवथे दिवशीं वाटेनें चालला असतां दोन प्रहरचें ऊन फार झालें, व जमीन फार तापून झळया मारीत होत्या, त्यामुळें बेजार होऊन पलीकडे झाडें दिसत होतीं, त्याखालीं अंमळ विश्रांति घेण्याकरितां तो वाटेआड झाला. तेथें एक चांगली विस्तीर्ण वडाची सांवली होती. त्या झाडाखालीं चांगला स्वच्छ पाण्याचा झरा होता, असें पाहून तो तेथें उतरला व झाडाच्या एका फांदीला घोडा बांधून पडशींतून कांहीं दशम्या व खजूर काढून तें खात झऱ्याजवळ बसला. खातां खातां तो खजुराच्या बिया आपल्या दोन्ही बाजूंस फेंकीत असे. नंतर खाणें संपल्यावर, जातीचा तो खरा मुसलमान होता, यास्तव हात, पाय व तोंड चांगलें धुऊन, गुढघे टेंकून निमाज पढत बसला. त्याचा निमाज संपला नाहीं, तो गुढघे टेंकूनच आहे, इतक्यांत एक राक्षस त्याच्या दृष्टीस पडला. त्या राक्षसानें वृद्ध मनुष्याचें रूप धारण केलें होतें, व तो अंगानें चांगला धष्टपुष्ट होता. त्याच्या हातांत एक तरवार होती. तो राक्षस या सावकाराजवळ येऊन तरवार उपसून त्यास म्हणाला, 'ऊठ; तूं जसें माझ्या मुलास मारलेंस, तसें तुला मारलें पाहिजे.' असें म्हणून त्यानें एक मोठी किंकाळी फोडली. तो बिचारा सावकार त्याचें विक्राळ रूप पाहून, व त्याचे दटावणीचे शब्द ऐकून खूप घाबरला, आणि कांपत कांपत त्यास म्हणाला, 'महाराज, आपण माझा प्राण घेतां असा मी आपला अपराध तरी कोणता केला ?' राक्षस बोलला, 'तूं जशा

माझा मुलगा मारलास तसा मी तुला मारणार.' सावकार म्हणतो, 'महाराज, मी आपला मुलगा मारीन कोठून? त्यास मी ओळखीत देखील नाहीं. फार तर काय पण तो काळा किंवा गोरा मीं कधीं पाहिलासुद्धां नाहीं! आणि ही गोष्ट होईल तरी कशी?' राक्षस म्हणतो, 'काय रे, तूं येथें आल्यावर पडशींतला खजूर काढून झऱ्याजवळ बसून खात नव्हतास? खात असतां त्याच्या दोन्ही अंगांस बिया फेंकल्या नाहींस?' सावकार म्हणतो, 'होय महाराज, आपण म्हणतां तें सर्व मीं केलें. मग नाहीं कसा म्हणूं?' राक्षस म्हणतो, 'तर मग तूंच मुलगा मारलास. कसा मारलास तें ऐक. तूं खजूराच्या बिया इकडेतिकडे झुगारीत होतास, तेव्हां तो इकडून जात होता. तों त्याच्या डोळ्यांत एक बीं जाऊन तो मरण पावला. म्हणून मी तुला मारणार.' सावकार म्हणतो, 'महाराज, क्षमा करा.' राक्षस उत्तर देतो, 'छिः, क्षमाबिमा कांहीं व्हावयाची नाहीं. अरे, ज्यानें दुसऱ्याचा जीव घेतला, त्याचा जीव घेणें योग्य नव्हे काय?' सावकार म्हणतो, 'पण मीं खचीत आपला मुलगा मुळींच मारला नाहीं; आणि कदाचित् मारला असला, तरी ती गोष्ट मीं समजून केली नाहीं; तेव्हां तिचा माझ्याकडे कांहीं अपराध येत नाहीं. याकरतां आपण मला माफी करावी. मारूं नये.' राक्षस आपला आग्रह न सोडतां म्हणतो, 'नाहीं, नाहीं, तसें होणें नाहीं; मी तुला मारणार. तूं माझा मुलगा कसा मारलास?' असें बोलून त्यानें सावकाराचा दंड धरून त्यास हिसडा दिला. तेणेंकरून तो भुईवर पालथा पडला. मग राक्षसानें त्याचें डोकें उडवण्याकरितां तरवार उगारली.

सावकार डोळ्यांस पाणी आणून 'माझ्याकडे अपराध नाहीं' असें वारंवार म्हणत होता; व मुलांमाणसांची आठवण करून शोक करीत होता; व कोणीकडून तरी राक्षसास कींव यावी, म्हणून त्याची पुष्कळ विनवणी करीत होता. त्या राक्षसानें तरवार तशीच उगारलेली ठेवून त्या सावकाराचा सर्व विलाप ऐकला. पण त्यास दया म्हणून आली नाहीं. तो त्या सावकारास म्हणतो, 'अरे, तूं काहीं

कितीही पिरपीर केलीस, तरी कांहीं उपयोग नाहीं. तूं रडून रडून डोळे जरी सुजवलेस व रक्ताचीं आसवें जरी गाळलीस, तरी तूं माझ्या मुलास मारलेंस तसें मी तुला मारल्यावांचून राहणार नाहीं!' सावकार म्हणतो, 'तुम्ही इतका आग्रह कां धरतां? माझ्यासारख्या निरपराध्याचा प्राण घेणारच, कां?' राक्षस म्हणतो, 'हूँ, मी घेणार.'

शाहजादी असें बोलत आहे, इतक्यांत उजाडलें असें पाहून, व पातशाह मोठे पहांटेस उठून निमाज पढून दरबारास जातो, हें तिला माहीत होतें म्हणून, ती उगीच राहिली. दिनारजादी मोठें आश्चर्य करून म्हणाली, 'वाहवा! गोष्ट मोठी मौजेची आहे!' शाहजादी उत्तर करते, 'ताई, पुढें जो भाग राहिला आहे तो याहीपेक्षां चमत्कारिक आहे; व पातशाहांनीं आजच्या दिवस मला वांचूं देऊन उद्यां सकाळीं गोष्ट पुढें चालवण्यास आज्ञा दिली, तर मी म्हणतें तें खरें कीं कसें तें तुला समजेल.' इकडे पातशाहास ती गोष्ट फार आवडली. मग तो आपणाशीं म्हणाला कीं, 'आज हिला वांचूं द्यावी. गोष्ट संपली म्हणजे हिला पाहिजे त्या दिवशीं मारतां येईल. आजच काय घाई आहे?' असा निश्चय करून तो निमाज पढावयास उठून गेला.

[ दुसरी रात्र. ]

दुसऱ्या दिवशीं पहांटेस सूर्योदयापूर्वीं दोन घटिका राहिल्या; तेव्हां दिनारजादी बहिणीस हांक मारून म्हणाली, 'ताई, आतां उजाडेल, तर तोंपर्यंत कालची गोष्ट पुढें चालव.' पातशहानें शाहजादी विचारीतोंपर्यंत न थांबतां आपणच तिला गोष्ट सांगण्याविषयीं आज्ञा केली; ती गोष्ट पुढें ऐकण्याची त्यासच फार उत्कंठा लागली होती तेव्हां शाहजादीनें गोष्ट पुढें सुरू केली.

सावकारानें जेव्हां पाहिलें कीं, राक्षस आपणांस मारतो, सोडीत नाहीं, तेव्हां तो त्यास म्हणाला, 'महाराज, क्षणभर दम धरून माझे दोन शब्द ऐकून घ्या. तुम्ही मला मारणार तर खरेंच, पण

मला थोडी फुरसत द्या. मी घरीं जाऊन बायका व मुलें यांस भेटून येतो, व आपल्या दौलतीचे वांटे करून त्यांस देतों, म्हणजे तीं माझ्यामागें भांडणार नाहींत. एवढें झालें म्हणजे, मी येथेंच किंवा आपण सांगाल त्या दुसऱ्या ठिकाणीं मुदतींत दाखल होईन; मग आपण पाहिजे तसें माझें करावें. एवढें मागणें मात्र आपण कृपा करून मला द्यावें.' राक्षस म्हणाला, 'पण तूं सांगतोस त्याप्रमाणें तुला सवलत दिली, तर तूं परत येशील हें कशावरून? याची मला शंका वाटते!' सावकार म्हणाला, 'माझी शपथ आपण खरी मानीत असल्यांस मी शपथ वाहून सांगतों कीं, मी संकेताप्रमाणें आपणांस भेटेन, माझें वचन कधीं टळणार नाहीं.' राक्षसानें विचारलें 'बरें, तुला किती वेळ पाहिजे?' सावकारानें उत्तर केलें, 'महाराज, मला एक सगळें वर्ष पाहिजे. त्याखेरीज माझ्या सर्व कामाची जिक-डल्यातिकडे यथास्थित व्यवस्था होणें शक्य नाहीं. वर्षानें मी मरण्यास तयार होईन व मरणाबद्दल मला कांहींएक वाईट वाटणार नाहीं. आजपासून मी बारा महिन्यांनीं आपणांस याच झाडाखालीं किंवा सांगाल तेथें भेटेन; मग आपण वाटेल तें करावें.' राक्षस म्हणाला, 'याबद्दल तूं अल्लाची शपथ वाहतोस?' सावकार म्हणाला, 'होय, वाहतों. आपणांस आणखी मी एक वेळ सांगतों कीं, आपण माझ्या शपथेवर खुशाल पूर्ण विश्वास ठेवावा. मनांत काडीइतका-देखील संशय धरूं नये.' हें भाषण ऐकल्यावर, सावकारास झऱ्या-जवळ सोडून राक्षस दिसेनासा झाला.

मनांतली भीति गेल्यावर सावकार घोड्यावर बसून वाट चालूं लागला. मृत्यूच्या दाढेंतून सुटल्याचा कांहीं अंशीं त्यास मोठा आनंद झाला होता. पण आपण शपथ वाहिली आहे, हें मनांत आठवून त्यास दुःखही झालें. तो घरीं पोंचल्यावर त्यास पाहून बायकोस व मुलांस मोठा हर्ष झाला. पण त्यांच्या हर्षाकडे कांहींच न पाहतां तो एकदम रडूं लागला. त्यावरून त्यास असें वाटलें कीं, यावर कांहींतरी मोठें संकट गुदरलें आहे. मग त्याची बायको दुःखाचें व रडण्याचें कारण

त्यास विचारूं लागली. ती म्हणाली कीं, 'तुम्हीं आला हें पाहून आम्हां सर्वांस मोठा आनंद झाला; तुम्हांस रडतांना पाहून आम्हांस मोठें दुःख वाटतें. तर कृपा करून आपल्या खेदाचें कारण आम्हांस कळवावें.' सावकार म्हणाला, 'कारण काय सांगूं? माझें आयुष्य एक वर्षभर सारें उरलें आहे!' मग त्यानें राक्षसाची गांठ पडल्याचा वृत्तांत त्यांस सांगितला, व एक वर्षाच्या अंतीं वध करून घेण्याकरतां त्याकडे जावयाची शपथ वाहिली आहे, हेंही त्यास सांगितलें.

हें दुःखकारक वर्तमान ऐकून तीं सगळीं एकदम शोक करूं लागलीं. त्याची बायको दीनवाणें रडून ऊर व तोंड बडवून घेऊं लागली, व केंस तोडूं लागली. मुलांनीं लांब लांब गळे काढून ओक्साबोक्शीं रडून मोठा आकांत करण्यास आरंभ केला. हें पाहून सावकारास गहिंवर आवरेना. यामुळें तोही त्यांबरोबर ओक्साबोक्शीं रडूं लागला! सारांश, एकाद्यानें पाहिलें असतां, त्याचें अंतःकरणच विरघळून जावें, असा त्या घरांत शोक चालला होता!

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सावकार निजून उठला, आणि तेव्हांपासून तो आपल्या दौलतीची वगैरे व्यवस्था करण्यास लागला. प्रथम त्यानें लोकांचें कर्ज वारून टाकलें. आपल्या इष्टमित्रांस जें जें योग्य वाटलें तें दिलें. पुष्कळ पैसा गरिबांस दान केला. दासदासी पदरीं पुष्कळ होत्या, त्या सर्वांस सोडचिठ्या देऊन टाकल्या, शेतें वगैरेंच्या वांटण्या करून सर्व मुलांस दिल्या. जीं त्याचीं मुलें वयांत आलीं नव्हतीं, त्यांचें प्रतिपालन करणारे नेमले. मुसलमान लोकांत लग्नाच्या वेळेस ठराव होत असतात, त्या ठरावाप्रमाणें बायकोस जें द्रव्य द्यावयाचें तें देऊन, देववलें तितकें तीस अधिक दिलें.

या सर्व कृत्यांस एक वर्ष लागलें. राक्षसाकडे जावयाचा दिवस जवळ येऊन ठेपला. मग त्यानें आपल्याकरितां एक खडा पडशींत घेतला. तो बायकोचा व मुलांचा शेवटचा निरोप घेऊं लागला. त्या वेळेस त्या सर्वांनीं जो आकांत केला, त्याचें शब्दांनीं वर्णन करतां येत नाहीं! तीं माणसें त्यांस जाऊं देईनात. तीं म्हणालीं, 'तुम्हांबरोबर आम्हीं सगळींच मरावयास येतों!' पण शेवटीं आपण यांस सोडलें

पाहिजे. उपाय नाहीं; असें पाहून तो त्यांस म्हणाला, 'अरे मुलांनो, तुम्हांस जो मी सोडतों तो मी आपल्या संतोषानें सोडीत नाहीं रे, देवाच्या आज्ञेवरून मी सोडतों. तर माझें हें उदाहरण लक्षांत घ्या, आणि जो प्रसंग आला आहे, त्यास निमूटपणें सादर व्हा. जन्मास आलेल्या प्राण्यास मरण कधींही टळत नाहीं, हें ध्यानांत घ्या.' असें बोलून घोडा पिटाळून त्यांचा विलाप ऐकूं न येईल इतका तो दूर गेला. मग मजल दरमजल कूच करीत तो नेमलेल्या दिवशीं वचनाप्रमाणें त्या वडाच्या झाडाखालीं येऊन पोहोंचला, आणि घोड्यावरून खालीं उतरून त्या झऱ्याजवळ राक्षसाची वाट पहात बसला. तो तेथें बसला असतां, त्याच्या मनांत पराकाष्ठेचें भय व दुःख वाटूं लागलें, तों इतक्यांत बरोबर एक कुत्री घेऊन एक म्हातारा मनुष्य त्याकडे येत आहे, असें त्यानें पाहिलें. नंतर त्याचा व याचा सलाम झाल्यावर, तो म्हातारा म्हणाला, ' बाबा, तूं या ओसाड ठिकाणीं कशाकरितां बसला आहेस ? या ठिकाणीं पुष्कळ भुतें व राक्षस असतात. ही मोठी भयाची जागा आहे. येथें फार वेळ बसूं नये. बसलें असतां दगा हटकून व्हावयाचा. हीं झाडें पाहून येथें वस्ती असेल असें मनुष्यास वाटतें, पण हें नुसतें रान आहे. येथें फार बसल्यास उपद्रव होतो.'

सावकारनें त्यास आपण तेथें बसण्याचें कारण सांगितलें. तें ऐकून म्हाताऱ्यास मोठा विस्मय वाटला. नंतर सावकाराचें बोलणें संपल्यावर म्हातारा त्यास म्हणतो, ' तुझी गोष्ट मोठी चमत्कारिक आहे. अशी चमत्कारिक गोष्ट मीं कधीं ऐकिली नाहीं. राक्षसानें तुला मोठ्या शर्थेनें बांधून घेतलें आहे. असो. तो येईतोंपर्यंत मी येथें बसून काय होतें तें पाहणार.'*

---

*गोष्टांत दिनारजादीचें बोलणें फार वारंवार आल्यानें रसाचा विच्छेद होऊन वाचणारांस त्रास येतो. यास्तव दररात्रीं दिनारजादीचे प्रश्न घालण्याचें सोडून पुढें एकसारख्या सरळ गोष्टी लिहिल्या आहेत. पातशाहास चटक लागण्याकरितां राणी कशा चातुर्यानें गोष्टी तोडीत गेली, हें समजण्याकरितां एवढा वेळ दररात्रीं गोष्ट तोडण्याचा प्रकार चालवला होता. आतां एकदम इतकें सांगतों कीं, गोष्टींच्या नादीं लागून पातशाहानें राणीस मारण्याचा विचार एकेक दिवस लांबणीवर टाकिला.

सावकार व कुत्रीवाला म्हातारा गोष्टी करीत बसले असतां पाहतात तों दुसरा एक म्हातारा दोन काळे कुत्रे बरोबर घेऊन त्यांच्याकडे येत आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें. त्या परस्परांचे सलाम झाल्यानंतर 'तुम्ही येथें काय करीत आहां!' असें कुत्रेवाल्यानें विचारलें. त्यावरून कुत्रीवाल्यानें त्यास सावकार व राक्षस यांची गोष्ट सांगितली व सावकारानें त्यास, राक्षसापाशीं शपथ वाहिली, हेंही सांगितलें. आणखी तो म्हणाला, 'आज त्यांची गांठ पडण्याचा दिवस आहे. मी तो चमत्कार पाहण्याकरितां राक्षस येईतोंपर्यंत बसणार आहे.'

दुसऱ्या म्हाताऱ्या मनुष्यासही ही गोष्ट चमत्कारिक वाटून त्यानेंही तेथें बसण्याचा बेत केला व ते एकत्र बसून गोष्टी करताहेत तों इतक्यांत तेथें तिसरा म्हातारा मनुष्य आला. त्यानें 'सावकार असा खिन्न कां दिसतो' म्हणून त्या दोघां म्हाताऱ्यांस विचारल्यावरून त्यांनीं त्यास दुःखाचें कारण सांगितलें तें त्यास फारच चमत्कारिक वाटलें. मग पुढें काय होतें हें पाहण्याची इच्छा त्यास होऊन, तोही त्यांच्या शेजारीं बसला.

कांहीं वेळ गेल्यावर पाहतात तों, पायधुळीनें धुळीचा जसा लोट उभा राहतो, तसा धुराचा एक लोट मैदानांत उत्पन्न होऊन त्यांकडे येऊं लागला. इतक्यांत धूर नाहींसा होऊन एक राक्षस त्यांच्या दृष्टीस पडला. तो कोणाला सलाम वगैरे न करतां, तरवार उपसून सावकाराजवळ येऊन त्याचा खवाटा धरून त्यास म्हणाला, 'ऊठ; तूं माझ्या मुलास मारलेंस, तसें तुला मारूं दे.' त्या राक्षसाचें अक्राळविक्राळ रूप पाहून सावकार व तिघे म्हातारे भिऊन गेले व मोठ्यानें आक्रोश करूं लागले.

राक्षस सावकारास धरून आतां त्याचा प्राण घेतो, असें पाहून, कुत्रीवाल्या म्हाताऱ्यास त्या सावकाराची करुणा येऊन त्यानें राक्षसाच्या पायां पडून मोठ्या गरीबीनें विनंति केली कीं, 'दया करून क्षणभर राग शांत करावा; व मी थोडें बोलतों इकडें लक्ष द्यावें.

आपण आज्ञा दिल्यास मी आपली स्वतःची व ह्या माझ्या कुत्रींची गोष्ट आपणांस सांगतों. ही गोष्ट सावकाराच्या गोष्टीपेक्षां विशेष चमत्कारिक असल्यास आपण या गरिबाच्या अपराधाचा तिसरा हिस्सा माफ करावा, असें आपणांपाशीं मागणें आहे.' राक्षसानें अंमळसा विचार करून 'हो' म्हटलें.

---

## कुत्रीवाल्या म्हाताऱ्या मनुष्याची व त्याच्या कुत्रींची गोष्ट.

पाहिला म्हातारा मनुष्य म्हणाला-महाराज, मी आपली गोष्ट सांगतों; कृपा करून अवधान असूं द्यावें. ही तुम्हांला जी कुत्री दिसत आहे, ही माझी चुलत बहीण, व बायको[1] आहे. माझें इशीं लग्न झालें तेव्हां ही सारी बारा वर्षांची होती. तेव्हां वयानें व नात्यानें मी हिजपेक्षां श्रेष्ठ होतो. यासाठीं माझा मान ठेवणें हा तिचा धर्म होता. असो. आमचें लग्न झाल्यास वीस वर्षें झालीं, तरी हिला मूल झालें नाहीं. तथापि हिच्या वांझपणामुळें मी हिचे लोभांत किंवा कशांत कमी केलें नाहीं. मूल असावें म्हणून मीं एक कुणबीण मात्र ठेविली. मला तिच्या पोटीं एक मुलगा झाला. तो मुलगा चांगला होतकरू होता. या माझ्या बायकोनें त्या मुलास व त्या दासीस पाण्यांत पहावें. परंतु तो द्वेष इतका गुप्त ठेवला होता कीं, तो तिनें उगवला तेव्हांच माझ्या लक्षांत आला! पण मग लक्षांत येऊन उपयोग काय ?

इकडे माझा मुलगा बराच मोठा झाला. तो दहा वर्षांचा होता, तेव्हां कांहीं निकडीचें काम असल्यामुळें मला मुशाफरीस जाण्याचा प्रसंग आला. या वेळेपर्यंत माझा बायकोवर पूर्ण विश्वास होता. यास्तव तिला विनवून मीं सांगितलें कीं, 'मी गांवास जातों आहें; मला परत यावयास एक वर्ष लागेल; तर मी येईतोंपर्यंत माझ्यामागें ही दासी व हा मुलगा यांस तुझ्या स्वाधीन करतों. तूं यास

---

[1] अरबलोकांत चुलत बहिणीशीं लग्न करण्याची चाल आहे.

चांगलें जप. यांचे कांहीं हाल होऊं देऊं नको.' असें सांगून मी निघून गेलों. मग मी नाहीं अशी संधि पाहून माझ्या बायकोनें आपला द्वेष उगवण्याचा निश्चय केला. तिनें जादू शिकण्याचा आरंभ करून आपला दुष्ट हेतु सिद्धीस नेण्यापुरता त्या दुष्ट विद्येचा अभ्यास केला. मग त्या दुष्ट चांडाळणीनें माझ्या मुलास एकीकडे ओसाड ठिकाणीं घेऊन जाऊन आपल्या जादूच्या योगानें त्याचा गोऱ्हा केला; व त्यास घरीं आणून माझ्या माळ्याच्या स्वाधीन केला, आणि सांगितलें कीं, 'मी हा गोऱ्हा विकत आणला आहे; याला चांगलें पुष्ट कर.' इतकें करून तिचें समाधान झालें नाहीं. तिनें माझ्या दासीस जादूनें गाय करून माळ्याच्या स्वाधीन केली.

एक वर्षानंतर मी परत घरीं आलों; आणि दासी व मुलगा यांविषयीं विचारूं लागलों. त्या वेळेस तिनें मला सांगितलें कीं, 'तुमची दासी मरण पावली, व मुलगा कोणीकडे निघून गेला तें मला ठाऊक नाहीं. गेल्या दोन महिन्यांमागें तो मजजवळ होता, पण या मागल्या दोन महिन्यांत एकाएकीं नाहींसा झाला. कोठें गेला तें समजत नाहीं. दासी मेली हें ऐकून मला फार दुःख झालें. बायकोनें मुलगा मेला हें न सांगतां कोठें गेला म्हणून सांगितलें, त्यावरून तो लवकरच भेटेल, अशी मला आशा होती. परंतु आठ महिने लोटले, तरी त्याचा मागमूस कांहींच लागेना. पुढें बैरामचा[1] सण आला. त्या वेळेस मीं माळ्यास सांगून पाठविलें कीं, 'तुजपाशीं सगळ्यांत अधिक पुष्ट जी गाय असेल, ती आज बळीकरितां पाठवून दे.' त्याजवरून एक गाय त्यानें पाठविली; पण ती गाय म्हणजे माझीही दासीच होती. मीं तिचे हातपाय बांधले; आणि आतां सुरी टाकणार, तों तिनें करुणस्वरानें हंबरडा दिला. तिच्या डोळ्यांस पाणी आलेलें माझ्या नजरेस पडलें. ही गोष्ट पाहून मला विस्मय वाटला. मीं आपलें मन कितीही निष्ठुर केलें, तथापि माझ्या अंतः-

---

१ अरब लोकांत हा एक सण असे; त्या वेळेस गाईचे किंवा बैलांचे बळी देत असत.

करणांत तिजविषयीं कळवळा येण्याचा राहीना, व माझा हात तिजवर चालेना. तेव्हां ती नेऊन दुसरी गाय आणण्यास मीं माळ्यास सांगितलें.

ही सर्व गोष्ट माझ्या बायकोच्या समक्ष झाली. त्या गाईविषयीं मला दया येते, हें पाहून तिला फार राग आला. तिचा सूड उगविण्याची संधि फसते, असें पाहून ती माझ्या हुकुमास अडथळा घालून म्हणाली कीं, हा काय तुम्हीं खुळेपणा चालवला आहे ? ती गाय मारा. आपल्या माळ्यापाशीं हिच्यासारखी पुष्ट व चांगली गाय कोठें आहे? आणि तुम्ही आणावयास सांगतां कसली ? हिचाच बळी द्या ! ' बायकोच्या मर्जीखातर मी पुनः त्या गाईजवळ गेलों; पण तिनें पुनः हंबरडा दिला व डोळ्यांस पाणी आणलें. तें पाहून माझा हात पुनः चालेनासा झाला. नंतर मीं माळ्याच्या हातीं सुरा देऊन सांगितलें कीं, ' हिला एकीकडे नेऊन मार, कारण हिचें ओरडणें व अश्रू हीं पाहून माझ्यानें हिचा वध करवत नाहीं. '

तो माळी निष्ठुर मनुष्य होता. त्यानें ती गाय मारली; आणि तिचें कातडें काढून पाहतो तों, जरी ती इतकी लठ्ठ दिसत होती तरी तिच्या अंगांत नुसतीं हाडें होतीं. हें समजल्यावर मीं माळ्यास सांगितलें कीं, ' ही गाय तुला घेऊन जा; व तुला हिचें पाहिजे तें कर. तुजपाशीं चांगला लठ्ठ एखादा गोऱ्हा असला तर बरीक आण.' पुढें त्यानें त्या गाईचें काय केलें, हें मला समजलें नाहीं; पण गाय घेऊन गेल्यावर तो लवकरच एक गोऱ्हा घेऊन आला. गोऱ्हा आपला मुलगा आहे, हें मला ठाऊक नव्हतें, तथापि त्यास पाहतांच मला प्रेमाचा गहिंवर आला. त्यानेंही मी दृष्टीस पडतांच मजकडे येण्याविषयीं इतका जोर केला कीं, त्यानें दावें तोडून मजपाशीं येऊन माझ्या पायांवर डोकें टेकलें. त्याच्या मनांतला भाव असा होता कीं, तेणेंकरून माझ्या मनांत दया येऊन क्रूरपणें मीं त्याचा जीव घेऊं नये. तसेंच मी तुमचा मुलगा आहे, असें मला कळविण्याविषयीं त्यानें होईल तितका प्रयत्न केला.

गाईच्या कृत्यापेक्षां ह्या गोऱ्ह्याचें कृत्य पाहून मला फारच आश्चर्य व फार कळवळा आला. माझ्या पोटांत त्या गोऱ्ह्याविषयीं पराकाष्ठेची माया उत्पन्न झाली. मग मीं माळ्यास सांगितलें कीं, 'हा गोऱ्हा घेऊन घरीं जा व यास चांगला जप; आणि याच्या ऐवजीं दुसरा गोऱ्हा बळी देण्याकरितां लवकर घेऊन ये.'

माझ्या तोंडचे हे शब्द ऐकून माझी बायको मोठ्या रागानें मला बोलली, 'अहो, तुम्ही आज हें काय आरंभलें आहे? अहो, हा गोऱ्हा मारा. माझें ऐका. चांगला गोऱ्हा राखून ठेवून वाईट देवास द्यावा, ही कोठली नवीनच चाल काढलीत?' मी तिला उत्तर केलें, 'अग, तो गोऱ्हा मी मारणार नाहीं त्यास वांचवणार. तूं उगीचच आग्रह धरूं नको. त्या दुष्ट कृत्येचा माझे मुलावर फार दांत होता; यासाठीं माझ्या मर्जीकडे अगदीं लक्ष न देतां तिनें मला फारच आग्रह केला; तेव्हां तिच्या मर्जीकरितां मी त्याचें हातपाय बांधून त्यास मारण्यास सिद्ध झालों आणि त्यावर सुरा उगारला.

राक्षसराज, मी हातांत सुरा घेऊन त्या गोऱ्ह्यास मारणार, तों त्यानें डोळ्यास आंसवें आणून मजकडे अशा दीन मुद्रेनें पाहिलें कीं, तेणेंकरून मला पराकाष्ठेचा गहिंवर येऊन माझ्या हातांतून उगारलेला सुरा गळून खालीं पडला. मग मी बायकोस निक्षून सांगितलें कीं, 'मीं हा गोऱ्हा मारीत नाहीं; याचे ऐवजीं मी दुसरा मारीन.' माझें मन फिरण्याकरितां तिनें हवा तितका यत्न केला; पण मी तिचें ऐकलें नाहीं. तिचा थोडासा संतोष रहावा, म्हणून तिला असें मात्र सांगितलें कीं, 'मी आज यास मारीत नाहीं, पुढल्या एखाद्या सणाच्या दिवशीं मारीन.' असें बोलून तो गोऱ्हा मी माळ्याच्या घरीं परत पाठविला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं माळी मजकडे येऊन म्हणाला, 'महाराज आपणांशीं मला एकांतीं कांहीं बोलावयाचें आहे' त्यावरून त्यास मी एकीकडे घेऊन गेल्यावर तो बोलला कीं, 'मी कांहीं आनंदाची

बातमी आपणांस सांगण्याकरितां आलों आहें व तीबद्दल आपण माझे उपकार मानाल, अशी माझी खात्री आहे. मला एक मुलगी आहे. ती जादूची विद्या जाणते. काल तुमच्यानें जो गोऱ्हा मारवेना, तो घेऊन मी घरीं गेलों; त्यास पाहून माझी मुलगी हांसली व थोडथा वेळानें ती रडूं लागली; म्हणून मी तिला विचारलें कीं, 'तूं पहिल्यानें हंसलीस कां?' तिनें उत्तर केलें, बाबा, तुम्ही आतां परत जो गोऱ्हा आणलांत, हा आपल्या धन्याचा लेंक आहे, हें पाहून मला हर्ष होऊन मी पहिल्यानें हंसलें; व याच्या आईस गाय केली होती, तिला मारलें, याची मला आठवण होऊन रडायला आलें. या दोघां मायलेकांचा आपली धनीण द्वेष करते. तिनें जादूनें ह्यांस जनावरें केलीं!' माळी म्हणाला, 'असा वृत्तांत माझ्या मुलीनें मला सांगितला, तो मी आपल्या कानांवर घातला.'

महाराज, माळ्याच्या तोंडचें हें वर्तमान ऐकून मला काय विस्मय झाला असेल, तें तुम्ही आपले मनांत आणा; मी सांगत नाहीं. असो; मी तत्काळ त्या माळ्याबरोबर त्या मुलीशीं स्वतः बोलण्याकरितां त्याच्या घरीं गेलों. तेथें पोंचतांच आधीं जेथें माझा मुलगा गोठ्यांत होता, तेथें जाऊन त्यास भेटलों व त्यास गोंजारलें. प्रेमानें माझ्या गळ्यांत मिठी घालण्याचें तर सामर्थ्य त्या बापडथास नव्हतेंच.

इतक्यांत माळ्याची मुलगीही तेथें गोठ्यांत आली. तिला पाहतांच मी मोठ्या आर्जवानें तिला विचारलें, 'कां बाई, तुला या मुलास पहिल्यासारखा पुरुष करतां येईल?' तिनें उत्तर केलें, 'हो; येईल तर काय झालें?' मी तिला म्हणालों, 'येईल तर आतां त्यास पुरुष कर, म्हणजे मी तुला आपली दौलत देतों.' ती मला बोलली, 'महाराज, आपण आमचे धनी आहां; आपली चाकरी करावी हा माझा धर्म आहे; हें मी पक्कें समजतें. तथापि आपण मला दोन वचनें दिल्यावांचून आपल्या मुलाचें मी रूपांतर करणार नाहीं. एक वचन असें कीं, आपण याच्याशीं माझें लग्न करून द्यावें व दुसरें

वचन हें कीं याला ज्या कोणी जनावर केलें आहे, त्यास शिक्षा करण्याची मला परवानगी असावी.' मीं उत्तर केलें, 'पहिली गोष्ट मी मोठ्या संतोषानें कबूल करतों आणि इतकेंच नाहीं तर मी तुला स्वतः होऊन पुष्कळ दौलत देईन. तिच्यावर माझ्या मुलाचीसुद्धां सत्ता चालणार नाहीं. फार काय बोलूं! तुझे उपकार मी कसें मानतों, हें माझ्या कृतीवरूनच पुढें तुला समजेल. आतां दुसऱ्या वचनाविषयीं माझें कांहीं म्हणणें नाहीं. जिनें एवढा घोर अपराध केला, तिला शासन तर झालेंच पाहिजे. माझें म्हणणें इतकेंच आहे कीं, तूं तिचा जीव घेऊं नको. त्याखेरीज तिचें पाहिजे तें कर.' माळ्याची मुलगी म्हणाली, 'तिनें तुमच्या मुलास जसें केलें, तसें मी तिला करणार.' मीं सांगितलें, 'खुशाल कर; माझा रुकार आहे. पण आधीं तूं माझ्या मुलास मूळचें मनुष्यरूप प्राप्त करून मात्र दे.'

नंतर त्या मुलीनें पाण्यानें भरलेलें भांडें आणलें आणि तोंडानें कांहीं अक्षरें ती म्हणाली. तीं अक्षरें मला समजलीं नाहींत. नंतर गोऱ्ह्यास उद्देशून ती बोलली, 'अरे प्राण्या, जगाचा धनी व सर्वशक्ति जो परमेश्वर, त्यानें, तुझा जो आकार दिसतो आहे त्या आकारानेंच जर तुला मुळीं उत्पन्न केलें असेल तर तसाच रहा; पण मनुष्य असून जादूच्या योगानें तुला कोणी गोऱ्ह्याचा आकार आणला असला तर, तो टाकून जगदीश्वराच्या आज्ञेनें आपला पूर्वीचा मनुष्याचा आकार धारण कर.' असें म्हणून तिनें भांड्यांतलें पाणी त्यावर शिंपडतांच तो पहिल्यासारखा मनुष्य झाला!

त्यास पहातांच मीं 'मुला, माझ्या लाडक्या' असें म्हणून त्यास कडकडून भेटलों. त्या हर्षाच्या भरांत मीं काय केलें याची मला शुद्ध राहिली नाहीं! नंतर मी त्यास म्हणालों, 'बेटा, तुझ्यावर जी ही भयंकर जादू केली होती, ती काढून टाकण्याकरितां व तुझ्या आईच्या दावेदारणीचा सूड उगविण्याकरितां, देवानेंच ही मुलगी पाठविली असें मला वाटतें. मी आपल्या मुलाशीं तुझें लग्न लावून देईन, असें मीं हिला वचन दिलें आहे व तिचा उपकार सम-

जून तूंही ह्या गोष्टीस नाहीं म्हणणार नाहींस, अशी माझी खात्री आहे.' त्यानें मोठ्या आनंदानें ती गोष्ट कबूल केली. पण त्याचें लग्न होण्याच्या पूर्वीं त्या मुलीनें माझ्या बायकोस कुत्री केली ती ही कुत्री तुम्हांस दिसत आहे. तिला कुत्रीचेंच रूप देण्याचा माझा अभिप्राय होता याचें कारण असें कीं, ही कुत्री झाली असतां हिला घरांत राखतां येईल असें माझें मत होतें.

या गोष्टीस पुष्कळ वर्षें झालीं. पुढें कांहीं वर्षांनीं माझ्या मुलाची बायको वारली; त्यामुळें त्यास पुष्कळ शोक झाला; व घरांत चैन पडेना म्हणून तो नानाप्रकारचे देश पाहण्याकरितां बाहेर पडला. अलीकडे पुष्कळ वर्षांत त्याची बातमी मला कळली नाहीं, म्हणून त्याच्या शोधाकरितां मी देशोदेशीं फिरत आहें. आपल्यामागें दुसऱ्यापाशीं आपल्या बायकोस ठेवणें मला बरें न वाटल्यामुळें, मी जिकडे जिकडे जातों तिकडे तिकडे हिला आपल्याबरोबर फिरवतों. ही माझी व माझ्या कुत्रीची गोष्ट अत्यंत अद्भुत गोष्टींत गणण्यासारखी नाहीं का ?' राक्षस म्हणाला, 'तुझी गोष्ट मोठी चमत्कारिक आहे खरी व संकेताप्रमाणें या सावकारास याच्या अपराधाचा एक तिसरा हिस्सा मीं माफ केला.'

याप्रमाणें पहिल्या म्हाताऱ्याची गोष्ट संपल्यावर दुसरा म्हातारा, ज्यापाशीं दोन काळे कुत्रे होते तो, राक्षसास म्हणाला, 'मी, माझी व या दोन कुत्र्यांची गोष्ट काय झाली ती आपणांस सांगतों. ती माझी गोष्ट आतां सांगितलेल्या गोष्टीपेक्षां विशेष चमत्कारिक आहे, असें आपण म्हणाल, याविषयीं मला खात्री आहे. पण मी म्हणतों त्याप्रमाणें माझी गोष्ट आपणांस वाटल्यास आपण या सावकारास आणखी एक तिसरा हिस्सा अपराध क्षमा करावा, असें माझें आपणांस मागणें आहे.' राक्षस म्हणाला, 'बरें, कुत्रीच्या गोष्टीपेक्षां विशेष चमत्कारिक असल्यास तसें करीन.' दुसऱ्या म्हाताऱ्यानें गोष्टीस आरंभ केला.

---

# दुसरा म्हातारा व त्याचे दोन काळे कुत्रे यांची गोष्ट.

म्हातारा म्हणतो—राक्षसराज, मी व हे दोघे कुत्रे असे आम्हीं तिघे सख्खे भाऊ होतों. आमचा बाप मेला, तेव्हां आमच्या एकेकांच्या वांट्यास दहा दहा हजार रुपये आले होते. त्या मुद्दलावर आम्ही निरनिराळा व्यापारउदीम करावयास आरंभ केला. पुढें लवकरच आम्हीं दुकानें घातलीं. आमचा सर्वांत वडील भाऊ, या दोहोंतला एक कुत्रा, यानें देशावर जाण्याचा निश्चय केला; आणि आपली सर्व जिनगी विकून त्याला हवा तो माल घेऊन तो चालता झाला.

त्यास जाऊन एक वर्ष लोटलें, तों एके दिवशीं मी आपल्या दुकानावर बसलों असतां एक गरीब माणूस दुकानाजवळ आला. मला, हा कोणी भीक मागावयाला भिकारी आला आहे, असें वाटून मी त्यास कांहीं देऊं लागलों. त्या वेळीं तो माणूस मला बोलला, 'अरे, तूं इतक्यांत माझी ओळख देखील विसरलास?' असें बोलणें ऐकून मी चपापलों; आणि बारीक दृष्टीनें पाहतां त्यास मीं ओळखलें. नंतर त्याच्या गळ्यास मिठी मारून म्हणालों, 'दादा, तुमची अशी अवस्था झाल्यामुळें तुम्हांला मीं पहिल्यानें ओळखलें नाहीं.' मग मीं त्यास दुकानांत बसवून, 'तुमची प्रकृति कशी आहे? तुमच्या व्यापाराचें कसें काय झालें?' म्हणून विचारूं लागलों. 'तुला सोडल्यापासून जीं नाना प्रकारचीं संकटें व हाल भोगावे लागले ते तुला सांगावयास लागलों तर माझें दुःख मात्र पुनः जागृत होईल; दुसरा कांहीं उपयोग व्हावयाचा नाहीं!'

नंतर लागलीच मी दुकान लावून त्यास घरीं घेऊन गेलों. मग त्यास चांगलें स्नान घालून माझ्या जवळचीं वस्त्रेंप्रावरणें दिलीं व त्यास जेवावयास बसविलें. इकडे मी आपल्या वह्या तपासून पाहिल्या, तों माझें भांडवल मूळच्या दुप्पट झालें, म्हणजे माझेपाशीं वीस हजारांचें बारदान झालें असें दृष्टीस पडलें. त्यांतले दहा हजार रुपये

मीं त्यास देऊन सांगितलें कीं, 'या भांडवलावर तुम्हीं पहिल्याप्रमाणें दुकान घाला.' त्यानेंही संतोषानें तो पैसा घेतला व तो चांगला सांवरून आम्हीं दोघे एक ठिकाणीं आनंदानें राहूं लागलों.

पुढें कांहीं दिवसांनीं माझा दुसरा भाऊ, या कुत्र्यांपैकीं दुसरा कुत्रा, त्यानेंही परमुलखांत व्यापार करावयास जाण्याच्या नादानें आपली मालमत्ता विकली. माझ्या थोरल्या भावानें व मी त्यास 'असें करूं नको' म्हणून पुष्कळ प्रकारें उपदेश केला. पण त्यानें आमचें ऐकलें नाहीं. त्यानें आपली सर्व जिनगी विकून जो पैसा आला, त्याचा त्याला जो पाहिजे होता तो माल खरेदी केला व कितीएक उदमी व्यापारास निघाले होते त्यांबरोबर तो गेला. एका वर्षाच्या शेवटीं तोही थोरल्या भावासारखा कफल्लक होऊन आला. इकडे मजपाशीं आणखी दहा हजार रुपये नवे झाले होते ते मी त्यास देऊन नवें दुकान पुनः उभारून दिलें व तेणेंकरून पूर्ववत् त्याचा धंदा चालला.

या गोष्टीला कांहीं काळ लोटल्यावर एके दिवशीं माझ्याकडे येऊन, 'आपण तिघेही गलबत करून परदेशीं व्यापार करावयास जाऊं,' असें ते म्हणूं लागले. मीं आरंभींच त्यांचें बोलणें नाकारलें. मी त्यांस म्हणालों, तुम्हीं दोघेही परदेशीं व्यापार करावयास गेलां होतां, तुम्हांस काय नफा झाला ? आणि आतां मलाच तुमच्यापेक्षां त्या गोष्टींत विशेष बरकत येईल, असा कोण जिमा घेतें आहे ?' त्यांच्या बेतांत शिरण्याविषयीं माझें मनांत यावें, म्हणून त्यांनीं मला पुष्कळ गळ घातली परंतु माझें मन वळलें नाहीं. पांच वर्षें मी नाहीं नाहींच म्हणत गेलों. परंतु ते माझा पिच्छा सोडीनात. शेवटीं त्यांनीं फारच गळ घातलीसें पाहून मीं एकदांचा रुकार दिला. पण परदेशीं जाण्याची तयारी करावयाचे वेळीं पाहतों, तों मीं दिलेल्या रुपयांपैकीं दमडीच्या कवड्यादेखील त्यांपाशीं उरल्या नव्हत्या; त्यांनीं सर्व पैसा उधळून टाकला होता! तथापि त्या गोष्टीबद्दल मी त्यांस एक चकार शब्द बोललों नाहीं. उलटे मजपाशीं साठ हजार रुपये

जमले होते, त्यांचे दोन वांटे करून त्यांस सांगितलें कीं, ‘ बाबांनो, आपण तीस हजार रुपये व्यापारांत घालूं. बाकीचे तीस हजार रुपये एका गुप्त ठिकाणीं ठेवूं. म्हणजे कदाचित् तुमच्या पहिल्या सफरीसारखी आपली हीहि सफर फसली, तरी आपला जुना धंदा करावयाला हे रुपये आपणां सर्वांच्या उपयोगीं पडतील.’ नंतर त्या प्रत्येकाला दहा दहा हजार रुपये दिले व मीं आपणांस दहा हजार ठेवले. दुसरे तीस हजार मीं आपल्या घरीं एका कोपऱ्यांत पुरून ठेवले. नंतर आम्हीं तिघांनीं आपआपल्या मालाची खरेदी केली व तिघांनीं एक स्वतंत्र गलबत केलें होतें, त्याजवर तो सर्व माल भरून, चांगला अनुकूळ वारा सुटलेला पाहून आम्हीं आपलें गलबत हांकारलें आणि दोन महिने जलमार्गानें चालल्यावर आम्हीं एका बंदरास लागून तेथें आपला माल जमिनीवर उतरला. त्या बंदरीं आमचा माल बोलतां बोलतां खपला. विशेषेंकरून मला त्या रोजगारांत इतकी बरकत आली कीं माझे एक रुपयाचे दहा रुपये झाले. मग स्वदेशीं विकण्याकरितां त्या देशाचा पुष्कळ प्रकारचा माल आम्हीं खरेदी केला. स्वदेशीं आम्ही परत येण्याकरितां आतां गलबतावर बसून निघणार,तों इतक्यांत मला समुद्राकिनाऱ्यावर एक स्त्री भेटली. ती बरीच सुरेख होती; पण तिच्या अंगावरच्या वस्त्रांच्या अगदीं चिंध्या झालेल्या होत्या. ती एकदम माझ्याजवळ येऊन माझ्या गळ्यांत हात घालून म्हणाली कीं, तुम्ही मला आपली बायको करून आपल्या बरोबर घेऊन चला, असें माझें कोंपरापासून हात जोडून मागणें आहे; नाहीं म्हणूं नका. ’ मी पहिल्यानें कबूल झालों नाहीं. परंतु ती म्हणाली, ‘ मी गरीब आहे, म्हणून तुम्हीं माझा अव्हेर करूं नका. मजपासून तुम्हांस किती उपयोग घडेल व मी कशी आहे, हें आज सांगून फळ काय ? तें सर्व परिणामीं कळेल तर माझें म्हणणें मान्य करावें. ’ अशा तिनें पुष्कळ गोष्टी सांगितल्यावरून शेवटीं माझें मन वळून मीं रुकार भरला. मी तिजकरतां चांगलीं वस्त्रें घेतलीं आणि चालीप्रमाणें तिच्याशीं लग्न

करून तिला गलबतावर घेऊन आम्ही जलमार्गानें चालते झालों. वाटेनें माझे बायकोचे अंगीं इतके चांगले गुण माझ्या दृष्टीस पडले कीं, दररोज तिजवर माझी अधिक ममता जडत चालली. इकडे माझ्या भावांनीं हयगय केल्यामुळें त्यांस या रोजगारांत माझ्यासारखा नफा झाला नव्हता; पण तो आपला अपराध न जाणतां, मला पैसा पुष्कळ मिळाला म्हणून माझा ते हेवादावा करूं लागले. त्या दाव्यानें त्यांनीं मला जिवें मारण्याची मसलत करून, एके दिवशीं रात्रीं आम्हां उभयतां स्त्री-पुरुषांस झोंप लागली असें पाहून आम्हांस समुद्रांत ढकलून दिलें. !

माझी बायको यक्षीण होती; यास्तव ती कधीं बुडून मरावयाची नाहीं, हें राक्षसराज, आपणांस ठाऊकच आहे. पण ती नसती तर मी निःसंशय मेलों असतों. मी पाण्यांत पडतों न पडतों इतक्यांत ती मला झेलून समुद्रांतील एका बेटांत घेऊन गेली. नंतर सूर्योदय झाल्यावर ती मला म्हणाली, आपण कृपा करून मला बायको केली त्याबद्दल मी तुमचा आज जीव वांचवला कीं नाहीं ? तुम्हांला आतां मी सांगतें कीं मी यक्षीण आहें. तुम्ही गलबताकडे जात होता, त्या वेळेस मी समुद्रकिनाऱ्यावर होतें व तुम्हांला पाहून तुमच्याविषयीं माझें चांगलें मत झालें. पण माझ्या मनांत तुमची परीक्षा पहावयाची होती, म्हणून मी भिकाऱ्याच्या वेषानें तुमच्याकडे बंदरावर आलें. तुम्ही मोठ्या उदारपणानें मजशीं वागलात. मी अगदीं भिकारी दिसत असतांही मला पत्करलेंत व माझें म्हणणें खरें मानिलेंत. देवानें माझ्या हातून तुमचा उपकार फिटण्याचा प्रसंग लवकर आणला, हें मोठें चांगलें झालें; पण तुमच्या भावांचा मला मनस्वी राग आला आहे. त्यांचा जीव घेतल्यावांचून माझा कोप शांत व्हावयाचा नाहीं ! '

यक्षिणीचें सर्व भाषण ऐकून मला चमत्कार वाटला. ती माझ्या अशी उपयोगीं पडल्याबद्दल मीं तिचे उपकार मानले आणि म्हणालों, ' तूं माझ्या भावांचा अपराध क्षमा कर, असें माझें तुजपाशीं पदर

पसरून मागणें आहे. त्यांनीं मला केवढाही उपद्रव केला, तरी त्यांचा प्राणघात व्हावा असें वाटण्यासारखें माझें मन निर्दय नाहीं'. मी त्यांना कसकसा उपयोगीं पडलों, हें मी तिला सर्व सांगितलें. तें ऐकून तर ती त्यांजवर फारच संतापली आणि त्वेषाच्या भरांत म्हणाली कीं, 'असें काय? तर मी आतां त्या कृतघ्न दुष्टांच्या मागें जातें आणि त्यांचा सूड उगवतें. मी त्यांचें गलबत फोडून त्यांस समुद्रांत बुडवतें.'

हें तिचें वचन ऐकून मला फार भय वाटलें.मी मग तिची विनवणी केली कीं,'तूं मजकडे पहा आणि अशी गोष्ट करूं नको. त्यांचा तूं प्राण घेतलास तर मला पराकाष्ठेचें दुःख होईल. आपला राग शांत कर. ते माझे भाऊ आहेत, हें मनांत आण. शत्रूवरही उपकारच करीत असावा अशी सज्जनांची रीत आहे.'

हें माझें भाषण ऐकून ती कांहींशी शांत झाली, आणि माझें बोलणें संपतांच तिनें मला त्या बेटांतून उचलून एका क्षणांत माझ्या घराच्या गच्चीवर आणून ठेविलें, आणि तात्काळ अंतर्धान पावली. मीं खालीं गेलों, दारें उघडलीं, व तीस हजार रुपये कोंपऱ्यांत पुरून ठेविले होते ते काढले; नंतर मी दुकानीं गेलों, आणि दुकान उघडलें. माझे शेजारचे दुकानदार, 'तुम्ही सुखरूप परत आलां; चांगलें झालें,' असें मला बोलले. कांहीं वेळानें मी घरीं परत आलों; आणि पाहतों तों हे दोन काळे कुत्रे माझ्या दृष्टीस पडले; व मला पाहतांच ते मोठ्या गरीबीनें माझ्याजवळ आले. हें पाहून मला मोठा विस्मय झाला; परंतु त्यांतला भाव माझ्या मनांत येईना. पण इतक्यांत ती यक्षीण माझ्या नजरेस पडून मला म्हणाली, 'हे दोन काळे कुत्रे पाहून तुम्हाला विस्मय वाटूं देऊं नका. हे तुमचे दोघे भाऊ.' हें वर्तमान ऐकून मला फार दुःख वाटलें. आणि त्यांचें असें हें रूपांतर कशानें झालें, म्हणून मीं तिला विचारिलें. ती म्हणाली, 'त्यांस हीं रूपें मीं आपल्या हातानें दिलीं नाहींत. मीं सांगितल्यावरून माझ्या बहिणीनें हें काम केलें. तिनें त्यांचें गलबतही समुद्रांत

करून तिला गलबतावर घेऊन आम्ही जलमार्गानें चालते झालों. वाटेनें माझे बायकोचे अंगीं इतके चांगले गुण माझ्या दृष्टीस पडले कीं, दररोज तिजवर माझी अधिक ममता जडत चालली. इकडे माझ्या भावांनीं हयगय केल्यामुळें त्यांस या रोजगारांत माझ्यासारखा नफा झाला नव्हता; पण तो आपला अपराध न जाणतां, मला पैसा पुष्कळ मिळाला म्हणून माझा ते हेवादावा करूं लागले. त्या दाव्यानें त्यांनीं मला जिवें मारण्याची मसलत करून, एके दिवशीं रात्रीं आम्हां उभयतां स्त्री-पुरुषांस झोंप लागली असें पाहून आम्हांस समुद्रांत ढकलून दिलें. !

माझी बायको यक्षीण होती; यास्तव ती कधीं बुडून मरावयाची नाहीं, हें राक्षसराज, आपणांस ठाऊकच आहे. पण ती नसती तर मी निःसंशय मेलों असतों. मी पाण्यांत पडतों न पडतों इतक्यांत ती मला झेलून समुद्रांतील एका बेटांत घेऊन गेली. नंतर सूर्योदय झाल्यावर ती मला म्हणाली, आपण कृपा करून मला बायको केली त्याबद्दल मी तुमचा आज जीव वांचवला कीं नाहीं ? तुम्हांला आतां मी सांगतें कीं मी यक्षीण आहें. तुम्ही गलबताकडे जात होता, त्या वेळेस मी समुद्रकिनाऱ्यावर होतें व तुम्हांला पाहून तुमच्याविषयीं माझें चांगलें मत झालें. पण माझ्या मनांत तुमची परीक्षा पहावयाची होती, म्हणून मी भिकाऱ्याच्या वेषानें तुमच्याकडे बंदरावर आलें. तुम्ही मोठ्या उदारपणानें मजशीं वागलात. मी अगदीं भिकारी दिसत असतांही मला पत्करलेंत व माझें म्हणणें खरें मानिलेंत. देवानें माझ्या हातून तुमचा उपकार फिटण्याचा प्रसंग लवकर आणला, हें मोठें चांगलें झालें; पण तुमच्या भावांचा मला मनस्वी राग आला आहे. त्यांचा जीव घेतल्यावांचून माझा कोप शांत व्हावयाचा नाहीं ! ’

यक्षिणीचें सर्व भाषण ऐकून मला चमत्कार वाटला. ती माझ्या अशी उपयोगीं पडल्याबद्दल मीं तिचे उपकार मानले आणि म्हणालों, ‘ तूं माझ्या भावांचा अपराध क्षमा कर, असें माझें तुजपाशीं पदर

मोठा आनंद झाला आणि ते सर्व आपआपल्या वाटेनें निघून गेले. सावकार परत घरीं येऊन आपल्या बायकोस व मुलांस भेटला. या प्रसंगीं झालेला त्यांचा आनंद वर्णन करण्यास आमची लेखणी असमर्थ आहे.

---

## मासे धरणाऱ्या कोळ्याची गोष्ट.

शाहजादी पातशाहास म्हणते—महाराज, प्राचीनकाळीं समुद्रतीरीं एके नगरांत एक कोळी रहात असे. तो फारच दरिद्री होता. त्यास आपला व बायकापोरांचा निर्वाह करण्यापुरतेंसुद्धां द्रव्य मिळत नसे. त्याचा नियम असा होता कीं, दररोज मोठ्या पहांटेस उठून मासे धरावयास समुद्रावर जावें व चार वेळ जाळें टाकून, तितक्यांत जे मासे सांपडतील, तितक्यांवर चरितार्थ चालवावा. यापेक्षां अधिक वेळ जाळें त्यानें कधींही टाकूं नये. तो कोळी एके दिवशीं मोठ्या पहांटेस उठून चांदण्यांत मासे धरण्याकरितां समुद्रावर जाऊन अंगावरचीं पांघरुणें काढून ठेवून, समुद्रांत जाळें टाकून बसला. नंतर अंमळशानें जाळें ओढून पाहतो तों, तें फारच जड असल्यामुळें पुष्कळ मासे लागलेसें त्यास वाटून त्याला मोठा आनंद वाटला. पण जाळें तीरावर ओढून आंत मासा एकदेखील नाहीं, गाढवाच्या हाडांचा सांगाडा मात्र लागला आहे, हें पाहून त्यास फारच वाईट वाटलें. नंतर त्यानें गाढव फेंकून देऊन व जाळें कितीएक ठिकाणीं तुटलें होतें, तें सांधून नीट करून पुनः समुद्रांत टाकलें, आणि ओढूं लागला; तेव्हां तें लौकर ओढत नाहींसें पाहून पुष्कळ मासे सांपडले असें त्यास वाटून पुनः मोठा संतोष झाला. आणि तीरावर जाळें ओढून आंत पहातो तों चिखलानें व वाळूनें गच्च भरलेला मोठा हारा त्याच्या नजरेस पडल्यावरून तो फारच संतापला आणि त्या खेदाच्या आवेशांत दैवास करुणस्वरानें म्हणाला, ' अरे दैवा, मजवर इतका कोप करूं नको. मला वांचव. तुजपाशीं नेहमीं दैन्य भाकीत असतां तूं मज गरिबाच्या कां बरें इतके हात धुवून पाठीस

लागला आहेस ? अरे, पोटाच्या पाठीस लागून कांहीं मिळेल म्हणून मी येथें आलों आणि तूं कांरे माझा जीव घेऊं पाहतोस ? मला या धंद्याखेरीज दुसरा धंदा पोट भरावयास नाहीं. अरे, मरेतोंपर्यंत मी मेहनत करतों; तरी माझ्या कुटुंबास ओलीकोरडी भाकरी व अंगास फाटकींतुटकीं वस्त्रें मिळण्याचींसुद्धां पंचाईत ! कोठेंच माझें तूं पुरें पडूं देत नाहींस. असें तुझें मी काय केलें आहे ? अथवा मी तुला नांवें ठेवतों, हा माझाच अपराध आहे ! भल्या मनुष्यास गांजण्यास तुला मोठा संतोष होतो ! खऱ्या व थोर मनुष्यास तूं कधीं वर डोकें काढूं देत नाहींस; असा तुझा स्वभावच आहे ! दुष्टांवर तुझी कृपा फार ! जे कुमार्गानें वागतात, त्यांस तूं नेहमीं बरकत देतोस, हें सर्वांस माहीतच आहे !'

याप्रमाणें दैवाच्या नांवानें रडून व त्याची निंदा करून त्यानें जाळ्यांतला गाळाचा हारा भिरकावून दिला व त्या जाळ्यास चिखल लागला होता, तो धुवून टाकून तिसऱ्यानें जाळें समुद्रांत टाकलें. याही खेपेस धोंडे, शिंपा, व चिखल हेच जाळ्यांत आले; मासा एकही सांपडला नाहीं. याप्रमाणें तीनदां निराश झाल्यावर तो बिचारा कोळी मनांतून खूप चिडला. त्यास कांहीं सुचेनासें झालें. तों इतक्यांत सूर्योदय झाला. तेव्हां तो जातीचा मुसलमान होता व मोठा धार्मिक असे, यामुळें त्यानें हातचें जाळें फेंकून देऊन व गुडघे टेकून निमाज पढण्यास आरंभ केला. निमाज झाल्यावर ईश्वराची नम्रत्वानें प्रार्थना करून तो म्हणाला, 'परमेश्वरा, दररोज चार वेळ मात्र जाळें मी समुद्रांत टाकतों; अधिक वेळ टाकीत नाहीं; हें तुला ठाऊकच आहे. तीन खेपा होऊन चुकल्या, पण मला माझ्या श्रमाबद्दल कांहींच प्राप्त झालें नाहीं. आतां एक खेप मात्र उरली आहे; तर त्या वेळेस तरी कृपा करून समुद्र मला अनकूळ होईल असें कर ! '

याप्रमाणें देवाची प्रार्थना करून कोळ्यानें चवथ्या वेळीं जाळें समुद्रांत फेंकलें आणि कांहीं वेळ लोटल्यावर ओढून पाहतो, तों पहिल्यासारखें तें जड लागूं लागलें. नंतर तें त्यानें तीरावर ओढून

पसरलें. त्यांत मासा तर एकदेखील नव्हता; पण पितळेचें एक भांडें त्यांत आलें होतें. त्याच्या वजनावरून तें कशानें तरी भरलें आहे, असें दिसत होतें. हातांत घेऊन पाहतो तों, त्याचें तोंड शिशानें बंद करून त्यावर मोहोर केली होती. हें पाहून त्या कोळ्यास हर्ष झाला. तो आपल्या मनांत म्हणाला कीं, 'हें नेऊन बाजारांत विकावें, आणि जो पैसा येईल त्याचें धान्य घ्यावें; म्हणजे वरेच दिवस आपला गुजरा होईल.' मग त्यानें तें भांडें उलथेंपालथें करून चोहीं-कडून पाहिलें, व आंत कांहीं वाजतें का म्हणून जोरानें हालवलें. आंतून कांहींच नाद आला नाहीं, यावरून व वरच्या मोहोरेवरून त्यास असें वाटलें कीं, या भांड्यांत कांहीं तरी अमूल्य वस्तु आहे. मग आंत काय आहे तें पहावें, म्हणून त्याजवळ एक सुरी होती तिनें तो शिश्याचा पत्रा उखळूं लागला, तों तो पत्रा सहज उखळला. नंतर मोठ्या उत्कंठेनें त्यानें तें पालथें करून हालवलें, पण आंतून कांहींच निघत नाहींसें पाहून त्यास मोठा विस्मय झाला. मग तें आपल्या पुढें ठेवून त्याकडे बारीक नजरेनें पाहतो आहे, तों एकदम धुराचा लोट निघाला;–तो इतका कीं त्या कोळ्यास भांडें टाकून दोनचार हात दूर जावें लागलें!

मग तो भांड्यांतला धूर मेघमंडळापर्यंत वर गेला; व सगळ्या समुद्रावर व तीरावर पसरला. नंतर सगळा धूर भांड्याबाहेर पड-ल्यावर तो सर्व एकत्र जमून त्याचा एक सोट बनला आणि पुनः पाहतो तों सोट नाहींसा होऊन एक डोंगरासारखा मोठा विशाळ राक्षस पुढें दिसूं लागला. त्याचें तें अक्राळविक्राळ स्वरूप व प्रचंड आकार पाहून कोळी फारच घाबरला. तो तत्काळ पळून गेला असता पण तो बिचारा पळून जातो कसचा? भयानें त्याचे हातपाय गळून गेले होते. त्याच्यानें पाऊलसुद्धां पुढें टाकवेना.

राक्षस बाहेर पडतांच '[1]सुलिमान्! हे सुलिमान्! हे पैगंबरा!

[1] सुलिमान् नामें मुसलमान लोकात एक मोठा पैगंबर म्हणजे सिद्धपुरुष होऊन गेला.

मला क्षमा कर. मी इतःपर तुझी आज्ञा मोडणार नाहीं' असें मोठ्यानें ओरडला. हे राक्षसाचे शब्द कानीं पडतांच कोळ्यास धीर आला; आणि तो राक्षसास म्हणतो, 'ए गर्विष्ठ राक्षसा, काय रे तूं बोललास? सुलिमान् पैगंबर मरून आज अठराशेंवर वर्षें लोटून गेलीं आणि आज तूं त्यास कसली हांक मारतोस? तूं कोणाचा कोण आहेस रे? अरे, तूं या भांड्यांत कसा कोंडला गेलास?'

कोळ्याचें वचन ऐकून राक्षस त्याकडे रागानें वळून डोळे वटारून त्यास म्हणतो, 'अरे, तूं मोठा दांडगा दिसतोस. पहा, "गर्विष्ठ राक्षसा" वगैरे शब्द बोलतोस, पण आपलें तोंड संभाळ; अदबीनें बोललास तर बरें, नाहीं तर पहा, माझ्याशीं प्रसंग आहे. कोळी म्हणतो, 'हो आदबीनें बोलतों. तुला सुचिन्ह सुचवणारा दिवाभीत म्हणतो म्हणजे ठीक आहे कीं नाहीं?' राक्षस विशेष चवताळून उत्तर करतो, 'कां, आदबीनें बोल म्हणून एकदां सांगितलें ना? तुझें मरण तर जवळ आलेंच आहे. जिवंत आहेस तोंपर्यंत तरी नीट बोल. तुला मी एक दान देणार आहे.' कोळी म्हणतो, 'कोणतें दान?' राक्षस उत्तर करतो, 'तुला मी मारणार आहे ही गोष्ट खरी, पण तूं सांगशील त्या रितीनें मारीन; एवढें तुला देणें देतों.' कोळी विचारतो, 'अरे, पण मी तुझा अपराध काय केला? तुला बंदींतून सोडवून तुजवर उपकार केला त्याचें हेंच काय रे बक्षीस?' राक्षस उत्तर देतों, 'हेंच. मला दुसरी गोष्ट करतां येत नाहीं व कां करतां येत नाहीं याविषयीं तुझी खात्री होण्याकरतां तुला मी आपली गोष्ट सांगतों. ऐक—

राक्षसांचें देवांशीं मोठें वैर असतें, हें तुला ठाऊक असेलच. मी त्या राक्षसांमध्यें मोठा श्रेष्ठ होतों. पुढें सुलिमान् राजा देवाच्या कृपेनें मोठा पराक्रमी झाला. त्या वेळीं त्याचा पराक्रम पाहून सर्व राक्षस भ्याले आणि त्यास शरण गेले. मी आणि मजसारिखा दुसरा एक राक्षस होता. असे दोघे मात्र सुलिमानास शरण गेलों नाहीं. हें पाहून त्या राजानें आपला मुख्य वजीर मला धरण्याकरितां पाठवला. त्यानें माझ्याशीं युद्ध करून मला धरून त्या राजापाशीं नेलें.

मी सुलिमानापुढें कैदी होऊन उभा राहिलों असतां, तो म्हणाला कीं, ' अरे राक्षसा, असा दांडगेपणा करूं नको; आपलें दुष्ट आचरण सोडून दे; आणि मला शरण ये व मी सांगतों त्याप्रमाणें वाग.' त्या वेळेस मी त्यास मोठ्या धिटाईनें असें उत्तर केलें कीं, 'मी तुझें म्हणणें ऐकत नाहीं. तुला राग आला असेल, तर तुझ्यानें होईल तें कर, जा. मी तुला शरण म्हणून कदापि येणार नाहीं व तुझा अंकित होणार नाहीं. ' याप्रमाणें माझें गर्वाचें भाषण ऐकून त्यास फार क्रोध आला. मग मला शासन करण्याकरतां त्यानें या पितळेच्या भांड्यांत मला घालून मी कदाचित् बाहेर पडेन म्हणून, त्या राजानें आपल्या हातानें हा शिशयाचा पत्रा वर बसवला व त्यानें आपली मुद्रा वर ठोकली. ह्या मुद्रेवर ईश्वराचें नांव खोदलेलें आहे. मग हें भांडें शरण आलेल्यांपैकीं एका राक्षसाच्या स्वाधीन करून त्यास त्यानें आज्ञा केली कीं, 'जा. हें भांडें समुद्रांत टाक. ' याप्रमाणें आज्ञा होतांच त्या राक्षसानें मला समुद्रांत टाकून दिलें.

ज्या वेळेस मी असा समुद्रांत पडलों, त्या वेळेस मला फारच वाईट वाटलें. नंतर मी आपल्या मनांत बेत केला कीं, 'शंभर वर्षांचे आंत जो कोणी मला या भांड्यांतून बाहेर काढील, त्यास मोठा श्रीमंत करीन व तो मेला तरी त्याची दौलत बुडूं देणार नाहीं.' पण शंभरहो वर्षें भरून गेलीं; माझें काम कोणी केलें नाहीं. नंतर पुनः मीं प्रतिज्ञा केली कीं, ' या शंभर वर्षांत कोणी मला खुला करील, त्यास पृथ्वींतलें सर्व गुप्त धन दाखवीन. ' मग त्याही शंभर वर्षांत माझी इच्छा पूर्ण झाली नाहीं. आणखी एक वेळ मीं आपल्या मनांत असा निश्चय केला कीं, ' या शंभर वर्षांत जो कोणी मला सोडवील, त्यास मोठा राजा करीन व अदृश्य रूपानें त्याच्या संनिध सर्वकाळ राहून त्याचे तीन हुकूम नित्य बजावीत जाईन; मग ते हुकूम कितीही कठीण असले तरी चिंता नाहीं. ' पण तींही शंभर वर्षें भरून गेलीं आणि मी समुद्राच्या तळीं भांड्यांत कोंडलेला जशाचा तसाच राहिलों. कोणीच माझ्या उपयोगीं पडला नाहीं. याप्रमाणें

तीनशें वर्षे लोटलीं. मीं येवढालें बक्षीस कबूल केलें असतां माझी सुटका कोणी करीत नाहीं, हें पाहून मला पराकाष्ठेचा संताप आला व संतापानें वेडा होऊन मीं शेवटीं अशी शपथ वाहिली कीं, 'इतःपर मला जर कोणी सोडवलें, तर त्या सोडवणाराचा प्राण तात्काळ घेईन. त्यास देणें म्हणून इतकेंच देईन कीं, तो सांगेल त्याप्रमाणें त्यास मारीन.' अशी मीं शपथ वाहिली. तूं मला आज सोडवलेंस, यास्तव मी तुला मारणार. तूं सर्व ऐकलेंस ? तर आतां तुला कसा मारूं तें सांग लवकर !'

हें राक्षसाचें भाषण ऐकून कोळ्यास फार वाईट वाटलें. तो आपल्या मनाशीं म्हणतो, 'अहो, काय मी नशिबाचा खोटा ! कशाला मी या असल्या कृतघ्न दुष्टावर उपकार केला !' नंतर तो राक्षसास म्हणतो, 'अरे, तुजपुढें पदर पसरून मी तुला सांगतों कीं, तूं असला अन्याय करूं नको. वेडेपणाची रागाच्या आवेशांत वाहिलेली शपथ तूं मोड आणि मजवर दया कर; म्हणजे देव तुजवर दया करील. तूं मला जीवदान दिल्यास देव तुला पुष्कळ वर्षे वांचवील.' राक्षस म्हणतो, 'तें कांहीं होणें नाहीं. तुला मारण्याचा मीं निश्चय केला आहे, तो आतां फिरणें नाहीं. तूं कोणत्या प्रकारें मरावयास इच्छितोस, तें सांग म्हणजे झालें. काय, तुला का समुद्रांत बुडवूं ? कीं चिरडून टाकूं ? कीं तरवारीनें तोडूं ? कीं खाऊं ? काय करूं तें लवकर बोल.' हें त्याचें वचन ऐकून त्या बापड्या कोळ्याच्या अंगावर कांटा आला व राक्षसाचा निश्चय पाहून त्यास फारच दुःख वाटलें. त्यास स्वतःच्या मरणाचें तादृश वाईट वाटलें नाहीं; पण त्यास तीन लहान लहान मुलें होतीं, तीं आपण मेलों असतां अनाथ होऊन अन्न अन्न करून मरतील, हें मनांत येऊन तो फारच कष्टी झाला. मग तो राक्षसास दया येण्याकरितां पुनः म्हणतो, 'अरे, माझी तुला करुणा येऊं दे. मीं तुजवर केवढा उपकार केला आहे, याचा कांहीं विचार कर.' राक्षस म्हणतो, 'अरे मूर्खा, तुला पूर्वींच मीं सांगितलें नाहीं कीं तूं मजवर उपकार केलास म्हणूनच मी तुला

मारणार ?' कोळी दीनवाणें तोंड करून उत्तर करतो, 'हा तर बाबा मोठा चमत्कार आहे. तूं मला उपकार केल्याबद्दल मारणार. अँ ? वाहवा ! अशी एक म्हण आहे कीं, अयोग्य मनुष्यावर उपकार केला असतां उपकार करणारा नाश पावतो; पण मला आजपर्यंत ती म्हण खोटी वाटत असे. माझी समजूत अशी होती कीं, ही गोष्ट घडघडीत वाईट दिसते, व असें होईल तर लोकांचा व्यवहार चालणार नाहीं. पण तुझ्याशीं प्रसंग पडल्यानें ती गोष्ट खरी आहे, असें आज माझ्याच प्रत्ययास आलें !' राक्षस म्हणतो, 'अरे, तूं उगाच वेळ कां घालवितोस ? तूं पाहिजे तितकें पांडित्य केलें तरी म्हटल्याप्रमाणें करण्यास मी कधीं चुकणार नाहीं. हें, आतां जलदी कर. सांग, तुला कसा मारूं तें बोल, बोल लवकर.'

प्रसंग गुदरल्यावर युक्ति आपोआप सुचते असें जें म्हणतात तें खरें आहे. कोळ्यानें राक्षस प्रामाणिकपणानें ऐकत नाहीं असें पाहून एक कपटयुक्ति लढविली. बरें, ईश्वराची इच्छा, अमक्या रितीनें मार हें तुला सांगण्याच्या आधीं, तुला ज्या ईश्वराच्या नांवाच्या मुद्रेनें सुलिमानानें या भांड्यांत कोंडून टाकिलें होतें, त्या ईश्वराची तुला शपथ आहे; मी तुला प्रश्न विचारतों, त्याचें खरें उत्तर दे बरें.'

ईश्वराची शपथ घातलेली ऐकून राक्षस दचकला, आणि त्यास म्हणतो, 'हं, विचार काय विचारतोस तें. आटप लवकर. मी शपथपूर्वक खरें सांगतों. विचार लवकर.' कोळी म्हणतो, 'मी तुला इतकेंच विचारतों कीं, तूं खरोखर या भांड्यांत होतास, याबद्दल देवाची शपथ वाहशील ?' राक्षस उत्तर करतो, 'हो, मी ह्यांत होतोंच मग शपथ वहावयाला काय चिंता आहे ?' कोळी पुनः म्हणतो, 'तूं शपथ वाहतोस खरा; पण बाबा, मला नाहीं तें खरें वाटत. अरे पहा, या भांड्यांत तुझें एक बोट देखील मावणार नाहीं, तो तूं सगळा ह्यांत मावशील काय ? ही गोष्ट मला खरी वाटेल कशी ! तूं मला अगदीं पोर समजतोस काय ? अशी असंभाव्य गोष्ट मला

सांगतोस ती!' राक्षस म्हणतो, 'अरे, पण मी तुला देवाची शपथ वाहून सांगतों ना, कीं, तूं मला जसा पहाताहेस असा मी या भांड्यांत होतों म्हणून. अरे, माझी एवढी शपथ देखील तुला खरी वाटत नाहीं.' कोळी म्हणतो, 'खरें पुसशील तर खरी नाहीं वाटत. तूं माझ्यादेखत त्या भांड्यांत जाईस तोंपर्यंत माझी खातरी नाहीं व्हावयाची.'

कोळी इतकें बोलून पाहतों तों राक्षसाच्या शरीराचा भराभर धूर होऊन तें नाहींसें झालें. मग तो धूर सर्व समुद्रतीरावर पहिल्या सारखा पसरला, आणि त्या पितळेच्या भांड्यांत शिरूं लागला. हळू हळू जात जात सगळा आंत गेल्यावर तत्काळ त्या भांड्यांतून शब्द निघाला कीं, 'अरे कोळ्या, कां? बघ मी आतां भांड्यांत आहे कीं नाहीं तो! आतां तरी माझें बोलणें खरें वाटतें कीं नाहीं?'

इकडे कोळ्यानें कांहीं एक उत्तर न देतां शेजारीं शिशाचा पत्रा पडला होता, तो लागलाच उचलून भांड्याच्या तोंडावर घट्ट बसवला. आणि मग मोठ्या हर्षानें राक्षसास म्हणतो, 'अरे चोरा, आतां कसा निघतोस? एवढा वेळ मी तुझी पायधरणी करून विनवण्या करीत होतों. पण माझी पाळी संपली. आतां तूं माझी पायधरणी कर! अरे, तुला कोणत्या रितीनें मारूं तें सांग लवकर. पण तुला मी मारीत नाहीं. मीं तुला जेथून काढला, त्याच समुद्रांत फेंकून देतों व या तीरावर एक घर बांधून येथें राहतों; आणि जे कोळी मासे धरावयास येथें येतील, त्यांस ताकीद करीत जाईन कीं, भांड्यांत कोंडलेला एक दुष्ट राक्षस येथें आहे; त्यास जो कोणी बाहेर काढून सोडवील, त्याचा जिव घेण्याची त्यानें शपथ वाहिली आहे; त्या दुष्टास बाहेर काढाल तर संभाळा! पहा! उगीच प्राणांस मात्र मुकाल!'

कोळ्याचें हें भाषण ऐकून राक्षसास फार त्वेष येऊन त्यानें बाहेर पडण्याकरितां पुष्कळ झटापट केली. पण सुलिमान राजाची मुद्रा वर होती तीमुळें त्याचें कांहीं चालेना. मग कोळ्यानें आपणावर

कडी चढवली असें पाहून त्यानें मनांत आणिलें कीं, ' आतां येथें मस्तीचा कांहीं उपयोग नाहीं; अकलेवर अक्कलच योजली पाहिजे. ' असा विचार करून त्यानें आपला सगळा राग गिळला; आणि विनोदस्वरानें कोळ्यास म्हणूं लागला, ' अरे गड्या, तूं बोलतोस तसें तूं कदाचित् करशील हो ! तूं मला फार भोळा दिसतोस. अरे, मी म्हणत होतों तें तुला सगळेंच खरें वाटलें ना ? अरे, आपल्यावर ज्यानें उपकार केला, त्याचा कोणी प्राण घेतो काय ? अरे वेड्या, मीं तुझी उगीच मस्करी केली; पण तुला ती सगळी खरीच वाटलीसें दिसतें ! ' कोळी म्हणतो, ' हं, हं, अरे लबाडा, आतां भला सांपडलास. कां रे आतांच तूं सर्व राक्षसांत महाप्रबल राक्षस असें म्हणत होतास ना ? आणि एका क्षणांत कसा रे असा दुर्बळ झालास ? राक्षसराज, आपण मनांत खूप समजून असा कीं, आपण कितीही गोड गोड बोललां तरी त्यापासून आपणांस कांहींएक नफा होणें शक्य नाहीं. आपणांस समुद्राच्या तळीं पुनः गेलें पाहिजे. तें आपल्या कपाळचें चुकत नाहीं. अरे दुष्टा, कृतघ्ना, माझा घात करूं नको म्हणून मीं परोपरीनें विनवणी केली; पण तूं असा पाषाणहृदय कीं, तुला माझी कांहींदेखील दया आली नाहीं ! तर तुझीही दया मला करतां येत नाहीं, समजलास !'

कोळ्यानें आपणास सोडावें, म्हणून राक्षसानें होते तेवढे उपाय केले. तो त्यास म्हणाला, ' अरे मित्रा, मी तुझ्या पायां पडून मागतों कीं, तूं या भांड्याचें झांकण एक वेळ उघड, आणि मला बाहेर येऊं दे; म्हणजे मी तुझ्या ज्या मनकामना असतील, त्या सर्व पूर्ण करीन.' कोळी उत्तर करतो, ' अरे दुष्टा, तूं केवळ कृतघ्न व विश्वासघातकी आहेस. तुझें बोलणें खरें मानून मीं तुला सोडल्यास माझ्यासारखा मूर्ख मीच. मग प्राणास मुकलों असतां काय नवल आहे ? एका यवन राजानें दुबान नामक वैद्यास जसें केलें, तसें तूं मला करण्यास कधीं चुकणार नाहींस. ती त्या राजाची गोष्ट तुला सांगावी,' असें माझ्या मनांत आहे. तर आतां तूं सावधानचित्त होऊन ती ऐक.

# एक यवन राजा व त्याचा वैद्य दुवान यांची गोष्ट.

इराण देशांतल्या जुमाननामक एका प्रांतीं एक यवन राजा असे. त्याच्या सर्वांगावर रक्तपिती उठली होती. त्या राजाच्या पदरीं बहुत मोठे मोठे वैद्य होते. त्यांनीं तो रोग घालविण्याविषयीं पुष्कळ इलाज केले. परंतु कांहीं गुण येईना, म्हणून त्या सर्व राजवैद्यांनीं हात टेकले. पुढें काय करावें हें कोणास सुचेनासें झालें. इतक्यामध्यें त्या राजाच्या प्रारब्धानें त्याच्या नगरांत दुवाननामक एक मोठा हुषार वैद्य आला.

दुवान हा केवळ प्रतिधन्वंतरीच होता. त्याची योजनाशक्ति व विद्वत्ता हीं अप्रतिम होतीं. त्यास अनेक भाषांचें ज्ञान होतें व त्यांतले वैद्यकाचे ग्रंथ अवगत होते. प्रत्येक वनस्पतीचे व प्रत्येक धातूचे गुणदोष तो पूर्णपणें जाणत असे. त्यास, नगरांतल्या राजास रोग झाला आहे व तो तेथील वैद्यांच्यानें बरा होत नाहीं, असें वर्तमान कळतांच राजास भेटण्याचा त्यानें बेत केला. नंतर कोणा गृहस्थाच्या द्वारें राजाची भेट झाल्यावर त्यानें राजास विनंती केली कीं, 'महाराज, माझ्या कानावर असें आलें आहे कीं, आपला हा रक्तपितीचा रोग आपल्या पदरच्या वैद्यांचे हातून बरा होत नाहीं; त्यांची मति अगदीं कुंठित झाली आहे; तर सरकारांनीं मज गरिबाची चाकरी मेहेरबानी करून स्वीकारल्यास आपल्यास या महाव्याधीपासून मुक्त करीन अशी मला खात्री आहे. आणखी मी अशी प्रतिज्ञा करतों कीं, पोटांत कांहीं औषध दिल्याशिवाय किंवा अंगास वरून कांहीं औषध लावल्याशिवाय मी आपणांस बरें करीन.

वैद्याचें भाषण ऐकून राजास मोठा विस्मय वाटला, व मोठा आनंद झाला. तो त्यास म्हणाला, 'वैद्यबावा, तुम्ही प्रतिज्ञा करतां त्याप्रमाणें मला गुण आल्यास मी तुमचें व तुमच्या संततीचें दारिद्र्य नाहींसें करीन व माझ्या या सर्व दरबारांत प्रिय मित्र म्हणून तुमचा

सन्मान करीन. पोटांत कांहीं औषध दिल्यावांचून किंवा वरून कांहीं औषध लावल्यावांचून माझी रक्तपिती बरी होईल अशी तर तुमची प्रतिज्ञा आहे खरी, पण मला ही गोष्ट अगदीं अपूर्व दिसते.' वैद्यानें उत्तर केलें, 'महाराज मी म्हणतों तसें करीन, अशी माझी तर पक्की खात्री आहे. परमेश्वराची कृपा असावी म्हणजे झालें. महाराज, उद्ईक आपणांस मी औषध देतों' असें बोलून वैद्य उठून गेला.

नंतर आपल्या बिऱ्हाडीं आल्यावर त्यानें एक पोकळ दांडू तयार करून त्याच्या मुठींत कांहीं औषध घातलें, व एक तऱ्हेचा एक चेंडू तयार केला आणि ते दोन्ही पदार्थ घेऊन राजसभेस येऊन राजास जमिनीपर्यंत लवून मुजरा करून तो म्हणाला, 'महाराज, माझी अशी विनंती आहे कीं, सरकारांनीं आपल्या घोड्यावर बसून एका मोठ्या मैदानांत चलावें.' राजानें तें बोलणें मान्य करून तो मैदानांत आल्यावर वैद्यानें त्यास दांडू व चेंडू देऊन सांगितलें कीं, 'आपण या चेंडूदांडूनें आपल्या सर्वांगास घाम सुटेपर्यंत खेळावें. मी या दांडूंत कांहीं औषध घातलें आहे. मेहनत करून आपले हात तप्त झाले म्हणजे त्या उष्णतेनें तें औषध पातळ होऊन आपल्या सर्व शरीरांत भिनेल. आपणांस पुष्कळ घाम आला म्हणजे खेळणें पुरें करून आपण घरीं जावें, आणि घरीं गेल्याबरोबर स्नान करावें. स्नान करतांना अंग खूप चोळावें. नंतर बिछान्यावर जाऊन स्वस्थ निजावें; म्हणजे झालें. पहांटेस उठून पहाल तों रोग नाहींसा होऊन अंग निर्मळ झालें, असें आपल्या दृष्टीस पडेल.'

नंतर वैद्यानें सांगितल्याप्रमाणें राजानें सर्व कृति केली, आणि तो दुसऱ्या दिवशीं पाहतो तों वैद्यानें सांगितल्याप्रमाणें अंग स्वच्छ झालें! हें पाहून त्यास जो हर्ष झाला तो त्याच्या मनांत मावेना. नंतर पोषाक करून तो दरबारांत आला, आणि सिंहासनीं बसून आपल्या मंत्रिमंडळास त्यानें आपलें शरीर दाखविलें. राजानें औषध घेतल्याची बातमी आदले दिवशीं त्यास लागलीच होती, त्यावरून तेही त्या दिवशीं दरबारास पहाटे आले होते. त्या सर्वांस राजा

अगदीं बरा झाला हें पाहून मोठा हर्ष झाला. कांहीं वेळानें दुवान वैद्यही राजसभेस आला, आणि राजास लवून मुजरा करून मोठ्या आदबीनें उभा राहिला. राजानें त्यास पहातांच जवळ बोलावून आपल्या हातानें आपल्या शेजारीं सिंहासनावर बसविलें व सर्व सभासदांस त्याची ओळख करून देऊन त्याची मोठी प्रशंसा केली. तसेंच त्या दिवशीं राजानें दरबारच्या सर्व लोकांस मोठी मेजवानी केली. त्या समारंभांत दुवान व राजा हे उभयता एका ताटांत जेवले. नंतर संध्याकाळच्या वेळेस त्यानें त्यास एक मोठा भरजरी पोषाक आणि एक लक्ष पुतळ्या दिल्या. दुसऱ्या दिवशीं व तिसऱ्या दिवशीं राजानें त्यांस आणखी देणग्या दिल्या. सारांश, आपण कांहीं दिलें तरी त्या पुरुषाचे आपणावरचे उपकार फिटावयाचे नाहींत, त्यास तें देणें थोडेंच आहे, असें वाटून राजा त्या वैद्याची योग्यता दिवसेंदिवस वाढवीत गेला. परंतु त्या राजाचा मुख्य प्रधान जो होता, तो मोठा लोभी, दुष्ट व परोत्कर्षासहिष्णु होता. राजा त्या वैद्यास वरचेवर देणग्या देतो व त्याचा बहुमान करतो हें पाहून व वैद्याचें वजनही दरबारांत फार वाढत चाललें हें पाहून त्याचा तो द्वेष करूं लागला. मग त्या दुष्टानें असा निश्चय केला कीं, कसें तरी करून राजाची या वैद्यावर इतराजी होईल असें केलें पाहिजे.

नंतर आपला द्वेष उगवण्याकरितां तो एक दिवस राजवाड्यांत जाऊन राजास एकांतीं गांठून म्हणाला, ‘ महाराज, आपणांस कांहीं मोठी गोष्ट सांगावयाची आहे. ’ ‘ ती गोष्ट कोणती ? ’ असा राजानें प्रश्न केल्यावरून त्यानें उत्तर केलें कीं, ‘ महाराज, ज्याची स्वामिभक्ति कसोटीस लावून पाहिली नाहीं, त्या मनुष्यावर विश्वास ठेवणें राजास बरें नाहीं; असें करणें अनर्थकारक आहे. महाराज, आपला हा दुवान वैद्य यावर आपण देणग्यांची वृष्टि करीत आहां, व त्यास दरबारांत अगदीं बरोबरीनें ठेविलें आहे; हें सर्व आपण केलें; परंतु हा मनुष्य आपल्या शत्रूंकडून आपला जीव घेण्याच्या

हेतूनें आला नसेल असें आपणाच्यानें निश्चयपूर्वक म्हणवेल काय? अशी त्याविषयीं खात्री बाळगण्यासारखी आपण त्याची कोणती प्रचीति घेतली आहे?' राजा म्हणाला, 'अरे, इतक्या धिटाईनें बोलतोस तो तुला कोणता आधार आहे? अरे, तूं कोणापाशीं व कोणाविषयीं बोलतो आहेस याचा विचार केलास? तूं सांगितलेली गोष्ट मी केवळ तुझ्याच वचनावरून खरी मानीन असें समजूं नको. प्रधान उत्तर देतो, 'महाराज, मी आपणांस जी गोष्ट सांगतों ती सबळ आधार असल्यावांचून सांगत नाहीं. तर आपणांपाशीं गरीबाची हीच विनंति आहे कीं, आपण त्या मनुष्यावर इतका विश्वास ठेवूं नये. कृपा करून थोडासा विचार करावा. महाराज, आणखी एक वेळ आपणास सांगतों कीं, 'हा दुवान वैद्य आपला स्वदेश सोडून आपल्या परकीय मुलखांत आला आहे, तो येथें राहण्याकरितां आला नाहीं; तर मी मघां जो त्याच्या मनांतला दुष्ट हेतु सांगितला तो सिद्ध होण्याकरितां तो आला आहे, अशी माझ्या मनाची पकी खात्री आहे.' राजा म्हणाला, 'छेः छेः, तुझी कल्पना अगदीं खोटी आहे. दुवान हा तूं म्हणतोस त्याप्रमाणें विश्वासघातकी व कपटी नव्हे. तो पुरुष पराकाष्ठेचा सज्जन आहे, याविषयीं मला काडीमात्र देखील संशय नाहीं; व त्यास मी जितका चाहतों, तितका दुसऱ्या कोणास चाहत नाहीं. अरे, तुला ठाऊकच आहे, त्यानें कशा प्रकारचें औषध देऊन माझी रक्तपिती दूर केली ती! अथवा त्यानें औषध कसलें दिलें तें? तें औषध नव्हे! त्यानें तो दैवी चमत्कार केला, असें मला वाटतें! त्याच्या मनांत जर माझा जीव घ्यावयाचा होता तर तो मला बरा कशास करता? त्यानें औषध दिलें नसतें, तर मी थोडया दिवसांत मेलों असतो! हा वैद्य भेटण्याच्यापूर्वी मी थोडया महिन्यांचा सोबती आहे असें सर्व लोक म्हणावयाला लागले नव्हते का? तर मी तुला सांगतों कीं, तूं भलतें भलतें सांगून त्या सज्जन मनुष्याविषयीं माझ्या मनांत विपरीत कल्पना भरवूं नको. तुझें बोलणें कांहींएक न

ऐकतां मी त्या वैद्यास लाख रुपये वर्षासन करून देणार. अरे, तुला काय सांगूं? मी आपली अर्धी दौलत, किंबहुना अर्धें राज्य इतकें जरी दुवान यास दिलें, तरी त्याचा जो उपकार माझे शिरावर आहे तो फिटणार नाहीं! प्रधाना, मला समजलें, दुवानाची योग्यता व अक्कल पाहून व त्याचा उत्कर्ष सहन न होऊन तुझ्या मनांत त्याच्याविषयीं इतका मत्सर उत्पन्न झाला आहे, आणि म्हणून तूं मला त्याच्याविषयीं अशा वाईट गोष्टी सांगत आहेस; पण समज कीं, मी अशीं भाषणें ऐकून कृतघ्नपणा कदापि करणार नाहीं. एका मनुष्यानें आपल्या दुष्ट बायकोच्या लबाड सांगण्यावरून आपलें हित करणाऱ्या एका गरीब राघूस मारून आपणांस जन्माचा पश्चात्ताप करून घेतला, ती गोष्ट माझ्या मनांत पक्की ठसली आहे; तर मी अविचारानें कदापि वागणार नाहीं.

राजाचें तें भाषण ऐकून प्रधान म्हणतो, ' महाराज, राघूची गोष्ट काय आहे ती सांगितल्यास चाकरावर मोठी मेहेरबानी होईल; पण धीटपणा करून सरकारास गोष्ट सांगण्याची विनंती केल्याचा गुन्हा गरिबास माफ असावा. ' असें प्रधानाचें नम्र वचन ऐकून राजाची मर्जी प्रसन्न होऊन त्यानें गोष्ट सांगण्यास आरंभ केला.

---

## एक मनुष्य आणि त्याचा रांवा यांची गोष्ट.

एका गांवांत एक गृहस्थ रहात असे. त्याची बायको मोठी लावण्यसंपन्न होती; तिच्यावर त्याचे पंचप्राण होते. एके दिवशीं मोठें निकडीचें काम आल्यावरून तो गृहस्थ बाहेर गेला. वाटेनें एका ठिकाणीं विकावयाकरितां पुष्कळ तऱ्हेतऱ्हेचीं पांखरें बसलीं होतीं, तीं त्यानें पाहिलीं. त्या पाखरांत एक रांवा होता. तो मनुष्यासारखें स्पष्ट भाषण करी; इतकेंच नाहीं तर त्याच्या डोळ्यापुढें जें जें घडे तें सर्व सांगण्याची त्याच्या अंगीं शक्ति होती. रांव्याच्या अंगचे गुण पाहून त्या गृहस्थानें तो पक्षी विकत घेतला; आणि त्यास एका सुंदर पिंजऱ्यांत घालून घरीं आणलें. नंतर बायकोस सांगितलें कीं,

'हा रांवा फार चांगला आहे. याचा पिंजरा आपल्या निजावयाच्या खोलींत टांग.' पुढें लवकरच कांहीं जरूरीच्या कामाकरितां त्यास गांवास जाण्याचा प्रसंग आल्यावरून त्यानें त्या रांव्यास चांगलें जपण्याविषयीं बायकोस सांगून तो निघून गेला. पुढें तो गृहस्थ परत आल्यावर त्यानें रांव्यास एकांतीं घेऊन आपल्यामागें झालेला सर्व वृत्तांत विचारला. त्या वेळेस त्या रांव्यानें सांगितलेल्या गोष्टींवरून तो बायकोस पुष्कळ रागें भरला. यावरून त्या बाईस असा संशय आला कीं, आपल्या कुणबिणींपैकीं कोणीं आपला विश्वासघात केला असावा. मग ती त्यांस बोलल्यावर त्या सर्व कुणबिनींनीं शपथ वाहून सांगितलें कीं, 'आम्हीं धन्यापाशीं तुमची चहाडी कांहींएक सांगितली नाहीं; तर त्या रांव्यानेंच कांहीं कागाळी सांगितली असावी असें आम्हां सर्वांस वाटतें. हा त्यांचा तर्क त्या स्त्रीस खरा वाटला.

नंतर नवऱ्याच्या मनांत आपणाविषयीं अंदेशा आला आहे तो घालविण्याविषयीं आणि रांव्याचा सूड उगवण्याविषयीं ती स्त्री योजना करूं लागली. मग विचार करतां करतां तिला ही पुढील युक्ति सुचली; ती येणेंप्रमाणें—तिचा नवरा कांहीं कामाकरितां पुनः परगांवीं गेला असतां तिनें आपल्या दासीस एकत्र बोलावून असें सांगितलें कीं, 'आज रात्रीं बारा वाजले म्हणजे एकीनें राघूच्या पिंजऱ्याखालीं आपल्या घरांतलें थोरलें जातें घालून तें एकसारखें फिरवावें; व दुसरीनें हजारा घेऊन त्याच्या पिंजऱ्यावर पाण्याच्या धारांचा एकसारखा वर्षाव करावा; व तिसरीनें हातांत एक मोठा आरसा घेऊन दिव्याचा कवडसा त्याच्या तोंडावर वरच्यावर पाडावा.' याप्रमाणें सांगून ती नेहमींच्याहून दुसऱ्या खोलींत त्या दिवशीं जाऊन निजली. मग दासींनीं यजमानणीच्या आज्ञेप्रमाणें सर्व तजाविजी यथास्थित केल्या.

दुसऱ्या दिवशीं गृहस्थ घरीं आल्यावर आपलेमागें झालेलें वर्तमान रांव्यास एकांतीं पाहिल्यासारखें विचारूं लागला. त्या वेळीं तो

पक्षी बोलला, ‘ महाराज, काय सांगूं ? काल रात्रीं पावसाची अशी झिमड लागली होती; व असें मोठ्यानें गडगडत होतें व विजांचा असा चकचकाट चालला होता कीं, मला सगळ्या रात्रींत झोंप लागली नाहीं व मीं जो त्रास भोगला तो सांगतां पुरवत नाहीं ! ’ गृहस्थास ठाऊक होतें कीं, त्या दिवशीं रात्रीं मुळीं पाऊस पडला नाहीं. यावरून त्यास असें वाटलें कीं, ’ रांवा आपणांस भलत्या-भलत्या खोट्या गोष्टी सांगतो व पाहिल्या खेपेसही यानें आपल्या बायकोविषयीं खोट्याच गोष्टी सांगितल्या असाव्या. ’ असें त्याच्या मनांत येऊन त्यास राघूचा मोठा राग आला; आणि त्या गरीब पक्ष्यास जमिनीवर आपटून त्यानें मारून टाकलें. परंतु पुढें शेजा-रच्या लोकांच्या सांगण्यावरून त्याची खात्री झाली कीं, रांव्यानें आपल्या बायकोविषयीं जें सांगितलें तें खोटें नव्हे. तिचें आचरण खरोखरीच वाईट होतें. हें समजल्यावर आपण त्या रांव्याचा निष्कारण प्राण घेतला, असें मनांत येऊन त्या गृहस्थास पराकाष्ठेचा पश्चात्ताप झाला.

कोळी राक्षसास म्हणतो—राजा प्रधानास याप्रमाणें गोष्ट सांगून त्यास म्हणाला, ‘ प्रधाना, दुवान वैद्यानें तुझा कांहींएक अपराध केला नसतां तूं त्याचा द्वेष करून मला नाश करावयास सांगतोस. पण मी तें ऐकून, त्या गृहस्थासारखा आपणास जन्माचा पश्चात्ताप करून घेणार नाहीं. ’

त्या दुष्ट प्रधानानें त्या गरीब वैद्याचा घात करण्याचा पक्का निश्चय केला होता. यास्तव राजा इतका निक्षून बोलला असतांही तो उगीच राहिला नाहीं. तो म्हणाला, ‘ महाराज या दुवान वैद्यास मारलें तर कदाचित् निरपराधी मनुष्यास मारलेंसें होईल, असा विचार आपण मनांत आणूं नये. आपला प्राण घेण्याचा त्याचा बेत आहे असा आरोप लोक त्यावर ठेवतात. तर हें त्याचा प्राण घेण्यास आपणांस सबळ कारण नाहीं काय ? मला तर असें वाटतें कीं, असें सबळ कारण असल्यावर मग आपणांस कोणी दोष ठेवणार नाहीं. जेथें

आपणांसारख्या राजे लोकांच्या जीव राखण्याच्या गोष्टींचा विचार असतो, तेथें संदिग्ध अपराध निश्चित अपराधाप्रमाणेंच समजला पाहिजे व असल्या ठिकाणीं अपराध्यास शिक्षा झाली तरी चिंता नाहीं, अशी राजनीति आहे. परंतु महाराज, दुबान वैद्याच्या घातकीपणाविषयीं संशय नाहीं; खात्रीच आहे. मी द्वेषानें असें बोलतों असें समजूं नये, तर मी आपला जुना चाकर, आपल्या जिवास धक्का लागूं नये, ही काळजी मला बोलवते. स्वस्थ बसूं देत नाहीं; आपण सावध न व्हाल आणि दुबान वैद्यावर विश्वास ठेवाल तर त्यामुळें आपला नाश खात्रीनें होईल. मला पक्की बातमी लागली आहे कीं, तो आपल्या शत्रूंकडून आपणांस मारावयास आला आहे. आपण म्हणतां कीं, त्यानें मला बरें केलें; पण महाराज, आपण वास्तविक बरें झालांत असें तरी कशावरून म्हणावें? तुम्हांस त्यानें औषध दिलें त्यापासून कांहीं दिवसांनीं आपणांस एकाएकीं मोठा अपाय घडणार नाहीं असें तरी कोणी म्हणावें? कारण औषधाचे गुण मोठे विचित्र असतात, हें आपणांस ठाऊकच आहे. मीं सांगावें असें नाहीं.'

यवन राजा जातीचा मूर्ख होता. त्यास त्या दुष्ट वजिराचें वास्तविक स्वरूप समजलें नाहीं. दुबान वैद्य चांगला व प्रामाणिक आहे, म्हणून त्याचा जो पहिला ग्रह होता तोही पुढें टिकला नाहीं. वजिराचें भाषण ऐकून तो मनांत एकदम दचकला.मग तो त्यास म्हणतो, ' अरे प्रधाना, तूं म्हणतोस हें मला आतां खरेसें वाटतें. तो दुष्ट वैद्य माझा जीव घेण्यासाठींच येथें कदाचित् आला असावा व आपला दुष्ट हेतु आपल्या अद्भुत औषधांनीं तो एका क्षणांत सिद्धीस नेणार नाहीं कशावरून ? तर आतां आपणांस नीट विचार करून ह्या संकटाचें निवारण लवकर केलें पाहिजे. विलंब करतां उपयोगीं नाहीं.'

राजाची वृत्ति आपणांस हवी तशी झाली, हें पाहून वजिराच्या मनांत मोठा हर्ष झाला. मग तो म्हणतो, ' महाराज, या प्रसंगीं अत्यंत शीघ्र व निश्चित उपाय म्हटला म्हणजे मला हाच सुचतो

कीं, त्या वैद्यास येथें आतां बोलावून आणावें; आणि तो आल्या-बरोबर त्याचा एकदम शिरच्छेद करावा,म्हणजे आपल्या जीवावरचें अरिष्ट गेलें. ' राजा संतोष पावून उत्तर देतो, ' शाबास ! प्रधाना, शाबास ! खाशी कल्पना काढलीस ! या ठिकाणीं हीच युक्ति आपणांस योजली पाहिजे. ' नंतर त्यांनें एका सेवकास वैद्याकडे बोलावणें पाठविलें. त्या वैद्यास इकडे झालेलें कांहींच माहीत नव्हतें, यामुळें तो बोलावण्याबरोबर मोठ्या घाईनें राजवाड्यांत आला.

त्यास पाहतांच राजा म्हणतो, ' अरे, मी तुजकडे बोलावणें कां पाठविलें हें तुला कळलें कां ? ' वैद्यानें उत्तर केलें, ' नाहीं महाराज, कळलें नाहीं. ' राजा म्हणाला, ' ' तुला बोलावून आण-ण्याचें हेंच कारण कीं, तुझें डोकें उडवून मी तुझ्या भयांतून मुक्त होणार. '

या प्रकारचें राजाचें भाषण ऐकून त्या वैद्यास जें आश्चर्य वाटलें त्याचें शब्दांनीं वर्णन करतां येत नाहीं ! तो मोठ्या नम्रतेनें राजास म्हणाला, ' महाराज, आपण माझा प्राण कां घेतां ? माझ्या हातून आपला असा कोणता अपराध घडला ? ' राजानें उत्तर केलें, 'अरे' मला अशी पक्की बातमी लागली आहे कीं, माझा प्राण घेण्याकरतां तूं येथें माझ्या नगरांत आला आहेस. पण तूं माझा प्राण घेण्यापूर्वीं मी तुझा प्राण घेऊन आपणास निर्भय करणार. ' असें बोलून शेजारी अपराध्यांचा वध करणारा मांग होता त्यास तो राजा म्हणाला, ' हं तोड त्याचें मस्तक; आणि या या दुष्ट विश्वास-घातक्याच्या भयांतून मला सुटूं दे. हा माझा नाश करण्याकरतां येथें आला आहे ! '

राजाच्या तोंडचे असे भयंकर व निष्ठुर शब्द ऐकून वैद्यास तत्काळ समजलें कीं,' अलीकडे आपणावर याची फार कृपा होती, ती सहन न होऊन कोणी दुष्टांनीं या मूर्खाचे कान भरले आहेत; यामुळें याचें मन एकाएकीं आपणावरचें फिरलें. आपण या असल्या मूर्ख व कृतघ्न मनु-ष्यास औषध देऊन रोगापासून वांचवलें, हें फार वाईट केलें, असा

त्याच्या मनांत पश्चात्ताप झाला. परंतु गोष्ट होऊन गेल्यावर पश्चात्तापाचा काय उपयोग? तो पुनः राजास म्हणाला, ' महाराज, मी आपणांस रक्तपितीपासून बरें केलें त्याचें मला हें बक्षीस काय?' पण राजानें त्याच्या बोलण्याकडे कांहीं एक लक्ष न देता मांगास पुनः हुकूम केला कीं, ' मूर्खासारखें पाहतोस काय? उडव याचें डोकें!' तेव्हां तो बिचारा वैद्य शोक करून त्या दुष्ट राजाची विनवणी पुनः करूं लागला, ' महाराज, मज गरीबावर दया करा; म्हणजे ईश्वर तुम्हांवर दया करील. मला आपण असें अन्यायानें माराल तर देव तुमचा नाश केल्यावांचून कदापि राहणार नाहीं.'–इतकी गोष्ट सांगून कोळी भांड्यांत कोंडलेल्या राक्षसास म्हणतो, ' अरे दुष्टा राक्षसा, त्या दुष्ट यवन राजानें त्या गरीब दुवान वैद्यास जसें केलें तसेंच तूं कांहीं वेळापूर्वीं मला करीत होतास. बरें. असो, आतां पुढें गोष्ट ऐक–

तो वैद्य इतकी विनवणी करीत असतां तिकडे कांहीं लक्ष न देतां राजानें निष्ठुरपणें त्यास उत्तर दिलें कीं, ' छेः छेः, तें कांहीं होणें नाहीं, मला तुझा जीव घेतलाच पाहिजे. तुला वांचूं दिल्यास तूं जसें चमत्कारिक रीतीनें मला बरें केलेंस, तसाच चमत्कारिक रीतीनें माझा कदाचित् जीव घेशील.' हें भाषण ऐकून वैद्यास रडें कोसळलें व राजाचा निर्दयपणा पाहून त्यानें पुष्कळ शोक केला. शेवटीं तो निरुपाय होऊन मरावयास सिद्ध झाला. मग मांगानें त्याचे डोळे व हातपाय बांधून तरवार उपसण्याकरितां तिच्या मुठीस हात घातला.

ह्या प्रसंगीं त्या सभेंत जे मोठमोठे लोक होते, त्यांस त्या गरीब वैद्याची करुणा येऊन त्यांनीं हात जोडून राजाची प्रार्थना केली, ' महाराज, हा मनुष्य निरपराधी आहे; यावर कांहीं गुन्हा शाबीत झाला, तर याचा निवाडा आम्ही करूं. तर सरकारांनीं कृपा करून यास जीवदान द्यावें, म्हणजे आम्हांवर अक्षय्य उपकार महाराजांनीं केलेसे होतील.' अशी त्यांनीं विनवणी केली, पण राजानें क्रोधयुक्त मुद्रेनें त्यांस दटावल्यावरून ते बिचारे उगीच बसले.

दुवान वैद्याचे डोळे व हात बांधले आहेत, तो गुडघे टेंकून खालीं

मान घालून राहिला आहे, व मांग आतां तरवारीचा घाव घालणार, इतक्यांत राजाची एक वेळ प्रार्थना करून तो म्हणाला, 'महाराज, आपण मला मारतां ? सोडीत नाहीं? असो. ईश्वरेच्छेपुढें काय उपाय आहे ! पण आपण कृपा करून इतकें तरी मला द्यावें; आतांच माझा वध करूं नये. आजचा दिवस आपण मला जीवदान देऊन उद्यां करणें तें करावें. म्हणजे तितक्या वेळांत मी घरीं जाऊन दानधर्म करीन; मुलांमाणसांचा शेवटचा निरोप घेऊन आपल्या मूठमातीविषयीं त्यांस सांगणें तें सांगेन व मजजवळ पुष्कळ पुस्तकें आहेत, तीं ज्यांच्या ज्यांच्या उपयोगीं पडावयासारखीं असतील त्यांस देईन. त्या सर्व पुस्तकांत एक पुस्तक आहे, तें फारच चांगलें आहे, त्यांत अनेक प्रकारचीं उत्तम औषधें लिहिलीं आहेत, तें आपल्या पायापाशीं सादर करीन; तें कृपा करून सरकारांनीं आपल्या संग्रहास ठेवावें.' राजानें विचारलें कीं, 'तूं जें पुस्तक वाखाणतोस त्यांत चांगलेपणा काय आहे ?' वैद्यानें उत्तर केलें, 'महाराज, त्यांत बहुत चमत्कारिक गोष्टी लिहिल्या आहेत. त्यांतली मुख्य गोष्ट ही कीं, माझें शिर तोडल्यावर आपण त्या पुस्तकाचें सहावें पान उलटून त्यांतली तिसरी ओळ वाचली असतां आपण विचाराल तितक्या प्रश्नांचीं उत्तरें माझें शिर देईल.' हें ऐकून राजास मोठें आश्चर्य वाटलें व तो चमत्कार पाहण्यासाठीं वैद्यास मारणें त्या दिवशीं तहकूब करून त्याबरोबर चांगला पाहरा देऊन राजानें त्यास घरीं पाठविलें.

नंतर घरीं गेल्यावर जी व्यवस्था करावयाची होती ती सर्व त्यानें केली. इकडे उद्यां राजसभेंत मोठा चमत्कार होणार आहे, अशी बातमी सगळ्या शहरांत पसरल्यावरून दुसऱ्या दिवशीं सर्व अमीरउमराव, शेटसावकार, वगैरे तमाम लोक मौज पाहण्याकरितां राजाच्या कचेरींत आले.

पुढें लवकरच दुवान वैद्य दरबारांत आला. त्याच्या भोंवतालीं शिपायांचा पाहरा होता व त्याच्या हातांत एक मोठें पुस्तक होतें. नंतर तो तसाच राजाच्या सिंहासनाजवळ जाऊन म्हणाला, 'महाराज, एक

मोठें ताट आणवावें' मग त्या ताटावर पुस्तकाचें वेष्टन पसरून त्यानें पुस्तक राजाच्या हातीं दिलें. आणि म्हणाला, 'महाराज, माझें मस्तक कापल्याबरोबर तें या ताटांतल्या वेष्टनावर ठेवावें. तेथें ठेव-ल्याबरोबर त्यांतून रक्त वहावयाचें बंद होईल. नंतर आपल्या हातचें पुस्तक उघडून त्यास प्रश्न करावे. म्हणजे तें त्यांचीं उत्तरें तत्काळ देईल. पण महाराज, आणखी एकवेळ सरतेशेवटींची आपणांस प्रार्थना करितों कीं, आपण कृपा करून मला जीवदान द्यावें, म्हणजे आपलें त्यांत कल्याण आहे. माझ्याकडे कांहींएक अन्याय नाहीं.' राजानें उत्तर केलें कीं, 'अरे मूर्खा, तुझी ही विनवणी व्यर्थ आहे. तुझ्यावर कांहीं गुन्हा जरी नसला तरी तुझें मस्तक कापल्यावर बोलतें कसें तो चमत्कार पाहण्याकरतांच केवळ तुझा शिरच्छेद करावा अशी माझी इच्छा आहे' असें भाषण करीत असतां त्यानें वैद्याचे हातचें पुस्तक घेऊन मांगास वार करण्यास हुकूम केला.

मांगानें अशा कौशल्यानें हात मारला कीं, तें मस्तक धडावरून उडालें तें नेमकें त्या ताटांतच येऊन पडलें आणि वेष्टनाचा स्पर्श होतांच त्यांतून रक्त यावयाचें बंद झालें. नंतर तें मस्तक डोळे उघडून राजास म्हणालें कीं, 'महाराज, कृपा करून हातांतलें पुस्तक उघडावें.' हें पाहून राजास व सभेंतल्या लोकांस पराकाष्ठेचा विस्मय झाला. नंतर राजा पुस्तक उघडून पानें चाळूं लागला. पण त्याचीं पानें परस्परांस चिकटल्यासारखीं वाटल्यावरून तीं लवकर चाळतां यावीं, म्हणून तो बोट जिभेस लावून ओलें करी. याप्रमाणें सहा पानें उलटून सातवें पान पाहतो तों तें कोरें दिसल्यावरून तो वैद्याच्या मस्तकास म्हणाला, 'अरे, या पानावर तर कांहींच लिहिलें नाहीं.' मस्तकानें उत्तर दिलें कीं, 'आणखी कांहीं पानें उलटा.' मग राजा आणखीं पानें उलटूं लागला, व दर पान उलटतांना तो जिभेस बोट लावी. त्या पुस्तकाच्या पानांला विष लावलें होतें, तें पानें उलटतांना राजा वरचेवर जिभेस बोट लावी त्यामुळें थोडें थोडें विष त्याच्या पोटांत जाऊन तत्काळ शरीरांत भिनतांच त्यास एकाएकीं गिरकी येऊन तो आसनावरून

खालीं पडला आणि मोठ्या दुःखानें तळमळूं लागला. त्याचा जीव कासावीस होऊन तो आतां मरणार, तों मस्तक त्यास म्हणतें, ‘ अरे दुष्टा,तुजसारखे जे अधम राजे आपल्या अंमलाच्या योगानें अनाथांस उगीच पीडा देतात, यांची ईश्वर अशी अवस्था करतो ! भेद इतकाच कीं, ही शिक्षा कोणास लवकर होते, कोणास उशीरां होते; पण ती झाल्यावांचून कदापि रहात नाहीं. इतके शब्द बोलून तें मस्तक निर्जीव झालें.

गोष्ट याप्रमाणें संपवून कोळी भांड्यांत घातलेल्या राक्षसास म्हणतो, ‘ त्या यवन राजानें दुवान वैद्यास वांचूं दिलें असतें तर देवानें त्यासही वांचवलें असतें. पण त्या दुष्ट राजानें त्याची प्रार्थना ऐकली नाहीं, त्यामुळें त्याचा तसा शेवट झाला. अरे दुष्टा राक्षसा, तुझीही गोष्ट त्या राजासारखीच आहे. मी तुजपाशीं जें मागणें मागत होतों, तें जर मला दिलें असतेंस तर आतां तुझीही मला दया आली असती. परंतु, अरे कृतघ्ना, माझे तुझ्यावर एवढे उपकार असतां तूं माझा जीव घ्यावयास उठलास, तेव्हां मलाही तुझ्याबद्दल निष्ठुर मन करणें भाग पडलें. ’

राक्षस मोठ्या नम्रतेनें कोळ्यास म्हणतो, ‘ अरे भल्या मित्रा, मी तुला हात जोडून सांगतों कीं, असा निर्दय होऊं नको, अरे पहा ! सूड उगवणें थोरांस योग्य नाहीं;त्यास कोणी उपद्रव केला तरी उलट उपद्रव न करतां सर्वदा ते उपकारच करतात. ’ कोळी उत्तर करितो, ‘ अरे दुष्टा, या परमार्थाच्या गोष्टी तुजसारख्या अधमाच्या मुखांत शोभत नाहींत. बंदींतून सुटण्याची आशा उगीच कशास बाळगतोस ? ती अगदीं व्यर्थ आहे. हा बघ तुला मी आतां समुद्रांत फेंकून देतों. ’ राक्षस म्हणतो, ‘ इतका तूं उतावळा होऊं नको. अंमळ दम खा; आणखी माझें सरतेशेवटचें भाषण ऐक. पहा मीं तुला शपथ वाहून सांगतों कीं, तूं मला भांड्याबाहेर सोडलें असतां मी कांहींएक उपद्रव न देतां उलटें तुझें जन्माचें दारिद्र्य नाहींसें होऊन, तूं मोठा श्रीमंत होशील, अशी तुला मी युक्ति सांगेन.

मनुष्याच्या मनास वळवणारें द्रव्यासारखें दुसरें कांहीं नाहीं. राक्ष-

त्याचें हें भाषण ऐकून कोळ्याचें मन फिरलें. तो म्हणाला, 'अरे राक्षसा, तूं म्हणतोस हें मी ऐकेन; पण तुझ्या वचनावर भरंवसा कोणी ठेवावा ? बरें, मी म्हणतों याप्रमाणें वागेन अशी ईश्वराची शपथ वहा, म्हणजे मी भांड्याचें झांकण काढतों. मला वाटत नाहीं, तुझ्यानें ती शपथ मोडवेलशी.'

मग त्यानें सांगितल्याप्रमाणें राक्षसानें शपथ वाहतांच कोळ्यानें झांकण काढलें. तें निघतांच भांड्यांतून धूर बाहेर आला, आणि राक्षसानें पूर्वींचें स्वरूप धारण केल्याबरोबर त्यानें प्रथम लाथ मारून तें भांडें समुद्रांत उडवून दिलें. हें कृत्य पाहून कोळी घाबरला, आणि त्यास म्हणतों कीं, 'अरे, हें रे काय ? आतां इतक्यांत तूं जी शपथ वाहिलीस ती मोडून दुवान वैद्यासारखें मला तुजपाशीं जीवदान मागावयास तूं लावणार ?' कोळी असा घाबरला, हें पाहून राक्षसास मोठें हंसें आलें. मग तो म्हणतो, 'अरे वेड्या, तूं इतका भिऊं नकोस. अरे, तूं कसा भीतोस हें पहाण्याकरितां मीं हें उगीच केलें. आतां मी आपलें वचन कसें खरें करतों तें बघ. उचल हीं आपलीं जाळीं, आणि चल माझ्या बरोबर.' असें म्हणून तो राक्षस पुढें चालता झाला. कोळीही आपलीं जाळीं आटपून त्याच्यामागून निघाला; तरी त्याच्या मनांत हा काय करील कोण जाणे अशी भीति होतीच. मग राक्षस जो निघाला तो कोळ्याच्या गांवावरून पुढें जातां जातां एका डोंगराच्या माथ्यावर गेला. कोळीही त्याच्या मागें चाललाच होता. मग डोंगरावरून पलीकडच्या दुसऱ्या बाजूस मोठें विस्तीर्ण मैदान होतें त्यांत उतरून ते पुढें जात जात एका तलावाच्या कांठाशीं जाऊन पोंचले. तेथें जातांच राक्षस उभा राहून कोळ्यास म्हणाला, 'तूं आपलीं जाळीं या तळ्यांत टाकून मासे धर.' कोळी पाहतो तों तळ्यांत मासे पुष्कळ होते; व ते पांढरे, तांबडे, निळे व पिंवळे अशा चार रंगांचे होते. हें पाहून कोळ्यास मोठें नवल वाटलें. नंतर त्यानें जाळीं आंत टाकून कांहीं वेळानें बाहेर काढलीं तों त्यांत प्रत्येक रंगाचा एकेक असे चार मासे आले. त्यानें तसे मासे जन्मांत पूर्वीं

कधीं पाहिले नव्हते. त्यांचा रंग वगैरे पाहून कोळ्यास फारच चमत्कार वाटला व त्यांची किंमतही पुष्कळ येईल असें मनांत येऊन, त्यास मोठा आनंद वाटला. राक्षस त्यास म्हणतो, ' अरे, हे मासे नगरांत घेऊन जा, आणि राजास नजर कर; म्हणजे तो तुला त्यांबद्दल पुष्कळ द्रव्य देईल. तुला पाहिजे तर दररोज येथें येऊन मासे धरीत जा; परंतु सांगतों इतकें तूं मनांत धर कीं, एका दिवसांत फक्त एकदांच जाळीं या तळ्यांत टाकीत जा; अधिक वेळ टाकशील तर पश्चात्ताप पावशील. ऐकिलेंस पक्कें? या माझ्या सांगण्याप्रमाणें तूं वागलास तर तुझें त्यांत चांगलें कल्याण होईल. असें बोलून राक्षसानें जमिनीवर लाथ मारली. त्या लाथेबरोबर ती दुभंग होऊन तिचे आंत तो गडप होतांच ती पहिल्याप्रमाणें जमून गेली.

कोळ्यानेंही राक्षसानें सांगितल्याप्रमाणें वागण्याचा नियम करून त्या दिवशीं दुसऱ्यानें जाळीं तळ्यांत टाकलीं नाहींत. जे चार मासे सांपडले होते ते घेऊन तो नगरांत आला. मग तसाच राजवाड्यांत जाऊन त्यानें ते मासे राजास नजर केले. ते पाहून राजाची मर्जी फारच खुष झाली आणि त्यानें कोळ्यास मोठें इनाम दिलें.

---

## एक मत्सरी दुष्ट मनुष्य व तो ज्याचा मत्सर करी असा एक सज्जन पुरुष यांची गोष्ट.

एका मोठ्या गांवांत दोन मनुष्य राहत असत. त्यांचीं घरें शेजारीं होतीं. त्यांपैकीं एक फारच दुष्ट होता; तो आपल्या शेजाऱ्याचा उगीच्या उगीच पराकाष्ठेचा द्वेष करीत असे. त्या शेजाऱ्यानें आपला व त्या दुष्ट मनुष्याचा स्नेह असावा म्हणून त्यावर कितीतरी उपकार केले; परंतु ते सर्व व्यर्थ गेले. त्या दुष्टाच्या मनांतला द्वेषबुद्धि तिळमात्रही कमी झाली नाहीं. मग शेजार जवळ असल्यामुळें हा आपणास पाण्यांत पाहतो असें मनांत आणून, आपण येथून निघून दूर

जाऊन रहावें. असा त्या सज्जन मनुष्यानें विचार करून, त्यानें आपलें घर वगैरे स्थावर जिंदगी विकून, जवळच कांहीं कोसांवर राजधानीचें शहर होतें, तेथें जाऊन राहिला. त्यानें त्या नव्या ठिकाणीं शहरापासून अर्धकोसांवर एक शेत घेतलें व शहरांत नेहमीं राहावयास एक चांगलें सोईस्कर घर घेतलें. त्या घराजवळ एक चांगला बाग होता. त्या घराला मोठें अंगण होतें व त्या आंगणांत एक मोठी खोल विहीर होती; परंतु ती वहिवाटींत नव्हती.

नंतर कांहीं दिवसांनीं दरवेशाचा म्हणजे फकीराचा आश्रम धारण करून तो विरक्त झाला. त्यानें आपल्या घरांत दुसऱ्या फकीरांस राहण्याकरितां कितीएक खोल्या करविल्या. तेव्हां कांहीं दिवसांनीं पुष्कळ फकीर जमले, त्यामुळें तें घर एक मोठी मशीद झालें व हा सज्जन मनुष्य त्यांतला मौलवी झाला. नंतर त्याच्या सद्गुणांची व सदाचरणाची प्रख्याति लोकांत पुष्कळ होत चालली. त्या नगरांतील लहानमोठे सर्व लोक त्यास फार मानूं लागले. दूर दूर अंतरावरून मोठमोठे लोक त्याच्या दर्शनास येत व आपलें संकट निवारण होण्याविषयीं, किंवा बरें होण्याविषयीं ते त्याजकडून अल्लाची प्रार्थना करवीत व त्यांचीं कार्यें झालीं म्हणजे ते त्याची कीर्ति गात आपआपल्या गांवीं जात. येणेंकरून चोहोंकडे त्याचा मोठा लौकिक झाला.

हा सज्जन मनुष्य प्रथम ज्या गांवांत रहात होता, त्या गांवीं ह्याची कीर्ति पसरल्यावर ती ऐकून त्या मत्सरी मनुष्यास फारच दुःख झालें. मग आपलीं सर्व कामें सोडून देऊन त्या सज्जन मनुष्याचा घात करावा म्हणून मुद्दाम घरून निघून तो त्याच्या गांवीं गेला. तो तेथें संध्याकाळीं येऊन पोंचला. तो आलेला पाहून, सज्जन मनुष्यानें त्याचा पराकाष्ठेचा सत्कार केला. मग मत्सरी मनुष्य त्यास म्हणाला कीं, ' मला कांहीं मोठी नाजूक गोष्ट तुम्हांशीं एकांतीं बोलावयाची आहे. याकारितां तुम्ही या फकीरांस आपआपल्या खोलींत जावयास सांगा व मला जें बोलावयाचें आहे, तें

आपण या आंगणांत फिरतां फिरतां बोलूं.' सज्जन मनुष्यानें त्याच्या म्हणण्याप्रमाणें केल्यावर, ते दोघे बोलत बोलत आंगणांत रपेट करूं लागले. मग रात्रीचा वेळ, आसपास कोणी नाहीं, अशी मनासारखी संधि पाहून त्या मौलवीस बोलत बोलत विहिरीच्या कांठाशीं नेऊन एकाएकीं विहिरींत ढकलून दिलें. असें घोर पापकृत्य करून तो तेथून झपाट्यानें जो निघाला; तों कोणाच्या दृष्टीस न पडतां त्या मशीदीच्या थोरल्या दरवाजांतून बाहेर पडून तसाच थेट रातोरात आपल्या घरीं येऊन पोहोंचला. आपण ज्या उद्देशानें घरांतून बाहेर पडलों, तो पूर्णपणें सिद्धीस गेला, असें वाटून त्या दुष्टास मोठा आनंद झाला. परंतु ईश्वर सज्जनाचें कसें संरक्षण करतो, तें त्या अधमास काय ठाऊक?

या दुष्टानें ज्या विहिरींत त्या सज्जन मनुष्यास ढकलून दिलें,ती फारच जुनाट होती. तींत यक्ष व यक्षिणी रहात होत्या व या प्रसंगीं त्याच्या नशिबानें त्या तेथेंच होत्या. त्यांनीं त्यास वरचेवर झेलून त्यास हलकेंच तळाशीं नेलें. त्यामुळें त्यास दुखापत अगदीं झाली नाहीं. त्याच्या मनांत असें आलें कीं, आपण विहिरीच्या तळाशीं आलों. तें आपणांस कोणीं आणलें असावें. नाहीं तर, आपणांस मोठा अपाय घडला असता. पण पडतांना त्यास कांहीं दिसलेंही नाहीं व कशाचा स्पर्शही झाला नाहीं. पुढें लौकरच त्याच्या कानीं पुढील संभाषण पडलें. कोणी एक दुसऱ्यास म्हणतो, 'ज्या मनुष्यास आतां आपण मृत्यू-पासून वांचविलें, तो कोण तें तुला माहीत आहे?' दुसऱ्यानें उत्तर केलें, 'नाहीं.' पहिला म्हणाला, 'तर सांगतों ऐक. हा मनुष्य प्रथम एका गांवांत राहात होता; तेथें याच्या शेजारीं एक दुर्जन राहात होता, तो याचा उगीच द्वेष करूं लागला, तेव्हां यानें तो न करावा म्हणून तो गांव सोडून हा येथें येऊन राहिला, येथें सदाचरणानें व परोपकारी स्वभावानें लोकांत याची कीर्ति फार झाली, ती त्याच्या जुन्या दुष्ट शेजाऱ्यास न साहून तो याचा घात करण्याकरितां मुद्दाम येथें आला; आणि त्यानें मघाशीं एकाएकीं दग्यानें यास विहिरींत

ढकलून दिलें. साहाय्य करावयास आपण येथें नसतों तर हा बापडा गरीब मनुष्य मरण पावून, त्या दुष्टाचा हेतु सिद्धीस गेला असता. या सज्जन पुरुषाच्या साधुत्वाची कीर्ति ऐकून या देशाचा राजा आपल्या दुखणेकरी मुलीस याजकडे घेऊन येणार आहे.' इतक्यांत तिसऱ्या एकानें पहिल्यास विचारलें कीं, 'राजाच्या मुलीस काय झालें आहे?' पहिल्यानें उत्तर केलें कीं त्या मुलीस भूत लागलें आहे. परंतु त्या मौलवीपाशीं त्या पिशाच्चास घालविण्याचा एक चांगला उपाय आहे. तो असा कीं, त्याच्या मशीदींत एक काळें मांजर आहे. त्या मांजराच्या शेंपटीचा शेंडा पांढरा आहे; त्या शेंड्याचे सात केंस घेऊन त्यांची धुरी त्या मुलीस दिल्याबरोबर तें दुष्ट पिशाच्च तिला सोडून जाईल व तिचें नांव जन्मांत पुनः कधीं घेणार नाहीं.'

हें सर्व संभाषण त्या मौलवीच्या कानीं पडलें. त्यानंतर त्याच्या कानीं एकही शब्द पडला नाहीं. मग रात्र जाऊन पहाटेस जसें थोडें थोडें दिसूं लागलें. तसा त्या विहिरींतून वर येण्यास कठीणशी वाट होती, तिनें तो मौलवी हळूहळू वर आला. इकडे याच्या मशीदींतले दुसरे फकीर याचा शोध करीत होते,त्यांस याला पाहून मोठा हर्ष झाला. नंतर त्यांनीं विचारल्यावरून त्यानें सांगितलें कीं, 'काल रात्रीं आपल्या मशीदींत जो मनुष्य आला होता व ज्याचा मीं इतका चांगला सत्कार केला, त्या दुष्टानें मला दग्यानें विहिरींत ढकलून दिलें. पण अल्लाचे कृपेनें मी वांचलों.' नंतर तो आपल्या खोलींत गेला. तेथें गेल्यावर तें काळें मांजर लाडिकपणें त्याच्या मांडीवर बसलें, तेव्हां त्यानें त्याच्या शेंपटीचे शेवटाचे सात पांढरे केंस काढून एका कागदांत गुंडाळून पुडी आपणापाशीं ठेविली.

इतक्यांत घटका दोन घटकांनीं फकीर सांगत आले कीं, 'राजाची स्वारी मशीदीस येत आहे.' राजानें मशीदीच्या जवळ आपली स्वारी थांबवून स्वतः तो कांहीं थोर थोर सरदारांनिशीं मशीदींत आला. मौलवीनेंही त्याच्या योग्यतेनुरूप त्याचा मोठा

आदरसत्कार केला. नंतर राजा मौलवीस एकीकडे बोलावून त्यास म्हणाला, 'फकीरबाबा, मीं एथें कोणत्या हेतूनें आलों हें आपणांस कदाचित् समजलेंच असेल.' मौलवीनें उत्तर केलें, 'होय महाराज, समजलें. आपल्या कन्येच्या प्रकृतीस आराम नसल्यामुळें खावंदाची या गरिबाच्या घरीं पायधूळ पडली असावी.' राजा म्हणाला, 'आपण बरोबर ताडलें. मला खचित वाटतें कीं आपण माझ्या मुलीस गुण पडण्याकरितां अल्लापाशीं प्रार्थना केली असतां ती बरी होईल व तसें झालें असतां आपण मला स्वतः वांचविल्यासारखें होईल.' मौलवीनें उत्तर केलें, 'महाराज, आपल्या कन्येस येथें आणविलीं असतां अल्लाच्या कृपेनें मी तिला चांगली बरी करीन असें मला वाटतें.'

हें भाषण ऐकून राजास मोठा आनंद झाला. मग त्यानें तत्काळ आपल्या लेकीस आणावयास पाठविल्यावर ती आली. तिच्याबरोबर पुष्कळ दासी व खोजे होते. मग ती मशीदींत आल्यावर मौलवीनें कांहीं निखारे आणून त्यांवर ते सात केंस फेंकले. त्याचा धूर त्या राजकन्येच्या अंगास लागतांच राक्षस मोठ्यानें आरोळी मारून तत्क्षणीं तिच्या अंगांतून निघून गेला. तो जातांच झोंपेंतून दचकून उठल्यासारखी ती राजकन्या इकडे तिकडे पाहून म्हणाली कीं, 'मी कोठें आहे ? मला या ठिकाणीं कोणीं आणलें ?' हे तिचे शब्द ऐकून राजास जो हर्ष झाला तो सांगतां येत नाहीं. त्यानें तत्काळ त्या मुलीस पोटाशीं धरून तिच्या डोळ्यांचें चुंबन घेतलें. नंतर त्या मौलवीची मोठी प्रशंसा करून, आपल्याभोंवतालच्या सरदारांस म्हणाला, 'माझी मुलगी यांनीं बरी केली, याबद्दल त्यांस काय देणगी द्यावी ?' त्या सर्वांनी एकदम उत्तर केलें, 'यास बक्षीस म्हणजे ही कन्याच द्यावी,' असें आम्हांस वाटतें. राजा म्हणाला, 'माझ्याही मनांत हाच विचार आहे. मग लवकरच मौलवीचें लग्न राजकन्येशीं लागलें. पुढें थोड्या दिवसांनीं राजाचा मुख्य वजीर मेला; तेव्हां ती जागा त्यानें आपल्या जांवयास दिली.

त्यानंतर कांहीं काळ लोटल्यावर राजाही वारला. त्यास पोटीं पुत्र नव्हता, यास्तव राज्यांतील सर्व लोक व फौजेचे अधिकारी यांनीं एकमतानें मुख्य वजीरास राजाच्या गादीवर बसाविलें.

हा सज्जन मनुष्य राजा झाल्यावर एके दिवशीं तो सरदारांसहवर्तमान वाटेनें जात असतां स्वारी पहाण्याकरितां दुतर्फा लोकांची दाटी जमली होती, तींत दूर अंतरावर, यास पूर्वीं ज्यानें विहीरींत लोटलें होतें तो दुष्ट मनुष्य याचे दृष्टीस पडला. तेव्हां तो आपल्याजवळच्या एका कामदारास म्हणाला कीं, 'तो पहा, तेथें जो मनुष्य उभा राहिला आहे, त्यास मजकडे घेऊन ये; पण त्यास भय वाटेल असें करूं नको हो!' मग तो मत्सरी मनुष्य जवळ आल्यावर राजा त्यास म्हणाला, 'मित्रा, बरा आहेसना? आज आपली गांठ फार दिवसांनीं पडली.' असें म्हणून त्यानें एका कामदारास हुकूम केला कीं, 'आमच्या खाजगी जामदारखान्यांतून या गृहस्थास हजार पुतळ्या द्या, व पांच उंची पोशाख द्या. आणि बरोबर शिपाई देऊन घरीं पोंचता करा.' नंतर त्या मत्सरी मनुष्यास पुनः सलाम करून तो राजा पुढें चालता झाला.



# सिंदबाद नांवाचा दर्यावर्दी ह्याची गोष्ट.

महाराज, हरुन् अलरशीद् म्हणून ज्या कालिफाची गोष्ट मी काल सांगितली, त्याच कालिफाचे राज्यांत बगदाद नगरांत हिंद्-बाद नांवाचा एक मोलकरी राहत असे. ऐन उन्हाळ्यांत एके दिवशीं त्या मजुरास एक ओझें मिळालें. तें त्या नगराच्या एका शेवटापासून दुसऱ्या शेवटापर्यंत न्यावयाचें होतें. तें ओझें घेऊन तो चालला असतां ऊन पुष्कळ झालें व ओझेंही भारी जड होतें व त्यास पुष्कळ मार्ग क्रमावयाचा होता. यामुळें कांहीं वेळ विसावा घ्यावा म्हणून तो हमाल जागा पाहात होता, तों एका रस्त्यांत आला. तेथें पश्चिमेकडील वायूची मंद गार झुळूक चालली होती; व रस्ताही गुलाबपाण्याचा सडा देऊन गार व सुवासिक केला होता. तो वारा घामाघूम झालेल्या त्या ओझेवाल्याच्या अंगास लागून, व गुलाबाचा मधुर वास येऊन त्यास पुष्कळ समाधान वाटलें. मग येथें कांहीं वेळ दम घेण्याचा विचार करून रस्त्यांतील एका ओटयावर ओझें उतरून तो त्या शेजारीं बसला.

तो ज्या वाड्याचे जोत्यावर बसला होता, तो वाडा मोठा टोलेजंग होता, व तेथें नानाप्रकारच्या सुगंधि पदार्थांचा वास सुटला होता;तो अनुभवून त्यास मोठा आनंद झाला. तसेंच वाड्यांत गाणें—बजावणें चाललें होतें. सारंग्या, पखवाज व सतारी यांचा व गाणारणी स्त्रियांचा मधुर शब्द ऐकून त्याचें मन शांत झालें. तसेंच, मैना, रांवे, चंडोल, वगैरे पक्षी तेथें मंजुळ स्वर काढीत होते, तेंही त्यानें ऐकिलें. त्याच-प्रमाणें नानाप्रकारच्या पक्वान्नांचा सुवास येत होता, त्यावरून त्यास वाटलें कीं, वाडयांत कांहीं मोठा उत्सव व मेजवानी असावी. तो त्या रस्त्यानें पुष्कळ वेळां गेला नव्हता,ह्यामुळें त्या वाडयांत कोण राहतो, हें त्यास माहीत नव्हतें. मग तें कळावें म्हणून,दरवाज्यापाशीं जाऊन देवडीवर चाकर होते, त्यांपैकीं एकास त्यानें विचारलें कीं, ह्या वाडयाच्या धन्याचें नांव काय ? ' त्यानें उत्तर केलें, ' काय ! तूं ह्या

बगदाद नगरांत राहतोस, आणि तुला या वाड्याचा धनी सिंदबाद दर्यावर्दी ह्याचें नांव माहीत नाहीं? मोठा चमत्कार आहे! अरे, हा केवढा विख्यात पुरुष! ज्यानें पृथ्वीच्या कितीएक प्रदक्षिणा केल्या, तो तुला ठाऊक नाहीं?' त्या मोलकऱ्यानें सिंदबाद ह्याची संपत्ति व वैभव हीं ऐकलीं होतीं व तो पराकाष्ठेचा सुखी आहे,असें त्यास वाटत होतें. मग त्याची अलौकिक श्रीमंती व आपलें अत्यंत दारिद्र्य हें मनांत येऊन त्यास फार वाईट वाटलें; आणि हे विचार मनांत येऊन त्याचें मन फार खिन्न होऊन, तो आकाशाकडे डोळे करून दुःखाच्या आवेशांत आपले शब्द कोणी ऐकेल ह्याचा विचार न करतां, मोठ्यानें म्हणाला, 'हे परमेश्वरा, सिंदबाद व मी ह्यांमध्यें केवढें हें अंतर! पहा, मी दररोज किती श्रम करतों, व किती दुःखें सोसितों, तरी मला जाडीभरडी भाकर पोटभर मिळण्याची मारामार; आणि हा सिंदबाद हवा तसा पैसा उडवितो, तरी सर्वकाळ सुखांत व मौजेंत घालवीत आहे! ईश्वरा, असें ह्यानें कोणतें पुण्य केलें कीं, तूं ह्यास असें अखंड व अपार सुख दिलें? व मीं तुझ्या घरीं कोणता अन्याय केला कीं, रात्रंदिवस दुःख व हाल काढावयास तूं मला लाविलेंस?' असें गाऱ्हाणें करून त्यानें त्रासून व निराश होऊन जमिनीवर मोठ्यानें पाय आदळला.

ह्याप्रमाणें तो मोलकरी दुःख करीत आहे, इतक्यांत वाड्यांतून एक चाकर येऊन त्याचा हात धरून त्यास म्हणाला, 'चल मजबरोबर, तुला आमचा धनी सिंदबाद बोलावीत आहे; कारण त्याच्या मनांत तुजपाशीं कांहीं बोलावयाचें आहे.'

इतका आदराचा निरोप ऐकून त्या मोलकऱ्यास मोठा अचंबा वाटला; कारण, त्याच्या तोंडावाटें जे नुकतेच शब्द निघाले होते, त्यांचा विचार केला असतां त्यास असें भय वाटलें कीं, सिंदबाद मला नेऊन शिक्षा करील; आणि या संशयानें 'ओझें रस्यावर टाकून मला येतां येत नाहीं,' अशी सबब तो सांगूं लागला; परंतु सिंदबाद याच्या चाकरांनीं 'ओझ्याविषयीं कांहीं काळजी करूं

नको; तें आम्हीं संभाळूं. तूं वाड्यांत चल, ' असा त्यास फार आग्रह केल्यावरून तो निरुपाय होऊन वाड्यांत गेला.

नंतर चाकरांनीं त्यास एका मोठ्या दिवाणखान्यांत नेलें. तेथें पुष्कळ लोक जेवावयास बसले होते व त्यांजपुढें अनेक प्रकारचीं पक्वान्नें भरून ताटें ठेविलीं होतीं. दिवाणखान्यांत वरच्या बाजूस एक गृहस्थ बसला होता त्याचा चेहरा गंभीर, सुरेख व तेजस्वी दिसत होता; त्यास मोठी दाढी होती व ती सर्व पिकून पांढरी झाली होती. त्याच्या पाठीमागें व बाजूंस कितीएक चाकर होते. हा गृहस्थ सिंदबाद दर्यावर्दी होय. त्या ठिकाणचें ऐश्वर्य व पुष्कळ मंडळी पाहून मोलकरी फार भ्याला, मग मोठ्या अदबीनें व कांपत कांपत त्यानें सर्वांस सलाम केला; तें पाहून सिंदबाद यानें त्यास जवळ बोलावून आपल्या शेजारीं उजव्या हाताकडे बसवून, आपल्या हातानें त्यास एक ताट दिलें व भोजन करावयास सांगितलें.

मग स्वस्थपणें जेवण झाल्यावर सिंदबाद यानें हिंदबाद याच्याशीं बोलावयास आरंभ केला. अरब लोकांच्या चालीप्रमाणें ' भाई ' अशा मोठ्या सलगीचें संबोधन करून तो म्हणाला, ' तुमचें नांव काय ? व तुम्ही धंदा कोणता करतां ? ' मोलकऱ्यानें उत्तर केलें, 'महाराज, मला हिंदबाद असें म्हणतात.' सिंदबाद म्हणाला, ' बरें, तुमची ओळख झाली हा मला मोठा लाभ झाला व मजसारखेंच येथील सर्व मंडळीस वाटत असेल, ह्यांत संशय नाहीं. असो, पण नुकतेच तुम्ही रस्त्यांत जे शब्द बोललां, ते पुनः तुमच्या तोंडानें ऐकावें, अशी माझी फार इच्छा आहे. ' ( पूर्वीं हिंदबाद जेव्हां बोलला होता त्या वेळेस सिंदबाद खिडकीशीं उभा होता; त्याचमुळें तें सारें बोलणें त्यानें ऐकिलें होतें; आणि नंतर यास बोलावयास पाठवून तो स्वतः दिवाणखान्यांत जेवावयास जाऊन बसला होता.)

हा प्रश्न ऐकून हिंदबादास मोठा विस्मय झाला. मग तो लाजेनें खालीं मान घालून उत्तर करतो,'महाराज,ऊन लागल्यामुळें व श्रमानें

जीव त्रासल्यानें माझ्या तोंडावाटे जे अविचारानें शब्द निघाले, तें आपण मला माफ करावें.' सिंदबाद म्हणाला, 'छेः छेः मी त्याबद्दल तुम्हांवर रागावलों नाहीं. असल्या कारणानें रागावणें हा अन्याय आहे. तुमची दशा पाहून मला फार वाईट वाटतें व तुम्ही बोललां त्याबद्दल मी तुम्हांस मुळींच दोष देत नाहीं. तुमच्या बोलण्यांत माझ्याविषयीं जो मजकूर आला, तो मात्र बरोबर नाहीं. तुम्हांस खचीत असें वाटत असेल कीं, मी हल्लीं जीं सुखें व संपत्ति भोगितों आहें, तीं मला कष्ट केल्यावांचून प्राप्त झालीं; परंतु तसें वाटत असल्यास तें खोटें आहे. ही दौलत मिळविण्यास कितीएक वर्षेंपर्यंत मीं जे हाल भोगिले आहेत व जीं संकटें सोसिलीं आहेत, तीं ऐकिलीं असतां त्यांची तुम्हांस कल्पनादेखील करतां येणार नाहीं.' असें म्हणून तो सर्व मंडळीस उद्देशून बोलला, 'मित्रहो, तुम्हास मी खरें सांगतों कीं, ही संपत्ति मिळवितांना मला असे कष्ट पडले आहेत कीं, मनुष्य कितीही द्रव्यलोभी असला तरी, त्यानें ते ऐकिलें असतां त्याचें धैर्य खचून त्याची श्रीमंत होण्याची इच्छा नाहींशी होईल ह्यांत संशय नाहीं. मी सात सफरी केल्या; त्यांत मजवर जे प्रसंग गुदरले व जीं दुःखें मला सोसावीं लागलीं, त्यांची सर्व हकीकत कदाचित् तुम्हीं ऐकिली नसेल; तरी ह्या प्रसंगीं ती इत्थंभूत हकीकत स्वतः आपल्या तोंडानें तुम्हांस सांगावी, असें माझ्या मनांत आहे व ती ऐकून सर्व मंडळींस चमत्कार वाटेल, ह्यांत संशय नाहीं.'

सिंदबाद ही हकीकत हिंदबादाचे उद्देशानें सांगणार होता, सबब त्यानें चाकरास हुकूम केला कीं, 'ह्याचें ओझें हा सांगेल तेथें लौकर पोचवून द्या.' नंतर त्यानें गोष्टीस आरंभ केला—

## सिंदबाद याची पहिली सफर.

तो म्हणतो—माझ्या बापानें मरतांना मला पुष्कळ जिंदगी ठेविली होती, त्यापैकीं बहुतेक मी तारुण्यांत ख्यालीखुशालींत उडवून टाकिली. परंतु पुढें मी सावध झालों, आणि मनांत आणिलें कीं,

संपत्ति तर नाशवंतच आहे, परंतु संपत्ति बुडवून इतके दिवस मी आपला अमोलिक वेळ खर्च केला, त्यामुळें माझा फारच तोटा झाला. आपल्या जुन्या पैगंबरांपैकीं मोठा पैगंबर जो सुलिमान् त्यानें असें म्हटलें कीं, "मरण बरें पण दारिद्य फार वाईट" त्या म्हणीची मला आठवण झाली. मग मी कांहीं चीजवस्तु राहिली होती, ती विकून पैसा केला, आणि कांहीं व्यापारी समुद्रांतून द्वीपांतरीं व्यापारास निघणार होते, त्यांचा पातीदार झालों. ह्या कामांतले चांगले वाकबगार जे होते, त्यांची सल्लामसलत घेऊन पैसा मिळविण्याच्या बुद्धीनें आम्हीं बसोरा शहरास गेलों. तें शहर इराणी आखातावर मोठें बंदर आहे.

मग तेथून गलबत हांकरून हिंदुस्थानाकडे आम्हीं चालू झालों. आम्हीं इराणी आखातांतून चाललों असतां आमच्या उजव्या बाजूस अरबस्थानाचा किनारा होता व डाव्या बाजूस इराणदेश होता. ह्याची अत्यंत रुंदी सुमारें शंभर कोस आहे. पूर्वसमुद्र व हिंदुस्थानचा समुद्र, हे फार मोठे आहेत. ह्याच्या एके बाजूस हपशांचा मुलूख आहे व वाकनामक बेटापर्यंत त्याची लांबी सुमारें सात हजार कोसांवर आहे. आरंभीं कांहीं दिवस गलबत लागल्यामुळें मी आजारी होतों, पण लौकरच माझी प्रकृति नीट झाली व त्यावर हा आजार मला कधीं पुनः झाला नाहीं.

वाटेनें आम्हांस कितीएक बेटें लागलीं. तेथें उतरून आम्ही आपला माल विकला व कोठें कोठें जवळचा माल देऊन दुसरा माल घेतला. एके दिवशीं आमचें गलबत चाललें असतां जवळच एक बेट दिसलें. तें समुद्राच्या पाण्याबरोबर सपाट दिसत होतें व तें सर्व हिरव्या लहान गवतानें भरल्यासारखें दिसत होतें. तें पाहून आमच्या गलबताच्या नाखव्यानें अवजारें गुंडाळावयास हुकूम करून आम्हांस सांगितलें कीं, 'ज्यांची मर्जी असेल त्यांनीं या बेटावर उतरून चार घटका इकडेतिकडे फिरावें. आतां वारा पडला आहे, तो पुनः वाहूं लागला, म्हणजे गलबत हांकारूं.'

नंतर कितीएक मंडळी उतरली, त्यांत मीही उतरलों मग कोणी तेथें जेवीत बसले; कोणी दारू पिऊं लागले; कोणी हुक्का ओढीत होते. इतक्यांत एकाएकीं तें सर्व बेट थरथरारून आम्हां सर्वांस मोठा धक्का बसला.

गलबतावर लोक होते, त्यांनीं तें बेट हालतांना पाहिलें आणि आम्हांस मोठ्यानें ललकारून सांगितलें कीं, ‘ धांवा धांवा ! लवकर गलबतावर चढा ! आपणांस जें हें बेट वाटलें तें बेट नाहीं, मोठ्या प्रचंड कांसवाची पाठ आहे.’ अशी आरोळी होतांच, जे चपळ होते, ते मोठ्या त्वरेनें होड्यांवर चढले व कोणी समुद्रांत उड्या टाकून पोहावयास लागले. परंतु माझी अवस्था अशी झाली कीं, मी त्या कांसवाच्या पाठीवर असतांच त्यानें बुडी मारली. माझ्या दैवानें इतकेंच झालें कीं, आमच्यांपैकीं, कांहीं लोकांनीं विस्तव पेटाविण्याकरितां लांकडें आणिलीं होतीं त्यांतील, एक मोठा ओंडा, समुद्रांत कांसव बुडण्याच्या पूर्वीं माझ्या हातीं सांपडला होता. इकडे नावाड्यानें वारा चांगला सुटलासें पाहून अवजारें सोडलीं व होडींतले लोक वर घेऊन, जे पोहत होते त्यांपैकीं जे जे जवळ होते, त्यांस लौकर चढवून घेऊन गलबत झपाट्यानें हांकारिलें, त्यामुळें अर्थातच तें मला गांठतां आलें नाहीं.

ह्याप्रमाणें मी लाटांत बुचकळ्या खात व वहात चाललों. तो सगळा दिवस व त्या दिवसाची रात्र तशीच हालांत घालविली. दुसऱ्या दिवशीं सूर्योदयाच्या सुमारास माझे हातपाय अगदीं दमून गेले, व जिवाची आशा सुटली. तों इतक्यांत एक मोठी लाट येऊन तिच्या उसळीनें मी एका बेटाच्या किनाऱ्यास जाऊन पडलों. तो किनारा पराकाष्ठेचा उंच व खडकाळ होता: तेथें वर चढावयाचा अगदीं इलाज नव्हता. परंतु माझी आयुष्याची दोरी सबळ ! खडकांतून एके ठिकाणीं वरील झाडाच्या मुळ्या बाहेर आल्या होत्या. त्या मुळ्यांस धरून मोठ्या संकटानें मी वर चढून गेलों. ह्या श्रमानें मी अगदीं बेजार होऊन जमिनीवर निपचित पडलों. मग सूर्य व

येऊन त्याचे किरण अंगास लागल्यावर ऊब येऊन सावध झालों. श्रमानें व भुकेनें माझा जीव अगदीं उबून गेला होता; तरी उपाय नसल्यामुळें तसाच उठून येथें कोठें खाण्याजोगा झाडपाला असला तर पाहूं लागलों. तों इतक्यांत मला दैवयोगानें कांहीं फळें सांपडलीं व एक चांगला स्वच्छ व गोड पाण्याचा झरा आढळला. मग तीं फळें खाऊन व पाणी पिऊन थोडासा हुशार झाल्यावर मी त्या बेटांत पुढें चालता झालों; तों एक सपाट मैदान लागलें. तेथें दूर अंतरावर एक घोडा चरतांना दृष्टीस पडला. मग कांहीं आशेनें व कांहीं भयानें मी त्याजकडे चाललों व तिकडे जात असतां मी काय मृत्यूस टाळतों, कीं त्याच्या विशेष जवळ जातों, ह्याचा मला निश्चय होईना. मग जवळ जाऊन पहातों तों ती खुंटयास बांधलेली छानदार घोडी आहे! तिजकडे पहात असतां खळींतून कोणी माणूस बोलतांना माझ्या कानीं आलें. मग तिकडे पाहतों तों एक माणूस मजजवळ येऊन, 'तूं कोण?' म्हणून मला विचारूं लागला. त्यास मीं आपली सर्व हकीगत सांगितली. ती ऐकल्यावर तो मला घेऊन एका भुयारांत गेला. तेथें आणखी कांहीं मनुष्यें होतीं, त्या सर्वांस मला पाहून मोठा विस्मय वाटला.

त्यांनीं कांहीं मला खावयास दिलें. तें खाल्ल्यावर मीं त्यांस विचारलें कीं, 'तुम्हीं कोण आहां? व येथें काय करतां?' त्यांनीं उत्तर केलें कीं, ह्या 'ह्या बेटाचा राजा मिऱ्हेज[1] ह्याचे आम्ही मोतद्दार आहों. दरवर्षी ह्या महिन्यांत आम्ही राजाच्या घोड्या ह्या ठिकाणीं घेऊन येत असतों आणि त्या येथें खुंटयास बांधून ठेवितों. येथें समुद्रांतून निघून जलवारू येत असतो त्यापासून घोडीस जें शिंगरूं होतें तें फारच चांगलें होतें; तसलें सर्व घोडे राजा आपले खासगी पागेंत ठेवितो. आमचे दिवस भरले. आम्ही उद्यां वरीं जावयास निघणार. तुम्ही एक दिवस उशीरानें आलां असतां तर

१ हा 'महाराज' या शब्दाचा अपभ्रंश असावा व हें बेट हिंदुस्थानच्या किनाऱ्यावरील एक टापू असावा.

तुम्ही खचीत मेला असतां; कारण, या ठिकाणापासून भोंवतालीं लांबपर्यंत नुसतें रान आहे, व माहितगार माणूस बरोबर आल्या-वांचून त्यास या रानांतून बाहेर पडून जाणें अशक्य आहे.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ते सर्व घोडया घेऊन मिऱ्हेज राजाच्या नगरीस परत जावयास निघाले, आणि मलाही त्यांनीं बरोबर घेतलें. नगरास पोहोंचल्यावर त्यांनीं मला राजास भेटविलें. राजानें विचा-रल्यावरून त्यास मीं आपली सर्व हकीकत सांगितली. तो म्हणाला, ' हा तुम्हांवर प्रसंग गुदरला हें फार वाईट झालें. असो, माझ्या येथें तुम्हांस कोणत्याही गोष्टीची कमतरता पडणार नाहीं. ' राजाचे कारभारीही फार चांगले होते. त्यांनीं राजाच्या आज्ञेप्रमाणें माझी बरदास्त ठेविली.

मी स्वतः व्यापारी होतों. यास्तव मी येथच्या व्यापारी लोकांत फार जात येत असें. मिऱ्हेज राजाची राजधानी समुद्रकिनाऱ्यास आहे. तेथें दररोज चोहोंकडलीं गलबतें येतात. मी, परमुलुखचे व्यापारी तेथें येत, त्यांकडे विशेषेंकरून जात असें; मनास आशा कीं, बगदाद शहराची बातमी लागावी, व स्वदेशीं परत जाणारा कोणी भेटला तर पहावा. हिंदुस्थानांतले मोठे मोठे विद्वान् पंडित तेथें आले होते. त्यांकडे मी फार जात असें; कारण त्यांच्या संभाषणा-पासून मला फार संतोष होई. इतक्या ठिकाणीं जरी मी फिरत असें तरी नित्य नेमानें दरबारांत जाण्याचें व तेथील अमीरउमराव व कारभारी लोक वगैरे यांच्याकडे जाण्याचें व त्यांचा स्नेह ठेवण्याचें, हें मीं सोडलें नाहीं. ते मला माझ्या देशच्या शेंकडों गोष्टी विचारीत व मीही त्यांस त्यांच्या देशांतल्या रीतिभाती, कानूकायदे, वगैरे जें जें चमत्कारिक किंवा महत्त्वाचें वाटें, तें तें विचारीत असें.

मिऱ्हेज राजाच्या राज्यांत एक बेट आहे; त्यास कासल असें म्हणतात. त्या देशांत असतां माझ्या ऐकण्यांत असें आलें कीं, कासल बेटांत दररोज रात्रीं झांजांचा नाद होतो व त्यावरून खलाशी लोकांत अशी समजूत पडून गेली आहे कीं, सैतान त्या

जागीं राहतो. त्या स्थळाचा चमत्कार पाहण्याची इच्छा मला उत्पन्न होऊन मी गलबतांत बसून तिकडे गेलों. वाटेनें जातांना शंभर शंभर दोनदोनशें हात लांबीचे मासे माझ्या दृष्टीस पडले. हे मासे दिसण्यांत भयंकर असतात खरे, परंतु ते कोणांस उपद्रव करीत नाहींत. ते इतके भ्याड असतात कीं, गलबताच्या तक्तपोशीवर काठ्या आपटून गोंगाट केला असतां तेवढ्यानें भिऊन पळून जातात. मीं दुसरे कांहीं मासे असें पाहिलें कीं, त्यांची लांबी तर हातावर नसे पण त्यांचीं डोकीं घुबडासारखीं दिसत.

परत आल्यावर एके दिवशीं बंदरावर मीं उभा होतों, तों दुरून बंदरांत येतांना मीं एक जहाज पाहिलें. मग तें धक्क्यास लागल्यावर खलाशी वरील गठ्ठे किनाऱ्यावर आणूं लागले, व ज्या ज्या सावकारांचे ते होते, ते सावकार ते गठ्ठे नेऊन वखारींत सांठवूं लागले. अशी गडबड चालली असतां माझी दृष्टि सहज कांहीं गठ्ठ्यांकडे गेली, तों त्यांवर माझें नांव माझ्या दृष्टीस पडलें. मग जवळ जाऊन ते गठ्ठे नीट पाहिलें, तेव्हां माझी खात्री झाली कीं, बसोऱ्याहून निघतांना मीं गलबतावर जे गठ्ठे चढवले, ते हेच. मग पाहातों तों त्या नवीन आलेल्या गलबताचा नावाडी मीं ओळखला. परंतु मी समुद्रांत बुडून मेलों, असें त्यांस वाटत असेल, असें अनुमान करून मीं त्यास विचारलें कीं,' हे एकीकडे पडले आहेत, हे गठ्ठे कोणाचे? त्या नावाड्यानें उत्तर केलें कीं, माझ्या गलबतावर बगदाद शहरचा सिंदबाद म्हणून एक व्यापारी होता. पुढें एक दिवस वाटेनें जात असतां जवळच एक बेट आहेसें आम्हांस वाटलें. त्या बेटावर सिंदबाद व दुसरे कांहीं व्यापारी उतरले. परंतु तें खरें बेट नव्हतें; तर एक मोठें कांसव पाण्यावर उन्हांत सुखावून निश्चळ पडलें होतें. आमच्या व्यापाऱ्यांनीं त्याच्या पाठीवर स्वयंपाक करण्याकरितां विस्तव पेटवला. त्या योगानें त्याची पाठ पोळतांच, त्यानें अंग हलवून पाण्यांत बुडी मारली. त्याच्या पाठीवर जे लोक उतरले होते. त्यांपैकीं बहुतेक समुद्रांत बुडाले; व बिचारा सिंदबादही त्यांतच

बुडाला. हे गठ्ठे त्याचे आहेत, आणि माझा बेत असा आहे कीं, हे गठ्ठे विकून जो नफा होईल तो स्वदेशीं गेल्यावर, त्याचे कोणी नातलग भेटल्यास त्यांस द्यावयाचा.' मीं बोललों, 'नावाडेबुवा, तुम्ही सिंदबाद जो मेला म्हणतां तो मीच; मी अद्यापि ईश्वराच्या कृपेनें जिवंत आहें. हे गठ्ठेही माझेच मीं ओळखिलें.'

माझें हें भाषण ऐकून नावाड्यास मोठा आचंबा वाटून तो म्हणाला, 'काय ? तूं सिंदबाद ? मग मनुष्यांत सत्य म्हणून उरलेंच नाहीं म्हणावयाचें ! अरे, मी आपल्या डोळ्यांनीं सिंदबाद बुडून मरतांना पाहिला; मीं एकट्यानेंच नाहीं, ही गोष्ट ज्यांनीं पाहिली असे माझे गलबतावर दुसरे पुष्कळ लोक आहेत, असें असतां तूं धीटपणें छातीस हात लावून तो सिंदबाद मीच असें म्हणतोस ! केवढें तरी तुझें हें धारिष्ट ! तूं दिसण्यांत तर मला भला माणूस दिसतोस, आणि तूं दुसऱ्याच्या मालाचा अभिलाष करावा या बुद्धीनें एवढी भयंकर लबाडी करतोस ! तुला शरम रे कशी नाहीं वाटत ? मीं उत्तर केलें, 'नाखुदेबुवा, अंमळ दम धरा, व मी काय म्हणतों हें ऐकून घ्या.' तो म्हणाला, 'बोला, तुम्हांस काय बोलावयाचें असेल तें. हा मी चित्त देऊन ऐकतों.' मग मी समुद्रांत माझा बचाव कसा झाला, पुढें मिऱ्हेज राजाच्या मोतद्दारांची गांठ कशी पडली, व त्यांनीं राजाची भेट कशी करून दिली, वगैरे मजकूर त्यास सांगितला.

ही माझी हकीकत ऐकून तो कांहींसा चपापला व कांहीं वेळानें मी ठक नव्हे म्हणून त्याची पक्की खात्रीच झाली; कारण आम्ही तेथें बोलत उभे होतों, इतक्यांत त्या गलबतावरचे दुसरे लोक तेथें आले. त्यांचा व माझा विशेष परिचय असल्यामुळें त्यांनीं तत्काळ मला ओळखलें व म्हणाले कीं, 'कोण ? सिंदबाद ! काळाच्या तोंडांतून परत आलेला पाहून आम्हांस फार संतोष झाला.' इतक्यांत माझ्याकडे विशेष न्याहाळून पाहिल्यावर स्वतः नाखुद्यासही माझी ओळख पटली. मग तो भला मनुष्य एकदम मला कडकडून भेटला,

आणि म्हणाला, 'ईश्वराची सत्ता अचिंत्य आहे! काय चमत्कारानें त्यानें तुला वांचवलें! तुला पाहून मला जो आनंद झाला आहे, तो माझ्यानें सांगवत नाहीं! हा तुझा माल घे आणि तुझा तूं पाहिजे तसा त्याचा व्यापार कर.' मी त्या नाखुदाचे मोठे आभार मानले व त्याच्या प्रामाणिकपणाची स्तुति केली. तसेंच माझ्या मालांतला कांहीं भाग घेण्याविषयीं मीं त्यास पुष्कळ आग्रह केला; परंतु त्या परोपकारी व निःस्पृह पुरुषानें कांहींएक घेतलें नाहीं. नंतर माझ्या मालांत अत्यंत मोलवान् व अतिउत्कृष्ट अशा कांहीं जिनसा होत्या, त्यांतल्या कांहीं घेऊन राजाच्या भेटीस जाऊन त्यास त्या नजर केल्या. माझ्या जिवावर जीं संकटें आलीं होतीं, तीं त्या राजास मी पूर्वींच कळविलीं होतीं, यावरून 'त्या दुर्मिळ जिनसा कोठून आणल्या,' म्हणून त्यानें मला प्रश्न केला. नंतर माझा सर्व माल पुनः कसा प्राप्त झाला, तो वृत्तांत मीं त्यास निवेदन केला. तें सर्व ऐकून घेऊन तो म्हणाला, 'फार चांगली गोष्ट झाली; तुझा माल सांपडलेला पाहून आम्हांस मोठा संतोष झाला. मग मी केलेली नजर स्वीकारून त्यानें तिच्यापेक्षां अधिक मोलाची देणगी मला दिली. नंतर त्या राजाचा निरोप घेऊन मी त्याच गलबतावर बसून परत स्वदेशास निघालों.हा देश सोडण्यापूर्वीं स्वदेशाचा माल विकून त्या देशांतला शिसवा, चंदन, कापूर, जायफळें, लवंगा, मिरें, सुंठ, वगैरे पुष्कळ माल मीं खरेदी केला होता. मग वाटेनें कितीएक बेटांत उतरून तेथें मालाची देवघेव करीत करीत, शेवटीं बसोऱ्यास येऊन पोहोंचलों, आणि तेथें कांहीं दिवस राहून तेथून बगदाद शहरास आलों. या सफरींत मला एक लक्ष रुपये नफा झाला. घरीं आल्यावर मला पाहून कुटुंबांतल्या सर्व माणसांस व इष्टमित्रांस मोठा आनंद झाला.

नंतर सिंदबाद यानें आपली गोष्ट सांगणें तहकूब करून, मंडळी घरोघर जाण्याची वेळ झाली, तेव्हां त्यानें शंभर रुपये पिशवींत घालून आणविलें; आणि ती पिशवी हिंदबाद यास देऊन त्यास

म्हणाला, ' आतां घरीं जा, व उद्यां सकाळीं आणखी माझी हकीकत ऐकण्याकरितां या. ' त्याचा मोठा मान झाला व बक्षीस मिळालें, त्यामुळें तो हिंदबाद हमाल अगदीं चकित झाला. मग घरीं येऊन घडलेली गोष्ट त्यानें बायकोस व मुलांस सांगितली. त्यामुळें तीं सर्व आनंद पावून ईश्वरापाशीं त्यांनीं सिंदबादास दुवा मागितला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं हिंदबाद हा आपला उत्तम पोषाक करून त्या उदार दर्यावर्दीकडे गेला. त्यानेंही त्याचें आनंदानें व मित्रभावानें आगतस्वागत केलें.सर्व मंडळी जमल्यावर ताटें मांडलीं व सर्व जेवावयास बसले. जेवण झाल्यावर सिंदबाद मंडळीस म्हणाला, 'मित्रहो, आज मी आपल्या दुसऱ्या सफरीचा वृत्तांत सांगतों; इकडे मेहेरबानी करून अंमळ लक्ष द्या.या सफरींतल्या गोष्टी पहिलींतल्यापेक्षांही चमत्कारिक आहेत. ' मग सर्वांनीं अवधान दिलें असें पाहून सिंदबाद यानें आरंभ केला. तो म्हणाला—

## सिंदबाद याची दुसरी सफर.

काल मीं तुम्हांस सांगितलें कीं, पहिली सफर करून आल्यावर मीं असा निश्चय केला होता कीं आतां पुढें बाहेर कोठें न जातां आपलें सर्व आयुष्य बगदाद शहरांत राहून स्वस्थपणें सुखानुभवांत घालवायाचें. परंतु निरुद्योगी राहण्याचा मला लवकरच कंटाळा आला. परमुलुख पहावे व व्यापार करावा, अशी उत्कंठा पुनः उत्पन्न झाली. मग नीट व नफ्याचा वाटलेला माल खरेदी करून व तो गलबतावर चढवून चांगल्या प्रामाणिक व्यापाऱ्यांच्या संगतीनें दुसऱ्यानें मी सफरीस निघालों.

आम्ही वाटेनें कितीएका टापूंत उतरलों, व तेथें विक्री व खरेदी करून आम्हांस बराच नफा झाला. एके दिवशीं एक बेट आमच्या दृष्टीस पडलें. तेथें फळझाडें व फुलझाडें तऱ्हेतऱ्हेचीं व पुष्कळ होतीं परंतु तें अगदीं ओसाड होतें. तेथें घर किंवा खोपट तर कोठलें.पण मनुष्य कधीं आल्याचेंसुद्धां अगदीं चिन्ह दिसत नव्हतें. आम्ही

कितीएक त्या बेटांत उतरलों व तेथें झाडांमधून ओढे वहात होते, त्यांच्या कांठांनीं कोणी फिरत होते; कोणी फळें व फुलें तोडूं लागले व मी फराळाचें घेऊन, एकीकडे ओढयाच्या कांठीं कांहीं झाडें होतीं, त्यांत जाऊन बसलों. मग फराळ करून वनाची शोभा पाहात असतां, गुंगी आली म्हणून तेथेंच लवंडलों. या ठिकाणीं किती वेळ निजलों हें मला सांगवत नाहीं; परंतु जागा झाल्यावर पाहतों तों जहाज निघून गेलें. हें पाहून मला आश्चर्य वाटलें व लगबगीनें उठून कोणी सोबती आहे कीं नाहीं म्हणून पहातों तों कोणी नाहीं; सर्व निघून गेले ! गलबत मात्र मोठ्या झपाटयानें चाललेलें दिसत होतें; परंतु तें इतकें दूर होतें कीं, त्यावरील लोकांस माझी हांक ऐकूं जाण्याचा संभवसुद्धां नव्हता व तें थोडया वेळानें मुळींच दिसेनासेंही झालें.

मित्रहो, असल्या संकटांत पडलों असतां, माझ्या मनांत कसे दुःखकारक विचार आले असतील याचा तुम्हीच विचार करा. मला वाटलें कीं या दुःखानें मी मरेन. मीं पुष्कळ विलाप केला; डोकें बडवून घेतलें व दुःखानें जमिनीवर गडबडा लोळलों. विचार कांहीं सुचेना. स्वतःला पुष्कळ शिव्या दिल्या. मी म्हणालों, ' अरे ! मी किती लोभी, मूर्ख ! एका सफरीनें इतका पैसा मिळाला असून दुसऱ्यानें सुखाचा जीव दुःखांत घालण्याची मला काय गरज होती ? ' परंतु गोष्ट घडावयाची ती घडून गेल्यावर शोक करून काय फळ ? मग ईश्वरावर हवाला ठेवला आणि मनांत आणलें कीं ' आतां तो काय करील तें करो. ' पुढें काय करावें हें कांहींच सुचेना; तेव्हां शेजारीं झाड होतें, त्यावर चढून चोहींकडे पाहूं लागलों. मनांत आशा कीं त्यामुळें तरी वांचण्याची आशा वाटेल, असा कांहीं विषय ( घर किंवा शेत ) दिसेल तर पहावा. समुद्राच्या बाजूस पाहिलें तों पाण्याखेरीज कांहीं दिसेना. मग झाडावरून खालीं उतरलों व खावयाचे पदार्थ राहिले होते, ते बरोबर घेऊन एक पांढरा पदार्थ जिकडे दिसत होता, तिकडे चालूं लागलों. जों

पदार्थ फारच दूर असल्यामुळें तो काय आहे हें पहिल्यानें कळेना. पण जसजसा मी जवळ जात चाललों, तसतसा तो फार मोठा गोळा दिसूं लागला; आणि अगदीं शेजारीं जाऊन हात लावून पहातों तों, हातास फार मऊ लागला. आंत शिरावयास दार असेल या बुद्धीनें मी त्याच्या सभोंवतीं प्रदक्षिणा केली; परंतु चोंहीकडून तो एकसारखाच दिसे, त्यास कोठेंही दार वगैरे नव्हतें; व तो फारच गुळगुळीत असल्यामुळें त्याच्यावर चढण्याचा इलाज नव्हता. त्याचा घेर मी मोजला तो सुमारें पन्नास कदम भरला.

या वेळेस सूर्य मावळण्याच्या सुमारास होता. मग मी तेथें त्या गोळ्याकडे पहात उभा आहे, तों इतक्यांत वरून मोठा ढग आल्याप्रमाणें एकाएकीं काळोखी आली. त्यामुळें मला आश्चर्य वाटलें, आणि वर पहातों तों एक मोठा प्रचंड पक्षी आपणाकडे उडत येत आहे, असें माझ्या दृष्टीस पडलें, आणि मला फारच विस्मय झाला. रुख म्हणून फार प्रचंड पक्षी असतात, म्हणून खलाशी लोक सांगतांना मीं पुष्कळ वेळां ऐकिलें होतें; त्या गोष्टीची स्मृति होऊन मी असा तर्क केला कीं, हा पांढरा गोळा या पक्ष्याचें अंडें असावें. हा माझा तर्क खरा झाला. कारण पुढें लौकरच तो पक्षी खालीं उतरून त्या अंड्यावर बसला. तो पक्षी खालीं येतो असें पाहून मी त्या अंड्याजवळ जाऊन बसलों. तो असा कीं, त्या पक्ष्याच्या पायाचें एक बोट माझ्यापुढें येऊन पडलें. हें बोट मोठ्या झाडाच्या खोडाप्रमाणें लठ्ठ होतें. मग मी डोक्याचें पागोटें काढून त्यानें स्वतःला त्या पक्ष्याच्या बोटास बांधून घेतलें. असें करण्याचा माझा उद्देश असा होता कीं, सकाळीं हा पक्षी उडून गेला म्हणजे हा मला या ओसाड बेटांतून पार घेऊन जाईल. मीं योजल्याप्रमाणें गोष्ट झालीही खरी. दुसऱ्या दिवशीं सकाळीं पहांट होण्याबरोबर तो तेथून उडाला, व त्यानें मला आकाशांत इतकें उंच नेलें कीं, मला खालीं जमीन दिसनाशीं झाली ! नंतर तो मोठ्या वेगानें खालीं उतरला, त्या योगानें माझी शुद्धच बहुतकरून गेली. मग तो पक्षी जमिनीवर ठरतो

न ठरतो, इतक्यांत मी जलदीनें आपणास त्याच्या बोटापासून सोडविलें आणि दूर होतों न होतों इतक्यांत त्या पक्ष्यानें एका मोठ्या प्रचंड सर्पावर झडप घालून त्यास चोचींत धरून तो पुनः आकाशांत उडून गेला.

या पक्ष्यानें मला दरींत ज्या ठिकाणीं सोडलें, तें ठिकाण म्हटलें म्हणजे एक मोठी खोल दरी होती. तिच्या भोंवतालीं चोहींकडून डोंगर होते, व ते इतके उंच होते कीं, वर पाहिलें असतां त्यांचीं शिखरें मेघमंडळास लागलीशीं दिसत व त्यांचे कडे अगदीं नीट असल्यामुळें त्यांवर चढून जाण्याचा अगदीं संभव नव्हता. हें पाहून मला पहिल्यापेक्षां विशेष पंचाईत झाली. मला वाटलें कीं मी ज्या बेटांत होतों तें बेट या दरीपेक्षां हजारों पट चांगलें होतें; तेथून येथें आल्यानें माझा कांहींएक नफा झाला नाहीं.

मग मी इकडेतिकडे फिरून पाहूं लागलों तों त्या दरींत जिकडेतिकडे लक्षावधि कोट्यावधि हिऱ्यांचा खच पडलेला दिसला. त्यांपैकीं कितीएक हिरे फारच मोठाले होते. मग त्यांतील कितीएक हिरे हातीं घेऊन त्यांकडे पाहून वेळ घालवीत होतों, तों सहज अंतरावर दृष्टि गेली, आणि जें पाहिलें त्यामुळें हिरे पहाण्यापासून झालेला सर्व हर्ष एका क्षणांत नाहींसा होऊन अंतःकरणांत पराकाष्ठेचें भय उत्पन्न झालें. तें काय पाहिलें म्हणाल तर, सर्प ! हे सर्प इतके मोठे व लांब होते कीं, त्यांतला अत्यंत लहान जरी घेतला तरी तो एवढा होता कीं, त्यास मोठा हत्ती सहज गिळतां येईल. हे सर्प त्यांचे हाडवैरी जे रुखनामक पक्षी, त्यांच्या भयानें, दिवसा उजेड आहे तोंपर्यंत, बिळांत लपून बसतात व संध्याकाळ झाली न झाली कीं, निर्भय होऊन गुहेंत फिरावयास निघतात. मी तो दिवस त्या गुहेंत इकडेतिकडे फिरून व कोठें कोठें बरीशीं जागा वाटली तेथें बसून घालविला. मग संध्याकाळ होत आली तेव्हां एक लहानशी कपारी पाहिली, आणि तींत बसून रात्र घाल-

विण्याचा निश्चय केला. त्या कपारींत शिरून तेथें रात्रीं सर्पांपासून उपद्रव न व्हावा म्हणून तिच्या तोंडाशीं एक मोठा धोंडा बसविला; तथापि उजेड व हवा येण्यासाठीं लहानशी फट ठेविली होती. मग जवळच्या खावयाच्या पदार्थांपैकीं थोडेसें खात बसलों आहे, तों सर्प बिळांतून बाहेर येऊन इकडेतिकडे फिरूं लागले. त्यांचे भयंकर फूत्कार ऐकून मी भयानें धाबरा झालों व ती रात्र कशी दुःखांत काढली असेल हें, मित्रहो, तुम्हीच मनाशीं ठरवा. पहांट होऊन उजेड पडूं लागला, तसें साप आपआपल्या बिळांत जाऊन लपून बसले. मग हलकेंच भयानें कांपत कांपत मी त्या कपारींतून बाहेर निघालों. त्या दिवशीं मी पुष्कळ वेळ हिरे तुडवीत फिरत होतों, परंतु त्यांतला एकदेखील उचलून घेण्याची मला वांछा झाली नाहीं ! शेवटीं थकून एका ठिकाणीं बसलों व जवळच्या पदार्थांतून कांहीं खाल्ल्यावर चित्त जरी भयानें व निराशेनें व्याकुळ झालें होतें, तथापि सगळ्या रात्रभर अलोचन जागरण झाल्यामुळें मला गुंगी आली. मला थोडीशीं झोंप लागतें न लागतें, इतक्यांत पलिकडे कांहीं धबादिशीं पडलेलें ऐकून दचकून जागा झालों; आणि पहातों तों, कांहीं अंतरावर एक मोठा गुराच्या मांसाचा ताजा तुकडा दृष्टीस पडला. त्याकडे मी पाहात आहें, इतक्यांत एकामागून एक कितीएक ताज्या मांसाचे तुकडे डोंगरावरून खालीं पडतांना मीं पाहिलें.

यापूर्वीं मीं कितीएक वेळां खलाशांच्या व दुसऱ्या लोकांच्या तोंडून असें ऐकिलें होतें कीं, कोणा एका देशांत हिऱ्यांची एक दरी आहे. ती दरी फार खोल असून तिच्या सभोंवतीं उंच उंच डोंगर असल्यामुळें तींत मनुष्याचा प्रवेश होत नाहीं. त्या दरींतून कांहीं हिकमतीनें व्यापारी लोक हिरे आणतात. ती हिकमत अशी कीं, त्या दरीभोंवतालच्या डोंगरावर मोठमोठाले गिधाड राहतात; ते ज्या दिवसांत आपलीं अंडीं फोडतात व त्यांचीं पिलें लहान असतात, त्या दिवसांत व्यापारी लोक तेथें जाऊन, त्या डोंगरावरून

दरींत ताज्या मांसाचे मोठमोठे तुकडे टाकतात. ते तुकडे जोरानें खालीं पडतात, त्या वेळेस त्या दरींतले कांहीं हिरे त्यांस चिकटतात. हे गिधाड फार मोठे व बळकट आहेत; ते ते मांसाचे तुकडे उचलून डोंगरावरील आपल्या घरट्यांत पिलांकरितां घेऊन येतात. ते त्यांनीं वर आणिले कीं, हे व्यापारी लोक मोठ्यानें ओरडून गलबला करतात, म्हणजे गिधाड बिचकून पळून जातात. मग ते गेले म्हणजे हे त्या मांसाच्या तुकड्यांस लागलेले हिरे काढून घेतात. ही सर्व गोष्ट इतक्या दिवस मला अगदीं खोटी वाटत असे. परंतु या वेळीं तिचा खरेपणा स्वतः माझ्याच प्रत्ययास आला. असो, हे मांसाचे तुकडे पडण्यापूर्वीं तर या भयंकर दरींतून सुटका होण्याची मला अगदीं आशा नव्हती. परंतु ते तुकडे पडतांना पाहून माझ्या जिवांत जीव आला. मग अत्यंत मोठमोठे सर्वोत्कृष्ट हिरे वेंचून, ते, खाण्याचे पदार्थ आंत भरून जी कातड्याची पिशवी बरोबर आणली होती, ती रिकामी करून तींत भरले; आणि ती कमरेस बळकट बांधून टाकिली. नंतर डोक्याचें पागोटें पुनः सोडलें, आणि मांसाच्या तुकड्यांपैकीं एक खूप मोठा तुकडा घेऊन तो त्या पागोट्यानें अंगास गच्च बांधून त्या दरींत पालथा निजलों.

माझी अशी सर्व तयारी झाली तों इतक्यांत तेथें गिधाड येऊं लागले व एकेकानें एकेक मांसाचा तुकडा उचलून ते उडून गेले. मग त्यांपैकीं मोठा व बळकट गिधाड होता त्यानें, मी आपल्या अंगाला जो तुकडा बांधला होता त्यावर झेंप घालून तो मजसकट उचलून डोंगरावर आपल्या घरट्यांत नेला. गिधाड वर येतांच वर व्यापारी होतेच, त्यांनीं मोठी आरोळी करून त्यास त्या मांसाच्या तुकड्यापासून पळविलें. मग मी जेथें उभा होतों, तेथें एक व्यापारी येऊं लागला. मला पाहून प्रथम तर तो दचकला; पण पुनः धीर धरून जवळ येऊन त्यानें मजबरोबर भांडण आरंभिलें. तो म्हणाला, 'अरे' या घरट्यावर माझी सत्ता असतां, तूं येथें काय म्हणून आलास?' गिधाडांचीं हीं घरटीं व्यापाऱ्यांनीं वांटून घेतलीं अस-

तात. मीं त्यांस गरीबानें उत्तर केलें, ' अहो शेटजी, मी कोण व या ठिकाणीं कसा आलों, हें आपण ऐकून घेतल्यास आपण मजवर राग करणार नाहीं; दयाच कराल यांत संशय नाहीं. आपण शांत व्हावें. मीं आपल्याबरोबर दरीच्या तळाहून पुष्कळ उत्तम हिरे आणले आहेत; ते तुम्हांला व मला पुरून उरण्याइतके आहेत. व त्या तुमच्या सोबत्यांच्या सर्व हिऱ्यांच्यानें किंमतीविषयीं माझ्या एकाही हिऱ्याची बरोबरी होणार नाहीं. असें बोलून त्यास हिऱ्यांची पिशवी दाखविली. याप्रमाणें मी त्याच्याशीं बोलत आहें तों मला पाहून दुसरे कितीएक व्यापारी तेथें जमले व माझी हकीकत ऐकून त्या सर्वांस पराकाष्ठेचा विस्मय झाला. मीं दरींतून वर येण्याविषयीं जी हिकमत योजली, तिचा त्यांस तितका चमत्कार वाटला नाहीं; परंतु ती करण्याचें माझें धारिष्ट पाहून ते फार थक्क झाले.

मग ते सर्व जेथें राहात होते, तेथें त्यांनीं मला नेलें. मीं बरोबर जे हिरे आणले होते, ते पाहून त्यांस चमत्कार वाटला. ते म्हणाले कीं, ' आम्ही बहुत दिवस हिऱ्यांचा व्यापार करीत आहों; पण एवढाले व अशा पाण्याचे हिरे आम्हीं पूर्वी कधींही पाहिले नाहींत. ज्या व्यापाऱ्याच्या घरट्यांत गिधाडानें मला आणलें होतें त्यास मीं म्हणालों कीं, ' शेटजी, या हिऱ्यांतून हवे तितके हिरे निवडून आपणास घ्या. पण त्यानें सगळ्यांत लहान असा एकच हिरा घेतला. मी त्यास आणखी घेण्याविषयीं पुष्कळ आग्रह केला व सांगितलें कीं, तुम्हीं पुष्कळ घेतलें तरी माझा तोटा नाहीं. परंतु तो ऐकेना. तो म्हणाला, ' एवढ्या हिऱ्यानें माझा संतोष आहे. याची जी मला किंमत येईल तितकी मला जन्मभर पुरेल. मला आतां पुनः मुशाफरी करण्याची गरज नाहीं. '

नंतर रात्रीं माझी सर्व हकीगत माझ्या तोंडानें पुनः त्या सर्व व्यापाऱ्यांनीं एक वेळ ऐकली. कारण, मीं पहिल्यानें जेव्हां सांगितली, त्या वेळीं कितीएक हजर नव्हते. पार पडलेल्या संकटांची आठवण होऊन या वेळीं जो मला आनंद झाला तो मनांत मावेना.

मला वारंवार वाटे कीं, मीं खरोखरीच या मंडळींत बसलों आहें किंवा स्वप्न पहात आहे, कोण जाणे! आतां आपणांस कांहीं भय नाहीं, ही गोष्ट माझ्या मनास बराच वेळ खरी वाटेना, इतकें माझें मन भयानें वेडावलें होतें!

मी त्या व्यापाऱ्यांमध्यें येण्याच्यापूर्वीं कांहीं दिवस ते तेथें आले होते व हिरे वेंचण्याचें कामही त्यांचें त्याच दिवशीं आटपलें होतें. यामुळें दुसऱ्या दिवशीं आम्ही तेथून निघालों. ज्या उंच डोंगरावरून आमची वाट होती, त्या डोंगरावर फार मोठमोठे साप असतात; परंतु ईश्वराच्या कृपेनें आम्ही सर्व त्यांस टाळून फार जवळचें जें बंदर होतें, तेथें सुखरूप येऊन पोहोंचलों. या बंदराहून जहाजावर बसून आम्ही रोहानामक बेटास गेलों. ज्यापासून कापूर निघतो, तीं झाडें या बेटांत असतात. तीं झाडें मोठीं असून त्यांचा विस्तार एवढा असतो कीं, त्यांच्या सावलीस शंभर मनुष्यें सहज बसतील. या झाडांस शेंड्यांशीं भोंक पाडून तेथें एक मडकें अडकवतात म्हणजे त्या भोंकांतून रस वाहून मडक्यांत सांचतो व तो रस आळला म्हणजे कापूर झाला. याप्रमाणें रस त्यांतून निघून गेला म्हणजे तें झाड वाळून मरतें.

गेंडे म्हणून जीं जनावरें आहेत, तीं या बेटांतच असतात. हें जनावर हत्तीपेक्षां लहान व रेड्यापेक्षां मोठें असतें. याच्या नाकावर एक शिंग असतें. त्या शिंगाची लांबी एक हात असते. तें भरीव असून मधून चिरलेलें असतें. त्या शिंगावर माणसाच्या चित्रासारख्या पांढऱ्या रेघा असतात. गेंडा हत्तीबरोबर लढाई करतो व ती करतांना तो हत्तीच्या पोटाखालीं शिरून त्यांत आपलें शिंग भोंसकून त्या हत्तीस डोक्यावर घेऊन जातो. पण हत्तीचें रक्त व चर्बी त्याच्या डोळ्यांत शिरून कांहीं वेळानें तो अंधळा होऊन जमिनीवर पडतो. परंतु यापुढली गोष्ट ऐकून तर तुम्हांस फारच चमत्कार वाटेल. ती गोष्ट अशी कीं, याप्रमाणें तो गेंडा पडला असतां रुख पक्षी त्यावर झडप घालून त्यास त्याच्या शिंगास अडकलेल्या

हत्तीसकट चोंचींत धरून आकाशमार्गानें नेऊन आपल्या पिलांस खावयास देतो.

याप्रमाणें दुसऱ्या कितीएक अद्भुत गोष्टी मीं त्या बेटांत पाहिल्या, परंतु त्या आतां तुम्हांस सांगत नाहीं. कारण त्या सर्व सांगूं लागलों तर तुम्हांस कंटाळा येईल. असो. मग जवळच्या हिऱ्यांपैकीं कांहीं हिरे विकून मीं त्या बेटांतले कांहीं उंची उंची जिन्नस व्यापाराकरितां खरेदी केले. मग तेथून निघून दुसऱ्या कितीएक बेटांत गेलों व वाटेनें पुष्कळ बंदरांत उतरून तेथें विक्री व खरेदी करीत करीत शेवटीं बसोरा शहरास येऊन पोहोंचलों. तेथें गलबतावरून उतरून बगदाद शहरास आलों. घरीं आल्यावर पहिल्यानें गरीबांस पुष्कळ पैसा धर्म केला व याप्रमाणें मोठ्या मेहनतीनें व संकटांनीं मिळविलेली दौलत कांहीं दिवस स्वस्थ सुखानें भोगली. माझा चोहोंकडे नांवलौकिक झाला व लोकांत माझी मोठी अब्रू वाढली.

याप्रमाणें दुसऱ्या सफरीची हकीकत समाप्त करून सिंदबाद यानें हिंदबाद यास त्याही दिवशीं शंभर रुपयांची एक पिशवी बक्षीस केली; व सांगितलें कीं, ' तिसऱ्या सफरीची गोष्ट ऐकण्याकरितां उद्यां तुम्हीं यावें. '

नंतर सर्व मंडळी आपआपल्या घरीं गेली. दुसरे दिवशीं संकेताप्रमाणें सर्व जमले. हिंदबाद, ज्यास आतां दारिद्र्याची स्मृतिही राहिली नव्हती, तोही सांगितल्याप्रमाणें आला. मग जेवण झाल्यावर सिंदबाद यानें लक्ष देण्याविषयीं सर्व मंडळीची प्रार्थना करून तिसऱ्या सफरीची हकीकत सांगण्यास आरंभ केला. तो म्हणतो—

## सिंदबाद याची तिसरी सफर.

दुसऱ्या सफरीहून आल्यावर कितीएक दिवस मीं घरीं बसून स्वस्थ सुखानुभव घेतला, त्यामुळें गेल्या दोन सफरींत झालेल्या सर्व

संकटांची व दुःखांची स्मृतिसुद्धां नाहींशी झाली. परंतु त्या वेळेस मी भरज्वानींत होतों, यास्तव घरीं निरुद्योगी बसण्याचा मळा लौकरच कंटाळा आला. मग धोक्याचे विचार मनांतून नाहींसे करून व उदीमाकरितां पुष्कळ उंची उंची माल खरेदी करून तो बरोबर घेऊन बगदादाहून बसोऱ्यास मी आलों. तेथें एका गलबतावर भाड्यानें जागा घेऊन त्यावर तो माल चढवून मीही वर चढलों. मजबरोबर पुष्कळ दुसरे व्यापारी निघाले. आम्ही पुष्कळ फिरलों, व बंदरोबंदरीं उतरून तेथें उदीमही पुष्कळ केला व त्यांत आम्हांस नफाही पुष्कळ झाला.

आमचें जहाज एके दिवशीं अफाट दर्यांत चाललें असतां एकाएकीं मोठें जबरदस्त वादळ झालें, त्यामुळें आम्ही रस्ता चुकलों. तें वादळ तसेंच कितीएक दिवस चाललें होतें. पुढें आमचें जहाज भडकत भडकत एका बेटाजवळ आलें. आमच्या गलबतवाल्या नाखुद्याच्या मनांत त्या बेटांत उतरावयाचें नव्हतें; परंतु आमचा उपाय नाहींसा झाल्यामुळें आम्हीं त्या बेटांपासून थोड्या अंतरावर गलबत नांगरलें; मग अवजारें आटपल्यावर नाखुद्यानें आम्हांस सांगितलें, 'मित्रहो, हें बेट व याच्या शेजारचीं कितीएक बेटें यांत मोठे क्रूर व अडाणी लोक राहतात. यांच्या सगळ्या अंगावर केंस असतात. ते आपणावर चालून येतील. आतां ते लोक ठेंगणे व लहान आहेत; तथापि आपण त्यांशीं मारामारी करतां कामा नये. कारण आपल्या हातून जर का त्यांतला एखादा मेला, तर तत्काळ त्या लोकांची असंख्य सेना टोळधाडीप्रमाणें आपणांवर पडून ते आपणां सर्वांस ठार मारून टाकतील.' हें भाषण ऐकून गलबतावरील सर्व मंडळी भयानें गडबडून गेली. नाखुद्यानें ही जी गोष्ट सांगितली, तिचा प्रत्यय लवकरच आला. आमचें गलबत स्थिर होऊन थोडा वेळ लोटतो न लोटतो इतक्यांत त्या बेटांतून वेड्याविद्र्या त्या अडाणी लोकांच्या झुंडीच्या झुंडी समुद्रकांठीं आल्या व त्यांनीं भराभर समुद्रांत उड्या घालून पोहत पोहत येऊन आमचें

गलबत घेरलें. ते गलबतावर अशा त्वरेनें व चपलतेनें चढले कीं, त्यांचे पाय गलबताच्या बाजूंस किंवा दोरखंडास लागतांना आम्हांस दिसले देखील नाहींत !

या प्रसंगीं आमची काय अवस्था झाली असेल तें, मित्रहो, तुम्हीच मनांत आणा. त्यांनीं कांहीं केलें तरी सर्व सोसून उगाच बसावयाचें. त्यांस हात म्हणून लावावयाचा नाहीं व त्यांची भाषा आम्हांस व आमची त्यास न समजल्यामुळें बोलण्याचा तर उपयोगच नाहीं; अशा स्थितींत त्यांनीं अवजारें सोडलीं व नांगराचा सोल तोडून टाकला. मग त्यांनीं जहाज ओढून तीरावर नेऊन आम्हां सर्वांस जमिनीवर उतरवलें; आणि तेथून आम्हांस घेऊन दुसऱ्या ज्या एका बेटांतून ते आले होते, तेथें गेले. हें बेट समुद्रांतून फिरणारे सर्व लोक टाळतात व ते तसें कां करतात, याचें कारण माझ्या पुढील गोष्टीवरून तुमच्या ध्यानांत येईल. परंतु या प्रसंगीं आम्ही निरुपाय होऊन त्या बेटांत गेलों. तेथें आम्ही पोहोंचल्यावर ते अडाणी लोक निघून गेले.

मग आम्ही तीरावरून त्या बेटाच्या आंतल्या प्रदेशीं जात असतां वाटेनें आम्हांस कितीएक फळझाडें लागलीं. त्यांचीं फळें खाऊन वांचतील तितक्या दिवस प्राण वांचविण्याचा आम्हीं बेत केला, परंतु आम्हां सर्वांची अशी खात्री झाली होती कीं, आपण येथून जिवंत सुटत नाहीं. मग त्या ओसाड बेटांत फिरत असतां दूर अंतरावर एक मोठी इमारत आमच्या दृष्टीस पडली. नंतर जवळ जाऊन पाहतों तों ती एक मोठी उंच हवेली होती. तिचा दरवाजा शिसवीचा होता. तो उघडून आम्हीं आंत शिरलों. तोंडींच मोठें अंगण होतें, व दरवाजाच्या समोरच्या बाजूस मोठा सोपा होता व त्याच्या मध्यभागीं आंत जावयाचें दार होतें. त्या दाराच्या बाहेर वरून आच्छादलेली चौकोनी बसावयाची जागा होती. तेथें एका बाजूस माणसांच्या हाडांचा एक मोठा ढीग पडला होता, व त्या ढिगासमोर मांस भाजावयाचे कितीएक लोखंडाचे दांडे पडले होते.

हें सर्व पाहून तर आमचें काळीज चरकलें. परंतु आम्ही सर्व चालून चालून अगदीं थकून गेलों होतों; आम्हांस पाऊलसुद्धां उचलून टाकण्याचें सामर्थ्य राहिलें नव्हतें; यामुळें आम्ही निरुपाय होऊन तेथेंच भुईवर पडलों.

इतक्यांत सूर्यास्त होण्याची वेळ झाली. आम्ही पंगू व दीन होऊन तेथें पडलों असतां त्या सोप्याचें दार एकाएकीं मोठ्यानें वाजलेसें वाटलें; आणि पाहतों तों तें उघडून ताडासारखा उंच व मोठा लठ्ठ व काळा ढुस्स असा एक राक्षस बाहेर आला. त्यास कपाळाच्या मध्यभागीं वाटोळा व निखाऱ्यासारखा लाल व चकचकीत असा एकच डोळा होता. त्याचें तोंड घोड्यासारखें लांब असून त्याचा खालचा ओंठ त्याच्या उरावर लोंबत होता, व त्याचे लांब लांब व तीक्ष्ण पुढील दांत तोंडाबाहेर आले होते. त्याचे कान हत्तीच्या कानांसारखे असून तें त्याच्या खांद्यावर लोळत होते. त्याचीं लांब लांब व शेवटास वळलेलीं नखें मोठ्या प्रचंड पक्ष्याच्या बोटांसारखीं दिसत होतीं. त्या राक्षसाचें या प्रकारचें भयंकर रूप पाहून आम्ही सर्व भीतीनें मूर्च्छा येऊन मढ्यासारखें जागच्याजागीं निपचित पडलों !

नंतर कांहीं वेळ लोटल्यावर पुनः शुद्धीवर येऊन पाहतों तों तो सोप्याच्या दारापुढल्या चतुष्कोनी जागेंत बसून आपल्या भयंकर डोळ्यानें आम्हांकडे न्याहाळून पहात आहेसें दृष्टीस पडलें. मग पाहून झाल्यावर आम्ही पडलों होतों तेथें येऊन त्यानें हात लांबवून प्रथमतः मला धरलें. नंतर मानगोटी धरून मला वर उचललें व खाटीक बकऱ्यास जसें करतो, तसा मला उलथा-पालथा करून मी अशक्त व रोडका वाटल्यावरून मला टाकून दिलें. नंतर ह्याचप्रमाणें दुसऱ्यासही त्यानें पाहिलें. त्या सर्वांत आमचा नाखुदा त्यास बरा वाटला. कारण तो सर्वांत चांगला पुष्ट होता. मग त्यास एका हातांत घेऊन दुसऱ्या हातानें त्यानें सहज त्याच्या अंगांत एक लोखंडाचा दांडा खुपसला, व मोठी एक आगटी पेट-

वून तीवर त्यास भाजून रात्रीच्या फराळाकारितां सोप्यांत घेऊन गेला. खाणें झाल्यानंतर तो बाहेर येऊन त्या चौकोनी जाग्यांत निजला. त्याच्या घोरण्याचा नाद मेघगर्जनेसारखा होत होता. तो उजाडेपर्यंत मध्यें जागा झाला नाहीं. परंतु आम्ही सर्वांनीं ती रात्र कशा दुःखांत व भयांत काढली असेल, तें शब्दांनीं सांगतां येत नाहीं! उजाडल्यावर तो राक्षस उठून बाहेर निघून गेला. आम्ही मात्र त्या हवेलींत राहिलों.

गडबड होऊन तो राक्षस जागा होईल या भयानें सगळ्या रात्रींत आम्हीं अगदीं हूं कीं चूं केलें नाहीं; निमूट बसलों होतों; पण तो सकाळीं कांहींसा दूर गेलासें वाटल्याबरोबर आम्हीं सर्वांनीं गळा मोकळा करून मोठ्यानें शोक करण्यास आरंभ केला; तो असा कीं आमच्या रडण्यानें व ओरडण्यानें, ती सर्व हवेली दणाणून गेली. आम्ही एकंदर म्हटलें असतां पुष्कळजण होतों, तथापि त्यास मारून आपली सुटका करून घेण्याची कल्पना म्हणून कोणा एकाच्या मनांतसुद्धां आली नाहीं. आतां या राक्षसाचा बध करणें हें मोठें कठीण काम होतें खरें, तथापि या गोष्टीचा यत्न केल्यावांचून जीव बचावण्यास दुसरा उपायच नव्हता.

पुढें आतां काय करावें असा आम्ही विचार करीत बसलों असतां, पुष्कळ कल्पना निघाल्या; परंतु त्यांपैकीं एकही कायम ठरली नाहीं. मग ईश्वर काय करील तें करो, असा त्यावर हवाला ठेवून आम्ही तो दिवस रानझाडांचीं फळें-मुळें खाऊन त्या बेटांत इकडेतिकडे फिरण्यांत घालविला. संध्याकाळ झाली तेव्हां रात्र काढण्याकरितां निवाऱ्याची जागा पाहूं लागलों, परंतु दुसऱ्या कोठें ती न सांपडल्यामुळें निरुपाय होऊन पुनः पहिल्या दिवशींच्या त्या हवेलींतच आलों.

राक्षस येऊन आम्हांपैकीं एकाचा फराळ करण्यास चुकला नाहीं. त्याची भूक शांत झाल्यावर तो आदले दिवसाप्रमाणें झोंपीं जाऊन मोठ्यानें घोरूं लागला, व पहाट होतांच उठून बाहेर निघून गेला.

आम्ही सर्व जीवाविषयीं इतके निराश झालों कीं, कितीएक म्हणूं लागले कीं, ' या अशा रीतीनें मरण्यापेक्षां समुद्रांत उड्या टाकून मरावें हें बरें. ' परंतु आम्हांपैकीं एकजण त्यावर बोलला, ' अहो, आपल्या मुसलमानी धर्मात आत्महत्येचा निषेध केला आहे; पण तो निषेध जरी नसता, तरी ज्यानें आपणांस अशा घोर रीतीनें मारण्याचें आरंभिलें आहे, त्या दुष्ट राक्षसाचा वध करण्याचा यत्न करणें हें जीव देण्यापेक्षां विशेष शहाणपणाचें कृत्य नव्हे काय ? तर आपण सर्वांनीं मिळून या गोष्टीचा यत्न करावा, हें मला बरें वाटतें.

या जातीची मसलत मीही आपल्या मनांत योजिली होती. मग तीच गोष्ट निघाल्यावरून ती मसलत मी आपल्या सर्व सोबत्यांस सांगितली; त्या सर्वांस ती मान्य झाली. मी त्यास म्हणालों, ' मित्रहो, या बेटाच्या किनाऱ्यावर पुष्कळ लांकडें आहेत, हें तुम्हांस ठाऊकच आहे; जर माझें म्हणणें तुम्ही सर्व ऐकत असाल, तर आपण त्या लांकडांचे ताफे बांधून त्यांचा उपयोग करण्याची संधी येईतोंपर्यंत ते एका नीट ठिकाणीं ठेवूं, आणि मग मीं आपली सुटका होण्याची एक युक्ति योजिली आहे, तिच्या तजाविजीस लागूं. ती युक्ति सिद्ध झाल्यास आपणांस त्या ताफ्यांची गरज नाहीं. मग एखादें गलबत वाटेनें जातांना आपणास आढळेपर्यंत आपण याच बेटांत कसा तरी काळक्षेप करूं. पण माझी युक्ति जर फसली तर आपण तत्काळ ताफ्यांवर बसून ते समुद्रांत हांकारूं. आतां हें मी कबूल करितों कीं, या असल्या आधारावर बसून समुद्राच्या लाटांत शिरणें ही जीवावरची गोष्ट आहे खरी. तथापि येथें राहून तरी आपणांस मरण कोठें चुकत आहे ? तर येथें उगीच बसून राक्षसाच्या तोंडांत जाण्यापेक्षां पाण्यांत बुडून मरणें बरें नव्हे ? पहा, या दुष्टानें आपणांपैकीं दोघांस तर खाऊन टाकलें, व आपण असेंच येथें बसलों जर आपणां सर्वांसही खाण्यास तो कधीं चुकणार नाहीं. या माझ्या बोलण्यास सर्वांनीं रुकार दिला. नंतर आम्ही ताबडतोब समुद्रकांठीं जाऊन एकएकावर तीन तीन असा-

र्मास बसतां येईल असे सर्वांस पुरेतसे ताफे संध्याकाळपर्यंत तयार केले. संध्याकाळ झाली तेव्हां आम्हीं पुनः त्या वाड्यांत आलों. नंतर कांहीं वेळानें आमच्या मागून राक्षसही आला. त्या रात्रींही आम्हांपैकीं एकजण त्या निर्दय दुष्टाच्या भुकेस बळी पडला. परंतु त्याचा सूड उगवण्यास आम्हीं फार वेळ लावला नाहीं. त्याचें तें भयंकर भोजन झाल्यावर नेहमींप्रमाणें तो राक्षस निजला. मग तो घोरूं लागलासें पाहून आम्हांपैकीं चांगले धिट्टधिट्ट नऊजण व मी दहावा, इतक्यांनीं कंबरा बांधून दहा मोठमोठे लोखंडी दांडे घेऊन ते मोठी आगटी जळत होती, तींत घातले. नंतर त्यांचीं टोंकें तापून चांगलीं लाल होतांच दहाही जणांनीं ते दांडे एकदम त्या राक्षसाच्या डोळ्यांत भोंसकून त्यास आंधळा करून टाकला.

आम्ही असें करतांच मोठी इजा झाल्यामुळें राक्षसानें मोठी भयंकर किंकाळी फोडली, आणि एकाएकीं उभा राहून कोणी तरी सांपडेल तर त्याचा चेंदा करून टाकावा, या बुद्धीनें त्यानें आपले हात लांब पसरून चोहींकडे फिरविले; परंतु सावध असल्यामुळें आम्ही त्याजपासून बरेंच दूर गेलों होतों. मग त्याच्या पायांखालीं तुडवलों जाणार नाहीं अशा ठिकाणीं आम्ही सर्व जमिनीसरसें होऊन दबून राहिलों. कांहीं वेळ त्यानें इकडेतिकडे शोधलें, पण कोणीच हातीं लागत नाहींसें पाहून तो चांचपत चांचपत दरवाजा शोधून ओरडत त्या दरवाज्यांतून बाहेर निघून गेला. तो बाहेर जातांच, त्याच्या पाठोपाठ आम्हीही बाहेर पडून आदल्या दिवशीं जेथें ताफे करून ठेवले होते, तेथें गेलों; आणि ते ताफे समुद्रांत लोटून देऊन, राक्षस कोणी वाटाड्या घेऊन आल्यास सूर्योदयाबरोबर ते चालू करावे, अशा तयारीनें बसलों. राक्षस जरी रानांत निघून गेला तरी त्याच्या दूरच्या आरोळ्या आम्हांस समुद्रकिनाऱ्यावर थोडथोड्या ऐकूं येत होत्याच. त्या आरोळ्या बंद होऊन सकाळपर्यंत कोणी न आले तर तो मेला असें समजावें, आणि तसें झाल्यास वाटेनें जातांना एकादें जहाज आढळेतोंपर्यंत याच बेटांत रहावें, असा आमचा संकेत

होता व त्याप्रमाणें बहुतकरून घडेल अशी आम्हांस आशाही होती. परंतु सूर्योदय होत आहे तोंच आमच्या दृष्टीस असें पडलें कीं, त्या दुष्ट राक्षसास हातीं धरून त्याच्याप्रमाणें मोठे दुसरे राक्षस मोठ्या जलदीनें आम्हाकडे येत आहेत!

हें पाहतांच आम्ही मोठ्या घाईनें तारयांवर बसून ते पुढें हांकारले. हे राक्षसांनीं पाहून मोठमोठे धोंडे त्यांनीं आम्हांवर अशा नेमानें मारले कीं, मी व आणखी दोन असामी ज्या तारयांवर होतों तो खेरीज करून बाकीचे सर्व मोडून त्यावरचे माझे सोबती पाण्यांत बुडून मरण पावले. आम्ही आपला ताफा मात्र मोठ्या झपाट्यानें वल्हवून त्यांच्या धोंड्यांच्या टप्प्याच्या पार नेला.

मग अफाट समुद्रांत आमचा ताफा गेल्यावर तो वाऱ्यानें व लाटांनीं इकडेतिकडे भडकूं लागून आम्हांस आवरेना. मग आतां मरतों किंवा घटकेनें मरतों अशा भयंकर अवस्थेंत कांहीं वेळ गेल्यावर सरतेशेवटीं तो ताफा एका बेटांत जाऊन लागला. मग मोठ्या आनंदानें आम्ही तेथें उतरलों. त्या बेटांत कितीएक प्रकारचीं चांगलीं रानफळें होतीं; तीं खाल्ल्यावर व पाणी प्याल्यावर आमच्या जिवांत जीव आला.

संध्याकाळ झाल्यावर आम्ही समुद्रतीरीं जाऊन निजलों. परंतु कांहीं वेळानें शेजारीं गडबड झाल्यामुळें जागें होऊन पाहतों, तों एक मोठा प्रचंड सर्प दृष्टीस पडला. तो इतका जवळ आला होता कीं, आम्हांपैकीं एकास धरून त्यानें गिळावयास आरंभ केला. त्या बिचाऱ्या माझ्या सोबत्यानें सुटण्यासाठीं पुष्कळ धडपड केली; पण कांहीं उपयोग झाला नाहीं. सापानें त्यास दोनचार वेळ हालवून जमिनीवर आपटलें, आणि चेंदा करून त्यास गिळून टाकलें.

माझा दुसरा सोबती व मी बरेंच दूर पळून गेलों होतों. तरी तेथें आम्हांस त्या सर्पाचा शब्द ऐकूं येत होता; त्यावरून आम्ही तर्क केला कीं, खाल्लेल्या मनुष्याचीं हाडें तो दुष्ट सर्प ओकून टाकीत असेल. दुसऱ्या दिवशीं दिवसां उजेडीं पाहिलें तो आमचा तर्क खरा

झाला. मग सोबत्यांचीं तीं हाडें पाहून मी शोक करून म्हणालों, 'हे दैवा! काय तूं हात धुवून आमच्या पाठीस लागला आहेस! पहा, कालच नुकते आम्ही त्या दुष्ट राक्षसाच्या तडाक्यांतून जीव वांचवून सुटलों, तों आज येथें देखील आम्हांकरतां त्याचसारखें मोठें अरिष्ट तूं तयार करून ठेवलेंच आहेस ना!'

नंतर त्या बेटांत फिरत असतां, एक मोठा वृक्ष आमच्या दृष्टीस पडला; त्या वृक्षावर बसून रात्र काढण्याचा आम्ही बेत केला, पण अंधार पडतांच, सर्प सुस्कारे टाकीत त्या वृक्षाच्या बुंध्याशीं येऊन त्याच्या खोडास टेंकून उभा झाला, आणि खालच्या अंगास माझा सोबती बसला होता त्यास पकडून घेऊन गेला.

सकाळ होईपर्यंत मी झाडावर तसाच बसून राहिलों. मग सूर्यो-दय झाल्यावर खालीं उतरलों. भयानें माझ्या तोंडावर मृतकळा आली होती. मला वाटलें कीं आज रात्रीं हा साप आपल्याला खाल्ल्यावांचून सोडीत नाहीं. त्या भयानें अगदीं वेडा होऊन जीव देण्याकरतां मी समुद्राकडे चाललों. जीव हा सर्वांस पराकाष्ठेचा प्यारा आहे; वांचेल तोंपर्यंत त्यास वांचविण्याची आशा सुटत नाहीं. असो; समुद्राकडे जातांना मीं आपल्याशीं विचार केला कीं, 'आत्महत्या करणें बरें नाहीं. ईश्वरावर हवाला ठेवून आपणाकडून यत्न करावा. मग तो सिद्धीस नेणें त्याच्या हातीं आहे.'

याप्रमाणें मनाचा निश्चय करून पुष्कळ लाकडें जमा केलीं व तीं झाडावर एके ठिकाणीं खालवर व बाजूंस बांधून व त्याच्या आंतून कांटेझाडें लावून पिंजऱ्यासारखी जागा केली. मग संध्याकाळ होतांच त्या पिंजऱ्यांत जाऊन बसलों. मनास इतकेंच पोकळ समाधान होतें कीं, आपणाकडून व्हावयासारखी तजवीज होती ती आपण केली आहे, आतां शेवट होणें तो परमेश्वराच्या हातीं. काळोख पड-ल्याबरोबर सर्प बिनचूक, मी ज्या वृक्षावर होतों त्याखालीं आला, आणि मजवर झडपा घालूं लागला; मग मी जो सभोंवतीं पिंजरा केला होता, त्यामुळें त्याचा इलाज चालेना. मग उंदराच्या टपणीस

बोका जसा बसतो तसा तो सर्व रात्र तेथें झटापट करीत होता. शेवटीं उजेडावयास लागलें, तेव्हां तो निघून गेला. तथापि चांगलें ऊन पडेतोंपर्यंत खालीं उतरावयास मला धीर झाला नाहीं.

आदल्या दिवशीं तो पिंजरा बांधण्याचे जे श्रम झाले होते व रात्रीस जागें रहावें लागलें, तसेंच त्या सर्पाचे विषमय फुस्कारे अंगाला लागले होते, त्यामुळें माझ्या जीवास पराकाष्ठेचा त्रास होऊन, पुनः असली रात्र काढण्याचा प्रसंग येऊं नये म्हणून समुद्राच्या कांठीं उंच दरडीवर जीव द्यावयास गेलों; आणि आतां खालीं उडी टाकणार इतक्यांत देवास माझी करुणा येऊन दूर अंतरावर एक गलबत माझ्या दृष्टीस पडलें. मग तें पाहतांच मला मोठा हर्ष होऊन मीं मोठ्या जोरानें आरोळी मारली व डोकीचें पागोटें मोकळें करून तें वर आकाशांत उडाविलें; मनांत हेतु कीं, त्या पागोटयाकडे तरी गलबतावरील कोणाचें लक्ष लागावें. ईश्वराचे दयेनें माझा मनोरथ सिद्धीस गेला. तो असा कीं, जहाजावरील सर्व खलाशांची दृष्टि माझ्या त्या पागोटयाकडे जाऊन नाखुद्यानें एक होडी मजकरतां पाठविली.

मग मी गलबतावर जाऊन पोहोंचतांच, त्यावरील सर्व खलाशी व व्यापारी मोठ्या उत्कंठेनें मला विचारूं लागले कीं, तूं या ओसाड बेटांत कसा सांपडलास ? त्यावरून मीं आपली सर्व हकीगत सांगितल्यावर, त्यांमध्यें फार वृद्ध होते ते म्हणाले कीं, येथील कित्येक बेटांत राक्षस राहतात, व ते मनुष्य मारून त्यांचें कच्चें किंवा भाजून मांस खातात, हें आम्हीं ऐकिलें आहे. तसेंच ज्या बेटांत तूं होतास त्या बेटांत पुष्कळ मोठमोठे सर्प आहेत, व ते सर्प दिवसास बिळांत लपून राहून रात्रीं बाहेर पडतात असेंही ऐकिलें आहे.'

मी जीवावरच्या इतक्या अनर्थांतून सुटलों, हें मनांत आणून मंडळीस मोठा आनंद झाला. मग मला भूक फार लागली असेल असें समजून त्यांनीं आग्रह करून मला जेवूं घातलें. तसेंच माझ्या

अंगावरचीं वस्त्रें फाटलीं होतीं, तीं पाहून नाखुद्यास दया आली, आणि त्यानें आपल्या जवळचा एक पोषाख मला दिला.

पुढें आम्ही समुद्रांतून कितीएक दिवस वाट चालत असतां वाटेनें पुष्कळ बेटांत उतरत उतरत शेवटीं सालहान नामक बेटांत येऊन पोहोंचलों. या बेटांत चंदन पुष्कळ होतें, व तें लाकूड फार औषधी आहे. आम्ही बंदरीं आल्यावर जहाज नांगरलें. व्यापारी लोक आपला माल विकण्याकरतां किंवा त्यांची अदलाबदल करण्याकरतां जहाजांतून जमिनीवर उतरूं लागले. एके दिवशीं नाखुदा मला बोलावून म्हणूं लागला, 'बाबा, कांहीं दिवसांपूर्वीं माझ्या गलबतावर एक व्यापारी होता, त्याचा माल मजपाशीं राहिला आहे. तो व्यापारी तर मरून गेला, याकरतां माझा बेत असा आहे कीं, हा माल विकून जी किंमत येईल ती त्या व्यापाऱ्याचीं मुलेंमाणसें भेटल्यास त्यांस द्यावीं. तो माल याच गलबतावर होता.' मग तो माल मला दाखवून नाखुदा म्हणाला, 'मी म्हणतों तो हा माल. माझें तुम्हाला सांगणें असें आहे कीं, तुम्ही हा माल आपल्या ताब्यांत घेऊन हा विकावा व जी किंमत येईल, तींतून चालीप्रमाणें दलाली घ्यावी.' मी उत्तर केलें कीं, 'तुम्ही मला हें काम सांगितलें हा मजवर मोठा उपकार झाला. मी ही गोष्ट मोठ्या आनंदानें पतकरतों.'

त्या जहाजावरचा जो कारकून होता, त्यापाशीं सर्व जिनसांची नांववार लिहिलेली याद असे; व त्या यादींत ज्यांचे ज्यांचे जे जिन्नस असत, त्यांचीं नांवें लागलीं असत. त्या कारकुनानें नाखुद्यास विचारलें कीं, 'आपण या गृहस्थास माल देणार तो कोणत्या व्यापाऱ्याचा देणार तें सांगावें, म्हणजे मी त्याप्रमाणें लिहून ठेवीन.' नाखुद्यानें उत्तर केलें कीं, 'सिंदबाद याचा माल यास दिला म्हणून लिही.' हें माझें नांव माझ्या कानीं पडतांच, मला चमत्कार वाटून मी नाखुद्याकडे विशेष न्याहाळून पाहिलें, तों कांहीं क्षणांनीं मला त्याची ओळख पटली. मी दुसऱ्या सफरीस ज्याच्या गलबतावर गेलों होतों व मी एका ओसाड बेटांत ओढ्याच्या कांठीं झाडींत

निजलों असतां जो गलबत हांकारून निघून गेला होता तोच हा नाखुदा, असें मी पक्कें ओळखलें. पण पुष्कळ दिवस मध्यें गेल्यामुळें त्याचें रूप बदललें होतें, म्हणून तो पहिल्यानें मला ओळखतां आला नाहीं. आतां त्याला तर मी मेलों म्हणून वाटत होतें, मग तो मला कसला ओळखतो ? मी त्यास म्हणालों, ' नाखुदेबाबा, तुम्ही मजपाशीं ज्याचा माल देणार त्या व्यापाऱ्याचें नांव सिंदबाद होतें काय ?' त्यानें उत्तर केलें, होय. तो व्यापारी बगदाद शहरांतील राहणारा होता, व तो बसोरा बंदरीं माझ्या गलबतावर बसला. तो एके दिवशीं चुकून एका ओसाड बेटांत निजला असतां, आम्ही चुकून गलबत हांकारलें. पुढें चारपांच तासांनीं तो नाहींसें आम्हांस समजलें; पण वारा विपरीत असल्यामुळें आम्हांस त्या बेटाकडे गलबत नेतां येईना.' मी पुनः त्यास म्हणालों, ' तो सिंदबाद मेला असें तुम्हांस वाटतें ? ' त्यानें उत्तर केलें, ' होय, मेला यांत संशय काय ? ' मी पुनः त्यांस म्हणालों, ' बरें तर आतां डोळे उघडा, आणि ज्यास तुम्ही ओसाड बेटांत चुकून टाकिलें, तो सिंदबाद अद्यापि जिवंत असून तुम्हांपुढें या क्षणीं बसला आहे, यास पहा. त्या ओसाड बेटांत तुम्ही सर्व निघून गेल्यावर मी जागा झालों, आणि शोध करूं लागलों तों तुमचें जहाज निघून गेलें. '

हें भाषण ऐकून तो नाखुदा माझ्या तोंडाकडे न्याहळून पाहूं लागला. मग शेवटीं त्यास ओळख पटून तो हर्षानें म्हणाला, 'सिंदबाद, मीं तुम्हांस ओळखलें. ईश्वराची सत्ता अगाध आहे. तो वांचवूं लागला म्हणजे असें वांचवतो. ' असें बोलून तो मला कडकडून भेटला. आणखी तो म्हणाला कीं, 'माझ्या हातून मोठा अन्याय झाला होता; परंतु तो सुधारण्याची संधि आज आली; फार उत्तम गोष्ट झाली. हा पहा तुमचा माल आजपर्यंत मीं जतन केला; व ज्या ज्या बंदरावर उतरलों, तेथें तेथें पहिला माल विकून दुसरा विशेष नफ्याचा घ्यावयास चुकलों नाहीं. हा मूळचा माल व हा वरील नफा, हें सर्व तुम्ही संभाळा. ' मी तें सर्व आपल्या

स्वाधीन करून घेऊन त्या भल्या मनुष्याचे फार आभार मानले, कारण त्याचें कृत्य तसेंच स्तुत्य होतें.

त्या सालाहात बेटांतून निघून आम्ही दुसऱ्या बेटांत गेलों. तेथें लवंगा, दालचिनी वगैरे पुष्कळ जिनसा मी खरेदी केल्या. मग तेथून जलमार्गानें चाललों असतां, वाटेनें समुद्रांत एक मोठें कांसव पाहिलें. तें वीस हात लांब व वीस हात रुंद होतें. तसाच एक चमत्कारिक मासा पाहिला, त्याचें गाईसारखें दूध निघतें. या माशाचें कातडें इतकें घट्ट असतें कीं त्याच्या ढाली करतात. आणखी एक मासा पाहिला त्याचा आकार व रंग उंटासारखा होता. याप्रमाणें चमत्कार पाहात व व्यापार करीत पुष्कळ दिवस फिरल्यानंतर शेवटीं बसोऱ्यास पोंहोंचलों; व तेथून बगदाद शहरास आलों. या खेपेस मला इतका पैसा मिळाला कीं, तो एकंदर किती होता हें माझें मलासुद्धां ठाऊक नव्हतें. त्यापैकीं पुष्कळ पैसा मी गरीब-गुरीबांस खैरात वाटला व नवीन पुष्कळ जमिनी खरेदी केल्या.

सिंदबाद यानें याप्रमाणें तिसऱ्या सफरीची हकीकत संपविली. मग त्या दिवशीं त्यानें हिंदबाद यास शंभर रुपयांची एक पिशवी देऊन दुसऱ्या दिवशीं चवथ्या सफरीची गोष्ट ऐकावयास बोलाविलें. संध्याकाळ झाल्यावर सर्व मंडळी आपापल्या घरीं निघून गेली. मग दुसऱ्या दिवशीं संकेताप्रमाणें सर्व मंडळी गोळा झाल्यावर भोजनास आरंभ झाला. सर्व श्रोते तृप्त झाल्यावर सिंदबाद यानें आपल्या चौथ्या सफरीची गोष्ट सांगावयास आरंभ केला:—

## सिंदबाद याची चौथी सफर.

तिसऱ्या सफरीहून परत घरास आल्यावर कितीएक दिवस मी ख्यालीखुशालींत व गमतींत घालविले; परंतु त्याच्या योगानें पुनः जलपर्यटनास जावयाची माझी हौस कमी झाली नाहीं. मग पुनः व्यापारास जावयाचा व नवे नवे देश पहावयाचा निश्चय करून

आपल्या घरांतील सर्व व्यवस्था केली. व्यापारास जो जो माल लायक वाटला, तो तो खरेदी करून घराबाहेर पडलों. प्रथम खुष्कीच्या वाटेनें इराण देशीं जाऊन व त्या देशांतले कितीएक प्रांत पाहून झाल्यावर शेवटीं एका बंदराच्या गांवीं जाऊन तेथें गलबत भाड्यानें घेऊन त्यावर चढलों. वाटेनें कितीएक बेटें लागलीं; तेथें थोडा थोडा वेळ उतरून व कांहीं व्यापार करून पुढें चाललों. एक दिवस आमचें गलबत अफाट दर्यांत चाललें असतां एकाएकीं मोठें वादळ झालें. त्यास आरंभ होतांच, आमच्या नाखुद्यानें शिडें उतरावयास हुकूम दिला. याप्रमाणें जो अनर्थ प्राप्त झाला, त्यापासून सुटका व्हावी, म्हणून करावयाचे तेवढे उपाय केले; तथापि ते सर्व निष्फळ होऊन आमच्या गलबताचीं सर्व शिडें फाटून गेलीं, व डोलकाठी मोडून पडली; व गलबत अनिवार होऊन जें भडकलें, तें मोठ्या जोरानें जाऊन एका खडकावर आपटून त्याचे तुकडे-तुकडे झाले. या प्रसंगीं गलबतावरील बहुतेक लोक समुद्रांत बुडून मरण पावले; व सर्व मालही बुडाला.

मी व दुसरे कांहीं थोडे उतारू लोक व खलाशी यांस नशिबानें गलबतावरील एक तक्ता सांपडल्यावरून आम्ही त्यास धरून राहिलों. तो तक्ता लाटांनीं नेत नेत एका बेटावर नेऊन टाकला. त्या बेटांत कांहीं फळें-मुळें सांपडलीं तीं खाऊन, व ओढे होते त्यांचें पाणी पिऊन, अंगांत कांहींसा जीव आल्यावर आम्ही तेथें समुद्रकांठींच निजलों. आम्हावर जो गहजब गुदरला होता, त्याच्या योगानें आम्ही सर्व जीवाविषयीं निराश झालों होतों. दुसऱ्या दिवशीं सकाळीं सूर्योदय झाल्यावर पहातों तों कांहीं अंतरावर रानटी लोकांचीं कांहीं खोपटें दृष्टीस पडलीं. त्यावरून तिकडे सर्व चाललों. आम्ही त्या झोंपड्यांजवळ जातों, तों कितीएक काळ्या रानटी लोकांचा समुदाय आम्हांस भेटला. त्यांनीं आम्हांस कैद करून व आपणांत आम्हांस वांटून घेऊन ते आपल्या झोंपड्यांकडे घेऊन गेले.

मी व दुसरे पांचजण माझे सोबती, इतके एका रानटी मनुष्याच्या वांट्यास आलों. त्यानें आम्हांस आपल्या घरीं नेल्यावर आमच्यापुढें कांहीं प्रकारचा पाला टाकून तो खाण्याविषयीं त्यानें खुणांनीं सुचविलें, परंतु ज्या माणसांनीं तो पाला दिला, तीं स्वत तो खात नाहींत, याचा कांहीं विचार न करतां, भुकेच्या स्वाधीन होऊन माझ्या पांचही सोबत्यांनीं तो पाला गपगप खाल्ला. परंतु हा पाला खाल्ल्यापासून कांहीं तरी दगा आहे, असा संशय माझ्या मनांत आल्यावरून मी त्या पाल्यास हात लाविला नाहीं, आणि हे मी बरें केलें कारण माझे सोबती तो पाला खाल्ल्यानें लागलेंच वेडे होऊन त्यांस कांहीं समजेनासें झालें. नंतर त्या रानटी लोकांनीं आम्हांपुढें खोबऱ्याचे तेलांत शिजवलेला भात ठेविला. तो भात माझे सोबती पाला खाऊन खुळे झाले होते, त्यांनीं आधाशाप्रमाणें खूप खाल्ला. भूक लागल्यामुळें मीही तो भात खाल्ला, पण फार खाल्ला नाहीं.

त्या रानटी मनुष्यांनीं आम्हांस जो प्रथम पाला खावयास दिला त्याचा उद्देश असा होता कीं आम्हांस खूळ लागून आम्हीं दुःख विसरावें, व खाल्लेला पदार्थ अंगीं लागून आमचीं शरीरें पोसावीं. हे लोक मनुष्यभक्षक असल्यामुळें आमचें मांस पुष्कळ मिळावें म्हणून आम्हांस पोशीत असत. माझे सोबती खुळे झाल्यामुळें चांगले पोसून त्या दुष्टांचें भक्ष्य झालें; परंतु मला शुद्ध होती, यास्तव मी न पोसतां दिवसेंदिवस उलटा वाळत चाललों. मरण्याचा धाक पोटांत असल्यामुळें खाल्लेलें अन्न अंगीं लागत नसे; परंतु ही गोष्ट परिणामीं मला हितावह झाली. ती अशी कीं, त्या रानटी लोकांनीं माझे सगळे सोबती मारून खाल्ले तरी मी पुढें लठ्ठ होईन या आशेनें मला तसेंच राखून ठेविलें.

मग त्या ठिकाणीं असतां मला मोकळीक पुष्कळ असे व मी काय करतों, याजकडे बहुतकरून कोणाचें लक्ष नसे. असें असल्यामुळें मला एक दिवस तेथून पळून जाण्याची संधि सांपडली. मी

चालता झालों असतां, मला एका म्हाताऱ्या रानटी मनुष्यानें पाहिलें व माझा बेत ओळखून तो मला परत बोलावूं लागला, पण मी त्याच्या हांकांस न जुमानतां, मोठ्या त्वरेनें पाऊल उचलून त्यास दिसेनासा झालों. त्या दिवशीं त्या खेड्यांत तो म्हातारा मात्र एकटा होता व सर्व दुसरीं मनुष्यें बाहेर गेलीं होतीं व तीं रात्र होईतोंपर्यंत परत येणार नाहींत, हें त्यांच्या नेहमींच्या वहिवाटीवरून मला ठाऊक होतें. तीं मनुष्यें परत येऊन त्यांस मी पळून गेल्याची बातमी लागल्यावर त्यांनीं माझा पाठलाग केल्यास, त्यांच्या हातीं लागूं नये म्हणून त्या दिवशीं रात्र पडेतोंपर्यंत मी एकसारखा न थांबतां चालत होतों. मग काळोख पडून दिसेनासें झाल्यावर एके ठिकाणीं विसावा घेण्याकरतां बसलों व बरोबर खाण्याकरितां कांहीं आणलें होतें, तें खाल्लें. नंतर याप्रमाणें न थांबतां मी सात दिवस एक सारखा चालत होतों व वाटेनें कोठें खेडीं दिसल्यास तीं टाळून निघून जाई. वाटेनें नारळाचीं झाडें पुष्कळ लागत. त्यांवरचे नारळ काढून त्यांतलें खोबरें खाऊन आंतलें पाणी पिऊन मी सात दिवस जीव वांचवला.

आठव्या दिवशीं समुद्रतीरास येऊन पोहोंचलों. त्या ठिकाणीं मजसारखे[1] गोऱ्या रंगाचे कितीएक लोक मिरीं जमा करतांना माझ्या दृष्टीस दुरून पडले, त्यांस पाहून मला आनंद झाला. मग त्यांकडे जात असतां त्यांच्या दृष्टीस मी पडून तेही मजकडे आले आणि ‘ तुम्ही कोण व कोठून आलां ?’ असा आरबी भाषेंत त्यांनीं मला प्रश्न केला.

ती आपली जन्मभाषा ऐकून मला फार हर्ष झाला. मग त्यांच्या प्रश्नांचें उत्तर देऊन त्यांस माझें गलबत फुटल्याचा व त्या बेटांत रानटी लोकांच्या हातीं सांपडल्याचा मजकूर सांगितला. त्यावर ते म्हणाले, ‘ अहो, ते रानटी लोक तर माणसें खात असतात. त्यांच्या हातून तुम्ही जिवंत कसे सुटला ? ’ मग मी त्यांपासून

१ तुर्कस्थान व इराण येथील लोक युरोपियन लोकांसारखे गोरे असतात.

कसा पळालों याची सर्व हकीगत सांगितल्यावर त्यांस मोठा विस्मय झाला.

त्यांनीं त्या स्थळीं जितकीं मिरीं जमा करावयाचीं होतीं तितकीं जमा करून झाल्यावर, त्यांनीं आपल्याबरोबर गलबतावर बसवून ते ज्या बेटांत राहात होते, तेथें मला नेलें. तेथें पोंचल्यावर त्यांनीं मला तेथच्या राजास भेटविलें. तो राजा फार सज्जन व चतुर होता. त्यानें स्वस्थपणें माझी सर्व हकीगत ऐकून घेतली व ती ऐकून त्यास मोठें आश्चर्य वाटलें. मग त्यानें मला एक नवा पोषाख देऊन आपल्या कारभाऱ्यास माझी चांगली वरदास्त ठेवण्यास हुकूम केला. या बेटांत वस्ती पुष्कळ असे व तेथें सर्व जिन्नस मिळत. राजा जेथें राहात असे, त्या शहरांत मोठा व्यापार चालत असे. येथें स्वस्थपणें राहिल्यामुळें मी आपलीं सर्व दुःखें प्रायः विसरत चाललों व त्या उदार राजाच्या सज्जनपणानें मला फार सुख झालें. त्या राजाचा मजवर फारच लोभ जडला, त्यामुळें दरबारचे लहानमोठे सर्व लोक माझी मनधरणी करूं लागले.

त्या देशांत एक मोठी चमत्कारिक गोष्ट माझ्या दृष्टीस पडली. ती ही कीं, तेथील सर्व लोक, फार तर काय, राजासुद्धां उघ्डाणी घोड्यावर बसत व त्या घोड्यांस लगाम व रिकीबी मुळींच नसत. मी एके दिवशीं मोठ्या आदबीनें राजास विचारलें कीं, 'येथें घोड्यावर खोगीर वगैरे सामान कां घालीत नाहींत ?' त्यावर त्यानें उत्तर केलें कीं, 'तुम्ही काय म्हणतां तें आम्हांस मुळीं ठाऊकच नाहीं!'

नंतर मी नमुना देऊन एक खोगीर तयार करवलें, व त्यावर आपल्या हातानें आंत केंस भरून वरून मऊ कातडें शिवलें व त्या कातड्यांवर कलाबतूचा कशीदा काढिला. तसेंच घिसाड्यास नमुना देऊन त्याजकडून रिकीबी व लगामाच्या कड्या तयार करून त्यांस वाद्या लावल्या; नंतर तो सर्व सरंजाम घालून राजाच्या पागेंतला एक घोडा तयार करून आणला. त्या घोड्यावर बसून त्या सामानाचा उपयोग समजल्यावर राजास मोठा हर्ष झाला. त्यानें त्याबद्दल मला मोठें

बक्षीस दिलें. नंतर प्रधानाकरितां व दरबारांतलि मानकऱ्यांकरितां त्यांनीं सांगितल्यावरून खोगिरें वगैरे तयार करविलीं. त्यांनींही पुष्कळ बक्षीस मला दिलें. तसेंच नगरांत मोठमोठे शेटसावकार होते, त्यांनींही मजकडून तें सामान तयार करविलें; त्यामुळें माझी मोठी प्रसिद्धि होऊन मला पुष्कळ पैसा मिळाला.

मी नित्य दरबारांत जात असे, त्याप्रमाणें गेलों असतां एक दिवस राजा मला म्हणाला, ' सिंदबाद, तुजवर माझा लोभ फार जडला आहे व मला हेंही ठाऊक आहे कीं, माझ्या रयतेपैकीं ज्यांस ज्यांस तुझे गुण माहीत आहेत, ते सर्व तुला चाहतात. तर माझें तुझ्यापाशीं एक मागणें आहे, तें तूं नाहीं म्हणूं नको. ' मी मोठ्या नम्रतेनें उत्तर केलें, ' महाराज, या दुनियेंत अशी कांहींएक गोष्ट नाहीं, कीं जी सरकारांनीं हुकूम केला असतां मी तत्काळ शिरसामान्य करणार नाहीं. महाराज, आपली आज्ञा मला पूर्वदिशा आहे. ' राजा म्हणाला, ' आमची इच्छा अशी आहे कीं, तूं लग्न करावेंस, म्हणजे तुला या माझ्या राज्यांत रहावयास विशेष आस्था वाटेल व स्वदेशीं जावेंसें वाटणार नाहीं. राजाच्या या म्हणण्यास माझ्यानें नाहीं म्हणवेना. मग राजानें स्वतः आपल्या दरबारांतील एका सरदाराच्या मुलीशीं माझें लग्न करून दिलें. ही मुलगी कुलीन, श्रीमंत व फार सुंदर असून मोठी चतुर होती. लग्नसमारंभ झाल्यावर मी त्या मुलीच्याच घरीं राहूं लागलों. आम्हां दोघांचा पुष्कळ काळ मोठ्या संतोषांत गेला, परंतु पुढें कांहीं दिवसांनीं माझ्या स्थितीचा मला कंटाळा आला. प्रसंग सांपडल्याबरोबर तेथून निघून स्वदेशीं जाण्याचा मीं निश्चय केला. त्या ठिकाणीं पुष्कळ ऐश्वर्य व अनेक प्रकारचीं सुखें मला अनुकूळ होतीं खरीं, परंतु तीं सर्व मला तुच्छ वाटूं लागलीं.

याप्रमाणें माझ्या मनाची स्थिति झाली असतां माझ्या शेजारीं एक गृहस्थ राहात होता. त्याची बायको दुखणें येऊन एकाएकीं मरण पावली. या गृहस्थाचा व माझा ऋणानुबंध होता, यामुळें मी

हें दुःखाचें वर्तमान ऐकून त्याच्या समाचारास गेलों व तो फार शोक करीत आहेसें पाहून मी त्यास म्हणालों, 'हे मित्रा, ईश्वर तुला तरी पुष्कळ दिवस खुशाल ठेवो !' हें माझें भाषण ऐकून तो गृहस्थ म्हणाला, 'तुम्ही आशीर्वाद देतां, हा आतां कसला खरा घडणार ! मी काय, आतां घटका दोन घटकांचा सोबती !' मी म्हणालों, 'मित्रा, असें काय बोलतोस ? वेड्यासारखा असा काय शोक करतोस ? मेल्याच्या मागून कोणी मेला आहे काय ? मी तर अशी आशा बाळगतों कीं, ईश्वर तुला पुष्कळ दिवस वांचवून तुझ्या स्नेहाचें सुख आम्हांस पुष्कळ दिवस देईल.' माझा शेजारी मला म्हणाला, 'बाबा, तूं सज्जन मनुष्य आहेस. तुला ईश्वर पुष्कळ आयुष्य देवो. माझा तर आतां या जगांतला अन्नोदकाचा ऋणानुबंध संपला. आज आतां मला दोनचार घटकांनीं माझ्या बायकोच्या प्रेतासहवर्तमान जिवंत पुरतील. असें करण्याची चाल या आमच्या बेटांत हजारों वर्षें वाडवाडिलांपासून चालत आली आहे. नवऱ्याच्या आधीं बायको मेल्यास त्यास तिजबरोबर व बायकोच्या आधीं नवरा मेल्यास तिला त्याजबरोबर जिवंत या देशांत पुरतात व लहानापासून मोठ्यांपर्यंत सर्व या रीतीस मानतात.'

त्या लोकांतली ही भयंकर चाल ऐकून माझ्या मनांत मोठें भय उत्पन्न झालें. मग आम्ही दोघेजण बोलत बसलों आहों तों इतक्यांत त्या गृहस्थाचे सोयरेधायरे, इष्टमित्र, सर्व जमून शेवटच्या तयारीस लागले. त्यांनीं त्या स्त्रीच्या प्रेतावर सर्व मोठे मोठे दागिने घातले व उंचीं उंचीं वस्त्रें नेसवून, लग्नास नवरीस नटवतात, तसें तें प्रेत नटवलें. मग तें मढें न झांकतां ताटीवर घालून घराबाहेर काढलें. त्या मढ्यामागून तिचा नवरा दुःखसूचक पोषाक अंगावर घालून निघाला; त्याच्या मागून सर्व मंडळी चालली. ते जात जात शेवटीं एका डोंगराजवळ थांबले. तेथें एक दरी होती व तिच्या तोंडावर एक मोठी शिळा बसाविलेली होती. ती शिळा उखळून या दरींत तें मढें सर्व दागदागिन्यांसुद्धां व वस्त्रांसुद्धां सोडून दिलें. नंतर एका दुसऱ्या ताटी-

वर त्या तिच्या नवऱ्यास बसवलें व त्याच्या शेजारीं पाण्यानें भरलेली एक घागर व सात लहान लहान चपात्या ठेवून त्यासही त्या दरींत सोडलें. आंत जातेवेळीं त्या गृहस्थानें आपल्या सोयऱ्याधायऱ्यांचा व इष्टमित्रांचा शेवटचा निरोप घेतला. त्यानें सुटण्याविषयीं कांहीं तडफड केली नाहीं. हा डोंगर मोठा विस्तीर्ण आहे व त्याच्या पलीकडच्या बाजूस समुद्र आहे; व ती दरीही पुष्कळ खोल असून विस्तीर्ण आहे. हें कृत्य झाल्यावर ती शिळा त्या दरीच्या तोंडाशीं पुनः पाहिल्याप्रमाणें बसवून मंडळी परत फिरली. हें सर्व पाहून मला फारच दुःख झालें. परंतु इतर लोकांस, ती गोष्ट पाहण्याची नेहमीं संवय पडल्यामुळें कांहींच वाटलें नाहीं. नंतर दुसऱ्या दिवशीं दरबारांत गेलों असतां राजापाशीं ती गोष्ट काढल्यावांचून मला राहवेना. मी म्हणालों, ‘ महाराज बोलतों, क्षमा असावी. काल आपल्या राज्यांतील एक अपूर्व चाल माझ्या दृष्टीस पडली, तेव्हांपासून माझ्या चित्तास जें दुःख वाटतें, तें मला आपणांस शब्दांनीं सांगतां येत नाहीं. महाराज, मी पुष्कळ हिंडलों व पुष्कळ देश पाहिले; परंतु मेल्याबरोबर जिवंत माणसास पुरण्याची चाल कोठेंही पाहिली नाहीं. या रीतींत फार अन्याय व मोठें पाप आहे. ’ माझें भाषण ऐकून घेऊन राजानें उत्तर केलें, ‘सिंदबाद, तूं म्हणतोस हें खरें आहे; तथापि या चालीपुढें माझा उपाय नाहीं. हा कायदा लहानापासून मोठ्यापर्यंत सर्वांस सारखा लागू आहे. फार तर काय, मलासुद्धां हा कबूल करणें प्राप्त आहे. पहा, माझी राणी मी जिवंत असतां वारली तर मलासुद्धां जिवंत पुरून घ्यावें लागेल ! ’ मी राजास विचारलें, ‘ माफी असल्यास एक गोष्ट विचारावयाची आहे. ती ही कीं, या देशांत परमुलूखचे जे लोक असतील, त्यांसही हा नियम लागू आहे कीं काय ? ’ प्रश्न विचारण्याचा माझा उद्देश समजून राजास हंसूं आलें, आणि त्यानें उत्तर दिलें, ‘ यांत काय संशय आहे ? ज्यांनीं या बेटांतल्या स्त्रीशीं लग्न लावलें असेल त्यांसही या चालीप्रमाणें वागलें पाहिजे. ’

राजानें असें उत्तर दिल्यावर मी चिंताग्रस्त व खिन्न होऊन घरीं आलों. कदाचित् माझी बायको अगोदर मेल्यास मला जिवंत पुरतील, असा विचार वारंवार मनांत येऊन मला मोठी काळजी लागली व दिवसरात्र चैन पडेनासें झालें. हें अरिष्ट टाळण्याचा कांहीं उपाय दिसेना, मग ईश्वरावर हवाला ठेवून उगीच बसलों. तथापि तेव्हांपासून मी बायकोच्या प्रकृतीस फारच जपूं लागलों. तिची तब्येत यत्किंचित् बिघडली असतां माझ्या पोटांत मोठा भयाचा गोळा उठे. परंतु मनुष्यानें कितीही जपलें तरी व्यर्थ आहे. दैवाच्या पुढें त्याच्यानें जाववत नाहीं. पुढें लौकरच माझी बायको दुखणें येऊन एकाएकीं वारली. या प्रसंगीं मला जें दुःख झालें तें शब्दांनीं सांगतां येत नाहीं. मनुष्यांस खाणाऱ्या रानटी लोकांच्या हातून मरण्यापेक्षां जिवंतपणीं पुरलें जाणें मला विशेष भयंकर वाटूं लागलें; परंतु कसेंही जरी वाटलें तरी प्राप्त झालेली गोष्ट भोगणें प्राप्त झालें. राजाचा व दरबारांतील लोकांचा लोभ मजवर पराकाष्ठेचा होता, त्यामुळें माझ्या पुरण्याच्या समारंभास स्वतः राजा व दरबारांतील सर्व मानकरी लोक आले होते.

मग सर्व तयारी झाल्यावर माझ्या बायकोचें प्रेत उंची उंची दागिन्यांनीं व वस्त्रांनीं भूषित करून ताटीवर घालून चालविलें, व तिच्या मागून मी चाललों. रडून रडून माझे डोळे सुजले होते, व अश्रूंनीं मी न्हाऊन गेलों होतों. मग त्या मढीं पुरण्याच्या दरीपाशीं पोहोंचण्याच्या पूर्वींच तो समारंभ पाहण्यास आलेल्या लोकांस, आली तर दया आणवून पहावी म्हणून, मीं बोलण्यास आरंभ केला. मी प्रथम राजास व त्याच्या मागून त्याच्या जवळ जे थोर थोर मानकरी होते त्यांस साष्टांग नमस्कार घालून व त्यांचे पाय धरून म्हणालों कीं, 'पहा, या देशांत मी जन्मलों नाहीं. मीं परक्या मुलुखांतून संकटांत पडल्यामुळें तुमच्या छायेस आलों, त्या माझ्यासारख्या अनाथास हा नियम आपण लागूं करूं नये.' या प्रकारें दीन व करुणस्वरानें मीं त्यांची पुष्कळ विनवणी केली; परंतु त्यायोगें त्यांच्या

चित्तास यत्किंचित्‌हि द्रव न येतां, त्यांनीं उलट विशेष त्वरा करून मला दरीजवळ नेलें; व तींत चालीप्रमाणें पूर्वी माझ्या बायकोचें प्रेत सोडून त्यामागून मला एका ताटीवर बसवून व मजजवळ पाण्यानें भरलेली एक घागर व सात रोडगे ठेवून मलाही आंत सोडून दिलें. मी रडून व ओरडून पुष्कळ आकांत केला, पण तो त्यांनीं मुळींच मनास आणिला नाहीं!

ती ताटी खालीं जात असतां वरील भोंकांतून आलेल्या उजेडानें त्या दरीचा आंतील आकार माझ्या नजरेस आला. ती दरी मोठी विस्तीर्ण होती. तिची खोली सुमारें पन्नास हात असेलसें वाटतें. तेथें चोहोंकडे प्रेतें कुजत पडलीं होतीं. त्यांची घाण अशी सुटली होती कीं, ती मला सोसवेना. नुकतींच आंत टाकलेलीं माणसें मरणोन्मुख होऊन त्यांस घोर लागला आहे, तो ऐकूं येतोसा मला भास झाला. तळाशीं जाऊन पोहोंचतांच मुठींत नाक धरून त्या ताटीवरून उठून पळालों, तों त्या मढ्यांपासून दूर अंतरावर जाऊन उभा राहिलों. त्या वेळेस पराकाष्ठेचें दुःख होऊन मी जमिनीवर गडबडां लोळूं लागलों; रडून रडून अश्रूंनीं सर्वांग भिजवलें; व पुष्कळ शोक केला. मी आपणांशीं म्हणालों, ‘ईश्वर सर्वज्ञ आहे. त्यास जसें बरें वाटतें तसें तो सर्व प्राण्यांस निरनिराळ्या अवस्थेंत घालतो. परंतु हे मूर्खा सिंदबादा, हा सर्व तुझा स्वताचाच अपराध नव्हे का? अरे दैवा, गलबत फुटून मी कितीएक वेळ समुद्रांत पडलों, व तेव्हां जो वांचलों, तो न वांचतों, तर मला हें असें घोर मरण कां येतें? परंतु दैवास बोल उगाच कां लावावा? मी दुष्टानें लोभ जर धरला नसता, तर आजचा हा अनर्थ माझ्यावर कसा कोसळला असता? मी आज खुशाल आपल्या मुलामाणसांत नसतों का? या व्यापारास जो मी निघालों, तो मजपाशीं पैसा काय थोडा होता म्हणून? कीं मला कोणत्या गोष्टीची उणीव होती?’

याप्रमाणें व्यर्थ शोक करून मीं आपल्या रडण्यानें ती सर्व गुहा दणदणविली. मीं आपलें डोकें व ऊर पुष्कळ बडवून घेतलीं. परंतु

अशी अवस्था प्राप्त झाली तरी, मित्रहो, वांचण्याची इच्छा सुटेना. मग मी चांचपडत चांचपडत ताटीपाशीं जाऊन तिच्यावरच्या चपात्यांपैकीं कांहीं खाऊन घागरींतलें थोडेसें पाणी प्यालों. कांहीं वेळ त्या अंधारांत बसल्यावर बरेंच दिसूं लागलें. ती गुहा बरीच मोठी होती; व तेथें मला पाहिल्यानें वाटली त्यापेक्षां अधिक मढीं पडलीं होतीं. ताटीवरच्या चपात्या व घागरींतलें पाणी हीं मला कांहीं दिवस पुरलीं. पुढें तीं संपल्यावर, आतां आपला प्राण राहात नाहीं, अशी खात्री होऊन मी बसलों असतां एकाएकीं दरीच्या तोंडावरची शिळा निघाली व आंत एक प्रेत, जिवंत माणूस अशीं दोन सोडून दिलीं. या खेपेस मढें पुरुषाचें होतें, व त्याबरोबर त्याची बायको जिवंत आली होती. जिवावरचा प्रसंग गुदरला म्हणजे, पापपुण्याचे सर्व विचार सुटतात; व प्राण वांचविण्याकरतां मनुष्य पाहिजे तें कृत्य करतो. तशी अवस्था माझी झाली. त्या बाईची ताटी खालीं येत असतां, मी हातांत एक मोठें हाडूक घेऊन टपत राहिलों. आणि वरचें तोंड बंद होतांच, त्या बाईच्या डोक्यावर हाडकाचे दोन तीन मोठे टोले देऊन तिचा प्राण घेतला! याप्रमाणें त्या बिचाऱ्या स्त्रीच्या चपात्या व पाणी मिळावयाकरितां मीं हें अघोर कृत्य केलें. हें अन्नपाणी मला कांहीं दिवस पुरलें. तें संपत आहे तों, एक स्त्रीचें मढें व तिचा जिवंत नवरा ह्यांस दरींत सोडून दिलीं. त्या पुरुषाचाही मघा सांगितल्याप्रमाणें मीं जीव घेऊन त्याबरोबर आलेल्या अन्न-पाण्यावर कांहीं दिवस काढले. त्या वेळीं माझ्या नशिबानें शहरांत कांहीं सांथ येऊन बरींच माणसें मरत होतीं त्यामुळें मला अन्न-पाण्याकरतां बरेच खून करावे लागले!

एके दिवशीं मी एका माणसाचा जीव घेतला, तों कोणी श्वासोच्छ्वास करीत आहे व चालत आहेसें मला वाटलें. जिकडून शब्द ऐकूं येत होता, तिकडे जाऊं लागलों तों मोठमोठ्यानें श्वासोच्छ्वास ऐकूं येऊं लागला व कांहीं मजजवळून पळालेसें दिसलें. मग त्या शब्दाच्या सुगाव्यानें चाललों असतां ज्या कोणाचा शब्द ऐकूं येत

होता, तें उभें राहिलेसें वाटे; व मी जवळ गेलों म्हणजे तें धांपा देत आणखी पलीकडे पळालें असा भास होई. याप्रमाणें या गुहेच्या आंत पुष्कळ लांब गेल्यावर दूर अंतरावर लहान चांदणीसारखा एक उजेडाचा बिंदु दृष्टीस पडला, तेव्हां मी त्या उजेडाकडे चाललों. मध्यें कांहीं आड आल्यामुळें तो उजेड केव्हां तेव्हां दिसेनासा होई; परंतु कांहीं पुढें गेलें म्हणजे तो पुनः दिसूं लागे. शेवटीं त्या उजेडाजवळ येऊन पाहातों तों खडकांत एक भोंक होतें, त्यांतून तो उजेड येत होता असें दृष्टीस पडलें. तें भोंक माझें शरीर मावण्यासारखें मोठें होतें.

धांवत असल्यामुळें दम लागला होता, म्हणून कांहीं वेळ दम खाल्ल्यावर त्या भोंकावाटें बाहेर येऊन पाहतों तों समुद्राच्या कांठीं मी उभा राहिलों ! मित्रहो, या प्रसंगीं मला केवढा हर्ष झाला असेल, हें तुम्हीच मनांत आणा. डोळ्यांनीं जें दिसत होतें तें कांहीं वेळ खरें वाटेना. मला वाटलें कीं, मी काय स्वप्न पाहात आहे कीं काय कोण जाणे ! कांहीं वेळानें जें दिसत आहे, तें खरें आहे, भ्रांति नव्हे, अशी खात्री झाल्यावर मीं असा तर्क बांधला कीं, जें धांपा देतांना मीं ऐकलें, तें समुद्रांतलें कांहीं जनावर असावें व तें मढ्यांचें मांस खाण्याकरितां गुहेंत आलें असावें.

नंतर समुद्रकांठच्या पर्वतावर चढून पाहतां मला समजलें कीं, पर्वताच्या पलीकडच्या बाजूस मी पूर्वीं राहात होतों तें नगर आहे व तिकडच्या बाजूनें कडा तुटलेला असल्यामुळें तिकडून माणूस येण्याचा संभव नाहीं. नंतर मीं समुद्रतीरीं गुडघे टेंकून मोठ्या भक्तीनें ईश्वराची स्तुति केली, व मृत्यूच्या तोंडांतून सोडविल्याबद्दल त्याचा मोठा उपकार मानला. मग पुनः गुहेंत जाऊन खावयास घेऊन आलों, व तें त्या दिवशीं उघड्या हवेंत खातांना मला फारच गोड लागलें !

नंतर कांहीं वेळानें पुनः गुहेंत जाऊन त्या अंधारांत मढ्यांच्या अंगावर जे जे हिऱ्याचे, माणकांचे, पाचांचे, मोत्यांचे व सोन्याचे

दागिने सांपडले, ते सर्व गोळा करून आणले. तसेंच उंची उंची भरगच्ची कापडही पुष्कळ आणलें. मग तें सर्व सामान एकत्र करून त्याचे गठ्ठे बांधले. त्या गुहेंत ताटघा सोडीत, त्यांस दोर असत; ते दोर या प्रसंगीं माझ्या फार उपयोगीं पडले. मग ते सर्व गठ्ठे मी एका सोईवार जागीं नीट रचून ठेवले.

पुढें दोन तीन दिवसांनीं एके दिवशीं मी समुद्रकांठीं उभा असतां दूर अंतरावरून जातांना एक गलबत माझ्या दृष्टीस पडलें. मीं डोक्याचें पागोटें मोकळें करून तें उडवलें व मोठ्यानें आरोळ्या मारल्या; त्या माझ्या आरोळ्या गलबतावर ऐकूं गेल्यावरून, नाखुद्यानें मजकरतां एक होडी पाठविली. होडीवरील खलाशांनीं 'तुम्हांवर असा प्रसंग कशानें गुदरला ?' म्हणून प्रश्न केला असतां मीं उत्तर केलें कीं, 'दोनतीन दिवसांपूर्वीं या किनाऱ्यावर माझें जहाज फुटून त्यावरील सर्व लोक बुडून मेले, व मी मात्र एकटा या थोड्या मालानिशीं ईश्वराच्या कृपेनें वांचलों.' ही माझी बनवलेली गोष्ट त्या लोकांस खरी वाटून त्यांनीं मालासकट मला होडींत घेऊन जहाजाकडे नेलें.

मग मी जहाजावर पोहोंचलों असतां, नाखुद्यास त्याच्या हातून माझे प्राण वांचल्यामुळें मोठा हर्ष झाला होता व तो गलबतावरच्या व्यवस्थेंत गुंतला होता,यामुळें मीं सांगितलेली गोष्ट फारशी चौकशी न करतां त्यानें खरी मानली. मग त्याचा लोभ विशेष जडावा म्हणून मी त्यास आपल्या जवळच्यापैकीं कांहीं उंची जिनसा देऊं लागलों, परंतु त्यानें त्या घेतल्या नाहींत.

वाटेनें जात असतां आम्हांस पुष्कळ बेटें लागलीं. त्यांपैकीं एका बेटाचें नांव केला असें होतें. या बेटांत आम्ही उतरलों होतों. येथें शिशाच्या खाणी आहेत व येथें वेताचीं बेटें पुष्कळ आहेत. तसेंच उत्तम प्रकारचें इमारती लांकूडही येथें पुष्कळ निपजतें. या बेटांतला राजा मोठा पैसेवाला व मोठा पराक्रमी आहे. याचा अंमल भोंवतालच्या कितीएक बेटांवर आहे. या बेटांतले लोक फार अज्ञान

आहेत; ते मनुष्याचें मांस खातात. या बेटांत आम्हांला व्यापारापासून मोठा नफा झाला. हें बेट सोडल्यावर दुसरीं कितीएक बेटें पाहिलीं आणि फिरत फिरत शेवटीं बसोरा बंदरीं येऊन पोहोंचलों. तेथून मी बगदाद शहरीं आलों. या खेपेस मला पैसा बहुत मिळाला होता. नंतर मी गरीबगुरीबांस पुष्कळ धर्म केला व मशिदींस पुष्कळ पैसा दिला. मग मीं कित्येक वर्षें इष्टमित्रांत व सोयऱ्याधायऱ्यांत आनंदानें घालविलीं.

सिंदबाद याच्या तोंडानें त्याच्या चवथ्या सफरीची हकीकत ऐकून मंडळींस फारच चमत्कार वाटला. त्याही दिवशीं त्यानें हिंदबाद यास शंभर रुपये देऊन, त्यास व इतर मंडळीस दुसऱ्या दिवशीं जेवावयास व आपल्या पांचव्या सफरीची हकीकत ऐकावयास बोलावलें. नंतर ते सर्व लोक आपल्या घरोघर गेले. दुसरे दिवशीं सर्व मंडळी येऊन त्यांचें जेवण झाल्यावर सिंदबाद यानें गोष्टीस आरंभ केला—

## सिंदबाद याची पांचवी सफर.

चवथ्या सफरीहून आल्यावर कितीएक दिवस मीं ख्यालीखुशाली व मौज यांखेरीज दुसरें कांहीं केलें नाहीं. त्यामुळें पूर्वीं झालेलीं सर्व दुःखें विसरून गेलों; परंतु मुशाफरीचा माझा नाद कमी झाला नाहीं. मग जलपर्यटनास जावयाचा निश्चय करून व व्यापाराकरतां नानाप्रकारचा माल खरेदी घेऊन, तो खुष्कीनें जवळच्या बंदरगांवीं रवाना केला व मीही लवकरच तेथें जाऊन पोहोंचलों. मग दुसऱ्याच्या ताब्यांत राहावयाचें नाहीं, असा विचार करून, आपल्या पदरचा पैसा लावून एक मोठें जहाज बांधलें, आणि त्यावर माल चढवून व दुसऱ्या कित्येक सावकारांचा माल भाड्यानें घेऊन आम्हीं एके दिवशीं चांगला वारा पाहून गलबत हांकारलें.

कित्येक महिने वाट चालल्यावर, एके दिवशीं आम्ही एका ओसाड बेटांत उतरलों. त्या ठिकाणीं रुखनामक पक्ष्याचें एक मोठें

अंडें पडलें होतें. त्या अंड्यांतलें पिलूं तयार होऊन त्यानें अंडें फोडून एका अंगानें चोंच बाहेर काढली होती. मजबरोबर जे दुसरें कांहीं उदमी होतें, त्यांनीं कुऱ्हाडींनीं तें अंडें फोडून त्या पिलाचे तुकडे आंतून काढून तें भाजून खाण्यास आरंभ केला. ते त्या कृत्यास प्रवृत्त झाले असतां, मीं त्यांचा पुष्कळ निषेध केला, परंतु त्यांनीं माझें म्हणणें कांहींच ऐकिलें नाहीं!

त्यांचें हें खाणें संपतें न संपतें, तों इतक्यांत आभाळांत दूर अंतरावर दोन मोठे विस्तीर्ण ढग दृष्टीस पडले. आम्ही गलबत चालविण्याकरितां जो नाखुदा चाकरीस ठेविला होता, तो मोठा वाकबगार होता. त्यास तो अनर्थ कळून त्यानें मोठ्यानें ओरडून आम्हां सर्वांस इषारा दिला कीं, ' या पिलाचीं हीं आईबापें येत आहेत; तर सर्वांनीं मोठी घाई करून जहाजावर चढावें; नाहीं तर मोठा दगा होईल. ' नंतर आम्हीं सर्व मोठ्या लगबगीनें गलबतावर चढून गलबत हांकारलें.

इतक्यांत ते दोन प्रचंड रुख नामक पक्षी मोठा भयंकर शब्द करीत बेटाजवळ येऊन पोहोंचले; आणि अंडें फुटलें व आंतलें पोर नाहींसें झालें, असें पाहून ते फारच विक्राळ शब्द करूं लागले. मग सूड उगवण्याकरतां, ते जिकडून आले होते तिकडे परत गेले. इतक्या वेळांत आम्ही होईल तितकी जलदी करून गलबत हांकारलें. मनांतला हेतु हा कीं, आपण दूर गेलों म्हणजे अनर्थ टळेल.

घटका अर्धघटका लोटली नाहीं तों, ते पक्षी परत आले; आणि आम्ही पहातों तों त्यांनीं आपल्या चोंचींत मोठमोठ्या शिळा आणल्या होत्या. मग उडतउडत बरोबर आमच्या डोक्यावर येऊन ते किंचित् स्थिर झाले; आणि एकानें एक शिळा सोडून दिली. परंतु आमचा नाखुदा मोठा हुषार होता, त्यानें तितक्यांत गलबत मुरडल्यामुळें ती शिळा नेम चुकून समुद्रांत पडली, पण ती इतकी मोठी होती व अशा जोरानें पडली कीं, ती जेथें पडली, तेथचा समुद्राचा तळ दिसला! इतक्या धांदलींत दुसऱ्या पक्ष्यानें आपली



त्यांनीं कुऱ्हाडींनीं तें अंडें फोडून त्या पिलाचे तुकडे आंतून काढून ते भाजून खाण्यास आरंभ केला. [ पान ११०

शिळा अशी बिनचूक सोडली कीं, ती गलबतावर पडून त्याचे तुकडे तुकडे झाले व कितीएक लोक चिरडून मेले व कितीएक बुडाले. त्या अनर्थांत मीही तळाशीं गेलों होतों; पण कांहीं वेळानें वर वर येतों तों त्या गलबताची एक फळी नशीबानें मला सांपडली. तिच्या आश्रयानें कांहीं वेळ एका हातानें व कांहीं वेळ दुसऱ्या हातानें, असा पोहत पोहत चाललों व दैवानें भरती व वारा हीं अनुकूल असल्यामुळें शेवटीं एका बेटाच्या किनाऱ्यास लागलों. तो किनारा उंच व कठीण चढावाचा होता; तथापि मोठ्या प्रयत्नानें मी वर चढून गेलों.

हिरवळ जमिनीवर बसून कांहीं वेळ दम खाल्ल्यावर मी उठून पुढें चालता झालों; आणि पहातों तों तें स्थळ फार रमणीय दिसलें. जिकडे पहावें तिकडे सुंदर वृक्ष फलपुष्पांनीं शोभत असे दृष्टीस पडत. त्यांवरचीं कांहीं फळें कचीं होतीं; कांहींकांस पाड लागला होता व कांहीं परिपक्व झालीं होतीं. तसेंच गोड व स्फटिकासारखे स्वच्छ पाण्याचे झरे त्या झाडांमधून वाहत होते. मग मी कांहीं फळें खाल्लीं. तीं फारच मधुर होतीं व तें झऱ्याचें उत्तम पाणी पिऊन माझा जीव कांहींसा स्वस्थ झाला.

इतक्यांत संध्याकाळ झाली. मग चांगलीशी जागा पाहून तेथें लवंडलों, परंतु दोन घटकासुद्धां एकसारखी स्वस्थ झोंप लागली नाहीं. त्या ओसाड ठिकाणीं एकटा असल्यामुळें वरचेवर मी दचकून जागा होई. बहुतेक रात्र मी रडण्यांत घालविली. ईश्वरानें सर्व प्रकारचीं सुखें घरीं अनुकूळ केलीं असतां, सुखाचा जीव मुद्दाम दुःखांत व संकटांत घातल्याबद्दल मी स्वतःला पुष्कळ शिव्या देऊन घेतल्या. मला इतकें वाईट वाटलें कीं, मीं प्राण देण्याचासुद्धां बेत केला होता; परंतु इतक्यांत पहांट झाली. नंतर चोहोंकिडे प्रकाश पडल्यावर आसमंताद्भागाची वनाची शोभा पाहून मनास थोडें समाधान वाटलें व दुःखाच्या कल्पना कमी होत चालल्या.

मग निजलों होतों त्या ठिकाणाहून उठून झाडींत शिरलों खरा; परंतु मनांत थोडें थोडें भय वाटतच होतें. कांहींसा पुढें गेलों तों, एका ओढ्याच्या कांठीं बसलेला एक म्हातारा मनुष्य दृष्टीस पडला. तो जरेनें अगदीं थकलासा दिसत होता. प्रथम मला असें वाटलें कीं, मजसारखाच हा कोणी गलबत फुटून कडेस लागलेला मनुष्य असावा. मी त्या म्हाताऱ्याजवळ जाऊन त्यास सलाम करून, 'येथें काय करीत आहां ?' म्हणून त्यास विचारलें. पण म्हाताऱ्यानें मला उलट सलाम न करतां व उत्तर कांहींएक न देतां डोकें मात्र किंचित् हालविलें आणि खुणांनीं मला सुचविलें कीं, 'मला फळें तोडावयाचीं आहेत, तर तूं मला पाठीवर घेऊन ओढ्यापलीकडे ने.'

मग त्यावर उपकार करावा या बुद्धीनें मी ओणवा होऊन त्यास पाठीवर घेतलें, आणि ओढा उतरून पलीकडें गेलों. नंतर पुनः ओणवून त्यास खालीं उतरावयास सांगितलें. परंतु मी हा उपकार करावयास गेल्यापासून काय परिणाम झाला तो पहा! मित्रहो, जेव्हां जेव्हां मला या पुढील गोष्टीची आठवण होते, तेव्हां तेव्हां मला हंसूं आल्यावांचून राहात नाहीं. ती गोष्ट हीच कीं, त्या म्हाताऱ्यानें खालीं उतरावें म्हणून मी लवलों असतां, उतरावयाचें सोडून माझ्या खांद्यावर टपकन् बसून त्यानें मांड्यांचा विळखा माझ्या मानेस असा बळकट घातला कीं, माझा दम कोंडून मी तत्काळ जमिनीवर मूर्च्छित पडलों! हा म्हातारा पहिल्यानें अगदीं खप्पड दिसत होता, परंतु या त्याच्या कृत्यावरून त्याच्या अंगीं चपळाई व जोर हीं किती होतीं हें तुम्हीच मनांत आणा. त्याच्या पायांवरचें कातडें बैलाच्या कातड्यासारखें घट्ट व केंसांनीं आच्छादलेलें होतें, परंतु ही गोष्ट प्रथम मीं पाहिली नव्हती; आतां पाहिली.

मी मूर्च्छा येऊन पडलों म्हणून तुम्हांस सांगितलें; परंतु खालीं पडलों तरी तो म्हातारा माझ्या मानेवरून हालला नाहीं; त्यानें माझ्या मानेचा विळखा मात्र सैल केला. मग कांहीं वेळानें मी किंचित् सावध झालोंसें पाहून त्यानें एक पाय माझ्या पोटाखालीं घुसवला व

दुसऱ्या पायानें माझ्या कुशींत लाथा मारून त्यानें मला उभें केलें. मग त्यानें कांहीं झाडांखालीं मला नेऊन मजकडून फळें खावविलीं. तो सर्व दिवसभर माझ्या खांद्यावर असे व रात्रीचा मी निजलों तरी माझ्या गळ्यांतून पाय न काढतां तसाच जमिनीवर लवंडत असे. सकाळ झाली ना झाली कीं, तो मला उठवून त्यास खांद्यावर घेऊन सर्व दिवसभर फिरावयास लावी व सर्वकाळ लाथा मारी. याप्रमाणें या समंधाचें ओझें अष्टौप्रहर वहावयाचें व तें जिवांत जीव आहे तोंपर्यंत कपाळचें सुटण्याचा संभव दिसेना असें झालें; तेव्हां मला केवढें दुःख झालें असेल, याचा विचार मित्रहो, तुम्हीच करा.

एक दिवस रानांत फिरत असतां, एक वाळूंत पडलेला कडू भोंपळा माझ्या दृष्टीस पडला. तो कोरून त्यांत द्राक्षांचे पिकलेले कितीएक घोंस मुठीनें पिळून तो भोंपळा मीं रसानें भरला. नंतर तो एके ठिकाणीं ठेवून कितीएक दिवस लोटूं दिले. मग एक दिवस पाहतों तों त्या रसाचें फार स्वादिष्ठ मद्य झालें. त्यांतलें मी थोडेसें प्यालों असतां मला हुषारी आली, व त्या कैफांत मी नाचूं व गाऊं लागलों.

मग त्या रसाचा तो गुण पाहून म्हाताऱ्यानें तो खुणेनें मागितला, आणि मीं त्याच्या हातीं तुंबा दिला असतां, त्यानें तो तोंडास लावून अगदीं रिकामा करून टाकला. त्या मद्याच्या योगानें तो बेशुद्ध होऊन आपल्या भाषेनें गाऊं लागला व त्याचे झोकांडे जाऊं लागले. इतक्यांत त्यास उलटया होऊन त्याचा मानेचा विळखा ढिला पडला. मग तसें झालेंसें माझ्या लक्षांत येतांच, मी त्यास खालीं जमिनीवर झोंकून दिलें व तो त्या धक्क्यानें निपचित पडला. इतक्यांत शेजारीं पडलेला एक मोठा दगड त्याच्या डोक्यांत घालून त्या दुष्टास मीं यमलोकास पाठविलें!

त्या द्वाड म्हाताऱ्याचा त्रास याप्रमाणें सुटल्यामुळें मोठा हर्ष पावून मी समुद्राकडे चालता झालों. त्या वेळीं माझ्या नशीबानें एक गलबत दर्यांत नांगरलें होतें, व त्यावरचे कांहीं लोक गोडें पाणी

घेण्याकरितां बेटांत आले होते; त्यांची व माझी किनाऱ्यावर गांठ पडली. मला त्या ओसाड बेटांत पाहून तेथें मी कसा आलों, कोणत्या संकटांत पडलों व त्या संकटापासून सुटका कशी झाली, हें सर्व ऐकून, त्या लोकांस मोठा अचंबा वाटला. ते मला म्हणाले, ' बाबा, तूं ज्याच्या हातीं सांपडला होतास तो " समुद्राचा म्हातारबोवा " या नांवानें विख्यात होता. तूं आपणास मोठा नशिबाचा मान. त्या दुष्टाच्या हातीं सांपडून जीव वांचवून सुटलेला असा पाहिला मनुष्य तूंच. आजपर्यंत त्याच्या तावडींत म्हणून जें जें सांपडलें, त्यास त्यानें प्राण घेतल्यावांचून सोडलेंच नाहीं. या म्हाताऱ्याच्या हातून येथें पुष्कळ लोक मरण पावल्याची या बेटाची मोठी प्रसिद्धि आहे. खलाशी व व्यापारी यांस ह्या बेटांत उतरणें झाल्यास त्यांचा मोठा जमाव असल्यावांचून या बेटांत उतरण्याची त्यांची छाती कधींही होत नसे. '

नंतर ते लोक मला आपल्या गलबतावर घेऊन गेले. तेथें जो मुख्य नाखुदा होता, त्यास माझा वृत्तांत ऐकून मोठी दया आली व त्यानें मला आश्रय दिला. नंतर तें गलबत थोडक्याच दिवसांत एका बंदरास येऊन थांबलें. त्या बंदरीं मोठें विस्तीर्ण शहर होतें.

या गलबतावर पुष्कळ व्यापारी व सावकार होते, त्यांपैकीं एकाशीं माझा फार स्नेह पडला होता. त्या सावकारानें फार आग्रह करून शहरांत परदेशचे सावकार उतरण्याचा वाडा होता तेथें मला नेलें. तेथें मोठमोठीं रिकामीं पोतीं घेऊन पुष्कळ लोक बसले होते, त्यांची व माझी ओळख करून देऊन त्यानें त्यांस सांगितलें कीं, 'या आमच्या सोबत्यास तुम्ही आपल्याबरोबर घेऊन जा. ' मग त्यानें मला एक रिकामें पोतें देऊन सांगितलें कीं, ' या लोकांबरोबर ते जेथें जातील तेथें जा व ते जें करतांना पहाल, तसें करा. सांगतों हें मात्र पक्कें ध्यानांत धरा कीं, या लोकांस सोडून एक पाव घटका देखील इकडे-तिकडे जाऊं नका, कारण, तसें केलें तर कदाचित् प्राणास मुकाल.'

अशी ताकीद करून त्यानें त्या दिवसापुरतें फराळाचें मला दिलें. नंतर मी त्या लोकांबरोबर चालता झालों.

नंतर आम्ही एका मोठ्या वनांत गेलों. तेथें मोठमोठे गगनचुंबित वृक्ष होते. परंतु त्या वृक्षांचे सोट असे गुळगुळीत होते कीं, त्यांच्या शेंड्यांशीं जीं फळें लटकलीं असत, तीं वर चढून काढण्याची अगदीं सोय नव्हती. या वृक्षास नारळी म्हणतात. त्या नारळीचे नारळ वेंचण्याकरतां आम्ही तेथें पोतीं घेऊन गेलों होतों. आम्ही त्या रानांत शिरत आहों तों हजारों वानर दृष्टीस पडले. त्यांत कितीएक फारच लहान होते व कितीएक फारच मोठे होते. ते आम्हांस पाहिल्याबरोबर भिऊन पळाले. ते मोठ्या त्वरेनें व चपळाईनें झाडांवर चढून शेंड्याशीं जाऊन बसले. मी ज्या लोकांबरोबर गेलों होतों, त्यांनीं पुष्कळ धोंडे जमवून ते त्या वानरांवर फेंकण्यास आरंभ केला; तें पाहून मीही तसेंच करूं लागलों. आम्ही धोंडे मारूं लागलों तसा आमचा हेतु समजून ते वानरही नारळ तोडून आमच्या अंगावर फेंकू लागले, व त्यांच्या आवेशावरून त्यांस फार त्वेष आलासें दिसे. ते नारळ वेंचून आम्ही पोत्यांत भरावयास लागलों व त्या वानरांस चवताळविण्याकरितां मध्यें मध्यें त्यांजवर दगड फेंकीत असूं. असें करतां करतां संध्याकाळपर्यंत आमचीं सर्वांचीं पोतीं भरलीं. नंतर आम्ही परत निघालों.

मग आम्ही रात्रीं शहरांत आल्यावर, ज्या सावकारानें मला पाठविलें होतें, त्यानें माझे सर्व नारळ विकत घेतले आणि मला सांगितलें कीं, 'याप्रमाणें तुम्ही नित्य नारळ जमा करून आणण्याचें काम कांहीं दिवस चालवा म्हणजे स्वदेशीं जाण्याच्या भाड्यापुरता पैसा तुम्हांजवळ होईल. असा चांगला उपदेश सांगितल्याबद्दल मी त्याचा मोठा उपकार मानून, याप्रमाणें वागूं लागल्यामुळें कितीएक दिवसांनीं नारळ विकण्यापासून मजपाशीं बराच पैसा जमला.

मी ज्या गलबतावर आलों होतों त्यावरच्या उदम्यांस पाहिजे होते तितके नारळ लौकर मिळाल्यामुळें, तें गलबत थोड्याच दिवसांत

निघून गेलें. पुढें लवकरच त्या बंदरीं नारळ भरण्याकरितां दुसरें एक गलबत आलें. त्या गलबतावर मी आपल्याजवळ सांचवलेले नारळ चढवले व तें निघावयाच्या दिवशीं, ज्या सावकाराचा व माझा मित्रपणा झाला होता व जो मला फार उपयोगी पडला होता, त्याचा निरोप घेऊन मी गलबतावर जाऊन बसलों. माझ्या मित्राचें काम उरकण्यास कांहीं अवकाश होता, म्हणून तो मजबरोबर आला नाहीं; तेथेंच राहिला.

मी जहाज हांकारून, लौकरच जेथें मिरीं पुष्कळ पिकतात, त्या बेटांत प्रथम गेलों; व तेथून जवळच कुमारीनामक बेट होतें तेथेंही गेलों. त्या कुमारी बेटांत सर्वोत्कृष्ट शिशवीचें लांकूड निपजतें. या दोन्ही ठिकाणीं नारळ विकून मिरीं व शिशवी हीं आम्हीं खरेदी केली. या बेटांत जवळच्या समुद्रांत मोतीं फारच व उत्कृष्ट निपजतात. मीं व दुसरे कितीएक उदमी ज्यांनीं मोतीं काढण्याचा व्यापार केला. मीं स्वतांचा पैसा देऊन कितीएक पाणबुडे चाकरीस ठेवले होते. माझ्या नशीबानें मला सर्वोत्कृष्ट पाणीदार व मोठमोठीं पुष्कळ मोतीं सांपडलीं. नंतर तो सर्व माल घेऊन मोठ्या आनंदानें जहाजांत बसून फिरत फिरत मी बसोरा बंदरांत येऊन पोहोंचलों, व तेथून लौकरच बगदाद शहरास आलों. तेथें बरोबर आणलेलीं मिरीं, शिशवी, मोतीं, वगैरे माल विकला; त्यांत मला पुष्कळ नफा झाला. मग माझ्या नेहमींच्या नियमाप्रमाणें नफ्याचा दहावा वांटा दान करून गरीबगुरीबांचा दुवा घेतला. पुढें कितीएक दिवस इष्टमित्रांसहवर्तमान ख्यालीखुशाली करून झालेल्या श्रमांची व दुःखांची आठवणसुद्धां बुजवून टाकली.

याप्रमाणें पांचव्या सफरीची गोष्ट सांगून नेहमींप्रमाणें त्या दिवशींही हिंदबादास शंभर रुपयांची थैली देऊन सिंदबादानें त्यास घरीं पाठविलें. दुसऱ्या दिवशीं पूर्वसंकेताप्रमाणें जमून जेवणखाण आटपल्यावर सिंदबादानें आपल्या सहाव्या सफरीची हकीगत सांगण्यास आरंभ केलाः—

# सिंदबाद याची सहावी सफर.

मित्रहो, मागल्या पांच सफरींत अनेक प्रकारचीं जिवावरचीं संकटें माझ्यावर आलीं व अनेक प्रकारचीं दुःखें व हाल भोगावे लागले; असें असतां पुनः अशे सहाव्यानें सुखाचा जीव संकटांत व धोक्यांत घालवण्याची माझी इच्छा झाली तरी कशी, म्हणून तुम्हांस मोठा विस्मय वाटत असेल. खरोखरी विचाराल तर दुसऱ्याला वाटेल यांत काय, पण माझा मलासुद्धां या गोष्टीचा अचंबा वाटतो ! या गोष्टीचा विचार करूं लागलों असतां, माझ्या मनाचा पक्का निर्णय होतो कीं, मनुष्याच्या प्रारब्धांत ज्या ज्या गोष्टी असतात, त्या घडल्यावांचून कदापि रहावयाच्या नाहींत. पांचव्या सफरीहून परत येऊन सुमारें एक वर्ष झाल्यावर मी पुनः सफरीस जाण्याचा विचार केला. तो प्रसिद्ध होतांच माझे सोयरेधायरे व इष्टमित्र यांनीं मजकडे येऊन डोळयांस आंसवें आणून व पुढें पदर पसरून सफरीस न जाण्याविषयीं माझी पुष्कळ पुष्कळ विनवणी केली; परंतु तें कांहींच न ऐकतां मी मुशाफरीस निघालों.

मग इराणी आखातांतून न जातां मी पुनः खुष्कीनें इराण देशांत व हिंदुस्थानांत जाऊन व त्या देशांतील कितीएक प्रांत पाहून, शेवटीं एका बंदरीं पोहोंचलों. तेथें एक नाखुदा फार मोठ्या सफरीस निघाला होता व त्याचें जहाजही चांगलें होतें. त्यावर माल चढवून दर्यांत गलबत हांकारलें. परंतु हें हांकारण्यास कोणता वाईट मुहूर्त लागला असेल तो लागो. या गलबतांत आम्हांस चैन म्हणून एक दिवस देखील पडलें नाहीं ! आम्ही बंदर सोडून कांहीं दिवस घालविले, तों आमचा नाखुदा व वाटाड्या हे दोघेही वाट चुकून त्यांस गलबत कोणत्या दिशेस चालवावें हें कळेनासें झालें. पुढें कांहीं दिवसांनीं त्यांस आपण कोणत्या प्रदेशीं आहों हें समजलें; परंतु त्यायोगानें त्या प्रसंगीं आम्हांस यत्किंचित्‌सुद्धां संतोष झाला नाहीं. कारण आपलें जहाज कोणत्या ठिकाणीं आहे हें कळतांच, तो नाखुदा एकाएकीं मोठ्यानें शोक करूं लागला. त्यानें आपल्या

डोक्याचें पागोटें जहाजाच्या तक्तपोशीवर आपटून, वेड लागल्या प्रमाणें केंस तोडण्यास व डोकें व ऊर बडवून घेण्यास आरंभ केला! हें त्याचें कृत्य पाहून आम्ही सर्व घाबरून त्यांस विचारूं लागलों कीं, 'तुम्ही असें कां करतां? तुम्हांस दुःख कोणतें झालें?' त्यानें उत्तर केलें कीं, 'बाबांनो, जें अरिष्ट प्राप्त झालें आहे, तें मी तुम्हांजवळ चोरीत नाहीं; ऐका. आपलें हें जहाज दर्यांतल्या एका जबरदस्त प्रवाहांत सांपडलें आहे. हें घटका अर्ध घटकेचे आंत खडकावर आपटून आपला सर्वांचा नाश होणार;तर आतां तुम्ही सर्व ईश्वराची प्रार्थना करून त्यास शरण जा. त्यास करुणा येऊन तोच वांचवील तर वांचवील. मानवी उपायानें आपला बचाव होण्याची आशा राहिली नाहीं.' असें बोलून त्या नाखुद्यानें अवजारें आटपण्याविषयीं खलाशास हुकूम केला; परंतु ते तसें करीत असतां, दोरखंड तुटून जहाज बेफाम झालें, तें मोठ्या झपाट्यानें जाऊन एका खडकावर आपटलें आणि त्याचे तुकडे तुकडे झाले, परंतु गलबत फुटण्याचें आम्हांस कांहीं वेळ अगोदर कळल्यामुळें आम्ही तजवीज करून आपापले जीव व थोडथोडे खाण्याचे पदार्थ इतके वांचविले.

मग आम्ही तीरावर जमलों असतां आमचा नाखुदा म्हणाला, 'ईश्वराच्या मनांत घडवावयाचें असतें,तें कोणाच्यानें टाळवावयाचें नाहीं. तर मित्रहो, आतां आपण सर्वांनीं आपापल्या शेवटच्या विश्रांतीकरितां खळ्या खणाव्या व एकमेकांचा शेवटचा निरोप घ्यावा; कारण कीं, हा किनारा असा सोसाट आहे कीं, येथून आजपर्यंत कोणी जीव राखून परत गेला नाहीं.' हें त्याचें भाषण ऐकून आम्हां सर्वांस खेद झाला. आम्ही सर्व एकमेकांच्या गळ्यांत मिठ्या मारून पुष्कळ रडलों व फार शोक केला.

आम्ही ज्या किनाऱ्यावर पडलों होतों, त्या किनाऱ्यानें एकसारखा मोठा उंच पर्वत लागत गेला होता, त्यामुळें तेथून मध्यदेशांत जाण्याचा अगदीं इलाज नव्हता. त्या किनाऱ्यावर हजारों गलबतें फुटून जिकडेतिकडे त्यांचे तुकडे पडले होते. तसेंच जिकडे

जिकडे पहावें, तिकडे तिकडे हजारों, लक्षावधि, माणसांचीं हाडें विखरलीं होतीं, त्यावरून त्या भयंकर ठिकाणीं किती लोक मेले असतील, हें मनांत येऊन आम्ही भयानें व्याकुळ झालों. तसेंच त्या ठिकाणीं मोठमोठ्या किंमतीचे व्यापाराचे जिन्नस इतके पुष्कळ पडले होते कीं, त्यांची किंमत सांगितली असतां, कोणास ती खरी देखील वाटणार नाहीं ! परंतु तो माल पाहून आम्हांस तिळमात्र संतोष न होतां उलट तेथून सुटण्याची विशेष निराशा मात्र झाली.

दुसऱ्या कोणत्याही स्थळीं पाहिलें असतां, असें दृष्टीस पडतें कीं, लहानमोठ्या पुष्कळ नद्या येऊन समुद्रास मिळतात; परंतु या किनाऱ्यावर विपरीत दृष्टीस पडलें; तें असें कीं, एक गोड्या पाण्याची मोठी नदी समुद्रांतून निघून किनाऱ्यानें जात जात, शेवटीं डोंगरास एक मोठ्या रुंद तोंडाची गुहा आहे, तींत गडप होते. या गुहेंत पराकाष्ठेचा अंधार आहे. या ठिकाणचा दुसरा मोठा चमत्कार म्हटला म्हणजे, येथें माणकें, स्फटिक, वगैरे रत्नांच्या सर्वोत्कृष्ट खाणी आहेत. फार तर काय ? हा पर्वत या बाजूस या रत्नांचाच आहे, असें म्हटलें तरी चालेल. येथें खडकांतून शिलारसासारखा कांहींएक पातळ पदार्थ समुद्रांत गळत असतो. तो माशांच्या पोटांतून निघतो, व त्याचें अंबर तयार होतें, व त्याचे गोळेच्या गोळे लाटांनीं वाहात येऊन या किनाऱ्यावर पडतात. या ठिकाणीं सुवासांचीं झाडेंही अनेक निपजतात.

या किनाऱ्यापासून कांहीं नियमित अंतरावर गलबत आलें असतां तें वाहात येऊन या किनाऱ्यावर आदळल्यावांचून कधींही राहावयाचें नाहीं. वारा जर समुद्रावरून येत असला, तर तो मागें सांगितलेल्या प्रवाहास अनुकूल होऊन गलबत विशेष झपाट्यानें येऊन खडकावर आपटतें व या किनाऱ्याजवळचा पर्वत पराकाष्ठेचा उंच असल्यामुळें, वारा बंद होऊन समुद्रावर तर अगदीं नाहींसा होतो; व त्यायोगानें प्रवाहाचा वेग पूर्ण चालून गलबत येऊन खडकावर आदळतेंच; तशी आमच्या जहाजाची गत झाली. असो.

या भयंकर जागेंतून सुटका होण्याचा उपाय कोणास कांहीं सुचेना. मग निरुपाय होऊन मृत्यूची वाट पहात आम्ही सर्वजण बसलों. एकंदर खावयाचे जे पदार्थ होते, ते सर्वांस सारखे वांटून दिले होते. मग ज्यानें आपला वांटा जसा तगवून ठेवला, त्याप्रमाणें तो कमी किंवा जास्त दिवस वांचला. जो जो मरे त्यास जे जिवंत असत, ते मूठमाती देत. असें होतां होतां, सरते शेवटीं मी एकटा राहिलों याचें कारण मीं आपला वांटा सर्वांपेक्षां विशेष कमी खर्चेला व कांहीं अन्नाचा सांठा मीं सोबत्यांस न कळत करून ठेवला होता. तथापि मी आपल्या शेवटच्या सोबत्यास मूठमाती दिली त्या वेळेस माझ्याजवळचें अन्न बहुतकरून संपत आलें होतें; यामुळें मी असा विचार केला कीं, आपले सर्व सोबती गेले व आपणासही त्यांच्यामागून लौकर गेलें पाहिजे. परंतु आपणांस मूठमाती द्यावयास कोणी राहिला नाहीं; त्यापेक्षां आपण आपल्याकरितां खड्डा खणून ठेवावा व मरण दिसूं लागलें म्हणजे तींत उडी टाकावी; असा विचार करून खांच खणण्यास आरंभ केला. हें कृत्य करतांच, मला मोठा गहिं-वर आला; मीं आपली पुष्कळ निंदा केली व त्या दुःखानें वेडा होऊन मीं आपलीं मनगटें चावून घेतलीं व डोकें बडवून घेतलें.

अशा अवस्थेंत भगवंतास माझी करुणा येऊन त्यानें माझ्या मनांत अशी कल्पना आणिली कीं, ज्या गुहेंत नदी शिरत होती, ती गुहा एक वेळ जवळ जाऊन पहावी. नंतर जाऊन ती गुहा पाहात असतां, माझ्या मनांत अशी कल्पना आली कीं, ज्या अर्थी हा एवढा प्रवाह या गुहेंत सतत चालला आहे, त्या अर्थीं ही नदी पुढें कोणत्या तरी देशांत बाहेर पडत असावी. तर आपण लांकडांचा एक तारवा बांधून त्यावर बसून या प्रवाहाबरोबर गुहेंत शिरलों असतां, कदाचित् आपण मनुष्यांनीं वसवलेल्या प्रदेशीं जाऊं आणि तसें न होतां कदाचित् आपण मेलों तरी आपलें विशेष वाईट काय होणार आहे ? येथें उपासानें मरण येणारच; गुहेंत गेलों असतां कदाचित् दुसऱ्या एखाद्या रीतीनें मरण प्राप्त होईल, तेव्हां

मरणापेक्षां अधिक वाईट कांहीं होत नाहीं. पण दुसऱ्यापक्षीं हा प्रवाह जर चांगल्या एखाद्या देशांत जात असता, तर मरण टळेल व कदाचित् मोठें कल्याणही होईल; नाहीं कोणी म्हणावें? असें मनुष्यास कितीएक वेळ घडतें कीं, त्यावर पराकाष्ठेचीं संकटें गुदरतात व त्यांतून तो सुटला असतां, त्याची एकदम मोठी भरभराट होते. तसेंच माझ्या नशिबीं नसेल कशावरून?'

असा विचार केल्यावरून माझ्या मनास बरीच हुषारी वाटून मी उत्साहानें तारवा बांधण्याच्या कामास लागलों. फुटलेल्या गलबतांच्या मोठाल्या फळ्या व दोरखंडें त्या किनाऱ्यावर पुष्कळ पडलीं होतीं. तीं जमा करून एक मजबूत तारवा मीं बांधला. मग त्या ठिकाणीं पडलेलीं सर्वोत्कृष्ट माणकें, पांच, स्फटिक, अंबर, कांहीं सोनें हे पदार्थ बरेच वेंचून त्यांचे गठ्ठे बांधून ते समतोल त्या तारव्यावर ठेवले. नंतर खावयाचे पदार्थ जे थोडेसे उरले होते, ते जवळ घेऊन व लहान लहान दोन वल्हीं दोन हातांत घेऊन तारव्यावर बसला. याप्रमाणें तयारी झाल्यावर, तारवा ज्या दोरीनें तीरास बांधला होता, ती दोरी तोडली आणि भगवंतावर हवाला ठेवून त्या दरींत शिरलों.

दरींत शिरल्याबरोबर मध्यरात्रीसारखा चोहोंकडे अंधार झाला. कोणत्या दिशेस जातों वगैरे मला कांहीं समजेना. याप्रमाणें त्या प्रवाहांत वाहात जातां जातां किती दिवस लोटले असतील, कोण जाणें? एके ठिकाणीं ती गुहा इतकी सखल होती कीं, वरच्या भागावर आपटून माझें कपाळच फुटत होतें; पण थोडक्यांत चुकलें. मग दुसऱ्यानें तशी पाळी येऊं नये म्हणून तारव्यासारखा निजलों. या प्रसंगीं मी जवळचे खावयाचे पदार्थ फारच काटकसरीनें खर्चीत होतों. केवळ प्राणधारणार्थ जेवढे हवेच तेवढे मात्र खात होतों. तथापि मजजवळचा अन्नाचा संग्रह अगदीं संपला. शेवटीं भुकेनें व्याकुळ होऊन पडलों असतां मला गाढ झोंप लागली. मी किती वेळ निजलों असेन, हें मला सांगतां येत नाहीं. परंतु जेव्हां जागा झालों, तेव्हां

पाहतों तों मी उजेडांत उघड्या प्रदेशीं आहें व मी ज्या तारव्यावर पडलों होतों, तो नदीच्या तीराशीं झाडांस बांधला आहे, व माझ्या भोंवतीं पुष्कळ काळे लोक उभे आहेत असें दिसलें! त्यांस पाहातां-क्षणींच मी उठून उभा राहून त्यांस सलाम केला व ते मजपाशीं बोलूं लागले, पण मला त्यांची भाषा कळेना.

या प्रसंगीं मला जो आनंद झाला,त्यानें मी अगदीं बावरून गेलों. मी काय जागा आहें किंवा स्वप्न पाहात आहे,हें मला कांहींच समजेना. मग कांहीं वेळानें, मी पाहात आहे हें सर्व खरें आहे, भ्रांति नव्हे, अशी मनाची पक्की खात्री झाल्यावर, माझ्या तोंडावाटें त्या आनंदावेशांत आरबी भाषेंतलें एक वाक्य निघालें. त्याचा अर्थ असा होता कीं, "ईश्वराचा धांवा कर, म्हणजे तो तुझें संकट दूर करील; तुला दुसरें कांहीं करावयास नको. डोळे मीट आणि तूं जागा झाला नाहींस तों तुझें संकट दूर करून तो तुला सुखी करील."

त्या काळ्या लोकांत एकास आरबी भाषा येत होती. तो माझें भाषण ऐकून पुढें आला; आणि म्हणाला कीं, 'बाबा, आम्हांस पाहून आश्चर्य पावूं नको. आम्ही या मुलुखांत राहतों. आम्ही शेजारच्या पर्वतापासून ही जी नदी निघते तिचे पाट फोडून शेतांस पाणी लावण्याकरतां येथें खपत होतों. इतक्यांत नदीच्या प्रवाहांतून कांहीं वाहात जात आहे असें दिसल्यावरून तिच्या कांठाशीं येऊन पाहूं लागलों, तों हा तारवा दृष्टीस पडला; मग आम्हांपैकीं एकानें आंत उडी टाकून पोहत जाऊन तो धरला आणि कांठाशीं ओढून येथें बांधून टाकला; आणि तुम्ही जागे व्हावयाची वाट पाहात येथें आम्ही उभे राहिलों. तर आतां आपण कोण व कोणीकडून वाहात आला, वगैरे सर्व हकीगत आम्हांस सांगावी, ती ऐकण्याविषयीं आम्हां सर्वांस फार उत्कंठा आहे.' मी त्यांस उत्तर केलें कीं, 'मित्रहो, भुकेनें माझा जीव फार व्याकुळ झाला आहे; तर प्रथम मला कांहीं खावयास द्या. माझ्या जीवांत जीव आला म्हणजे तुमची इच्छा पूर्ण करीन.'

मग त्यांनीं तत्काळ कितीएक प्रकारचे पदार्थ मला खावयास दिले. ते खाऊन अंगांत कांहींशी हुशारी आल्यावर मीं त्यांस आपला सर्व वृत्तांत निवेदन केला, व तो ऐकून त्यांस फारच चमत्कार वाटला. मी उगा राहिल्यावर दुभाषी मनुष्यानें मला कळविलें कीं, 'तुमची गोष्ट ऐकून माझ्या सर्व सोबत्यांस फार आश्चर्य वाटलें; तर आमचें तुम्हांस असें म्हणणें आहे कीं, तुम्ही आम्हांबरोबर आमच्या राजाकडे चलावें, व त्यास हा सर्व आपला मजकूर सांगावा. तुमची हकीगत फारच अद्भुत असल्यामुळें ती सांगावयास तुम्हीच पाहिजे.' मग 'तुम्हां सर्वांच्या इच्छेबाहेर मी नाहीं.' असें उत्तर मीं केल्यावरून, त्या लोकांनीं एक घोडा आणविला व त्यावर मला बसवून, कितीएक वाट दाखविण्याकरितां मजबरोबर चालले व जे कितीएक विशेष बळकट होते ते, तो तारवा व त्यावरचें सामान डोईवर घेऊन मागून येत होते.

ज्या बेटांत हल्लीं मी आलों होतों, त्याचें नांव सेरेंदिब. या बेटांतल्या मुख्य राजधानींत आम्ही पोंचल्यावर माझ्याबरोबरच्या मनुष्यांनीं मला राजवाड्यांत नेलें. दरबारांत राजा मोठ्या उंच सिंहासनावर बसला होता. त्यास पाहातांच त्या देशांतल्या रिवाजाप्रमाणें मीं त्यास साष्टांग नमस्कार केला. राजानें मला उठावयास सांगून व माझा मोठा सत्कार करून मेहेरबानीनें मला आपल्या शेजारीं बसविलें. मग 'तुमचें नांव काय?' म्हणून त्यानें प्रश्न केला असतां, मीं उत्तर केलें कीं, 'महाराज, आपल्या सेवकास सिंदबाद असें म्हणतात. आपल्या दासानें कितीएक सफरी केल्या आहेत व पुष्कळ मुलूख पाहिले आहेत. मी मूळचा बगदाद शहरचा राहणारा.' राजानें विचारलें कीं, 'तुम्ही या देशांत कोठून व कसें आलां?'

मीं कांहींएक न गाळतां, आपलें इत्थंभूत वर्तमान त्यास निवेदन केलें. ही माझी गोष्ट त्यास इतकी आवडली कीं, त्यानें प्रधानास हुकूम केला कीं, 'ती सोनेरी अक्षरांनीं लिहून आपल्या दप्तरांत ठेवावी.' नंतर माझा तारवा आणवून त्यावरचे गठ्ठे सोडविले;

त्यांतले अंबर वगैरे सुगंधि पदार्थ राजास फार आवडले; परंतु मजजवळचीं माणकें व पांचेचे खडे पाहून तर तो फारच खुष झाला; कारण, तशीं सुंदर रत्नें त्याच्या स्वतःच्या जामदारखान्यांतसुद्धां नव्हतीं.

राजास तीं रत्नें पाहून आनंद झालासें पाहून, मी नमस्कार घालून, मोठ्या आदबीनें विनंति केली कीं, 'हा बंदा व याचा हा यत्किंचित् विषय सरकारचा आहे; तर सरकारांनीं मेहेरबानी करून यांपैकीं कांहीं जिनसांचा स्वीकार केल्यास हा चाकर आपणास मोठा धन्य मानील.' राजानें हंसून उत्तर केलें कीं, 'तुमच्या वस्तूंपैकीं कांहींएक घेण्याची आम्हांस इच्छा नाहीं; कारण, ईश्वरानें ह्या वस्तु तुम्हांस दिल्या आहेत, त्या तुम्हापासून घेणें बरोबर नाहीं. तर तुमचें कांहींएक न घेतां, आम्हीच तुम्हांस काय देऊं इच्छीत आहों व तुम्ही या देशांतून परत जाल, तेव्हां आमच्या औदार्याचीं दर्शक कांहीं चिन्हें तुम्हांपाशीं असावीं, असें आमच्या मनांत आहे.' तें त्याचें भाषण ऐकून मी थक्क झालों; आणि म्हटलें कीं, 'आपलें औदार्य अद्भुत आहे; ईश्वर आपलें सदोदित कल्याण करो.'

त्यानें एका दिवाणास हुकूम केला कीं, 'सिंदबाद याची चांगली बरदास्त ठेवावी.' त्या हुकुमाप्रमाणें त्या मुलखांत होतों तोंपर्यंत माझा मोठा इतमाम असे व त्या सर्वांचा खर्च राजाकडून असे. मी नित्य मुजरा करण्याकरितां दरबारांत जात असे. तसेंच त्या शहरांत व आसपास पाहण्यासारखें जें जें होतें, तें सर्व मीं पाहिलें.

हें सेरंदिब द्वीप बरोबर मध्यवृत्तावर असल्यामुळें, त्या स्थलीं रात्री व दिवस सर्वकाळ सारखे असतात. या बेटाची लांबी व रुंदी हीं सारखींच आहेत. राजधानीचें शहर आहे; त्याच्या भोंवतालचा मुलूख फारच रमणीय आहे. या शहरापासून कांहीं अंतरावर एक पर्वत आहे. तो इतका उंच आहे कीं, तो समुद्रांतून तीन दिवसांच्या वाटेवरून दिसतो. पृथ्वीवर असा उंच दुसरा पर्वत नाहीं. माणकें, पाच, वगैरे रत्नांच्या खाणी या पर्वतावर पुष्कळ आहेत. दुर्मिळ व

उंची अशा वनस्पति व झाडें या बेटांत पुष्कळ निपजतात. तसेंच या बेटाच्या किनाऱ्यास नद्यांच्या मुखांत उत्तम प्रकारचीं मोत्यें पुष्कळ सांपडतात. तेथें हिऱ्याच्याही खाणी पुष्कळ आहेत. या बेटांतला जो उंच पर्वत इतक्यांत सांगितला; त्यावर एक प्राचीन पवित्र स्थान आहे, त्याची यात्रा करावयास मी गेलों होतों.

त्या यात्रेहून आल्यावर, मीं स्वदेशीं परत जाण्याविषयीं राजापाशीं परवानगी मागितली. ती देतांना त्यानें माझा मोठा गौरव केला. मी नको नको म्हणत असतां, त्यानें मला मोठा उंची पोषाख दिला; व दुसरें पुष्कळ वक्षीस दिलें. निघावयाचे पूर्वीं त्याचा निरोप घ्यावयास गेलों, त्या वेळेस पराकाष्ठेचे उंची नजराणे व एक पत्र मजपाशीं देऊन त्यानें मला सांगितलें कीं, ‘ सिंदबाद, हा नजराणा व हें पत्र तुम्ही कालीफ हरून अलरशीद यांस देऊन त्यांस असें सांगावें कीं, आम्ही त्यांविषयीं बहुत मित्रभाव मनांत वागवितों. ’ नजराणा व पत्र मोठ्या आदरानें घेऊन मीं उत्तर केलें, ‘ ज्याअर्थीं सरकारांनीं कामगिरी सांगून दासाचा बहुमान केला आहे, त्याअर्थीं ती कामगिरी मी लक्ष लावून हुकुमाप्रमाणें बजावीन. ’ नंतर ज्याच्या गलबतांत मी जात होतों त्या नाखुद्यास, व माझ्याबरोबर जे सावकार निघाले होते त्या सावकारांस बोलावून आणून राजानें ताकीद केली कीं, ‘ या गृहस्थाचा वाटेनें चांगला बोज ठेवा व यांस जपून स्वदेशीं पोहोंचवा. ’

सेरेंदिब बेटाच्या राजाचें पत्र एका प्रकारच्या जनावराच्या कमावलेल्या कातड्यावर लिहिलें होतें. हें कातडें फार दुर्मिळ व फार किंमतीचें असतें. त्याचा रंग कांहींसा पिंवळा होता, व वरच्या शाईचा रंग अस्मानी होता. तें पत्र त्या देशच्या लिपीनें लिहिलें होतें; व त्यांतील मजकूर येणेंप्रमाणें होता:—

“जो घराबाहेर निघाला असतां, हजार हत्ती ज्यापुढें चालतात,
“ ज्याच्या मंदिराचें छत लक्ष माणिकांच्या प्रभेनें लखलखत

" असतें, व ज्याच्या जामदारखान्यांत हिरेजडित वीस हजार
" मुकुट आहेत, असा जो सेरेंदिब वगैरे द्वीपाचा राजा,
" त्याजकडून

" हरुन् अल्‌रशीद् कालिफ् यांसः—

" हल्लीं आम्हीं आपणांस जो नजराणा पाठविला आहे, तो फार
" मोलाचा नाहीं,तथापि हा आपल्या भावाकडून आल्याप्रमाणें समजून
" आम्हीं आपल्याविषयीं जो स्नेहभाव बाळगतों तो मनांत आणून,
" याचा स्वीकार करावा. हा मनांतला स्नेहभाव दाखविण्याचा
" हा प्रसंग आज आला हें फार चांगलें झालें. आम्हांविषयीं कांहीं
" स्नेहभाव आपल्या मनांत असावा, इतकेंच मागणें आहे. बहुत काय
" लिहिणें हें सलाम. "

या पत्राबरोबर नजराणा दिला होता त्यांतही अमोलिक पदार्थ होते. प्रथम सबंद एका माणकाचा कोरून केलेला एक प्याला होता; त्याची उंची सुमारें पाऊण वीत होती व प्याला करवंदासारख्या मोठ्या व पाणीदार मोत्यांनीं भरला होता. तसेंच एक प्रकारच्या सापाची कांत होती; जिच्या अंगीं हा अद्भुत गुण असे कीं, ती बिछान्याखालीं असतां वर निजणाऱ्यास कोणत्याही रोगाची बाधा कधीं व्हावयाची नाहीं. तसेंच अंबर व दुसरे कितीएक सुवासिक पदार्थ होते.

आमचें गलबत कितीएक महिन्यांनीं बसोरा बंदरीं सुखरूप येऊन पोंचलें. नंतर तेथून मी बगदाद नगरास आलों. मी ह्या शहरांत पोंचतांक्षणींच पहिल्यानें सेरेंदिब द्वीपच्या राजाचें पत्र व नजराणा घेऊन राजवाड्यांत जाऊन, तेथें आधिकारी होते त्याच्या द्वारें, आपलें येण्याचें कारण सरकारच्या कानांवर घातलें. नंतर लौकरच परवानगी येऊन राजदूतांनीं नेऊन मला कालिफापुढें कचेरींत उभें केलें. नंतर मीं साष्टांग नमस्कार घालून व आपले येण्याचें प्रयोजन थोडक्यांतच कळवून नजराणा व पत्र पातशाहापुढें ठेविलें. तें पत्र वाचून पाहिल्यावर पातशाहानें मला विचारलें कीं,

' सेरेंदिब द्वीपाचा राजा पत्रांत लिहिल्याप्रमाणें खरोखरीच बलाढ्य व ऐश्वर्यवान् आहे काय ? ' दुसऱ्यानें साष्टांग नमस्कार करून मीं मोठ्या आदबीनें उत्तर केलें–' हे राजाधिराज, हे सद्धर्मरक्षक, पत्रांत लिहिल्याप्रमाणें त्या राजाचें ऐश्वर्य व पराक्रम आहे, त्यांत अतिशयोक्ति अगदीं नाहीं, मीं तीं स्वतः डोळ्यांनीं पाहिलीं आहेत. त्या राजाच्या मंदिरांत जी शोभा आहे व तेथें जी दौलत आहे, ती वर्णवत नाहीं. या राजाची स्वारी वाड्याबाहेर निघते, त्या वेळीं हत्तीवर सोन्याच्या अंबारींत राजा बसतो. त्याच्या दोन्ही बाजूंस त्याचे प्रधान, आश्रित व इतर दरबारचे लोक ओळीनें चालतात. राजा ज्या हत्तीवर बसला असतो त्याच हत्तीवर पुढल्या अंगास सोन्याची काठी हातीं घेऊन एक अधिकारी असतो; व त्याच्या मागल्या बाजूस दुसरा एक अधिकारी उभा असतो; त्याच्याही हातांत एक सोन्याची जाड काठी असते व तिच्या मुठीस सुमारें एक वीत उंच व दोन बोटें जाड एवढी एक पाच बसविलेली आहे. राजाच्या हत्तीमागून उत्तम प्रकारें शृंगार केलेल्या दुसऱ्या हत्तींवर बसून एक हजार शूर शिपाई त्याच्या शरीररक्षणार्थ चालतात. ह्या लोकांच्या अंगावरचे पोषाख रेशमी व सोनेरी कलाबतू यांचे असतात. स्वारी चालत असतां, अंबारीच्या पुढील चोपदार ललकारतो कीं, ' महापराक्रमी व प्रतापी हा सेरेंदिब वगैरे द्वीपांचा पातशाह चालत आहे; ज्याच्या मंदिराच्या छतास एक लक्ष माणकें झळकत आहेत व ज्यापाशीं वीस हजार हिऱ्यांचे मुकुट आहेत; पूर्वीं जे महाविख्यात राजे होऊन गेले, त्यांहीपेक्षां हा राजा मोठा आहे. '

इतक्यांत मागल्या बाजूचा चोपदार ललकारतो कीं, ' इतका मोठा जरी हा राजा आहे, तथापि ह्यास एक दिवशीं मरणें अवश्य आहे. ' त्यावर पहिला चोपदार उत्तर देतो कीं, ' असें आहे तर, ज्यास कदापि मरण नाहीं, जो सतत वांचतो, त्याचा जयजयकार असो ! '

हा राजा इतका न्यायानें वागतो कीं, त्याच्या राज्यांत न्याया-

धीश मुळींच नाहींत; कारण त्याच्या प्रजेस त्याची गरजच नाहीं. ते लोक न्याय कोणता, व अन्याय कोणता, हें पुरतेपणें समजतात व त्याप्रमाणें वागतात. ज्याचा जो धर्म, त्यापासून तो कधीं ढळतच नाहीं. तेव्हां असल्या लोकांत न्यायाधीशांचें व फौजदारांचें काय प्रयोजन आहे ? जेथें रोगच नाहीं, तेथें वैद्य व औषधें व्यर्थ आहेत!

माझें भाषण ऐकून कालिफाला समाधान झालें आणि तो म्हणाला कीं, ' त्या राजाचें शहाणपण त्याच्या पत्रांतच उघड दिसत आहे. सिंदबाद, तूं जें सांगितलेंस त्यावरून हें स्पष्ट दिसतें कीं, तो सुज्ञ राजा व त्याची सुज्ञ प्रजा हीं परस्परांस अनुरूपच आहेत. ' असें बोलून मला कालिफानें निरोप दिला; व जातांना मला मोठें बक्षीस दिलें.

याप्रमाणें सिंदबाद ह्यानें गोष्ट समाप्त केल्यावर, सर्व मंडळी घरोघर गेली. त्या दिवशींही हिंदबाद यास शंभर रुपयांची थैली मिळाली. आमंत्रणाप्रमाणें दुसऱ्या दिवशीं मंडळी जमून जेवण-खाण झाल्यावर सिंदबाद यानें आपल्या सातव्या सफरीची गोष्ट सांगावयास उपक्रम केला. तो म्हणाला:—

## सिंदबाद याची सातवी व शेवटची सफर.

सहाव्या सफरीहून परत आल्यावर मी पुनः जलपर्यटनास जाण्याचा विचार अगदीं सोडून दिला. या वेळेस श्रम व हाल काढण्यासारखें माझें वयही राहिलें नव्हतें; आणि मी शपथ वाहून घेतली कीं, ' इतःपर संकटांत व धोक्यांत आपला जीव घालाव-याचा नाहीं; तर आयुष्यमर्यादेचा जो काळ राहिला असेल, तो सर्व स्वस्थ बसून सुखांत घालवावयाचा. '

एक दिवस मी इष्टमित्रांच्या मंडळींत आनंदांत बसलों असतां, चाकरानें येऊन कळविलें कीं ' कालिफाचा कोणी अधिकारी आपल्या भेटीस आला आहे. ' मग मी तत्काळ उठून त्या अधिकाऱ्याची भेट घेतली. त्यानें सांगितलें कीं, ' पातशहांनीं तुम्हांस लौकर

बोलाविलें आहे.' नंतर तत्काळ मी राजवाड्यांत जाऊन पातशाहास नमस्कार करून त्यापुढें हात जोडून उभा राहिलों. कालिफ म्हणाला, 'सिंदबाद, तुला बोलावण्याचें प्रयोजन असें कीं, तुला कांहीं काम सांगावयाचें आहे, तें तूं अवश्य केलें पाहिजे. सेरें-दिब द्वीपाच्या राजास एक पत्र व कांहीं नजराणा पाठविणें आहे, तर तो घेऊन तुला गेलें पाहिजे. त्या राजानें आपणास जसा मित्रभाव दाखविला, त्याप्रमाणें त्यास मलाही मित्रभाव दाखविणें अवश्य आहे.'

कालिफाची ही आज्ञा ऐकून माझ्या पोटांत धसका बसला. मग मोठ्या विनयानें मीं उत्तर केलें, 'हे सद्धर्मपालक, हे राजाधिराज, सरकार खूष होऊन जो मला हुकूम करितील, तो बजाविण्याविषयीं हा दास सिद्ध आहे; तथापि याची एक विनंति आहे, तिकडे सरकारांनीं लक्ष द्यावें. ती ही कीं, आजपर्यंत सफरी करून करून जे पराकाष्ठेचे हाल झाले व जीं दुःखें सोसावीं लागलीं त्यामुळें हा दास अगदीं जर्जर झाला आहे. महाराज, हें आपलें बगदाद शहर न सोडण्याविषयीं मी शपथसुद्धां घेतली आहे.' या प्रसंगीं मी आपल्या सर्व सफरीची सविस्तर हकीकत पातशाहास सांगितली. ती मेहेरबानीनें ऐकून घेऊन तो म्हणाला, 'तुझ्यावर जे प्रसंग गुदरले ते अत्यंत अद्भुत आहेत खरें, तथापि त्या सबबीनें मजकरतां आणखी एक वेळ जलपर्यटण करण्यास नाहीं म्हणूं नको. सेरेंदिब द्वीपापर्यंत मात्र जाऊन येण्यास मी तुला सांगत आहे. या प्रसंगीं तुला अवश्य गेलें पाहिजे. पहा तूं सुज्ञ आहेस. तुला कळतच असेल कीं, त्या राजानें मला जो नजराणा पाठविला, त्याचा तो परत न केल्यास, त्यांत माझ्या चालीरीतीस व थोर-पणास किती बट्टा लागणार आहे तो!'

असा कालिफाचा आग्रह पाहून मीं मनांत विचार केला कीं, नाहीं म्हणून उपाय नाहीं. मग मी म्हणालों कीं, 'मी जावें अशी सरकारची इच्छा असल्यास, मी हुकुमास हजर आहे.' हें माझें

भाषण ऐकून कालिफ खुष झाला. नंतर त्यानें जाण्याच्या खर्चा-करतां मला हजार मोहरा देण्याचा हुकूम केला.

पुढें थोड्याच दिवसांत मी जाण्याची तयारी केली. मग कालिफाकडील पत्र व नजराणा हातीं पडतांच मी निघालों, तों बसोरा बंदरास येऊन, तेथें गलबतांत बसून पुढें चालता झालों. वाटेनें कांहींएक विघ्न न येतां, आम्ही मोठ्या आनंदानें लौकरच सेरेंदिब द्वीपास जाऊन पोहोंचलों. तेथें राजधानींत गेल्यावर दिवा-णाच्या कानावर आपला मजकूर घालून राजाची भेट घेण्याचें त्यास सांगितलें असतां त्यानें लौकरच परवानगी आणली. मी राज-वाड्यांत गेलों असतां, राजा तत्काळ मला ओळखून म्हणाला कीं, 'सिंदबाद, तूं खुशाल आहेस ना ? तूं गेल्यापासून तुझी आम्हांस पुष्कळ वेळ आठवण होत असे.' या मेहेरबानीबद्दल राजाचा मोठा उपकार मानून त्या प्रसंगास योग्य अशी त्याची मीं स्तुति केली. नंतर कालिफाचें पत्र त्याचे हातीं मोठ्या आदबीनें देऊन नजराणा पुढें ठेविला. तो राजानें मोठ्या संतोषानें स्वीकारला.

कालिफानें जो नजराणा पाठविला होता, त्यांत भरजरीच्या कापडाचा एक बिछाना होता; त्याची किंमत सुमारें एक हजार मोहरा असेल. तसेंच फार उंची कापडाचे पन्नास पोषाक होते व फारच बारीक पांढऱ्या मलमलीचे शंभर पोषाख होते; तसेंच एका प्रकारच्या रत्नाचें एक पात्र होतें; त्याची रुंदी खोलीपेक्षां अधिक असून, त्याच्या बाजूवर चित्र कोरलें होतें, तें असें कीं, एक मनुष्य ढोंपरावर उभा राहून, हातीं धनुष्यबाण घेऊन, एका सिंहावर निशाण मारीत आहे. याखेरीज वर पुष्कळ नक्षीदार काम केलेला असा एक चौरंग होता; त्याविषयीं अशी दंतकथा होती कीं, तो पूर्वी सुलिमान म्हणून मोठा विख्यात पैगंबर राजा होऊन गेला, त्याच्या दौलतींतला होता. पत्र जें होतें, तें कालिफाचें स्वदस्तुरचें होतें; त्यांतील मजकूर येणेंप्रमाणें होता:—

" ईश्वराच्या प्रसादानें कीर्तिमान् पूर्वजांच्या गादीवर
" बसणार अब्दला हरुन् अल्रशीद हा, सेरेंदिब द्वीपाच्या
" पराक्रमी व धन्य पातशाहाचें, सन्मार्गदर्शक जो परमेश्वर
" त्यापाशीं कल्याण इच्छितों.

" तुम्हीं पाठविलेलें पत्र पावलें. मोठा आनंद झाला. बुद्धिमान् व सुज्ञ
" पुरुषांचें केवळ आगर, असें जो आमचा दरबार, त्याच्या विचारानें हें
" प्रत्युत्तर आपणांस पाठविलें आहे. त्याचें अवलोकन केलें असतां आपणा-
" विषयीं आमच्या मनांत किती स्नेहभाव आहे हें आपल्या ध्यानांत
" येईल. कळावें, हे सलाम.

काालिफ आपणाविषयीं मित्रभावना मनांत वागवतो हें पाहून सेरेंदिब द्वीपाच्या राजास मोठा संतोष वाटला. ही भेट झाल्यावर लौकरच पुनः राजाच्या भेटीस गेलों, आणि स्वदेशीं परत जाण्याविषयीं परवानगी मागितली. ती तो प्रथम देईना. परंतु माझा फार आग्रह पाहून त्यानें ती दिली. निघावयाच्या वेळीं त्या राजानें मोठा गौरव करून मला पुष्कळ देणगी दिली. नंतर मी तत्काळ जहाजावर बसून मोठ्या त्वरेनें स्वदेशीं यावयास निघालों. परंतु ईश्वरेच्छा दुसऱ्या प्रकारची असल्यामुळें स्वदेशीं माझें लौकर येणें घडलें नाहीं.

सेरेंदिब द्वीप सोडून सुमारें चारपांच दिवस झाल्यावर एक दिवस चाच्यांनीं आम्हांस गांठलें. आम्हांपाशीं लढाईचें सामान कांहींच नसल्यामुळें, त्या चोरांनीं तत्काळ आमचें गलबत घेतलें. गलबतावरील ज्या लोकांनीं त्यांशीं दांडगाई केली, ते उगीच प्राणास मुकले. मी व दुसरे कितीएक लोकांनीं असा विचार केला कीं, या प्रसंगीं दांडगाई करून उपयोग नाहीं; आपण निमुटपणें चाच्यांच्या स्वाधीन व्हावें; आणि आम्हीं तसें केलें. चाच्यांनीं आमच्या गलबतावरचा सर्व माल आपल्या हस्तगत करून घेतला; व आमचीं चांगलीं वस्त्रें सोडून घेऊन, आम्हांस मळकीं व फाटकीं वस्त्रें दिलीं; आणि आम्हांस त्यांनीं आपले गुलाम केलें; नंतर पुष्कळ दिवसांनीं एका बेटांत उतरून, तेथें त्यांनीं आम्हांस विकलें.

मला एका श्रीमंत सावकारानें विकत घेतलें. माझ्या धन्यानें मला घरीं नेऊन पोटभर जेवूं घातलें; व गुलामाच्या चालीचा एक पोषाक घालावयास दिला. कांहीं दिवस लोटल्यावर माझ्या धन्यानें मला विचारलें कीं, 'तुला कांहीं धंदा किंवा कसब येतें कीं नाहीं?' मी त्यास उत्तर केलें कीं, 'मी मूळचा कारागीर नाहीं; मी व्यापारी आहें. आमचें गलबत लुटून चांच्यांनीं मला दास करून तुम्हांस विकलें व मजपाशीं जें कांहीं द्रव्य होतें, तें सर्व हिरावून घेतलें.' माझा धनी म्हणाला, 'बरें असो. पण तुला हातांत कामटा घेऊन तीर मारण्याचा अभ्यास आहे कीं नाहीं?' मीं उत्तर केलें कीं, 'मी लहानपणीं मौजेकरितां तीर मारावयास शिकलों होतों, ती कला अद्याप मला थोडीबहुत अवगत आहे.' नंतर त्यानें मला एक धनुष्य व कांहीं तीर देऊन आपल्यामागें हत्तीवर बसवून एका मोठ्या रानांत नेलें. त्या रानांत आंत बरेंच गेल्यावर, त्यानें एका ठिकाणीं हत्ती उभा करून मला खालीं उतरविलें; आणि तेथें जवळच एक मोठा वृक्ष होता, त्याकडे बोट दाखवून मला सांगितलें कीं, 'या झाडावर चढून उंच बैस व या रानांत हत्ती पुष्कळ आहेत, त्यांपैकीं या झाडाखालून जे जातील, त्यांवर तीर मार; आणि एकादा हत्ती तुझ्या बाणांनीं मेल्यास मला शहरांत येऊन कळव.' असें सांगून व मजपाशीं कांहीं अन्नपाणी देऊन, माझा धनी परत गेला. मी त्या दिवशीं सगळी रात्र हत्ती येतील म्हणून मार्गप्रतीक्षा करण्यांत काढली.

त्या दिवशीं रात्रीं तर एक देखील हत्ती दृष्टीस पडला नाहीं. पण दुसऱ्या दिवशीं पहांट होतांच एक मोठा हत्तींचा कळप माझ्या दृष्टीस पडला. मग मोठ्या जोरानें मीं त्यावर पुष्कळ बाण फेंकले असतां, एक हत्ती मर्मी बाण लागून मरून पडला व इतर सर्व तत्काळ पळून गेले. नंतर मी खालीं उतरून शहरांत गेलों, आणि धन्यास ती गोष्ट कळविली. त्या बातमीनें खुष होऊन त्यानें त्या दिवशीं गोड पक्कान्नें मला खाऊं घातलीं व मला मोठी शाबासकी

दिली. नंतर तो व मी दोघेजण रानांत जाऊन मोठी खळी खणून, तींत तें हत्तीचें मढें गाडलें. असें करण्याचा माझ्या धन्याचा मतलब हाच होता कीं, कांहीं दिवसांनीं तें मढें कुजून गेलें म्हणजे, त्या हत्तीचे दांत व हाडें मिळावीं.

दोन महिने हा धंदा मीं केला. या दोन महिन्यांत एकादा तरी हत्ती मारल्यावांचून मीं एकसुद्धां दिवस फुकट जाऊं दिला नाहीं. मी दररोज एकाच झाडावर बसत नसे. कधीं या झाडावर, कधीं त्या झाडावर, असा चालुनपाळून बसत असे. एक दिवस मी एका मोठया वृक्षावर हत्तीकरतां टपत बसलों असतां, हत्तींची खूप मोठी एक टोळी आली व ते त्या दिवशीं नेहमींप्रमाणें वाटेनें न जातां, मोठा भयंकर शब्द करीत, मी ज्या झाडावर होतों तिकडे येऊं लागले. त्या दिवशीं त्यांचा थवा एवढा मोठा आला होता कीं, तें सर्व रान हत्तींनीं भरून गेलें व त्यांच्या चालण्यानें जमीन हादरत आहे असें वाटूं लागलें. मग मी होतों त्या झाडाखालीं येऊन सर्वांनीं मजकडे एकसारखी टक लावून, कितीएकांनीं त्या झाडाच्या बुंधास आपल्या सोंडांचे विळखे घातले आणि ते तें झाड हालवूं लागले. हा चमत्कार पाहून मी भयानें वेडा झालों, व माझ्या हातांतला तीरकामटा गळून खालीं पडला.

इतक्यांत सगळ्या कळपांत मुख्य व मोठा जो हत्ती होता, त्यानें आपल्या सोंडेचा विळखा घालून, झाडाच्या बुंधाला असा हिसका दिला कीं, त्या हिसक्याबरोबर तें झाड मुळासकट उपटून जमिनी-वर पडलें व त्याबरोबर मीही पडलों. मग त्या थोरल्या हत्तीनें मला यत्किंचित् इजा न करतां सोंडेनें अलग उचलून आपल्या खांद्यावर ठेवलें. त्या ठिकाणीं मी भीतीनें मृतप्राय होऊन बसलों. नंतर तो थोरला हत्ती पुढें व सर्व कळप त्याच्या मागून, ह्याप्रमाणें ते सर्व हत्ती दूर जाऊन, एके ठिकाणीं त्या हत्तीनें सोंडेनें मला आपल्या खांद्यावरून उचलून जमिनीवर ठेवलें, आणि तो सर्व कळप निघून गेला. मित्रहो, या वेळीं माझ्या मनाची काय स्थिति

झाली असेल हें तुम्हीच मनांत आणा! मला वाटलें कीं, मी स्वप्न पहात आहे. मग कांहीं वेळ लोटल्यावर हत्ती पार निघून गेले असें पाहून मी बसल्या ठिकाणाहून उठून इकडेतिकडे फिरून पाहूं लागलों तों सहज दृष्टीस पडलें कीं, आपण एका टेंकडीवर आहों. त्या टेंकडीवर जिकडेतिकडे हत्तींच्या हाडांचा व दातांचा खच पडला होता. हें पाहून मला हत्तींच्या शहाणपणाविषयीं फारच चमत्कार वाटला. त्यांस पक्कें समजलें होतें कीं, हा जो आपणांस मारतो, तो केवळ आपल्या हाडांकरितां व दांतांकरितां मारतो; तर हाडें व दांत त्यास मिळाल्यास आपणास तो मारणार नाहीं, असें मनांत आणून मेलेले हत्ती टाकण्याच्या या जागीं त्यांनीं मला आणून सोडलें; व हा त्यांचा अभिप्राय मी स्पष्ट समजलों. असो. मग त्या टेंकडीवर फार वेळ न राहतां मी शहराकडे चालता झालों. मला शहरांत येऊन पोहोंचावयास सगळा दिवस व एक रात्र लागली. वाटेनें एकसुद्धां हत्ती आढळला नाहीं, त्यावरून मला असें वाटलें कीं, वाटेनें ते दृष्टीस पडल्यास मला भय वाटेल, तें न वाटावें म्हणून त्या दिवशीं ते फार दूरच्या रानांत गेले असावे.

माझा धनी मला पाहून मोठ्या ममतेनें म्हणाला, 'कोण? सिंदबाद का? सुखरूप आहेस ना? तुला परत येण्यास उशीर लागल्यामुळें तुझ्याबद्दल मला फार घोर लागला होता. तुझ्या शोधाकरितां काल मी स्वतः रानांत गेलों होतों. तेथें नवीनच उपटून पडलेला वृक्ष पाहून व त्याखालीं पडलेला तुझा तीरकामटा पाहून तर माझ्या पोटांत मोटा धसका बसला. मी तुझा इकडे-तिकडे खूप शोध केला, परंतु तूं सांपडला नाहींस, त्यावरून मला वाटलें कीं, तूं पुनः इहलोकीं दृष्टीस पडत नाहींस! तर गड्या, तुझ्यावर कोणतें संकट आलें होतें व त्यांतून तूं कसा पार पडलास, हें मला सविस्तर सांग.' मग मी रानांत घडलेला सर्व वृत्तांत पहिल्यापासून शेवटपर्यंत त्यास सांगितला. नंतर दुसऱ्या दिवशीं त्यास रानांत घेऊन जाऊन ती हस्तिदंताची टेंकडी त्यास दाखवून, मी

सांगितलेला मजकूर खरा अशी त्याची खात्री केली. ते हस्तिदंत पाहून त्यास पराकाष्ठेचा आनंद झाला. नंतर आम्ही ज्या हत्तीवर बसून रानांत गेलों होतों, त्यावर जातील तितके हस्तिदंत लादून घरीं घेऊन आलों. घरीं आल्यावर माझा धनी म्हणाला, 'सिंदबाद, हस्तिदंताची एवढी खाण तूं मला दाखविलीस. इतःपर तुला गुलाम लेखणें मला योग्य नाहीं, तर येथून पुढें तूं मला भावामारखा झालास. ईश्वर तुला सुखी राखून अनेक प्रकारें तुझें कल्याण करो. मी तुला आजपासून दासपणापासून मुक्त केलें. आजपर्यंत तुजपासून मीं एक गोष्ट छपविली होती ती आतां तुला सांगतों ऐक. या नगरांत राहणारे आम्ही सावकार लोक नेहमीं आपल्या गुलामांस हत्ती मारावयास रानांत पाठवतों आणि दरवर्षी हजारों गुलामांस हत्ती ठार मारतात.आम्ही त्या गुलामांस आपला बचाव करण्याच्या नानाप्रकारच्या युक्त्या सांगतों; परंतु या रानांतले हत्ती फार धूर्त आहेत; ते कधीं ना कधीं त्यांचा जीव घेतल्यावांचून सोडीत नाहींत; ईश्वराची पूर्ण कृपा तुझ्यावर आहे, म्हणूनच तूं त्या हत्तींच्या तडाक्यांतून जिवंत सुटलास. यावरून मला स्पष्ट दिसतें कीं, देवाच्या मनांत तुझ्याहातून कांहीं मोठें कृत्य करावयाचें आहे. असो. तूं माझें फार मोठें कल्याण केलेंस. आजपर्यंत गुलामांचे जीव धोक्यांत घातल्याशिवाय आम्हांस हस्तिदंत मिळत नसत. आतां ते मिळूं लागल्यानें आमचें हें सर्व शहर मोठें गबर होईल. मी तुला दासपणांतून मुक्त केलें येवढ्यानें मी तुझ्या उपकारांतून मुक्त झालों, असें समजूं नको. माझ्या मनांत तुला याखेरीज पुष्कळ बक्षीस द्यावयाचें आहे. मीं जर गोष्ट काढली तर या नगरांतील सर्व सावकार लोक वर्गणी करून तुला श्रीमंत करतील; पण मी तसें करूं इच्छित नाहीं. मी एकट्यानें तुला श्रीमंत करावें असा माझा बेत आहे.'

याप्रमाणें त्याचें उदारपणाचें व कृपेचें भाषण ऐकून मीं उत्तर केलें, ' महाराज, ईश्वर तुम्हांस सर्वदा सुखी राखो. आपण मला

दास्यापासून मुक्त केलें, तेवढ्यानेंच माझा आपणांवर कांहीं यत्किंचित् उपकार झाला असला, तर तो सर्व फिटून गेला, व यापुढें माझें आपणांशीं व या नगरच्या लोकापाशीं इतकेंच मागणें आहे कीं, आपण कृपा करून स्वदेशीं जाण्याची मला परवानगी द्यावी.' माझ्या धन्यानें उत्तर केलें, 'बरें आहे. आतां लवकरच हस्तिदंत भरावयास देशोदेशचीं जहाजें या बंदरीं येतील; तीं आलीं म्हणजे तुझी स्वदेशीं रवानगी करून देईन.' हें भाषण ऐकून मीं त्याचा मोठा उपकार मानला. गलबतें त्या बंदरीं येण्यास कांहीं महिन्यांचा अवकाश होता. त्या काळांत आम्ही हस्तिदंतांच्या टेंकडीच्या कितीएक खेपा करून माझ्या धन्याचीं कोठारें हस्तिदंतांनीं भरून टाकलीं व त्या टेंकडीची बातमी दुसऱ्या पुष्कळ लोकांस समजल्यावरून त्यांनींही तेथून पुष्कळ हस्तिदंत आणिला.

लवकरच पुढें कांहीं दिवसांनीं देशावरचीं जहाजें आलीं. मग माझ्या धन्यानें एक जहाज भाड्यानें ठरवून त्यावर हस्तिदंत भरला. त्यांपैकीं निम्मा हस्तिदंत त्यानें मला बक्षीस दिला होता व गलबतावर खाण्यापिण्याच्या जिनसांची चांगली बेगमी केली होती. तसेंच मी नको नको म्हणत असतां त्या देशांतील अपूर्व अपूर्व व बहुमोल अशा पुष्कळ जिनसा त्यानें मला दिल्या. मग त्याचे मोठे उपकार मानून मी गलबतावर चढलों.

जलमार्गानें चाललों असतां पुष्कळ बेटें लागलीं; त्यांपैकीं कितीएकांत आम्हीं गोडें पाणी व शिधासामुग्री घेण्याकरितां उतरलों होतों. कांहीं दिवसांनीं आम्ही हिंदुस्थानास पोहोंचलों. नंतर तेथून इराणांत जावयास जो समुद्र लागतो, त्यांत चांचे व वादळें यांचें फार भय असल्यामुळें खुष्कीच्या वाटेनें जावयाचा निश्चय केला. मग मजपाशीं जो हस्तिदंत होता तो विकला; त्याचा मला पुष्कळ पैसा आला. त्या पैशाचे नानातऱ्हेचे अपूर्व व उंची उंची पदार्थ खरेदी करून, एक व्यापारी लोकांचा तांडा इराणांत जावयास निघाला होता, त्यांच्या सोबतीनें चाललों. या वाटेनें आम्हांस

पुष्कळ दिवस लागले व हाल व कष्टही पुष्कळ झाले. परंतु चांचे, तुफानें व भयंकर मोठाले सर्प, इत्यादिकांचा उपद्रव न होतां, त्याचें सुख मनांत आणून मीं संतोषानें ते सर्व हाल व कष्ट सहन केले.

सरतेशेवटीं मी बगदाद शहरास सुखरूप येऊन पोहोंचलों. नंतर दुसऱ्या दिवशीं लागलींच कालिफाच्या वाड्यांत जाऊन पातशाहाची भेट घेऊन झालेला वृत्तांत सर्व त्यास निवेदन केला. माझें सर्व बोलणें ऐकून घेऊन पातशाह म्हणाला, ' सिंदबाद, तुला परत यावयास फार विलंब लागलेला पाहून मला कांहीं काळजी लागली होती; तथापि माझ्या मनाची खात्री होती कीं, ईश्वर तुला बचावून परिणामीं कल्याण करील. '

मी जेव्हां हत्तींची गोष्ट सांगितली, तेव्हां ती ऐकून तर कालिफास फारच आश्चर्य वाटलें, व माझ्या प्रामाणिकपणाविषयीं त्याची खात्री नसती तर ती त्यास खचीत खोटी वाटली असती. ही गोष्ट व माझ्या दुसऱ्या पुष्कळ गोष्टी त्यास अद्भुत वाटल्यामुळें त्यानें आपल्या चिटणीसास हुकूम केला कीं, ' या सर्व गोष्टी सोन्याचे शाईनें लिहून आपल्या किताबखान्यांत ठेवाव्या. ' मग त्यानें मला मोठे पोषाख व दुसरीं बक्षिसें देऊन घरीं पाठविलें. त्या दिवसापासून पुढें व्यापार करण्याचें अगदीं सोडून आपल्या सोयऱ्याधायऱ्यांत व इष्टमित्रांत राहून मौजेंत व सुखांत काळ घालविण्यास मीं आरंभ केला.

सिंदबादनें याप्रमाणें आपल्या सात सफरींची हकीगत संपवून हिंदबाद यास म्हणाला, ' कां मित्रा, मी जशीं दुःखें भोगिलीं व जसे हाल काढले तशीं दुःखें व तसे हास सोसलेला मनुष्य दुसरा कोणी तुझ्या ऐकण्यांत आला आहे ? पहा, इतकीं जीवावरचीं संकटें ज्यानें सोसलीं, त्यास म्हातारपणीं देखील कांहीं स्वस्थता व सुख नसावें ? ' याप्रमाणें त्याचें भाषण ऐकून हिंदबाद जवळ आला आणि हात जोडून मोठ्या नम्रतेनें त्यास म्हणाला, ' महाराज,

आपण पराकाष्ठेचीं दुःखें भोगिलीं खरीं; त्यापुढें माझीं दुःखें कांहींच नाहींत व तीं होतात तेव्हां त्यांपासून होणाऱ्या लाभाकडे लक्ष देऊन मी मनाचें समाधान करतों. महाराज, म्हातारपणाची स्वस्थता तर काय, पण ईश्वरानें कृपा करून आपणांस जी मोठी संपत्ति दिली आहे, तिला सुद्धां आपण योग्य आहां; कारण आपण तिचा विनियोग यथायोग्य करीत आहां. ईश्वर करो, आणि आपणांस शेवटपर्यंत सुख होवो!'

सिंदबाद यानें त्याही दिवशीं हिंदबाद यास शंभर रुपयांची थैली द्यावयाचा हुकूम केला, व त्यास आपल्या मित्रमंडळींत घेऊन त्यास हमालाचा धंदा सोडावयास सांगितलें; आणि याप्रमाणें त्यानें त्याचें कल्याण केल्यावरून तो व त्याचें कुटुंब सुखी होऊन सिंदबाद यास दुवा देऊं लागलीं.

---

## तीन आंधळ्यांची गोष्ट.

शाहजादी पातशहास म्हणते—महाराज, मी आपणांस कालीफ हरून् अल्रशीद् हा चोरगस्तीस फिरत असतां घडलेली गोष्ट कांहीं दिवसापूर्वी सांगितली. त्याच कालीफाची दुसरी गोष्ट आज सांगतें. कृपा करून लक्ष द्यावें—

या पातशाहानें एके दिवशीं आपला मुख्य वजीर जाफर यास हुकूम केला कीं, 'आज संध्याकाळीं तूं राजवाड्यांत ये, म्हणजे आपण रात्रीं चोरगस्तीस जाऊं; आणि शहरांतील रयत लोक आपल्या अंमलदाराविषयीं काय म्हणतात तें ऐकूं. जर कोणी कामगार प्रजेस पीडा करीत असेल, तर त्यास शिक्षा करूं; व ज्यांस लोक योग्य रीतीनें काम करीत असल्याबद्दल वाखाणतांना आढळतील, त्यांस बक्षिसें देऊन त्यांची योग्यता वाढवूं.' मग संकेताप्रमाणें मुख्य वजीर संध्याकाळीं राजवाड्यांत आल्यावर कालीफ त्यास व जनानखान्यांतला मुख्य अधिकारी मश्रूर यास बरोबर घेऊन,

व कोणी न ओळखावें म्हणून वेष बदलून,चोरवाटेनें राजवाड्यांतून बाहेर पडला. नंतर शहरच्या कित्येक महाल्यांतून फिरल्यावर ते एका लहान गल्लींत शिरले. त्या दिवशीं रात्रीं मजेचें चांदणें पडलें होतें. त्याच्या उजेडानें, कांहीं अंतरावर चालतांना एक उंच म्हातारा मनुष्य त्यांच्या दृष्टीस पडला. त्याला मोठी लांब दाढी होती, व ती पिकून पांढरी झाली होती. त्याच्या डोक्यावर पाटी व खांद्यावर मासे धरण्याचें जाळें होतें, व हातांत लांब काठी होती. त्यांस पाहून कालीफ म्हणाला, ' त्याच्या मुखचर्येवरून तर हा म्हातारा खाऊन पिऊन सुखी असेलसें दिसतें. विचार बरें त्यास,त्याची स्थिति कशी काय आहे ती ? ' त्यावरून वजीर म्हाताऱ्यास म्हणाला, ' का म्हातारेबाबा, कोणकिडे चाललां ? आपण काय करीत असतां ? ' म्हाताऱ्यानें उत्तर दिलें, ' मी मासे धरणारा आहे. मी फार दारिद्री व दुःखी आहें. मी आज दोन प्रहरापासून नदीवर गेलों होतों, तेव्हां-पासून आतांपर्यंत पुष्कळ मेहनत केली; पण महाराज, एकदेखील मासा सांपडला नाहीं. नशीब तर हात धुवून असें पाठीस लागलें आहे, आणि घरीं एक बायको व पांचसहा लहान लहान बच्चीं आहेत, त्यांचें पोट भरावें कसें, अशा मी मोठ्या फिकिरींत पडलों आहे. '

त्याचें तें दीनवाणें भाषण ऐकून पातशहास दया आली, आणि तो त्यास म्हणाला, ' पहा गड्या, पुनः आमच्याबरोबर नदीवर येत असलास तर चल; आणि नदींत जाळें टाकून एक वेळ काढ.आमच्या दैवानें जें कांहीं निघेल तें घेऊन त्याबद्दल आम्ही तुला शंभर मोहरा देऊं. कां, चलतोस ? ' हें पातशाहाचें भाषण ऐकून म्हाताऱ्यास फार हर्ष झाला व त्या दिवशीं त्यांस पुष्कळ श्रम झाले होते तरी ते सर्व विसरून त्यानें पातशाहाचें बोलणें तत्काळ मान्य करून त्या दिवशीं तिघांबरोबर नदीवर जाण्याकरितां तो परत वळला. त्यानें मनांत विचार केला कीं, ' हे मनुष्य थोर व सभ्य दिसतात. हे मला उगीच श्रम देणार नाहींत. हे म्हणतात त्याचा शंभरावा हिस्सा जरी मिळाला तरी मला तें लाखाच्या जागीं आहे. '

मग तैग्रीस नदीच्या तीरीं आल्यावर त्यानें जाळें पाण्यांत टाकून कांहीं वेळानें बाहेर ओढलें, आणि पाहतो तों जाळ्यांत मोठी एक पेटी आली. ती पुष्कळ जड होती. मग पातशाहानें ठरावाप्रमाणें वजिराकडून त्या म्हाताऱ्यास शंभर मोहरा तत्काळ देवविल्या. नंतर तो म्हातारा मोठा संतोष पावून घरीं गेला. इकडे त्या पेटींत काय आहे तें पहाण्याची पातशहास फार उत्कंठा झाली होती. म्हणून ती पेटी मश्रूर याचे खांद्यावर देऊन ते तिघे मोठ्या जलदीनें राजवाड्यांत गेले. मग एका दिवाणखान्यांत ती पेटी फोडली असतां तींतून नारळीच्या पातींच्या चटईंत बांधलेलें गाठोडें निघालें. चटईचीं शेवटें तांबड्या पीळदार दोऱ्यानें शिवून टाकलीं होतीं. सुरीनें सुताचीं टोकें तोडून टाकून चटई काढून पाहतात, तों आंत जुन्या सतरंजीचें वेष्टन होतें. मग तें उघडून पाहतात, तों आंत स्त्रीचा एक मुर्दा दृष्टीस पडला! ती स्त्री फार गोरी व लावण्ययुक्त अशी होती, व तिच्या शरीराचे तुकडे तुकडे केलेले होते. हा भयंकर देखावा पाहून पातशाहास प्रथम मोठें आश्चर्य वाटलें. मग एका क्षणांत तें आश्चर्य नाहींसें होऊन त्यास मोठा क्रोध आला. मग लाल झालेले डोळे वजिरावर वटारून तो त्यास म्हणतो, ‘ अरे दुष्टा अधमा, माझ्या रयतेचा तूं असा बंदोबस्त ठेवतोस, अं? तुझ्या अमलांत लोक निःशंकपणें माझ्या गरीब रयत लोकांचा जीव घेतात. आणि तूं खुशाल घरीं मौजा मारतोस! हें सर्व पाप माझ्या माथीं पडतें. न्यायाच्या दिवशीं हीं मेलीं गेलेलीं माणसें ईश्वरापुढें मजवर दोष आणतील, त्या वेळेस मी काय उत्तर देऊं? तर पाहा, ज्या दुष्टानें या स्त्रीचा खून केला असेल त्याचा शोध लावून शासन करण्यास त्यास लवकर आणलास तर बरें; नाहीं तर मी तुला व तुझ्या घराण्यांतल्या चाळीस माणसांस सुळावर चढवीन, तसें न करीन तर मला परमेश्वराचीच शपथ! ’ वजीर म्हणाला, ‘ महाराज, सरकारांनीं मेहेरबानी करून गरिबास शोध करण्यास फुरसत द्यावी. ’ खलिफानें उत्तर केलें, ‘ बरें आहे. तुला तीन दिवसांची फुरसत

देतों. पहा, शोध लागला तर बरें! नाहीं तर जिवास मुकशील.' वजीर पराकाष्ठेचा खिन्न होऊन घरीं आला. त्यास कांहीं सुचेना. तो आपल्या मनांत विचार करूं लागला कीं, अहो, एवढ्या या अफाट बगदाद शहरांत या खून करणाराचा कसला शोध लागतो? पेटींतला मुर्दा पाहिला, त्यावरून उघड दिसतें कीं, करणारानें हें घोर कृत्य एकांतीं केलें असावें; ह्याला कोणी साक्ष नसेल, आणि बहुतकरून तो गुन्हेगार शहरांतून पळूनसुद्धां गेला असेल. तो एवढा वेळ येथें कशाला राहतो आहे? दुसऱ्या एखाद्यावर जर मजसारखा प्रसंग गुदरला असता तर त्यानें एकादा अनाथ गरीब मनुष्य पकडून हाच गुन्हेगार असें ठरवून पातशाहाकडून त्यास शासन करविलें असतें; पण तसला अन्याय माझ्या हातून घडणें नाहीं. अशा अधमपणानें प्राण वांचण्यापेक्षां तो प्राण गेला तर बरा असें मला वाटतें!'

नंतर त्यानें कोतवाल व दुसरे कितीएक अधिकारी यांस बारीक चौकशी करून गुन्हेगाराचा तलास लावण्याविषयीं हुकूम केला, व अधिकाऱ्यांनींही जातीनिशीं खपून तीन दिवस पुष्कळ मेहनत केली; पण ती सर्व व्यर्थ गेली. गुन्हा करणाराचा त्यांस यत्किंचित्सुद्धां पत्ता लागला नाहीं. मग वजिरानें मनांत विचार केला, 'आपलें मरण बहुतकरून टळत नाहीं. आतां इतक्यावर ईश्वरानेंच कृपा केली तर ती गोष्ट निराळी.'

चवथा दिवस उजाडतांच कालिफाकडला शिपाई वजिरास बोलावूं आला. वजिरानें जाऊन पातशाहास चालीप्रमाणें मुजरा केला असतां, पातशाहानें 'गुन्हेगार सांपडला किंवा नाहीं?' म्हणून त्यास प्रश्न केला. तेव्हां डोळ्यांस पाणी आणून वजिरानें उत्तर केलें, 'महाराज, मीं बहुत शोध केला. परंतु गुन्हेगाराचा पत्ता अगदीं लागत नाहीं.' हें ऐकून कालिफास पराकाष्ठेचा राग आला, व त्यानें पुष्कळ रागें भरून हुकूम केला कीं, वजीर जाफर व त्याच्या घराण्यांतलीं चाळीस मनुष्यें यांस राजवाड्यापुढें सुळीं द्यावें.

मग कितीएक चाकर सूळ पुरावयास लागले असतां व किती-

एक वजिराच्या नातलगांस पकडावयास गेले असतां इकडे पातशाहानें दवंडीवाल्यास हुकूम केला कीं, ' कालीफ,आज वजीर जाफर व त्याचे गोतांतील चाळीस माणसें यांस राजवाड्यापुढें सुळीं देत आहे; तर ज्यांची इच्छा असेल त्यांनीं तें कृत्य पहावयास यावें, अशी सर्व नगरांत दवंडी पुकार. '

मग सर्व तयारी झाली, व कोतवाल आला; व पुष्कळ शिपाई व स्वार यांच्या रांगा उभ्या राहिल्या; व वजिर व त्याचे चाळीस भाऊबंद यांस एकमेकांस सुळापाशीं उभें केलें. हें सर्व पाहून ज्या हजारों तमासगिरांची दाटी झाली होती, त्या सर्वांस वाईट वाटून त्यांच्या डोळ्यांवाटें अश्रुधारा चालल्या; कारण वजीर व त्याचे भाऊबंद हे सर्व फार सज्जन, उदार व निःपक्षपाती असल्यामुळें, केवळ बगदाद शहरांतलेच नाहींत, तर कालिफाच्या सर्व राज्यांतील रयत लोक त्यांस फार चाहत असत.

याप्रमाणें कालिफाचा तो कडक हुकूम बजावणार व त्या अत्यंत योग्य व निरपराधी मनुष्याचा प्राण घेणार, तों इतक्यांत काय चमत्कार झाला तो ऐका. एक तरुण मनुष्य भोंवतालच्या दाटींतून लोटालोटी करीत मोठ्या घाईनें वजिरापाशीं आला. त्याचा चेहरा सुरेख होता व त्याच्या अंगावर चांगला पोषाख होता तो येऊन वजिराच्या पायां पडून त्यास म्हणाला, ' वजिरसाहेब ,आपण फार थोर व ग़रिबांचे पोशिंदे आहां. आपल्याकडून हा गुन्हा झाला नाहीं व त्याबद्दल आपणांस शिक्षा होणें योग्य नाहीं तर आपण एकीकडे व्हावें, व आपल्या जागीं मला शिक्षा भोगूं द्यावी. ज्या स्त्रीचा मुर्दा पातशाहास तैग्रीस नदींत सांपडला त्या स्त्रीचा मीं खून केला. यासाठीं त्याबद्दल माझ्याखेरीज दुसऱ्या कोणासही शिक्षा होऊं नये. '

हें भाषण ऐकून जीव वांचवल्याबद्दल वजिरास आनंद तर झाला खरा, तरी त्या तरुण मनुष्याबद्दल त्यास फार वाईट वाटलें. कारण त्याच्या मुद्रेवरून तो दुष्ट असेल असें अगदीं दिसत नव्हतें. वजीर

त्याच्यापाशीं बोलणार, इतक्यांत भोंवतालची दाटी फोडून एक म्हातारा आला, आणि वजीरापाशीं जाऊन त्यास म्हणतो, ‘ खावंदांनीं या मुलाचें म्हणणें खरें मानूं नये. त्या बाईला मी मारली, याकरितां त्याबद्दल मलाच शिक्षा असावी. ’ इतक्यांत मध्येंच तरुण मनुष्य बोलूं लागला, ‘ सरकार, मी शपथपूर्वक आपणांस सांगतों कीं, हें घोर कृत्य मीं एकट्यानें केलें आहे; यांत माझा दुसरा कोणी साथीदार नाहीं. ’ म्हातारा पुनः म्हणतो, ‘ अरे मुला, तूं दुःखानें वेडा होऊन मृत्यूच्या मुखांत घुसत आहेस हें बरें नाहीं. मी फार म्हातारा झालों आहें, मी मेलों असतां कांहीं वाईट होणार नाहीं. यासाठीं तुझ्या जागीं मला मरूं दे. ’ नंतर वजिरास म्हणतो, ‘ महाराज, मी गुन्हेगार आहे, मला आतांच्या आतां मारण्याविषयीं आपण हुकूम द्यावा. ’

याप्रमाणें त्या दोघांचा तंटा लागल्यामुळें वजिरास त्यास कालिफाकडे नेणें जरूर वाटून त्यानें तसें करण्याविषयीं कोतवालाची परवानगी विचारली, व कोतवालास वजिरावर उपकार करण्याची संधि आल्यानें मोठा संतोष वाटून त्यानें त्यास अनुमोदन दिलें. मग पातशहापाशीं आल्याबरोबर चालीप्रमाणें त्यानें सात वेळ नमस्कार करून विनंति केली कीं, ‘ खुदावंत, हा तरुण मनुष्य व म्हातारा हे सरकाराकडे आणिले आहेत.’ यांपैकीं प्रत्येकजण म्हणतो कीं, ‘ त्या स्त्रीचा खून मीं केला. ’ नंतर कालिफानें स्वतः त्यांस विचारलें कीं, ‘ तुम्हांपैकीं खून करणारा वास्तविक कोण ? ’ तरुण मनुष्य म्हणाला, ‘ खुदावंत, मीं स्वतः त्या स्त्रीचा निर्दयपणें वध करून तिचा मुडदा तैग्रीसमध्यें टाकिला. ’ म्हातारा म्हणाला, ‘ मीं टाकिला. ’ याप्रमाणें दोघांचा तंटा पाहून कालीफ वजिरास म्हणाला, ‘जा, दोघांसही सुळीं द्यावयाचा हुकूम दे.’ वजिरानें उत्तर केलें, ‘पण, खावंद, जर एकानेंच खरा गुन्हा केला असला, तर दुसऱ्याचा जीव उगीच घेतल्यापासून अन्याय होणार नाहीं काय ? ’

वजीर इतकें बोलत आहे, इतक्यांत तरुण मनुष्य पुनः म्हणाला,

'राजाधिराज, सर्व दुनियेचा निर्माण करणारा जो ईश्वर त्याची शपथ घेऊन मी सांगतों कीं त्या स्त्रीचा मी जीव घेतला व तिचे तुकडे तुकडे करून ते मीं नदींत टाकिले. मी म्हणतों हें खोटें असेल, तर न्यायाच्या दिवशीं ईश्वर मला पापाची क्षमा करणार नाहीं. तर ह्या अपराधाबद्दल मलाच शिक्षा असावी.' अशा प्रकारची त्याची भयंकर शपथ ऐकून पातशाहास फार अचंबा वाटला; व म्हातार्‍यानें त्यावर कांहींच उत्तर दिलें नाहीं; त्यावरून त्या तरुण मनुष्याचें भाषण त्यास खरें वाटलें. मग तो त्यास म्हणाला, 'अरे हत भाग्या, चांडाळा, प्रथम तूं असलें घोर कृत्य केलेंस कां? आणि इतक्या लौकर त्या कृत्याचा पश्चात्ताप होऊन त्याबद्दल शिक्षा भोगण्यासाठीं पुढें आलास कां? असें करण्यास तुला कोणतें कारण घडलें असावें?' तरुण मनुष्य बोलला, 'हे सद्धर्मपालक, माझा व या स्त्रीचा संबंध झाल्यापासून घडलेल्या सर्व गोष्टी एकत्र लिहिल्या असतां, लोकांच्या उपयोगी पडण्यासारखा एक ग्रंथ होईल.' पातशाह म्हणाला, 'असें आहे तर तो सर्व वृत्तांत आम्हास सांगा.' मग 'आज्ञा महाराज,' असें म्हणून तरुण मनुष्यानें पुढील गोष्ट सांगण्यास आरंभ केला. तरुण मनुष्य म्हणतो--

---

## जिचा खून झाला होता ती स्त्री व तिचा नवरा-तरुण मनुष्य-यांची हकीगत.

हे राजाधिराज, जिचा खून मीं केला, ती स्त्री माझी बायको; व सरकारच्या पुढें हा जो म्हातारा गृहस्थ उभा आहे, याची ती मुलगी. हा म्हातारा माझा चुलता आहे. त्या स्त्रीचें बारा वर्षांचें वय असतां या तिच्या बापानें तिचें माझ्याबरोबर लग्न करून दिलें. या गोष्टीला आज अकरा वर्षें झालीं. तिजपासून मला तीन मुलगे झाले; ते सर्व ईश्वराचे कृपेनें जिवंत आहेत. तिच्या मागें तिला

निष्कारण वाईट कशाला म्हणूं? त्या विचारीनें कधींही मला राग येण्यासारखी गोष्ट केली नाहीं. ती चतुर व सुशील असे, व मला संतुष्ट राखावें याविषयीं तिला पराकाष्ठेचा उल्हास असे. माझाही तिजवर पराकाष्ठेचा प्रेमा होता. तिची जसजशी इच्छा दिसेल, त्याप्रमाणें तिनें सांगितल्यापूर्वीं मी वागत असे. मी तिचें मन जन्मांत कधींही दुखविलें नाहीं.

सुमारें दोन महिन्यांपूर्वीं ती दुखण्यानें पडली, त्या वेळीं मी तिची पुष्कळ सेवा केली; व ती बरी होण्याकरतां कष्ट करण्यास व पैसा खर्चण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं. एका महिन्यानें तिला आराम पडला, आणि तिला पाणी पिण्याची इच्छा झाली. मग मी पाणी आणण्यास जाण्यापूर्वीं ती मला म्हणाली, 'मला आंबे खावेसे वाटतात, तर तुम्ही मजकरतां कांहीं आंबे आणाल तर मला फार संतोष होईल. मला आंबे खाण्याची वासना फार दिवस झाली आहे व ती अलीकडे इतकी वाढली कीं ती लौकर पूर्ण न केल्यास, मला वाटतें मला कांहीं मोठा अपाय घडेल.' मी उत्तर केलें, 'तुझी इच्छा पुरविण्यासाठीं माझ्याकडून होईल तितका मी प्रयत्न करतों.'

मी तत्काळ बाहेर पडलों, आणि शहरांतील सर्व बाजार व दुकान न् दुकान शोधिलें, व एकेका आंब्यास एकेक रुपया द्यावयास कबूल झालों, परंतु आंबा कोठेंही मिळाला नाहीं. मग इतके श्रम करून कांहीं उपयोग झाला नाहीं, असें पाहून दमून घरीं आलों. माझी बायको न्हाऊन घरांत आली, व आंबा मिळत नाहीं हें ऐकून तिला जो खेद झाला त्यामुळें तिला सारी रात्र झोंप आली नाहीं. दुसऱ्या दिवशीं मी मोठ्या पहांटेस उठून या शहरच्या आसपासची बाग न् बाग हिंडलों; परंतु एकही आंबा सांपडला नाहीं, परंतु एक म्हातारा माळी भेटला, त्यानें इतकें सांगितलें कीं, 'बसोरा शहरच्या पातशाहाच्या बागेखेरीज आंबा या दिवसांत कितीही पैसा दिला तरी तुला मिळावयाचा नाहीं.'

माझें बायकोवर अतिशय प्रेम होतें, त्यामुळें तिची वासना पूर्ण

करण्याचा उपाय म्हणून जोंपर्यंत होता तोंपर्यंत माझ्यानें उगीच बसवेना. मग मी बायकोस कळवून बसोरा शहरास गेलों. मीं इतक्या त्वरेनें गेलों व आलों कीं, पंधराव्या दिवशींच घरीं परत आलों. त्या शहरांत मला तीन आंबे मिळाले, व एकेकास एकेक मोहोर पडली. तेथेंही तिहींपेक्षां अधिक आंबे नव्हते व तो बागवान् मला कमी किंमतीस देईना. परंतु पंधरा दिवसांनीं घरीं आलों, तों इकडे माझ्या बायकोची वासना आपोआपच नाहींशी झाली होती; त्यामुळें मीं आंबे दिले असतां ते घेऊन तिनें एकीकडे ठेविले. अद्यापि तिची प्रकृति बिघडलीच होती, व ती बरी करण्याचा मला पुढें कांहीं उपाय सुचेना.

मी परत आल्यावर एक दोन दिवसांनीं कापडाच्या बाजारांत आपल्या दुकानांत बसलों असतां, एक काळा उंच गुलाम रस्त्यानें जातांना मीं पाहिला. त्याच्या हातांत एक आंबा होता. तो आंबा मी बसोरा शहरांतून आणिलेल्यांपैकीं होता, हें मीं तत्काळ ओळखिलें. कारण साऱ्या बगदाद शहरांत व या शहरच्या आसपासच्या बागांत तें फळ मिळत नाहीं, हें मला ठाऊक होतें. मग मीं त्या गुलामाला हांक मारून विचारलें कीं, ‘ भल्या माणसा, हा आंबा तुला कोठें मिळाला ? ’ त्यानें हंसतहंसत उत्तर केलें कीं, ‘ हा आंबा माझ्या मैत्रिणीनें मला नजर केला. मी तिला भेटावयास आज गेलों होतों; तिची प्रकृति बिघडलेली होती; तिच्या घरीं तीन आंबे पडले होते. ते पाहून मीं तिला विचारलें कीं, हे आंबे कोठून आणले ? ’ त्यावर तिनें उत्तर केलें, ‘ माझ्या भोळ्या नवऱ्यानें दूर गांवाहून पंधरा दिवसांत माझ्याकरतां हें आणिलें. ’ मग आम्ही एकत्र जेवलों; आणि तेथून येतांना हा एक आंबा मीं आणला.

हें ऐकून मला अतोनात राग आला. मग मी दुकान बंद करून धांवतच घरीं आलों, आणि तसाच बायकोच्या खोलींत आंबे जाऊन पाहिले. तों दोनच आंबे माझ्या दृष्टीस पडले. त्यावरून मी तिला विचारलें कीं, ‘ तिसरा आंबा कोठें आहे ? ’ आंबे जिकडे

पडले होते, तिकडे वळून व दोनच आंबे आहेत असें पाहून तिनें उत्तर केलें, ' मला नाहीं ठाऊक काय झाला तो. ' या बेपर्वाईच्या उत्तरावरून माझी खात्री झाली कीं, गुलामानें जो मजकूर सांगितला, तो खरा. नंतर त्या त्वेषाच्या झपाट्यांत मी बेफाम होऊन कंबरेस कट्यार होती, ती उपसून तिच्या उरांत खुपसली. मग तिचें डोकें व हातपाय कापून, ते तुकडे एकत्र करून एका सतरंजींत गुंडाळले, व फिरून तें गांठोडें चटईत गुंडाळून त्याचें तोंड रेशमी धाग्यानें शिवून टाकलें व तें गांठोडें एका पेटींत घालून काळोख पडल्यावर ती पेटी खांद्यावर वाहून नेऊन तैग्रीस नदींत झुगारून दिली.

माझीं धाकटीं दोन मुलें बिछान्यावर निजलीं होतीं व तिसरा थोरला मुलगा बाहेर गेला होता.मी नदीहून परत आलों तों थोरला पोरगा दरवाज्यामध्यें रडत बसला होता. त्यास मीं 'रडतोस कां ?' म्हणून विचारलें. त्यानें उत्तर केलें, ' बाबा, तूं गांवाहून आणिलेल्या आंब्यांपैकीं एक आंबा आईला नकळत घेऊन मी त्याच्याशीं दुपारच्या वेळीं रस्त्यांत खेळत असतां वाटेनें एक मोठा काळा गुलाम आला, त्यानें माझ्या हातून तो आंबा हिसकावून घेऊन तो चालता झाला. तो परत मागत मागत त्याच्या मागें पुष्कळ दूर धांवत गेलों, व माझी आई दुखणेकरीण आहे, व तिच्याकरितां पंधरा दिवस गांवास जाऊन हा व आणखी दोन असे तीन आंबे तूं आणले असें मीं त्यास पुष्कळ सांगितलें;पण कांहीं उपयोग झाला नाहीं; मग मी रडत ओरडत त्याचे पाठीस लागलों तें पाहून तो मागें वळला, व त्यानें मला मारलें, व धांवत वांकड्यातिकड्या गल्ल्यांनीं पळून गेला. माझी त्याची चुकामूक झाली. मग तुला शोधण्याकरतां मी गांवांत पुष्कळ फिरलों. बाबा, तुझ्या पायां पडतों. तूं ही गोष्ट आईला सांगू नको. हें ऐकून तिची प्रकृति फारच बिघडेल. ' इतकें बोलून तो मुलगा आणखी रडूं लागला.

मुलाच्या तोंडची ही गोष्ट ऐकून मला जो खेद झाला, त्याला

पार नाहीं. त्याच्या बोलण्यावरून मला समजलें कीं, त्या लुच्च्या दुष्ट गुलामानें माझ्या मुलाजवळून खरा मजकूर ऐकून त्यावरून खोटी गोष्ट रचून मला सांगितली व ती मीं मूर्खानें कांहीं विचार न करतां खरी मानून अत्यंत घोर हत्या केली. याप्रमाणें मला पुष्कळ पश्चात्ताप झाला, परंतु कृत्य घडून गेल्यावर पश्चात्ताप होऊन उपयोग काय ? इतक्यांत माझा हा चुलता व सासरा आपल्या मुलीच्या समाचाराकरितां तेथें आला. मग मीं त्याला झालेला सर्व वृत्तांत सांगितला. त्याजवळ कांहींएक चोरलें नाहीं व त्यानें माझी निंदा करण्याच्या आंतच त्या दुष्ट कृत्याबद्दल मी आपल्या तोंडानेंच आपली निर्भर्त्सना करून घेऊं लागलों. परंतु मी निंदा करण्यास योग्य असतां, माझी निंदा न करतां हा सज्जन मनुष्य मजबरोबर विलाप करूं लागला. मग आम्हीं तीन दिवस एकसारखे शोक करीत बसलों होतों. तो आपल्या एकुलत्या एक व लाडक्या मुलीबद्दल व मी आपल्या आवडत्या सुशील बायकोबद्दल. मला फारच दुःख होण्याचें कारण असें होतें कीं, मीं त्या लुच्च्या गुलामाचें भाषण खरें मानून, कांहीं विचार न करतां तिचा असा क्रूरपणें जीव घेतला !

हे सद्धर्मपालक राजाधिराज, आपल्या आज्ञेवरून ही आपली खरी हकीकत सरकारच्या पायांपाशीं निवेदन केली. माझा गुन्हा याप्रमाणें आहे, तर सरकारांनीं मला यथायोग्य शिक्षा करण्याविषयीं हुकूम करावा इतकाच माझा सरकारापाशीं अर्ज आहे व ती शिक्षा कशीही कडक असली तरी मी ती सौम्यच लेखीन.

ही गोष्ट ऐकून पातशाहास पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें व तो न्यायानें वागणारा होता, यामुळें त्याचें मनांत असें आलें कीं, हा तरुण मनुष्य शिक्षा करण्यापेक्षां दया करण्यास विशेष पात्र आहे आणि असें वाटून तो त्याचा पक्ष घेऊन बोलूं लागला. पातशाहा म्हणाला, ‘ या माणसाचें कृत्य ईश्वराच्या दृष्टीनें क्षमा करण्याजोगें आहे, यासाठीं मला त्यास क्षमा करण्यास चिंता दिसत नाहीं. य

गुन्ह्याचा वास्तविक दोष म्हटला तर तो त्या दुष्ट गुलामाकडे येतो तर त्यास शिक्षा होणें योग्य आहे.' नंतर वजिराकडे वळून त्यास कालिफ म्हणाला, 'पहा, तुला तीन दिवसांची मुदत देतों, इतक्या मुदतीच्या आंत तूं जर त्या दुष्ट गुलामास हजर न केलें. तर त्याच्या जागीं तुला देहान्तशिक्षा भोगावी लागेल.'

तो बिचारा वजीर जाफर जीव नुकताच वांचल्याबद्दल आनंद मानीत होता, तों पातशाहाची ही आज्ञा ऐकून पुनः दुःखसमुद्रांत बुडाला; परंतु त्यास आपल्या धन्याचा स्वभाव ठाऊक होता, यामुळें त्यास उत्तर करण्याचा हिय्या न होऊन तो मुकाट्यानें कचेरींतून घरीं गेला. त्याच्या मनाची खातरी झाली कीं, आपण तीन दिवसांवर वांचत नाहीं व तो गुलाम सांपडण्याची कांहींएक आशा त्यास न वाटल्यामुळें त्यानें त्यास शोधण्याचा यत्नसुद्धां केला नाहीं. तो आपणाशीं म्हणाला, 'या बगदादसारख्या शहरांत, जेथें लक्षावधि काळे गुलाम राहतात, तेथें तो गुन्हेगार गुलाम मला कसला सांपडतो? ईश्वरानेंच कृपा करून त्या खून करणाऱ्याप्रमाणें त्यास उघडकीस आणिलें तर नकळे, नाहीं तर माझा जीव आतां वांचत नाहीं.'

मग आपल्या कुटुंबाच्या मनुष्यांबरोबर शोक करून त्यानें दोन दिवस घालवले. तिसऱ्या दिवशीं तो आपल्या शेवटच्या तयारीस लागला. तो सर्वकाळ नेकीनें वागत असे व मनास खाण्यासारखें कृत्य त्यानें कधींही केलें नव्हतें, यामुळें त्याला मरण्याचें भय वाटलें नाहीं. नंतर त्यानें काजीस व दुसऱ्या कितीएक प्रतिष्ठित लोकांस बोलावून आणिलें व त्यांचे समक्ष आपलें व्यवस्थापत्र करवून त्यावर त्यांच्या सह्या घेतल्या. नंतर त्यानें आपल्या बायकोस व मुलास भेटून त्यांचा शेवटचा निरोप घेतला. त्या वेळेस त्याच्या कुटुंबांतील सर्व माणसें रडावयास लागलीं व त्यांनीं जो शोक मांडला, तो वर्णवत नाहीं. इतक्यांत पातशाहाकडून एक अधिकारी आला, आणि त्यानें वजिरास कळविलें कीं, सरकारांनीं ज्या काळ्या

गुलामाचा शोध करण्याविषयीं आपणांस हुकूम केला होता,त्याविषयीं आपल्याकडून कांहींच न कळल्यामुळें सरकारची आपल्यावर फार इतराजी झाली आहे. मला आपणास दरबारांत बोलवण्याकरितां पाठविलें आहे. तो बिचारा वजीर त्या अधिकाऱ्याबरोबर जावयास सिद्ध झाला व घरांतून बाहेर पडणार तों इतक्यांत कुळंबिणीनें त्याची सर्वांत धाकटी मुलगी त्यास भेटावयास आणिली. त्या मुलीचें वय पांचसहा वर्षांचें होतें.

वजिराची या मुलीवर विशेष ममता होती, यामुळें त्यानें त्या अधिकाऱ्याची प्रार्थना केली कीं, ‘ क्षणभर मला या मुलीशीं शेवटचे शब्द बोलूं द्या.’ मग तिला उचलून उराशीं धरून त्यानें तिचे पुष्कळ मुके घेतले. इतक्यांत तिच्या खिशांत कांहीं कठीण व मोठा पदार्थ त्याच्या हातास लागला व त्याला फार वास येत होता. मग वजिरानें तिला विचारलें कीं, ‘ बेटा, तुझ्या खिशांत काय आहे ?’ तिनें उत्तर केलें, ‘ बाबा, माझ्या खिशांत आंबा आहे. त्यावर आपला धनी व पोशिंदा जो पातशाह त्याचें नांव लिहिलें आहे. तो आंबा आपला गुलाम रिहान यानें मला दोन मोहरांला विकत दिला.’

आंबा आणि गुलाम हे दोन शब्द ऐकून वजिरास जो आनंद झाला तो वर्णितां येत नाहीं. मग त्यानें तत्काळ मुलीच्या खिशांतून आंबा, काढून घेतला, व गुलामास बोलावून आणिलें. तो आल्यावर वजीर त्यास म्हणाला, ‘लुच्च्या, हा आंबा तूं कोठून आणिला, तो सांग.’ गुलामानें उत्तर केलें, ‘ वजीरसाहेब, मी शपथ वाहून सांगतों कीं, हें फळ आपल्या किंवा पातशाहाच्या बागेंतून चोरून आणिलें नाहीं. दोनचार दिवस झाले, मीं रस्त्यांतून चाललों असतां, दोनचार पोरें खेळत होतीं, त्यांपैकीं एकाच्या हातांत हा आंबा होता, तो मी त्याच्या हातून हिसकावून घेतला. तें पोर माझ्या पाठीस लागलें, व म्हणालें कीं, ‘ हा आंबा माझा नाहीं; माझ्या आईचा आहे व ती दुखण्यांत पडली आहे, तिच्याकरतां माझ्या बापानें पुष्कळ दूर जाऊन हा व आणखी दोन असे तीन आंबे आणले. मी हा आंबा आईच्या

नकळत घेतला आहे.' याप्रमाणें त्या पोरानें पुष्कळ सांगितलें पण त्याकडे लक्ष न देतां मी आंबा घेऊन आलों व तो आंबा मी धाकट्या बाईसाहेबांस विकला.'

गुलामाचा लुच्चेगिरीनें एका गरीब स्त्रीचा फुकट प्राण गेला व आपलाही जावयाच्या बेतांत आला होता, हें मनांत येऊन वजिरास मोठा विस्मय झाला. नंतर त्या गुलामास बरोबर घेऊन तो पातशाहाकडे गेला व त्यानें त्यास झालेला सर्व मजकूर जाहीर केला.

शाहजादी सुलतानास म्हणते,'महाराज, इतक्या वेळ मी आपणांस जी गोष्ट सांगितली ती आपणांस फारच चमत्कारिक वाटली असेल. तथापि आणखी दुसरी एक गोष्ट ठाऊक आहे ती हिजपेक्षांही चमत्कारिक आहे, व खावंदांनीं कृपा करून उद्यां ती ऐकल्यास आपणांस मी बोलतें तें खरें वाटेल. तेव्हां तिला कांहींएक न करतां, शाहरियार पलंगावरून उठला. पुढें काय कसें करावें, या संबंधींचा निश्चय त्यास होईना. तो स्वतःशीं म्हणाला, 'ही शाहजादी फारच चतुर आहे. ही लांब लांब गोष्टी सांगते, व हिनें एकदां गोष्ट आरंभली म्हणजे ती शेवटास जाईपर्यंत ऐकिल्यावांचून राहवत नाहीं. मला वाटतें आतां हिला नवीन गोष्ट आरंभूं देऊं नये. आज हिचा वध करण्याविषयीं हुकूम करावा. परंतु असें नाहीं, इतक्या घाईची तरी काय गरज आहे? कोणतीही गोष्ट अविचारानें करूं नये. ती जी गोष्ट सांगेन म्हणते, ती कदाचित् आजपर्यंत ज्या गोष्टी मीं ऐकल्या, त्याहींपेक्षां विशेष चमत्कारिक असेल; तर ती ऐकण्याचें सुख आपणास अंतरून कां घ्यावें? येवढी गोष्ट संपली म्हणजे तिचा वध करून टाकूं.' असा विचार करून तो निमाज पढावयास गेला.

दुसऱ्या दिवशीं पहांटेस दिनारजादी, चालीप्रमाणें आपल्या बहिणीस हांक मारून म्हणते, 'ताई, तुला झोंप येत नसल्यास काल म्हणालीस त्या गोष्टीस आरंभ कर.' मग पातशाहाची परवानगी घेऊन शाहजादीनें पुढील गोष्ट सांगावयास आरंभ केला.

---

# एका ठेंगण्या कुबड्याची गोष्ट.

शाहजादी म्हणते, तार्तरी देशाच्या शेवटास काशगर म्हणून एक शहर होतें. त्या शहरांत एक शिंपी राहात असे. तो शिंपी आपल्या दुकानांत एके दिवशीं शिवीत बसला असतां, एक ठेंगणा कुबडा येऊन त्याच्या दुकानाच्या दारांत बसला, व त्याच्यापाशीं सारंगी होती, ती वाजवून तो तोंडानें गाऊं लागला. त्याचें गाणें शिंप्यास फार आवडलें. मग त्यानें मनांत आणलें कीं, 'या कुबड्यास आपल्या घरीं आज संध्याकाळचें जेवावयास न्यावें, म्हणजे त्याचें गाणें आपल्या बायकोस ऐकावयासही सांपडून तिची चार घटका करमणूक होईल.' असा बेत मनांत आणून त्यानें त्या कुबड्यास आमंत्रण केलें, व आपण लागलीच दुकान बंद करून त्यास बरोबर घेऊन घरीं गेला.

संध्याकाळच्या जेवणाची वेळ झालीच होती, व शिंप्याच्या बायकोनें स्वयंपाक वगैरे तयार केलाच होता. मग घरीं नवरा येतांच त्यानें सांगितल्यावरून तिनें तीन ताटें वाढून तयार केलीं, व तिघें-जणही जेवावयास बसलीं. तीं जेवीत असतां, त्या कुबड्याच्या गळ्यांत माशाचें मोठें हड्डूक एकाएकीं आडकून तो तत्क्षणीं डोळे पांढरे करून खालीं पडला. शिंपी व त्याची बायको यांस उपाय करण्यास अगदीं फुरसत सांपडली नाहीं. हा एकाएकीं घडलेला अनर्थ पाहून, त्या दोघांसही मोठें भय वाटलें; कारण ही गोष्ट त्यांच्या घरांत घडल्यामुळें त्यांस असा धाक पडला कीं, कोतवा-लाच्या कानावर ही गोष्ट गेल्यास, तो खुनाचा आरोप ठेवून आपणांस शिक्षा करील. आतां पुढें काय करावें, असा तीं विचार करीत असतां, शिंप्यास एक युक्ति सुचली.

आपल्या आळींत एक यहुदी वैद्य राहात आहे असें त्यास आठ-वून, त्यानें ही पुढील हिकमत योजिली. तो व त्याची बायको यांनीं एकानें त्याचें डोकें व एकानें त्याचे पाय धरून त्या कुब-ड्यास त्या वैद्याचे घरीं नेलें. तो वैद्य ज्या जागेंत राहात होता, त्या

जागेस जिन्याची वाट होती; व तो जिना अरुंद उंच पायऱ्यांचा असून त्याच्या खालच्या तोंडाशीं दार होतें. तें दार बंद असल्या-मुळें त्यांनीं त्यावर थाप मारली. ती ऐकून एका दासीनें घाईनें दिवा घेतल्यावांचून येऊन तें दार उघडून, 'काय काम आहे ?' म्हणून त्यास विचारलें. शिंप्यानें उत्तर केलें कीं, 'बाई, आपल्या धन्यास कळीव कीं, आम्हीं एक रोगी आणिला आहे. त्याची प्रकृति फार बिघडल्यामुळें आम्ही तुझ्या धन्याकडे औषधासाठीं आलों आहों. हा घे रुपया.' असें बोलून त्यानें तिच्या हातावर एक रुपया ठेवला, व म्हणाला कीं, 'पहा, आम्ही कोणाची मेहनत फुकट घेऊं इच्छित नाहीं.' मग ती दासी ती हर्षाची बातमी आपल्या धन्यास कळविण्याकरितां परत गेली असतां, शिंपी व त्याची बायको यांनीं जलदीनें त्या कुबड्याचें मढें जिन्यांतून नेऊन वरच्या पायरीवर ठेवलें, आणि तेथून पळून घाईनें तीं आपल्या घरीं आलीं.

इकडे दासीनें घरांत जाऊन वैद्यास सांगितलें कीं, 'दारापाशीं एक पुरुष व स्त्री आलीं आहेत, व त्यांनीं एक रोगी आणला आहे. तो आपण खालीं येऊन पहावा, असें त्यांचें म्हणणें आहे. तसेंच त्यांनीं आपल्या मेहनतीबद्दल हा रुपया दिला आहे.' असें म्हणून तिनें, शिंप्यानें दिलेला रुपया वैद्याच्या हातावर ठेविला. आगाऊ पैसा मिळालेला पाहून वैद्यास फार हर्ष झाला. त्यास असें वाटलें कीं, 'त्यांनीं फार चांगलें कूळ आणलें असावें; आपण त्याची हयगय करूं नये.' मग तो दासीस म्हणाला, 'मी पुढें जातों; तूं लवकर दिवा घेऊन ये.' असें म्हणून तो मोठ्या घाईनें अंधारांतच जिन्यांत येऊन खालीं उतरूं लागला, तों त्याचा धक्का लागून तें कुबड्याचें प्रेत गडबडत जिन्याच्या खालीं येऊन पडलें. तो वैद्यही घसरून खालीं पडलाच असता, परंतु त्यानें मोठ्या मुष्किलीनें आपणांस सांवरलें. मग घाबरून मोठ्यानें ओरडून, दासीस हणाला, 'अग, दिवा कां अजून आणीत नाहींस ?' इतक्यांत तीही

दिवा घेऊन आली, आणि दोघें जिना उतरून खालीं गेलीं. मग वैद्य पाहतो तों जिन्यावरून गडगडत पडलेला मनुष्य मेला! हें पाहून त्याच्या पोटांत धसका बसला. नंतर तो आपल्या नशिबास नांव ठेवून म्हणाला, 'काय मी मूर्ख! मी दिवा येईतोंपर्यंत कां बरें थांबलों नाहीं? अंधारांत जिन्यांत कां आलों? माझ्या धक्यानें पडून हा बिचारा रोगी जिवास मुकला. याच्या मरणास कारण मी. आतां ईश्वरानें कृपाच केली तर बरें आहे; नाहीं तर माझी धडगत दिसत नाहीं. हाय हाय! ही गोष्ट बाहेर फुटली असतां कोतवाल मला धरून नेईल, यांत संशय नाहीं.'

मग रस्त्यांतल्या जाणाऱ्यायेणाऱ्यांच्या दृष्टीस तो मुडदा पडूं नये म्हणून वैद्यानें जिन्याचें दार बंद केलें. नंतर त्या कुबड्यास उचलून त्यास आपल्या बायकोच्या खोलींत आणिलें. तें प्रेत पाहून ती बायको भयानें घाबरून गेली, व मोठ्या दुःखानें म्हणूं लागली, 'मुडदा येथून लांबविण्याची युक्ति आपण लवकर न काढल्यास, आपला घात खचित होईल. ही गोष्ट अंमलदारास कळल्यास, आपणांस खुनाच्या अपराधाबद्दल फांशीं जावें लागेल. काय हो हा अनर्थ झाला!' नवऱ्यास ती म्हणाली, 'अहो, ही हत्या तुम्हीं कशी केली?' वैद्यानें उत्तर केलें, 'अग, हें कसें झालें आणि काय झालें हा विचार करण्याची ही वेळ नाहीं. जो प्रसंग येऊन आपणावर गुदरला आहे, त्यांतून सुटका होण्याचा उपाय आधीं योजिला पाहिजे.'

मग तो मुडदा घरांतून कसा काढून द्यावा, याच्या विचारांत वैद्य व त्याची बायको पडलीं असतां, वैद्यानें पुष्कळ विचार केला; परंतु त्याला कांहीं तोड सुचेना, शेवटीं त्याची बायको विशेष चतुर असल्यामुळें, तिनें एक हिकमत काढिली. ती नवऱ्यास म्हणाली, 'आपण हा मुडदा आपल्या गच्चीवर नेऊं आणि तेथून आपल्या शेजारीं एक मुसलमान राहतो, त्याच्या घरावर हळूच चढून धुराड्यांतून हा त्या मुसलमानाच्या घरांत सोडून देऊं, म्हणजे झालें.'

या मुसलमानाचें वाण्याचें दुकान होतें. तो राजवाड्यांत तेल, तूप, वगैरे पुरवीत असे. तें सर्व सामान ठेवण्याची कोठी त्याच्या घरांतच असे, व त्या कोठींत उंदीर व घुशी त्याचें सामान नेहमीं नाशीत असत.

यहुदी वैद्यास बायकोनें काढलेली कल्पना पसंत होऊन त्यांनीं त्या कुबड्याचा मुडदा उचलून गच्चीवर नेला, व त्याच्या बगलेंतून दोऱ्या बांधून त्यास मोठ्या युक्तीनें हलकेंच धुराड्यावाटें मुसलमानाच्या कोठींत सोडून दिलें, आणि त्याचे पाय जमिनीवर टेंकून भिंतीच्या आश्रयानें त्यास उभा करून, त्यांनीं दोऱ्या हळूच वर ओढून घेतल्या आणि तीं दोघें आपल्या घरांत येऊन गुपचिप बसलीं.

इतक्यांत तो मुसलमान बाहेर जेवावयास गेला होता, तो घरीं आला. त्याच्या हातांत कंदील होता, त्यासकट तो कांहीं कामाकरितां कोठी उघडून आंत गेला असतां, त्यानें भिंतीशीं उभा राहिलेल्या कुबड्यांस पाहिलें. हा मुसलमान स्वभावानें धीट होता, त्यामुळें त्यास भीति वाटली नाहीं. मग चोर आपल्या कोठींत शिरला आहे असें त्यास वाटून तो मुसलमान हातांत एक सोडगें घेऊन त्या कुबड्याच्या अंगावर गेला आणि त्यास म्हणाला, 'अरे चोरा, भला सांपडलास! मी इतक्या दिवस असें समजत होतों कीं, उंदीर व घुशी माझा माल खाऊन नाहींसा करतात. परंतु अरे चोरट्या, तूं धुराड्यांतून उतरून मला नागवितोस हें मला ठाऊक नव्हतें! तर आज तुला असें बक्षीस देतों कीं, तूं पुनः येथें कधीं येणार नाहींस.' असें म्हणून त्यानें त्या कुबड्यास खूप सोटे लगावले. त्यामुळें तो कुबडा जमिनीवर पालथा पडला. तरी तो मिष करतो असें समजून त्या मुसलमान वाण्यानें त्यास आणखी दहा पंधरा सोटे मारले. परंतु तो चोर कांहींच चळवळ करीत नाहीं, असें पाहून तो थांबून पाहूं लागला. मग तो केवळ मुडदाच असें पाहून त्या मुसलमानाच्या मनांतला राग जाऊन भीति उत्पन्न

झाली. नंतर तो आपणाशीं म्हणतो, ‘ अरे, काय तरी दुष्ट मी! मी रागाच्या झपाट्यांत काय हा अनर्थ केला! ईश्वरा, आतां तूंच कृपा करशील तर बरें आहे, नाहीं तर माझा मृत्यु जवळ आला आहे. माझा जळाला तो माल, हजार वेळ कां गेला नव्हता! परंतु हा अनर्थ माझ्या हातून घडला हें फार वाईट झालें ! ’ त्यास पुढें कांहीं सुचेनासें झालें; कोतवाल व त्याचे शिपाई आपणास पकडून शिक्षा करावयास नेत आहेत असें त्यांस वाटूं लागलें, इतका भयानें ता वेडा झाला!

मग तो मुडदा त्यानें पाठीवर घेऊन आपल्या घराबाहेर रस्त्यांत नेला, आणि तो दूर एका दुकानाशीं टेंकून ठेवून मागें न पाहतां धांवत घरीं येऊन दार लावून तो आपल्या खोलींत जाऊन निजला.

नंतर पहांट होण्याच्या सुमारास एक ख्रिस्ती सावकार रात्रीं कोठें ख्यालीखुशालींत बसला होता, व त्यानें दारू पुष्कळ झोंकली होती, तो घरीं चालला होता. त्याचा उद्देश असा होता कीं, पहांट होऊन मुसलमान लोक निमाज पढावयास घराबाहेर निघाले नाहींत, तों गार पाण्यानें स्नान करून घरीं बसावें, म्हणजे अंमल उतरून आपण शुद्धीवर येऊं. त्या शहरांत पहांटेस कोणी झिंगलेला दृष्टीस पडल्यास तत्काळ पकडून कैदेंत ठेवीत असत, त्या भयानें तो ख्रिस्ती सावकार मोठ्या घाईनें चालला होता. तो कांहीं कारणामुळें एका दुकानाजवळ थांबला. त्याच दुकानास टेंकून मुसलमान वाण्यानें त्या कुबड्यास ठेविलें होतें. मग ख्रिस्ती सावकाराचा थोडा धक्का लागतांच कुबड्याचा मुडदा एकाएकीं त्याच्या पाठीवर पडला, तेणेंकरून सावकारास, कोणी चोरानें आपणावर झडप घातली, असें मनांत वाटून त्यानें त्या कुबड्याच्या डोक्यावर गुद्दा मारून त्यास खालीं पाडलें, आणि त्यास लाथ मारून, ‘चोर चोर’ म्हणून आरोळी ठोकली. ती ऐकून जवळच्या नाक्यावरचा चौकीदार तेथें धांवत आला.

मग ख्रिस्ती मनुष्य मुसलमानास ( कुबडा मुसलमान धर्माचा

होता. ) मारीत आहे असें पाहून शिपाई त्यास म्हणाला, ' अरे ख्रिस्त्या, तूं मुसलमानास इतका काय म्हणून मारीत होतास ? ' असें चौकीदारानें विचारलें असतां ख्रिस्ती सावकारानें उत्तर केलें कीं, ' हा चोर मला लुटण्याकरतां न कळतां एकाएकीं झडप घालून माझी गचांडी धरूं पाहत होता.' चौकीदारानें सावकाराचा हात धरून त्यास एकीकडे ओढिलें, आणि त्यास तो म्हणाला, ' अरे, हो एकीकडे; तूं पुष्कळ सूड उगवलास. जाऊं दे त्यास आतां. ' मग तो त्या कुबड्यास उठवूं लागला. परंतु तो मुडदा होऊन पडला आहे, असें पाहून तो चौकीदार ख्रिस्ती सावकारास रागानें म्हणाला, ' अरे, मुसलमान लोकांचा प्राण घेण्याइतके तुम्ही ख्रिस्ती लोक कशानें रे माजला ? ' असें बोलून त्यानें त्या सावकारास पकडून कोतवालाकडे नेलें. कोतवालानें त्यास तुरुंगांत ठेवून, दुसऱ्या दिवशीं न्यायाधीश कचेरींत आल्यावर त्यापुढें त्यास उभें केलें व त्यानें कोणता गुन्हा केला होता तें कळविलें. कांहीं वेळानें त्या ख्रिस्ती सावकाराचा अंमल उतरून तो चांगला शुद्धीवर आला, तेव्हां आपल्या एका गुद्द्यानें मनुष्याचा प्राण कसा गेला हें त्यास समजेना.

पहारेकऱ्याची जबानी झाल्यावर व मयत मनुष्याचा मुडदा पाहिल्यावर न्यायाधीशानें कैद्यास ' तुझें काय उत्तर आहे ?' म्हणून प्रश्न केला. त्याचा खरोखरी कांहीं दोष नव्हता, तरी ख्रिस्ती सावकारास गुन्हा नाकबूल करवेना. मेलेला कुबडा राजाच्या आश्रितांपैकीं होता, असें कळल्यावरून, सरकारचा अभिप्राय कळल्याखेरीज कैद्यास ठार मारण्याची शिक्षा करावयाची नाहीं, असा विचार करून न्यायाधीश स्वतः राजवाड्यांत गेला, आणि झालेला मजकूर त्यानें राजाच्या कानावर घातला. तो ऐकून घेऊन राजानें उत्तर केलें कीं, ' मुसलमानास जिवें मारणाऱ्या ख्रिस्ती मनुष्यावर मजकडून दया होणार नाहीं; तर तूं जाऊन न्यायाप्रमाणें कैद्यास फांशीं दे. ' न्यायाधीशानें येऊन फांसाचीं लांकडें उभीं करण्याच

हुकूम देऊन दंवडीवाल्यास सांगितलें कीं, ' शहरभर दंवडी पिटा कीं, मुसलमानाचा जीव घेतल्याबद्दल एका ख्रिती मनुष्यास राजा फांशीं देत आहे. सर्वांस कळावें. '

नंतर कोतवालाच्या शिपायांनीं कैद्यास तुरुंगांतून आणून फांशीं देण्याच्या जागीं नेलें. मग मांगानें त्याच्या गळ्याला दोरी बांधून त्यास तो टांगणार, इतक्यांत राजाचा मुसलमान वाणी दाटींतून लोक दूर करीत करीत घाईनें पुढें आला, मांगाजवळ येऊन त्यास म्हणाला कीं, 'अरे, घाई करूं नको,या ख्रिस्ती सावकारानें हा खून केला नाहीं. मीं केला आहे. ' न्यायाधीश तेथेंच होता, त्यानें सवाल केल्यावरून आपण त्या कुबड्यास कसें मारिलें, याची साविस्तर हकीगत त्या वाण्यानें सांगितली, व आपण तो मुडदा गुप्तपणें रस्त्यांत एका दुकानास टेंकून ठेविला हेंही सांगितलें, आणि शेवटीं तो न्यायाधिशास म्हणाला कीं, ' तुम्हीं निरपराधी मनुष्याचा जिव विनाकारण घेत आहां. अरे, जो मेला त्याचा जीव पुन: कसा घेतां येईल ? मी एका मुसलमानाची हत्या केली, हेंच पातक माझ्या डोक्यावर पुष्कळ आहे. आतां आणखी निरपराधी ख्रिस्ती मारविण्याचें दुसरें कशास घेऊं ? '

याप्रमाणें सर्व लोकांसमक्ष त्या वाण्यानें आपल्या तोंडानें गुन्हा कबूल केल्यामुळें ख्रिस्ती सावकारास खुला करण्याविषयीं व त्या वाण्यास शिक्षा करण्याविषयीं हुकूम करणें न्यायाधिशास जरूर पडलें. त्या हुकुमाप्रमाणें ख्रिस्ती सावकारास सोडून वाण्याच्या गळ्यास फांस बांधून मांग त्यास वर चढाविणार, इतक्यांत यहुदी वैद्य दुरून ओरडून त्यांस म्हणाला कीं, ' अरे, थांब थांब, वाण्यास फांशीं देऊं नको. त्यानें खून केला नाहीं. मीं केला आहे. मला फांशीं दे. पहा, मी आलों. '

नंतर तो वैद्य न्यायाधिशापुढें उभा राहून त्यास म्हणाला कीं, ' आपण या मुसलमान वाण्यास देहांतशिक्षा देत आहां, परंतु याच्याकडे कांहींएक अपराध नाहीं ? खरा गुन्हेगार मी आहें. '

नंतर त्यानें घडलेली सर्व गोष्ट सांगितली, आणि तो म्हणाला, ' याप्रमाणें हा अपराध मजपासून घडला आहे. आतां हें खरें आहे कीं, या मनुष्याचा जीव मीं जाणूनबुजून घेतला नाहीं; मी सहज कारण झालों; तथापि आपल्या हातून घडलेल्या हत्येबद्दल दुसऱ्या निरपराधी मनुष्यास मरूं देऊन एकीचे जागीं दोन हत्यांचें पाप आपल्या माथीं घेणें बरें नाहीं, असा मी निश्चय करून आलों आहें; तर आपण पाहिलें तर मला फांशीं द्यावें. कारण, या मनुष्याच्या मरणास मजखेरीज दुसरा कोणी कारण नाहीं. '

मग यहुदी वैद्यानें गुन्हा केला अशी त्याच्या बोलण्यावरून न्यायाधीशाची खात्री होतांच, त्यानें मुसलमान वाण्यास मोकळा करून त्या वैद्यास फाशीं देण्यास मांगास हुकूम केला. नंतर त्याच्या गळ्यास तांत बांधून टांगणार इतक्यांत ' थांबा थांबा, असें दुरून मोठ्यानें ओरडत शिंपी गर्दीतून पुढें आला; आणि न्यायाधिशास म्हणाला कीं, ' महाराज, या निरपराधी मनुष्याचा आपण कां जीव घेतां ? स्वस्थ होऊन मी काय सांगतों हें ऐकून घ्या. म्हणजे वास्तविक गुन्हेगार कोण हें आपल्या ध्यानांत येईल. एका मनुष्याचा जीव घेतल्याबद्दल दुसऱ्याचा जीव घेणें जर आवश्यकच असेल, तर आपण माझा जीव घ्यावा. '

नंतर त्यानें त्याच्या दुकानीं ठेंगणा कुबडा आल्यापासून गोष्ट सविस्तर सांगितली; आणि म्हणाला कीं, ' यावरून आपली खात्री होईल कीं, यहुदी वैद्याकडे या गोष्टीचा अपराध कांहींएक नाहीं; तर आपण त्यास मोकळा करण्याविषयीं हुकूम द्यावा, आणि त्याच्या जागीं पाहिजेतर मला फांशीं द्यावें. '

त्या कुबड्याच्या मरणामुळें एकामागून एक असल्या चमत्कारिक गोष्टी झालेल्या पाहून न्यायाधिशास व तमासगिरांस मोठें आश्चर्य वाटलें. न्यायाधीश म्हणाला, ' बरें, ज्या अर्थी हा शिंपी गुन्हा मी केला असें आपल्या तोंडानें कबूल करीत आहे, त्या अर्थी त्यास शिक्षा करणें वाजवी होईल. आजच्यासारखी चमत्कारिक गोष्ट

मीं कधींही पाहिली नाहीं, किंवा ऐकिलीही नाहीं. ही गोष्ट लिहून ठेवण्यासारखी खरी.' नंतर मांगानें वैद्याच्या गळ्यांतून तांत सोडून शिंप्याच्या गळ्यास लाविली.

याप्रमाणें इकडे चमत्कार घडत असतां काशगरच्या राजाच्या वाड्यांत काय झालें तें ऐका. तो ठेंगणा कुबडा राजाच्या मोठा कृपेंतला होता, व तो मोठा थट्टेबाज व गमती असे, त्यामुळें दिवसांत दहापांच वेळां राजास त्याची आठवण झाल्यावांचून राहात नसे; यास्तव त्या दिवशीं सकाळीं राजास त्याची आठवण होऊन त्यानें त्यास बोलावून आणण्याकरितां चाकरास हुकूम केला असतां, एका हुजऱ्यानें उत्तर दिलें कीं, ' महाराज, सरकार ज्याची आठवण करीत आहेत, तो कुबडा काल संध्याकाळीं दारू पिऊन झिंगला होता, व त्या गुंगींत तो शहरांत फिरण्याकरितां वाड्याबाहेर गेला, तों आज पहांटेस मेलेला एका रस्त्यांत सांपडला. त्याच्या खुनाबद्दल कोतवालाच्या शिपायांनीं एक मनुष्य धरून आणला व न्यायाधिशापुढें त्या मनुष्यानें आपला गुन्हा कबूल केल्यावर त्यास मांग फांशीं देत होता, इतक्यांत दुसरा एक मनुष्य येऊन मीं हा गुन्हा केला, असें म्हणाला. मग त्या दुसऱ्या मनुष्यास बळी देणार, तों तिसरा आला व चवथा आला. जो जो मागून येतो, तो तो म्हणतो कीं, हा गुन्हा मागल्यानें नाहीं केला, मीं केला, मला फांशीं द्यावें. याप्रमाणें सकाळपासून चमत्कार चालला आहे. हल्लीं चवथ्या मनुष्याची चौकशी न्यायाधीश करीत आहे.'

ही गोष्ट ऐकून काशगरच्या राजानें आपल्या एका हुजऱ्यास हुकूम केला कीं, ' लौकर मोठ्या जलदीनें फांशीं देण्याच्या जागीं जा, आणि न्यायाधिशास सांग कीं, सर्व गुन्हेगार व कुबड्याचा मुडदा घेऊन वाड्यांत ये. मला त्या माझ्या बिचाऱ्या कुबड्यास एक वेळ पहावयाचें आहे.' मग राजाज्ञेप्रमाणें तो हुजऱ्या घोड्यावर बसून घोडा भरधांव पिटीत फांशीं देण्याच्या ठिकाणीं आला. इकडे मांग शिंप्याच्या गळ्यास तांत बांधून त्याच्या पायाखालची फळी

ओढीत होता, तों दुरून, थांब; थांब; फांशीं देण्याचें तहकूब कर. ' अशी राजाच्या हुजऱ्याची मोठी आरोळी त्यानें ऐकिली. मग तो फळी ओढतांना थांबला. हुजऱ्यानें राजाचा हुकूम न्यायाधिशास सांगतांच तो हुकुमाप्रमाणें कुबड्याचें प्रेत व गुन्हेगार घेऊन तत्काळ राजवाड्यांत गेला.

न्यायाधिशानें राजास साष्टांग नमस्कार घालून झालेला सर्व वृत्तांत त्यास निवेदन केला. तो वृत्तांत ऐकून राजास फारच नवल वाटलें, व त्यानें तो समग्र लिहून ठेवण्यास एका चिटणीसास आज्ञा केली, नंतर तो तेथें जमलेल्या लोकांस म्हणाला, ' अरे, माझ्या या कुबड्या दासाच्या प्रमाणें चमत्कारिक गोष्ट तुम्हांपैकीं कोणी तरी ऐकिली आहे काय ? ' ख्रिस्ती सावकारानें राजास भुईपर्यंत लवून सलाम करून उत्तर केलें, ' महाराज, मला एक गोष्ट ठाऊक आहे; असें मला वाटतें. हुकूम झाल्यास ती सांगण्यास मी तयार आहें. ती गोष्ट ऐकिली असतां, मनांत कळवळा आल्यावांचून राहावयाचा नाहीं.' राजा म्हणाला,'सांग पाहूं वरें,तुझी गोष्ट कशी काय आहे ती?'

नंतर ख्रिस्ती सावकारानें सांगितलेली गोष्ट ऐकून काशगरचे राजास ख्रिस्ती सावकाराचा फारच राग आला. तो त्यास म्हणाला, ' अरे मूर्खा, मला ऐकण्यास अयोग्य, अशी क्षुल्लक गोष्ट सांगून ती माझ्या कुबड्याच्या गोष्टींपेक्षां चांगली आहे कीं नाहीं, म्हणून तूं मला उलटून विचारतोस याची तुला लाज नाहीं वाटत ? माझ्या नकल्या कुबड्याच्या अद्भुत गोष्टींपेक्षां, रात्रंदिवस घडणारी एक तरुण स्त्री-लंपट मनुष्याची गोष्ट मला अधिक चमत्कारिक वाटेल असा मी तुला वेडा वाटलों काय ? तर त्या बिचाऱ्या कुबड्याबद्दल मी तुम्हां सर्वांस फांशीं देईन, हें तुम्ही पक्कें समजा. '

राजाचें रागाचें भाषण ऐकून मुसलमान वाणी फार भ्याला,आणि साष्टांग नमस्कार घालून राजास म्हणतो कीं, ' सरकारांनीं क्षणभर कोप शांत करावा, व सरकारचा हा बंदा सेवक गोष्ट सांगत आहे ती स्वस्थ चित्त करून मेहेरबानीनें ऐकावी; व ठेंगण्या कुबड्याच्या

गोष्टीपेक्षां ही गोष्ट सरकारांस विशेष मनोरंजक वाटल्यास, आम्हां सर्वांस सरकारांनीं जीवदान द्यावें.' राजानें उत्तर केलें, 'बरें, आहे तुझी विनंति आम्ही मान्य करितों. सांग पाहूं बरें, तुझी गोष्ट कशी आहे ती?'

नंतर मुसलमान वाण्यानें सांगितलेली गोष्ट ऐकून राजा म्हणाला, 'तुझी गोष्ट कांहीं अंशीं चमत्कारिक आहे खरी, तथापि माझ्या ठेंगण्या कुबड्याच्या गोष्टीची सर तिला येणें नाहीं.' मग यहुदी वैद्य पुढें झाला, आणि साष्टांग नमस्कार घालून राजास म्हणाला, 'महाराज, खावंदांनीं मेहेरबानी करून माझी गोष्ट ऐकिल्यास सरकारांस ती फार चमत्कारिक वाटेल यांत संशय नाहीं.' राजा म्हणाला, 'बरें आहे, सांग;पण ती माझ्या ठेंगण्या कुबड्याच्या गोष्टी-सारखी अद्भुत नसल्यास तुझा जीव वांचावयाचा नाहीं.'

यहुदी वैद्यानें सांगितलेली गोष्ट ऐकून काशगरचा राजा म्हणाला कीं, 'वैद्यबाबा, तुमची गोष्ट बरीच आहे, हें मी कबूल करतों; पण खरें म्हणाल तर माझ्या कुबड्याच्या गोष्टीप्रमाणें मौजेची ही गोष्ट नाहीं. या गोष्टीवरून तुम्हांस जीवदान मिळेल, अशी खोटी आशा धरूं नका; तुम्हां सर्वांस मीं फांशीं देणार, ही पक्की खात्री ठेवा.' इतक्यांत शिंपी पुढें सरून मुजरा करून राजास म्हणाला, 'महाराज, क्षणभर दम धरावा. सरकारांनीं ज्या अर्थीं मेहेरबानी करून इतरांच्या गोष्टी ऐकिल्या, त्याअर्थीं माझीही गोष्ट ऐकावी. ही गोष्ट सरकारांस विशेष रुचेल असें मला वाटतें.' राजानें उत्तर केलें, 'बरें आहे. सांग तुझी गोष्ट. परंतु माझ्या कुबड्याच्या गोष्टी-पेक्षां तुझी गोष्ट चमत्कारिक असल्याखेरीज तुझा जीव वांचणें नाहीं. हें मात्र पक्कें समज.' नंतर शिंप्यानें पुढील गोष्ट सांगावयास आरंभ केला.

*



तुम्हां सर्वांस मी फाशीं देणार ही पक्की खात्री ठेवा. [पान १६२

# शिंप्यानें सांगितलेली गोष्ट.

शिंपी म्हणतो महाराज, दोन दिवस झाले, या शहरांतील एका व्यापाऱ्यानें मला आपल्या घरीं मेजवानीस बोलावलें होतें. मी लवकरच त्याचे घरीं गेलों. तेथें वीस गृहस्थ जेवावयाला आले होते.

घरचा यजमान कांहीं निकडीचे कामामुळें बाहेर गेला होता; त्याची वाट पाहात आम्हीं सर्व मंडळी बसलों होतों. इतक्यांत तो बाहेरून आला. त्याबरोबर एक तरुण गृहस्थ होता. तो गृहस्थ या शहरचा राहणारा नव्हता. तो सुरेख, भव्य व प्रतिष्ठित दिसणारा असून त्याच्या अंगावरचा पोपाकही उंची होता. तो गृहस्थ पायानें अधू असल्यामुळें लंगडत असे. तो आलेला पाहून आम्हीं सर्व उठून उभे राहिलों, व त्या तरुण गृहस्थास बसावयास जागा दिली. तोही बसत होता, इतक्यांत आमच्या मंडळींत एक न्हावी बसला होता, तो त्याच्या नजरेस पडतांच तो तरुण गृहस्थ दचकून मागें सरला व बाहेर जावयास लागला. घरधन्यास या गोष्टीचा मोठा अचंबा वाटून त्यानें त्यास थांबवून धरिलें, आणि म्हटलें कीं, ‘ आपण एकाएकीं चालला कोठें ? मीं आज या मित्रमंडळींत मेजवानी करण्याचें योजून आपणांस या समारंभास बोलाविलें; व आपण बसला नाहीं व निघून चालला याचें कारण काय ? ’ तो तरुण गृहस्थ मोठ्या नम्रपणानें घरधन्यास म्हणाला कीं, ‘ तुम्हांस देवाची शपथ आहे, आपण मला अडवूं नका. मला लौकर येथून जाऊं द्या. मी तुमच्यापुढें पदर पसरतों. तो द्वाड न्हावी येथें बसला आहे, त्यास पाहिलें म्हणजे माझ्या अंगाची लाही होते. तो मनुष्य किती खराब आहे म्हणाल तर तें माझ्यानें सांगवतसुद्धां नाहीं ! ’

हें त्याचें भाषण ऐकून आम्हां सर्वांस मोठा विस्मय वाटला, व तो जें बोलला तें खरें किंवा खोटें याचा विचार केल्यावांचून त्या न्हाव्याविषयीं आमचें वाईट मत झालें. आम्ही सर्वजण म्हणालों कीं, ‘ हा न्हावी इतका खराब आहे तर त्याच्या

बरोबर आम्हीही जेवणार नाहीं.' घरधनी त्या तरुण गृहस्थास म्हणाला कीं, 'अहो, त्यास तुम्ही इतक्या शिव्या देतां, पण त्याच्या-वर तुमचा इतका रोष होण्यास कारण तरी काय झालें, तें आम्हांस सांगा.' त्या गृहस्थानें उत्तर केलें कीं, 'गृहस्थहो, कारण म्हणून काय सांगूं ? मी जो जन्माचा लंगडा झालों, त्याला कारण हा द्वाड न्हावी. या दुष्टानें मजवर असा भयंकर प्रसंग आणिला कीं, त्याचा भयंकरपणा सांगितल्यावांचून तुम्हांला कल्पनाही यावयाची नाहीं. त्यावरून मी अशी शपथ वाहून घेतली आहे कीं, हा दुष्ट न्हावी जेथें असेल तेथें कधींही बसावयाचें नाहीं. फार काय, पण हा ज्या गांवांत असेल, त्या गांवांतसुद्धां मी राहावयाचा नाहीं. बगदाद माझी जन्मभूमि. परंतु हा दुष्ट तेथें राहतो, एवढ्याच कारणानें तें शहर सोडून मी तार्तरी देशांतल्या या दूर शहरांत येऊन राहिलों. मनांत हेतु हा कीं, अशा दूर ठिकाणीं जाऊन राहिलों म्हणजे तरी या व्याधीचें दर्शन टळेल; पण हा द्वाड तर हात धुऊन माझ्या पाठीस लागला आहे ! असो. आतां मला येथें बसतां येत नाहीं; गेलें पाहिजे. तुम्हांसारख्या प्रतिष्ठित गृहस्थांबरोबर बसून जेवावें या गोष्टीचा मला फार संतोप आहे, व ती गोष्ट घडण्यास हा व्यत्यय आला, याचें मलाही फार वाईट वाटतें. परंतु काय करूं ? माझा उपाय नाहीं. मला गेलें पाहिजे. मी आजच्या आज हें तुमचें शहर सोडून जेथें या द्वाड न्हावगंडाचें दर्शन होणार नाहीं अशा कोठें तरी जाणार.' इतकें बोलून तो तरुण गृहस्थ जात होता; परंतु घरधन्यानें त्यास थोपवून धरून विचारलें कीं, 'या न्हाव्यानें असें केलें तरी काय, तें आपण कृपा करून सांगावेंच. तसेंच आम्हीं सर्वांनींही त्यास ती गोष्ट सांगण्याविषयीं पराकाष्ठेचा आग्रह केला. तेव्हां आमच्या सर्वांच्या मुरवतीस्तव तो गृहस्थ आपली गोष्ट सांगा-वयास खालीं बसला. हें सर्व भाषण चाललें असतां त्या न्हाव्यानें खालीं मान घातली होती. त्यानें तोंडावाटें एकसुद्धां शब्द काढला नाहीं, किंवा वर पाहिलें नाहीं. असो. त्या तरुण गृहस्थानें त्या न्हाव्याकडे पाठ करून आपली हकीकत सांगितली.

शिंपी गोष्ट सांगतो—महाराज, त्या तरुण लंगड्या गृहस्थाची गोष्ट ऐकून आम्हां सर्वांस मोठा विस्मय वाटला, व तो निघून गेल्यावर आम्हीं सर्व त्या न्हाव्यास म्हणूं लागलों कीं, 'त्या गृहस्थानें सांगितलेली गोष्ट खरी असल्यास त्यास तूं खचित् निष्कारण पीडा केलीस.' तो गृहस्थ गोष्ट सांगत असतां, न्हाव्यानें खालीं मान घातली होती ती वर उचलून तो आम्हांस म्हणाला, 'मित्रहो, तो तरुण मनुष्य आपली हकीकत तुम्हांस सांगत असतां मी उगीच बसलों, यावरून तुमच्या ध्यानांत आलेंच असेल कीं, तो, जें बोलला, तें सर्व खरें आहे. तथापि माझी पक्की समजूत आहे कीं, त्या प्रसंगीं मी जो वागलों, तो यथायोग्य वागलों. मी अगदीं गैरशिस्त केलें नाहीं; आणि माझी ही समजूत खरी आहे किंवा खोटी आहे, याचा निकाल तुम्हीच करा.तुम्हीच पहा बरें, तो प्रसंग त्याच्या जिवावरचा नव्हता काय? आणि माझ्या मदतीवांचून त्या संकटांतून त्याची सुटका झाली असती काय?तो जन्माचा लंगडा झाला खरा; पण खरोखर म्हटलें म्हणजे त्यानें हेंच मोठें नशीब मानावें कीं, जिवावर गुदरली होती, ती नुसत्या पायावरच गेली! पहा बरें, त्यास त्या घरांतून सोडण्याकरतां मी आपला प्राण केवढ्या धोक्यांत घातला होता तो! तर त्यानें मजवर ठपका ठेवून माझी इतकी निंदा करावी व मला इतक्या शिव्या द्याव्या, हें योग्य आहे काय? कृतघ्न मनुष्यावर उपकार केला असतां त्याचा परिणाम असाच होतो. तो तोंडाळपणाचा दोष मजवर लादतो; पण तें त्याचें बोलणें अगदीं खोटें आहे. आम्ही मूळचे पांच भाऊ होतों. त्या पांचांत मी अत्यंत बुद्धिवान् असून सर्वांत कमी बोलणारा आहे, अशी माझी चोहोंकडे कीर्ति आहे; आणि बडबड करणारा म्हणून तो मला नांवें ठेवतो, तेव्हां पुढें त्यास काय म्हणावें; मित्रहो, मी म्हणतों हें खरें कीं खोटें याविषयीं तुमची खात्री व्हावी, याकरितां तुम्हांस त्या सर्व भावांची व माझी हकीकत सांगतों. तुम्हीं कृपा करून माझ्या बोलण्याकडे लक्ष द्यावें.'

# न्हाव्याची गोष्ट.

महादयाळू व महाप्रख्यात असा मुस्तान्सर बिल्लाह्नामें कालिफ राज्य करीत असतां त्याच्या कारकीर्दींत मोठे बिलंदर दहा चोर माजले होते. त्यांनीं बगदाद शहरच्या आसपासच्या रस्त्यांवर फारच उपद्रव मांडला होता. त्यांनीं कित्येक गरीब वाटसरांस लुटलें व कित्येकांचे हाल केले. ही बातमी पातशाहाच्या कानावर गेल्यावर त्यानें शहरच्या कोतवालास बोलावून आणिलें, आणि ताकीद केली कीं, 'आतां लौकरच बैरामचा सण आला आहे. त्या सणाच्या आंत तुला ते दुष्ट दहाही चोर धरून आणिले पाहिजेत. तसें न झाल्यास सणाच्या दुसऱ्या दिवशीं तुझें डोकें उडवीन.' कोतवाल मोठा हुशार व धूर्त अंमलदार होता. त्यानें चोहोंकडे आपले गुप्त बातमीदार व शिपाई पाठविले; व त्यांनीं मोठी मेहनत करून त्या सणाच्या दिवशीं सकाळींच ते सारे चोर पकडून आणिले. त्याच दिवशीं सकाळचा मी तैग्रीस नदीच्या तीरावर हवा खात फिरत असतां, चांगला पोषाख केलेले दहा लोक नावेंत शिरतांना मला दिसले. त्यांच्या रखवालीस पाहारा होता, त्याकडे मीं लक्ष दिलें असतें, तर ते दहा असामी चोर आहेत असें मला कळलें असतें. परंतु त्या पाहारेवाल्यांकडे माझें लक्ष गेलें नाहीं; नुसते चोर मात्र मीं पाहिले, आणि हे कोणी गुळहौशी लोक सणाचा दिवस ख्यालीखुशालींत घालवावा म्हणून नावेंत बसून गमतीनें चालले आहेत असें मला वाटून मी त्याच नावेंत शिरलों. नंतर ती नाव जात जात पातशाहाच्या वाड्याजवळ थांबली. वाटेनें माझी चुकी माझ्या लक्षांत येऊन मला समजलें कीं, आपण ज्या लोकांबरोबर जात आहों, ते हे साव नव्हत; चोर आहेत. परंतु त्या वेळेस हें समजून उपयोग नव्हता. मग ती नाव राजवाड्याजवळ जाऊन पोहोंचतांच आम्हांस धक्क्यावर उतरवलें, व आमच्या सभोंवतीं नव्या पाहारेकऱ्यांचा वेढा पडला. त्यांनीं आमच्या मुसक्या बांधून आम्हांस पातशाहासमोर नेलें.

त्यांनीं त्या चोरांप्रमाणें माझ्याही मुसक्या बांधल्या पण मी चकार-शब्द बोललों नाहीं. कारण त्यांशीं बोलाचाली करून किंवा धिंगामस्ती करून कांहीं उपयोग होण्याचा संभव नव्हता. तसें मीं केलें असतें तर त्यांनीं माझेच उलट हाल केले असते. मी चोरांत होतों, व ती गोष्ट मीही चोरच आहे असें समजण्यास त्यांस पुरे होती; कारण ते लोक अगदीं पशूंसारखे असतात;त्यांशीं वादविवाद करून काय फायदा?

आम्हांस पातशाहापुढें उभें करून, 'हे ते प्रसिद्ध दहा चोर आहेत व हे कोतवालांनीं धरून हुकुमाप्रमाणें सरकारांकडे पाठविले आहेत,' असें पाहरेकऱ्यांच्या जमादारानें सांगतांच, 'या सर्व दुष्टांचीं डोकीं उडवा' म्हणून पातशाहानें हुकूम केला. नंतर अप-राध्यांचीं डोकीं उडवण्याचें काम ज्याच्याकडे होतें, त्यानें आम्हांस एका ओळीनें उभें केलें, व माझें आयुष्य सबळ म्हणून मला सगळ्यांच्या शेवटीं उभें केलें.नंतर पहिल्यापासून दहा जणांचीं डोकीं उडवून तो थांबला. त्यानें माझें डोकें तोडलें नाहीं, हें पाहून पातशाह रागानें त्यास म्हणाला, 'अरे मूर्खा, या साऱ्या दहाही चोरांचीं डोकीं उडवावयास तुला मीं हुकूम केला असतां नवांचींच डोकीं तोडून उगाच कां राहिलास? हा दहावा का कोणी तुझा भाऊबंद आहे?' डोकीं उडवणारानें नम्रपणानें उत्तर केलें, 'सद्धर्मपालक राजाधिराज, हा दास आपला हुकूम कसा तोडील? महाराज, जमिनीवर पडलेलीं दहा डोकीं व धडें सरकारांनीं पहावीं. हुकूम झाल्यास या अकराव्याचेंही डोकें उडवतों. सरकारचा हुकूम झाल्यास मी आपल्या बापावरसुद्धां वार टाकावयास अनुमान करणार नाहीं, मग इतरांची कथा काय?' पातशाहानें मोजलीं तों दहा डोकीं तोडलीं होतीं खरीं. मग मजकडे त्यानें मोठ्या आश्चर्यानें पाहिलें, आणि माझी मुद्रा चोरासारखी दिसत नाहींसें पाहून तो मला म्हणाला, 'अरे भल्या म्हाताऱ्या, या दुष्टांत तूं रे कसा सांपडलास?' मीं उत्तर केलें, 'सद्धर्मपालक महाराज, मी आपली खरी हकीकत सांगतों. सरकारांनीं मेहेरबानी करून ऐकावी. आज

सकाळीं मी नदीच्या कांठीं सहज फिरत असतां हे दहा चोर, ज्यांस सरकारांनीं नुकतीच यथायोग्य शिक्षा केली, त्यांस नावेंत बसतांना पाहिलें, आणि हे कोणी गृहस्थ आज सणाचा दिवस ख्यालीखुशालींत घालवण्याकरतां चालले आहेत, असें समजून मीही त्यांच्याबरोबर नावेंत शिरलों.'

हें माझें भाषण ऐकून पातशाहास मोठें हंसूं कोसळलें. मग तो मला म्हणाला, 'अरे गृहस्था, तुझें शहाणपण व मौन धरण्याचें तुझें सामर्थ्य हीं मोठीं अपूर्व आहेत. असा जिवावरचा प्रसंग आला तरी उगीच राहिलास! शाबास तुझी!' न्हावी आपल्या ऐकणारास म्हणतो—महाराज, मौन धरण्याबद्दल मला वाहवा देणारा पातशाह खरा म्हणतां, कीं वटवट करण्याचा ठपका मजवर ठेवणाऱ्या त्या लंगड्या तरुण मनुष्यास खरा म्हणतां? असो. मग मी पातशाहास उत्तर केलें कीं, 'ज्या प्रसंगीं दुसऱ्या मनुष्यांनीं बोलण्याविषयीं अत्यंत उत्कंठा दाखविली असती, त्या प्रसंगीं मीं आपली जीभ आवरून धरली, याचा सरकारांनीं मोठा विस्मय करूं नये. जीभ आपल्या आळ्यांत ठेवण्याचा मी मुख्यत्वेंकरून अभ्यास केला आहें, व या उत्तम गुणावरूनच मला लोकांत प्रतिष्ठादायक "मौनधारी" असें नांव मिळालें आहे. आम्हीं पांचजण भाऊ आहों; पण हा गुण त्या सर्वांत नाहीं. माझ्या एकट्यामध्येंच आहे. हा गुण विद्येनें मला शिकविला. सारांश, मला जी एवढी प्रतिष्ठा व सौख्य हीं प्राप्त झालीं आहेत, त्याचें मुख्य कारण हा मौनाचा गुण होय.' पातशाहानें हंसून उत्तर केलें कीं, लोकांनीं तुला जें प्रतिष्ठादायक नांव दिलें आहे, त्यास तूं खराच योग्य आहेस. पण तुझे भाऊ कोणत्या प्रकारचे मनुष्य आहेत? ते तुझ्यासारखेच आहेत काय?' मीं उत्तर केलें, 'छेः! त्यांचें व माझें अगदीं सादृश्य नाहीं. ते सर्व पराकाष्ठेचे बडबड करणारे आहेत. दिसण्यांत देखील त्यांचा व माझा सारखेपणा नाहीं. त्यांच्या हकीकती ऐकल्यास ते कोणत्या प्रकारचे मनुष्य आहेत, हें सरकारच्या सहज ध्यानांत येईल. हुकूम

झाल्यास त्या हकीकती सांगण्यास हा बंदा हजर आहे.' मग त्या गोष्टी ऐकण्याविषयीं पातशाहाची खुषी दिसल्यावरून मी त्या गोष्टी सांगण्यास आरंभ केला.

---

## न्हाव्याच्या पहिल्या भावाची गोष्ट.

महाराज, माझ्या पाहिल्या भावाचें नांव बाक्बक्. तो अंधळा होता व त्या बिचाऱ्यास दैव प्रतिकूळ असल्यामुळें पोट भरण्याकरितां दारोदार भीक मागावी लागे. तो शहरांत पुष्कळ वर्षें राहिल्यामुळें त्यास सर्व रस्ते व गल्ल्या माहीत होत्या. त्यास कोणी वाट दाखवावयास लागत नसे. त्याची रीत अशी होती कीं, त्यानें लोकांचें दार ठोठवावें व कोणी येऊन तें उघडीतोंपर्यंत 'कोण दाराशीं आहे?' म्हणून आंतून विचारल्यास त्यानें उत्तर देऊं नये.

एक दिवस तो एका घराचें दार ठोठावीत असतां, त्या घराच्या मालकानें 'कोण दाराशीं आहे?' म्हणून आंतून विचारलें. माझ्या भावानें आपल्या रीतीप्रमाणें उत्तर न देतां पुनः दार ठोठावलें. 'दार कोण ठोठावीत आहे?' म्हणून घराच्या धन्यानें पुनः विचारलें; परंतु बाक्बकानें उत्तर न देतां आणखी दारावर धक्का दिला. तेव्हां घरधनी दुसऱ्या मजल्यावर होता, तो जिना उतरून खालीं आला आणि दार उघडून 'तूं काय म्हणून दारावर धक्का देतोस?' असें त्यानें माझ्या भावास विचारलें. बाक्बकानें उत्तर केलें, 'महाराज, मी गरीब भिक मागावयास आलों आहें; तर आपण मला कांहीं तरी द्यावें.' घरधनी म्हणाला, 'तूं अंधळा दिसतोस.' माझ्या भावानें 'होय महाराज' म्हणून उत्तर केलें. घरधनी बोलला, 'तुझा हात पुढें कर.' हा कांहीं देत आहे, असें वाटून माझ्या भावानें हात पुढें केला; परंतु घरधन्यानें त्यास कांहीं न देतां त्याचा हात धरून त्यास माडीवर नेलें. बाक्बकास वाटलें कीं हा आपणांस कांहीं खावयास देण्याकरितां माडीवर नेत आहे; कारण कांहीं लोक

त्यास माडीवर आपल्या बिऱ्हाडीं नेऊन जेऊं घालीत असत. असो. घरधन्यानें माझ्या भावास माडीवर नेल्यावर हात सोडून दिला, आणि तो पलीकडे जाऊन बसला; आणि पुनः माझ्या भावास विचारूं लागला कीं, ' तूं येथें कां आलास ? तुला काय पाहिजे ?' बाकूबकानें उत्तर केलें, ' मी भिकारी आहें, व ईश्वर आपणास बुद्धि देईल, त्याप्रमाणें आपण मला कांहीं धर्म करावा, असें माझें मागणें आहे. ' घरधन्यानें उत्तर केलें कीं, "ईश्वर कृपा करून तुला डोळे देवो, असा मी तुला पूर्ण आशीर्वाद देतों. याखेरीज तुला द्यावयास मजजवळ कांहीं नाहीं. ' माझा भाऊ म्हणाला, ' अहो, असें जर होतें तर तें दाराशींच कां सांगितलें नाहींत ? मला वर चढून येण्याची मेहनत तरी फुकट कां दिलीत ?' घरधनी बोलला, ' अरे तूं इतक्या भलेपणाच्या गोष्टी दुसऱ्यास सांगतोस; पण मी तुला विचारतों कीं, तूं माझ्या दारावर पहिल्यानें धक्का दिलास त्या वेळीं 'कोण दार वाजवतो' म्हणून तुला विचारलें असतां तूं जबाब कां नाहीं दिलास ? तूं लोकांना आपलें काम टाकून तुला दार उघडण्याची तसदी कां बरें देतोस ? बाकूबकानें विचारलें, ' महाराज, बरें; पण आपण मला कांहीं धर्म घालतां कीं नाहीं ? ' घरधनी म्हणाला, 'तुला मी एकच उत्तर सांगतो कीं, तुला द्यावयाला मजपाशीं कांहींएक नाहीं. ' माझा भाऊ पुनः बोलला, ' बरें; पण महाराज, मला वर आणलेंत तसें खालीं तरी नेऊन पोंचवा म्हणजे झालें. ' घरधन्यानें उत्तर केलें, ' जिना मोकळा आहे. हवा तर जा खालीं एकटा. ' नंतर माझा भाऊ चांचपत चांचपत जिना शोधून खालीं उतरूं लागला; पण मध्यें त्याचा पाय चुकून तो अर्ध्या जिन्यांतून खालीं पडला. त्यामुळें त्याचें डोकें ठेंचलें व कंबरेंत लचक भरली. मग तो कण्हतकुंथत उठून घरधन्यास शिव्या देत रस्त्यानें चालता झाला. तो असा पडला तरी तो निष्ठुर घरधनी त्यास उठवावयास आला नाहीं. उलट मोठ्यानें हंसूं लागला.

बाकबक् रस्त्यानें शिव्या देत चालला असतां त्याच रस्त्यानें त्याचे सोबती दुसरे दोन अंधळे चालले होते, त्यांनीं स्वरावरून त्यास ओळखून 'तुला आज काय मिळालें?' म्हणून विचारलें. त्यानें उत्तर केलें कीं मला आज सगळ्या दिवसांत कांहीं मिळालें नाहीं.' आणि त्यानें आपण जिन्यांतून पडल्याचा मजकूरही त्यांस कळवून असें म्हटलें कीं, गड्यांनो, चला आतां घरीं जाऊं, म्हणजे आपली समाईक जी शिल्लक आहे, तींतून कांहीं पैशाचें कांहीं विकत घेऊन मी खाईन. मला फार भूक लागली आहे.' त्यावरून ते तिघेही अंधळे आपल्या बिऱ्हाडाकडे चालते झाले.

या प्रसंगी वाचणारांस इतकें कळविलें पाहिजे कीं, ज्या घरांत बाक्बक् जिन्यांतून पडून त्याला दुखापत झाली, त्या घरांतला तो मालक चोर असून त्याचा स्वभाव फार दुष्ट होता. बाक्बक् व त्याचे सोबती दुसरे दोघे अंधळे यांचें इतक्यांत सांगितलेलें भाषण त्या दुष्ट मनुष्याच्या घराजवळ झालें, तें सर्व त्यानें आपल्या माडीवरून ऐकलें होतें. मग तोही खालीं येऊन निमूटपणें त्यांच्या मागून चालला. ते आंधळे एका म्हाताऱ्या बाईच्या घरीं बिऱ्हाडानें रहात असत. ते त्या आपल्या खोलींत शिरल्यावर हा चोरही गुपचीप त्यांच्या मागून शिरला. मग खालीं बसल्यावर बाक्बक् आपल्या सोबत्यांस म्हणाला कीं, 'गड्यांनो, आधीं दार बंद करून येथें कोणी परका आला नाहींना, याचा शोध केला पाहिजे.' हें त्याचें बोलणें ऐकून तो चोर चपापला, व पुढें आतां काय करावें याची त्यास पंचाईत पडली. परंतु इतक्यात त्या खोलींत मध्यभागीं वरच्या बहालाला एक टांगलेला जाड सोल त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां त्यास धरून तो अधांतरीं लोंबकळत राहिला. इकडे अंधळ्यांनीं दार बंद करून आपल्या काठ्यांनीं सर्व खोलीभर चांचपून पाहिलें. मग कोणी तिऱ्हाईत त्या ठिकाणीं नाहीं, असें त्यास वाटून ते पुनः खालीं बसल्यावर बाक्बक् त्यांस म्हणतो, 'मित्रांनो, आपण धंद्यावर जो पैसा मिळवतो, त्याचा जामदार तुम्हीं मला केलें आहे,

तर तुम्हीं मजवर जें काम विश्वासानें सोंपाविलें आहे, त्यास मी योग्य आहे, असें तुमच्या प्रत्ययास आणून देणें माझा धर्म आहे. तर गड्यांनो, पहा कीं मागल्या वेळीं आपण आपली शिल्लक मोजली, त्या वेळीं आपणाजवळ दहा हजार पैसे होते, व त्यांच्या दहा थैल्या करून आपण ठेवल्या होत्या. आजपर्यंत ती सर्व शिल्लक जशीची तशी राहिली आहे. त्यांतून एक छदामसुद्धां खर्चला नाहीं.' असें बोलून, गुप्तपणें चिंध्यांच्या ढिगाखालीं थैल्या लपवून ठेवल्या होत्या, त्या काढून त्यानें मोठ्या डौलानें आपल्या मित्रापुढें टाकल्या, आणि तो त्यास म्हणाला कीं, 'गड्यांनो, ही पहा आपली शिल्लक. मी म्हणतों, त्याप्रमाणें ती आहे कीं नाहीं, हें तुम्ही हवें तर मोजून पहा.' त्याच्या सोबत्यांनीं उत्तर केलें, 'मित्रा, आमचा तुझ्यावर पूर्ण भरंवसा आहे, मोजण्याची कांहीं गरज नाहीं.' मग बाक्बकानें एक पिशवी सोडून तींतून दहा पैसे काढले व त्याच्या सोबत्यांनींही दहा दहा पैसे घेतले.

नंतर बाक्बकानें त्या पिशव्या जेथल्या तेथें नेऊन ठेवल्यावर त्याच्या दोघां सोबत्यांपैकीं एकजण म्हणाला कीं, 'मित्रांनो, आजरात्रीच्या खाण्याकरतां पैसा खर्चण्याची गरज नाहीं. मला गांवांत आज बरेंच अन्न मिळालें आहे, तें आपणां सर्वांस पुरेल.' असें म्हणून त्यानें आपल्या झोळींतून भाकरीचे तुकडे, तोंडीं लावण्याचे पदार्थ, कांहीं फळें, वगैरे पुष्कळ सामान काढलें. नंतर ते सर्व जेवावयास लागले. तो चोर त्यांचें बोलणें चाललें असतां माझ्या भावाशेजारीं बसला होता. त्यानेंही खावयास आरंभ केला. त्यास दिसत असल्यामुळें तो झोळींतले चांगले चांगले पदार्थ निवडून खात असे. तो फार जपून गुपचिप खात होता, तरी बाक्बकास त्याचें तोंड वाजलेलें ऐकूं येऊन तो मोठ्यानें ओरडून म्हणाला, 'गड्यांनो, दगा झाला रे दगा झाला! आपणांत कोणी तरी परका खचीत येथें आहे.' असें बोलत असतां त्यानें आपला हात लांबवून चोराचा दंड पकडला आणि त्यास ओढून खालीं पाडून त्याच्या

अंगावर तो पडला, व 'चोर रे चोर!' म्हणून आरोळ्या मारूं लागला. याप्रमाणें गलबला चालला असतां बाक्बकानें त्या चोरट्यास बराच कुबलला. त्याचे सोबती दुसरे दोघे अंधळेही 'चोर! चोर! धांवा! धांवा!' म्हणून ओरडूं लागले, व त्या चोरास मारूं लागले. तो चोरही अंगानें चांगला बळकट असून फार चपळ होता, व त्यास दिसत असल्यामुळें त्यानेंही त्या अंधळ्यांचें चांगलें कांडात काढलें.; आणि 'चोर रे चोर!' म्हणून तोही त्यापेक्षां मोठ्यानें ओरडूं लागला!

हा गोंगाट ऐकून शेजारीपाजारी धांवून आले, व दार फोडून खोलींत शिरून पाहतात तों चौघांजणांची मोठी मारामारी व झोंबी चालली आहे. मग मोठ्या कष्टानें त्यांनीं त्यांस सोडवून एकमेकांपासून दूर केलें, आणि 'अरे बेट्यांनो, असे एकमेकांच्या बोकांडीस कां बसतां?' म्हणून लोक विचारूं लागल्यावरून, बाक्बकानें ज्या चोराचा दंड अद्यापि सोडला नव्हताच, त्याकडे वळून उत्तर केलें कीं, 'आम्हां गरीब दुबळ्यांचें जें यत्किंचित् द्रव्य आहे, तें चोरण्याकरितां हा द्वाड चोर गुपचिप आमच्या मागून आमच्या घरांत शिरला आहे व आम्हांसच उलट मारीत आहे.' चोर मोठा धूर्त व कावेबाज होता. त्यानें दार फोडून लोक खोलींत शिरलेले पाहतांच आपले डोळे गच्च मिटले, आणि अंधळ्याचें सोंग घेऊन तो जमलेल्या लोकांस म्हणूं लागला कीं, 'महाराज, हा अंधळा खोटें बोलतो. मी शपथ वाहून तुम्हांस सांगतों कीं, 'मी चोर नाहीं. त्यांच्यांतलाच मी एक आंधळा आहे. आम्हीं चौघेही कितीएक दिवस एकत्र रहात आहों, व आम्हीं सर्वांनीं आपलें मिळालेलें द्रव्य एके ठिकाणीं समाईक ठेविलें आहे. आज मी आपला वांटा मागूं लागलों असतां हे तिघेजण एकत्र होऊन मला मारूं लागले व माझें द्रव्य न देतां मला चोर म्हणतात. महाराज, आपण न्याय करून मज गरिबाचा वांटा मला देववावा.' लोकांनीं मनांत आणलें कीं, 'याचा तंटा आपण कोठें तोडीत बसावें? सरकारांत यांस गुदरावें

म्हणजे झालें.' मग त्यांनीं त्यांस कोतवालाच्या कचेरींत नेऊन दाखल केलें.

कोतवालापुढें गेल्यावर अंधळ्याचें सोंग घेणाऱ्या त्या चोरानें सवाल होण्याची वाट न पाहतां आपणच होऊन कोतवालास मोठ्या विनयानें म्हटलें कीं, 'धनीसाहेब, आपणांस सद्धर्मपालक पातशाहांनीं रयतेचा दाद लागण्याकरितां न्यायाधीश नेमिलें आहे. तर सरकारां-पुढें देवास स्मरून खरा मजकूर सांगतों, तिकडे लक्ष द्यावें. वास्त-विक म्हटलें म्हणजे आम्ही सर्वच गुन्हेगार आहों. परंतु आम्हीं सर्वांनीं अशी शपथ वाहिली आहे कीं, जेरबंदांनीं मारल्याशिवाय आपली गुप्त गोष्ट फोडावयाची नाहीं. तर आपणांस आमचा गुन्हा कळण्याची इच्छा असल्यास आम्हांस मार देण्याचा हूकूम करावा. सरकारची मर्जी असल्यास प्रथम मजपासून आरंभ करावा.' या प्रसंगीं बाकबक पुढें होऊन बोलूं लागला, परंतु कोतवालानें त्यास मना केलें व चोरांस जेरबंदांनीं मारण्याविषयीं शिपायांस हुकूम केला.

तो चोर मार खाऊन घटावलेला होता, त्यानें पंचवीसतीस फटके सोसले, नंतर पुढें मार सोसत नाहीं असें दाखवून त्यानें प्रथम एक डोळा हळूच उघडला व कांहीं वेळानें दुसराही उघडला. नंतर वेद-नेनें कळवळल्यासारखें करून तो मोठ्या दीनपणानें कोतवालास विनवूं लागला कीं, 'सरकार, मी गुन्हेगार खरा, पण मजवर दया करावी, आणि मला मारणें बंद करावें. मी सर्व खरा मजकूर आपल्यापाशीं निवेदन करतों.' त्यानें दोन्ही डोळे चांगले उघडले, हें पाहून कोतवालास मोठें नवल वाटलें. तो त्यास म्हणाला, 'अरे लुच्च्या, हें रे काय?' चोरानें उत्तर दिलें, 'महाराज, आपण माफी कराल तर आपणांस एक चमत्कारिक गुप्त गोष्ट कळवतों. पण महा-राजांनीं क्षमेची सूचक आपली बोटांतील आंगठी मला दिली पाहिजे; म्हणजे मला धीर येईल.'

कोतवालानें त्यास मारण्याचें बंद करण्याचा शिपायांस हुकूम

करून व क्षमा करण्याचें वचन देऊन बोलण्यास सांगितलें असतां, तो म्हणाला, 'महाराज, खरेंच विचाराल तर मी व माझे हे तिघे सोबती हे आम्ही चांगले डोळस आहों. आम्हां सर्वांस उत्तम प्रकारचें दिसतें. आम्हीं सर्वांनीं अंधळेपणाचें ढोंग करण्यांत आमचा हेतु इतकाच कीं, आम्हांस लोकांच्या घरांत पाहिजे तिकडे खुशालपणीं जातां यावें. हें सोंग केल्यानें आम्ही जनानखान्यांतसुद्धां बेधडक जातों. कारण आम्ही अंधळे, आम्हांस दिसत नाहीं, असें समजून लोक आम्हांस हरकत करीत नाहींत. महाराज, आणखी दुसरी एक गोष्ट आपणांस कळवितों कीं, आम्हीं चौघांनीं अशा ढोंगानें सुमारें दहाहजार पैसे जमविले आहेत. आज सकाळीं मी या आपल्या सोबत्यांजवळ आपल्या वांटयाचे अडीच हजार पैसे मागूं लागलों असतां त्यांस वाटलें कीं, हा आतां आपल्या मंडळींतून गेला असतां, आपली गुप्त गोष्ट उघडकीस आणील. आणि त्या धाकानें ते मला माझा वांटा देईनात. मग मीं फार हट्ट धरला तेव्हां तिघेही मज एकट्यावर तुटून पडले आणि त्यांनीं मज गरिबाला पुष्कळ मारलें. मी म्हणतों हें खरें कीं खोटें, तें ज्या भल्या गृहस्थांनीं तेथें येऊन मला सोडविलें त्यांस विचारावें म्हणजे समजेल. तर महाराज, माझा इनसाफ करून माझा वांटा मला मिळेसा करणें सरकाराकडे आहे. आतां माझ्या या सोबत्यांनींही आपला गुन्हा कबूल करावा अशी सरकारची इच्छा असल्यास, माझ्याप्रमाणें त्यांसही जेरबंदाचें सुख दाखवावें म्हणजे खचीत ते आतां कबूल होतील, व झटदिशीं डोळे उघडतील. कदाचित् तफावत इतकीच पडेल कीं, मला एक कोरडा पुरला असला, तर त्यांस तीन चार लागतील.'

बाक्बक् व दुसरे दोघे अंधळे कोतवालास म्हणूं लागले कीं, 'महाराज, हा मनुष्य बोलला हें सर्व खोटें आहे. यांत एक अक्षरसुद्धां खरें नाहीं.' परंतु कोतवाल त्यांस बोलूं देईना. तो म्हणाला, 'अरे लुच्च्यांनो, तुम्ही असें अंधळेपणाचें ढोंग करून धार्मिक लोकांस लुबाडतां काय?' बाक्बक् म्हणाला, 'सरकार, तो चोर खोटें

बोलतो. आम्हीं तिघेही खरोखर अंधळे आहों. आम्हीं याबद्दल शपथा वाहतों.'

याप्रमाणें तो पुष्कळ बोलला, परंतु त्याच्या बोलण्याकडे कोतवालानें अगदीं लक्ष न देतां त्या तिघांस कोरडे मारण्याविषयीं शिपायांस हुकूम केला. नंतर शिपाई त्यांस मारूं लागले, तेव्हां हे आतां डोळे उघडतील, असें सर्वांस वाटूं लागलें, परंतु ते जन्माचेच अंधळे, ते कितीही मारलें तरी डोळे कोठून उघडतात? परंतु कोतवालास तसें वाटेना. त्यास वाटलें कीं, ते लुच्चेगिरीनें व हट्टानें तसें करतात. शिपाई त्या बिचाऱ्यास कोरडे लगावीत असतां तो धूर्त चोर त्यांस एकसारखा म्हणत असें कीं,'अरे भल्या माणसांनों, डोळे उघडा. उगींच हट्टास पेटून जिवाचे हाल कां करून घेतां? तुम्हीं डोळे उघडल्यावांचून सरकार तुम्हांस सोडील असें वाटतें काय?' नंतर मारानें ते अगदीं बेदम झाले असें पाहून तो दुष्ट चोर कोतवालास म्हणूं लागला, 'महाराज, मला यांच्या हट्टावरून खचित दिसतें कीं, हे मरतील पण डोळे उघडून आपला गुन्हा कबूल करणार नाहींत. तर माझी सरकारांस अशी विनंति आहे कीं, इतका वेळ मार बसला ही शिक्षा यांस पुरे आहे. यांस आतां सरकारांनीं क्षमा करावी व यांनीं लपवून जे दहा हजार पैसे ठेवले आहेत, ते आणण्याकरतां आपला एक माणूस द्यावा म्हणजे मी तें द्रव्य दाखवितों.'

कोतवालास ती गोष्ट मान्य होऊन त्यानें एक चाकर देऊन त्या चोरास पाठविलें, व त्यानें पैशांनीं भरलेल्या दहा पिशव्या कचेरींत आणल्या. नंतर त्या पैशांतून अडीच हजार पैसे चोरास देऊन बाकीचें सर्व द्रव्य कोतवालानें घेतलें व बाकबक व त्याचे सोबती यांस शहराबाहेर हांकून देण्याचा हुकूम केला.

न्हावी पातशाहास सांगतो—महाराज, पुढें मला बाकबकावर असा प्रसंग आल्याचें समजतांच मी त्याचा शोध करून त्यास भेटलों. त्यानें आपलीं सर्व हकीकत मला निवेदन केली, व मलाई

त्याची कींव येऊन त्यास मी गुप्तपणें शहरांत आणलें. मी स्वतः जर गेलों असतों तर माझ्या भावाकडे अगदीं अपराध नाहीं, अशी मी कोतवालाची खात्री करून दिली असती, व त्या चोरासही शिक्षा करविली असती. परंतु या कामांत शिरलें असतां कदाचित् आपणावरच एकादें बालंट आलें तर काय करावें, या भीतीनें मी तसें करण्यास प्रवृत्त झालों नाहीं. महाराज, याप्रमाणें माझ्या पहिल्या भावाची हकीकत आहे.

ही गोष्ट ऐकून पातशाहास पुष्कळ हसूं आलें. नंतर मला कांहीं बक्षिस देण्याविषयीं त्यानें चाकारास हुकूम केला. परंतु मी तिकडे लक्ष न देतां आपल्या दुसऱ्या भावाची गोष्ट सांगावयास प्रारंभ केला.

---

## न्हाव्याच्या दुसऱ्या भावाची गोष्ट.

महाराज, माझ्या दुसऱ्या भावाचें नांव अल्कूज. तो एकाक्ष होता. त्याचा तो डोळा कसा गेला, हें सरकारास मी त्याची जी आतां गोष्ट सांगणार आहे, तीवरून समजेल. अल्कूज हा खाटकाचा धंदा करीत असे. तसेंच त्यास टकरा खेळणारे एडके तयार करण्याचें कसब चांगलें माहीत होतें. यामुळें शहरांतील कितीएक थोर लोकांशीं त्याची ओळख झाली होती व स्नेह झाला होता. कारण त्या लोकांस एडक्याच्या टकरा लावण्याचा नाद असे, व ते आपल्या घरोघर एडके पाळीत असत; व त्यांस तरबेज करण्याकरतां अल्कूज यास बोलावीत असत. तसेंच त्याचा खाटिकपणाचा धंदाही चांगला चालला होता. त्याच्या दुकानांतल्यासारखें उत्तम व छानदार मांस सगळ्या शहरांत दुसऱ्या कोठें मिळत नसे; कारण तो पैसेवाला असल्यामुळें पडेल ती किंमत देऊन नामी माल सर्व काळ जवळ राखीत असे.

एक दिवस अल्कूज दुकानावर बसला असतां एक म्हातारा तेथें आला. त्याची दाढी लांब असून पांढरी झाली होती, व तो दिस-

ण्यांत मोठा भव्य व प्रतिष्ठित होता. त्यानें अल्कुजाजवळून तीन शेर मांस विकत घेऊन त्यानें सांगितल्या दरानें त्यास पैसा दिला. या म्हाताऱ्यानें जें नाणें दिलें, तें फारच सुरेख असून नवें दिसत होतें; यामुळें माझ्या भावानें तें पेटींत वेगळें ठेवलें. पुढें पांच महिनेपर्यंत दररोज तो म्हातारा मनुष्य माझ्या भावाच्या दुकानीं येत असे व नित्य तितकेंच मांस घेऊन तसलेंच सुरेख नाणें त्यास देत असे. माझा भाऊही तें सर्व पेटीच्या निराळ्या खणांत सांचवून ठेवीत असे. पुढें एके दिवशीं अल्कूजास कांहीं मेंढरें विकत घ्यावयाचीं होतीं, व त्यांची किंमत देण्याकरितां दुसरे पैसे नव्हते, यामुळें त्यानें तें सुरेख नाणें खर्च करण्याचें योजून तें जींत ठेवलें होतें, ती पेटी उघडली, आणि पाहतो तों आंत नाण्याच्या जागीं पानाच्या वाटोळ्या तुकड्यांची चवड पडली आहे! तें पाहून त्यास केवढें आश्चर्य झालें असेल, व किती दुःख वाटलें असेल, तें सरकारांनींच मनांत आणावें. मग तो दुःखानें डोकें बडवून घेऊं लागला, व 'हाय हाय! बुडालों!' म्हणून मोठ्यानें आक्रोश करूं लागला. तो त्याचा गलबला ऐकून शेजारीपाजारी गोळा होऊन 'हाय हाय कां करतां? झालें तरी काय?' म्हणून त्यास विचारूं लागले. तेव्हां त्यानें रुपयांचीं पानें झाल्याचा मजकूर त्यांस कळवून ते पानांचे तुकडे दाखविले. तें पाहून त्यांसही यासारखा मोठा अचंबा वाटला. इतक्यांत माझा भाऊ कळवळून म्हणाला कीं, 'काय हो सांगूं! ईश्वर करील आणि तो लुच्चा थेरडा जर इतक्यांत येईल तर त्याची खोडच मोडून टाकीन. त्या ठकाची यावयाची हीच वेळ!' असे शब्द त्याच्या तोंडावाटें निघावयास व तोच म्हातारा मनुष्य दुरून येतांना दिसावयास एकच गांठ पडली. त्यास पाहतांच अल्कूज मोठ्या त्वेषानें त्याच्या अंगावर धांवून गेला, आणि त्याचा हात पकडून भोंवतालीं जमलेल्या लोकांस मोठ्यानें ओरडून म्हणाला कीं, 'महाराज, ऐका हो ऐका, याच थेरड्या ठकानें मला कसें बुडवलें तें!' आणि 'मित्रहो, मला मदत करा,' असें म्हणून

त्यानें नाण्यांचे पानांचे तुकडे झाल्याची गोष्ट त्या लोकांस सांगितली. त्याची गोष्ट संपल्यावर तो म्हातारा काडीमात्रही न गांगरतां माझ्या भावास म्हणाला, 'अरे, तूं मला सोडून दे; माझ्या वाटेस जाऊं नको. इतक्या लोकांत तूं माझी अब्रू घेतलीस खरी, तथापि मी या वेळेस तुझी गय करतों. मी म्हणतों हें ऐक; त्यांत तुझें कल्याण आहे. पण जर हट्ट धरशील आणि मला तुझें वर्म काढावयास लावशील, तर ती गोष्ट तुला फारच भोंवेल; याचा पुरा विचार कर.' माझा भाऊ म्हणाला, 'जा जा; तूं काय माझें वर्म काढणार आहेस! मीं जर कांहीं वाईट केलें असेल, किंवा करीत असेन, तर मला भय! बोल बोल, काय बोलतोस तें ऐकूं बरें? मी असल्या भेडवण्यानें भिणारा नव्हे!' म्हातारा म्हणाला, 'हं हं एकूण बोलूंच का तर आपलें वर्म?' असें म्हणून लोकांकडे वळून त्यांस तो बोलला कीं, 'अहो भले गृहस्थ हो, तुम्हांस ठाऊक आहे का, हा द्वाड खाटिक बकऱ्याचें मांस म्हणून माणसांचें मांस तुम्हांस विकतो हें?' माझा भाऊ म्हणाला, 'अहो, हा थेरडा लुच्चा आहे. हा खोटें बोलतो.' म्हातारा लोकांस म्हणाला, 'बाबांनो, मीं म्हणतों तें अगदीं खरें आहे. आणि माझ्या बोलण्यावर तुमचा विश्वास पटत नसल्यास तुम्हीच याच्या दुकानीं जा आणि तेथें आतां कापलेल्या माणसाचें धड उलटें टांगलें आहे कीं नाहीं तें पहा म्हणजे तुमची खात्री होईल.'

न्हावी पातशाहास गोष्ट सांगतो—महाराज, त्या दिवशीं सकाळीं माझ्या भावानें पैशाची पेटी उघडण्यापूर्वी एक बकरें मारून व त्याचें कातडें काढून तें दुकानांत उरफाटें टांगून ठेवलें होतें. त्यावरून तो लोकांस म्हणाला कीं, 'अहो, हा थेरडा मजवर हें भलतेंच तुफान घेत आहे; हा बोलतो यांत कांहीं खरें नाहीं.' याप्रमाणें माझ्या भावानें पुष्कळ सांगितलें, पण त्या भोळसट लोकांस तें खरें वाटेना. हा खाटीक माणसें कापून त्याचें मांस लोकांस खावयास विकतो, हा आरोप ऐकून त्यांचीं अंतःकरणें अगदीं खवळून गेलीं

व म्हाताराही मोठ्या खात्रीनें बोलत होता, व तो म्हणतो तें खरें किंवा खोटें याचा प्रत्यय घेणें अगदीं सोपें होतें; यासाठीं ते सर्व लोक मोठ्या उत्कंठेनें माझ्या भावाच्या दुकानीं आले, आणि पाहतात तों तेथें मनुष्याचें धड खरोखरीच उलटें टांगलें आहे, असें त्यांच्या दृष्टीस पडलें ! कारण, तो म्हातारा मनुष्य मोठा मांत्रिक होता. त्यानें पूर्वीं माझ्या भावाचे डोळे भारून त्यास जसें पानांच्या तुकड्यांचें नाणें करून दाखविलें, तसेंच त्यानें आपल्या मंत्रसामर्थ्यानें त्या सर्व लोकांचे डोळे भारल्यामुळें खरें बकरें असतांही तें माणूस दिसूं लागलें !

तसें झाल्यावर मग काय विचारतां ? माझ्या भावाच्या शेजारीं जो एक तमासगीर उभा होता त्यानें रागानें त्यास एक बळकट गुद्दा चढवून म्हटलें कीं, 'अरे गाढवाच्या लेका, तूं याप्रमाणें माणसें मारून त्यांचें मांस आमच्याकडून खाववितोस काय ?' इतक्यांत त्या म्हाताऱ्या जादुगारानें माझ्या भावाच्या तोंडावर दुसरा जोराचा गुद्दा दिला. तो त्याच्या डोळ्यावर लागून त्याचा डोळा फुटला. याप्रमाणें तमासगिरांपैकीं ज्याला ज्याला म्हणून जवळ जावयास सांपडलें, त्यानें त्यानें त्या बापड्या अल्कुजाला लाथ, बुक्की, गुद्दा, ठोंसा असें कांहीं तरी मारलेंच; व इतक्यानेंही त्यांचें समाधान झालें नाहीं. त्यांनीं त्यास धक्के मारीत कोतवालाकडे नेलें व त्या अधिकाऱ्यापुढें, तें जादूच्या योगानें माणसाच्या धडासारखें दिसणारें बकऱ्याचें धड मुद्द्याकरतां ठेवलें. नंतर तो म्हातारा जादुगार पुढें होऊन मोठ्या गंभीरपणानें कोतवालास म्हणाला, 'सरकार,हा दुष्ट खाटीक आम्हीं आपणाकडे आणला आहे. हा माणसें कापून त्यांचें मांस बकऱ्यांचें मांस म्हणून विकतो. तर यास याच्या या घोर अपराधास योग्य अशी शिक्षा करण्यास सरकार मुक्त्यार आहे.' या प्रसंगीं आपल्यावरचा दोष उडविण्यासाठीं माझ्या भावानें पानांच्या तुकड्यांच्या नाण्यांची गोष्ट सांगितली व त्यांचें तें सर्व म्हणणें कोतवालानें न त्रासतां ऐकून घेतलें; परंतु ती

गोष्ट त्यास खरी वाटेना. तसेंच 'तें धड मनुष्याचें नव्हे, खरोखरी बकऱ्याचें आहे,' असेंही माझ्या भावानें पुष्कळ शपथाआणा वाहून सांगितलें; परंतु डोळ्यांनीं प्रत्यक्ष जी गोष्ट दिसली, ती केवळ शपथांनीं खोटी कोणास वाटणार आहे? शेवटीं माझ्या भावावर तो गुन्हा शाबीद होऊन त्यास पांचशें फटके मारण्याचा कोतवालानें हुकूम केला. तें झाल्यावर त्याची सर्व मालमत्ता जप्त करून सरकारांत घेतली, व त्यास उंटावर बसवून साऱ्या शहरांत त्याची तीन दिवस धिंड काढली, आणि त्यास गांवाबाहेर हांकून दिलें.

न्हावी म्हणतो—महाराज, माझ्या दुसऱ्या भावावर जेव्हां हा गहजब गुदरला, त्या वेळेस मी बगदाद येथें नव्हतों; नंतर अल्कूज आपल्या अंगावरील जखमा बऱ्या होईपर्यंत एका अप्रासिद्ध ठिकाणीं गुप्तपणें राहिला होता. फटके मुख्यत्वेंकरून त्याच्या पाठीवर फार बसल्यामुळें तेथें त्यास फार मोठी जखम झाली होती; पुढें बरा झाल्यावर तो मुशाफरी करूं लागला. तो रात्रीचा व अप्रसिद्ध रस्त्यांनीं चालत असे, कारण त्यास ओळखीचे लोक भेटण्याची लाज व भीति वाटे. नंतर तो फिरत फिरत एका अपरिचित गांवीं आला. तेथें एक बिऱ्हाड घेऊन कांहीं दिवस राहिला. तो घरांतून बहुतकरून बाहेर पडत नसे. परंतु कांहीं वेळानें त्यास एकटा बसण्याचा कंटाळा आल्यामुळें तो एक दिवस गांवाच्या बाहेरील वाडींत रपेट करीत असतां एकाएकीं मोठा गोंगाट त्याचे कानीं आला, आणि पाहतो तों कितीएक घोडेस्वार त्याच्यामागून दौडत येत आहेत, असें त्यानें पाहिलें. त्या बापड्यावर हकनाहक तोहमत येऊन फार पिडा झाली होती, व तिच्या योगानें तो अगदीं वेडावून गेला होता, व त्यास जो तो आपला वैरी आहे, व आपला घात करूं इच्छीत आहे, असें भासत होतें; त्यामुळें ते घोडेस्वार आपणासच पकडण्याकरतां येत आहेत अशी भ्रांति होऊन, तो त्या वेळेस एका मोठ्या वाड्याजवळ उभा होता, त्या वाड्याचें दार उघडून भयानें आंत शिरला, आणि दार बंद करून पुढें चौकांत

जात आहे, तों एकाएकीं त्या वाड्यांतील दोन चाकरांनीं त्याच्या अंगावर येऊन त्याची गचांडी धरली, आणि ते म्हणूं लागले कीं, 'देवानें तुला बुद्धि देऊन आपल्याच पायांनीं येथें चालत आणलें हें फार चांगलें झालें. गेल्या तीन रात्रीं तूं आम्हांस फार त्रास दिला आहेस. आम्हांस तुझ्या उपद्रवानें क्षणभरसुद्धां झोंप मिळाली नाहीं. आम्हीं सावध राहिलों म्हणूनच वांचलों;नाहीं तर तूं आमचा खचीत जीव घेणार होतास.'

हें त्या चाकरांचें भाषण ऐकून अल्कुजास फारच आश्चर्य वाटलें. तो त्यांस म्हणाला, 'अरे भल्या माणसांनो, तुम्हीं काय बोलतां हें मला खरोखरी कांहींच कळत नाहीं, मला खचीत वाटतें कीं, तुम्ही मला भलताच कोणी समजून भ्रांतीनें असें बोलत आहां.' चाकरांनीं उत्तर केलें, 'अरे, आम्ही असल्या मानभावीपणानें फसणार नाहीं. तूं व तुझे सोबती भले बिलंदर चोर आहां,हें आम्ही पुरें जाणत आहों. अरे दुष्टा, आमच्या धन्याचें सर्व लुटून नेऊन त्यास भिकारी करून टाकलेंस, तरी तुझें समाधान झालें नाहीं;तर त्याचा जीवसुद्धां घ्याव-यास पहात होतास! बरें काल रात्रीं आमच्या हातून निसटून पळा-लास तेव्हां तुझ्या हातीं सुरा होता, तो सुरा तुझ्याजवळ आहे कीं नाहीं पाहूं दे बरें! तूं चोर नाहीं म्हणतोस तो'! असें बोलून ते त्याचा झाडा घेऊं लागले, आणि त्याच्या खिशांत सुरा होता तो काढून मोठ्या आवेशानें ओरडून ते म्हणाले, 'अरे चोरा, एवढा ढळढळीत मुद्दा जवळ असून मी चोर नाहीं म्हणतोस? केवढें रे तुझें काळीज! तुला वाटतें काय आम्ही बोळ्यानें दूध पितों?' माझा भाऊ त्यांच्या भाषणाचा मोठा विस्मय करून म्हणाला, 'वाहवा! एकूण काय जवळ सुरा असला म्हणजे खात्रीनें मनुष्य चोर झाला? भल्या माणसांनो, अंमळ शांत व्हा; आणि मी आपली हकीकत सांगतों ती ऐका. माझें दुःख ऐकून दगडाला देखील घाम येईल. मग तुम्ही तर माणसेंच आहां'. परंतु त्यांनीं त्याच्या बोलण्याकडे काडी-मात्र लक्ष न देतां त्यास बडवावयास आरंभ केला. त्यांनीं त्याचा

अंगरखा फाडून काढला आणि त्याच्या पाठीवर कोरडे मारल्याचे वण पाहून ते त्यास म्हणाले, 'अरे लुच्च्या, तुझ्या पाठीवर कोरड्यांनीं मारल्याचे इतके वण असून मी साव आहे असें आम्हांस भासवूं पाहतोस काय ? काय हो निर्लज्ज हा ! ' असें म्हणून त्यांनीं त्यावर पहिल्यापेक्षां जास्त लाथाबुक्क्यांचा वर्षाव चालविला. माझा भाऊ त्या वेदनांनीं कळवळून आपणांशीं म्हणाला कीं, ' काय असें मोठें पातक मजपासून झालें असेल कोण जाणे, कीं ज्याच्या योगानें मला एक विनाकारण शिक्षा होऊन मी सर्वस्वास मुकलों ! आणि त्यास फार दिवस लोटले नाहींत तों पुनः तसाच प्रसंग गुदरला ! केवढा हतभागी मी ! मला मरण कां येत नाहीं ! '

त्या दोघां चाकरांनीं माझ्या भावाच्या शोकाकडे लक्ष न देतां त्यास त्या गांवच्या कोतवालाकडे नेलें, आणि ' हा चोर आमच्या धन्याच्या घरांत शिरत असतां यास पकडून आणिलें आहे ' म्हणून सांगितलें. कोतवाल माझ्या भावास दटावून म्हणाला कीं, ' अरे, तूं लोकांच्या घरांत घुसतोस, व सुरा हातीं घेऊन त्यांच्या पाठीस लागतोस. इतका धीट तूं कशानें रे झालास ? तुला काय सरकारचें भय अगदींच वाटत नाहीं ? ' माझ्या भावानें पराकाष्ठेच्या दीनस्वरानें उत्तर केलें कीं, ' महाराज, मीं अगदीं निरपराधी आहे. हे लोक भ्रांतीनें मला भलताच मनुष्य समजून माझ्यावर हा आळ घेत आहेत. सरकारांनीं मेहेरबानी करून, मी आपली हकीकत सांगतों, ती ऐकून घ्यावी आणि नंतर काय करणें तें करावें. नाहीं तर मोठा अन्याय होऊन मज गरिबाचा सर्वथैव घात होईल. महाराज, मज-सारखा दयेस पात्र दुसरा मनुष्य या साऱ्या दुनियेंत सांपडणें कठीण आहे. ' इतक्यांत त्या चाकरांपैकीं एकजण पुढें होऊन कोत-वालास म्हणाला, ' महाराज, दुसऱ्या लोकांच्या घरांत घुसून त्यास लुटणाऱ्या व त्यांचा जीव घेणाऱ्या अशा चोराच्या पोकळ भाकड कथा आपण क्षणभरसुद्धां ऐकूं नयेत. आम्ही म्हणतों तें आपणांस खरें वाटत नसल्यास आपण स्वतः या मनुष्याची पाठ

पहावी; म्हणजे हा कोणत्या प्रकारचा असावा हें आपणांस चांगलें समजून येईल. ' असें त्यानें म्हणतांच शिपायांनीं माझ्या भावाच्या अंगावरील पांघरूण काढून त्याची पाठ मोकळी केली आणि कोतवालास तीवरील वण दाखविले. ते पाहतांच हा खराब चालीचा मनुष्य आहे अशी कोतवालाची खात्री होऊन त्यानें त्यास तेथल्या तेथें शंभर फटके मारण्याचा हुकूम केला. विशेष कांहींएक चौकशी केली नाहीं. नंतर त्यानें आपल्या शिपायांस हुकूम केला कीं, ' यास उंटावर बसवून सगळा दिवसभर गांवांतून याची धिंड काढा व अशी दवंडी चोहींकडे फिरवा कीं, दुसऱ्याच्या घरांत जबरीनें जे शिरतात, त्यांस सरकार याप्रमाणें शिक्षा करतें. '

मग त्याची धिंड काढल्यावर कोतवालाच्या शिपायांनीं त्यास गांवाबाहेर नेलें आणि सांगितलें कीं, ' खबरदार ! पुनः गांवांत आलास तर यापेक्षां मोठी शिक्षा पावशील. ' याप्रमाणें दुसऱ्यांदा त्याची अशी विनाकारण फजिती झाल्यानंतर त्याची बातमी मला लागली. मग मीं मोठ्या प्रयासानें त्यास शोधून गुप्तपणें बगदादला आणिलें व माझ्या हातून होण्यासारखा त्याचा समाचार घेतला.

न्हावी सांगतो—महाराज, ही गोष्ट ऐकून मुस्तान्सर पातशाह, पूर्वींच्या गोष्टी ऐकून हंसला, तसा हंसला नाहीं. कारण तो पातशाह मोठा कनवाळू होता. त्यास त्या बापड्या अल्कुजाची दया आली. नंतर त्यानें मला आणखी कांहीं बक्षीस देऊन माझी रवानगी करण्याविषयीं आपल्या चाकरांस हुकूम केला. परंतु त्यांनीं तसें करण्याच्या पूर्वींच मी पातशाहास म्हणालों कीं, ' सद्धर्मपालक, दुनयेचे पोशिंदे, महाराज, या आपल्या दासाला ( मला ) फार बोलण्याचा कंटाळा आहे हें आपल्या ध्यानांत येऊन चुकलेंच असेल. मी आपल्या तोंडानें सांगावें असें नाहीं, पण ज्या अर्थीं सरकारांनीं मेहेरबानी करून इतक्या चार गोष्टी बंधूच्या तोंडून ऐकून घेतल्या, त्या अर्थीं राहिलेल्या माझ्या दोन भावांच्या गोष्टी ऐकाव्याच. त्याही पहिल्याप्रमाणें आपणांस मनोरंजक वाटतील,

अशी माझी खात्री आहे. सहाही गोष्टी ऐकणें झाल्यावर मर्जीस आल्यास सरकारांनीं त्या लिहवून आपल्या संग्रहास राखाव्या. त्या राखण्यासारख्या खचीत आहेत.'

हें भाषण ऐकून पातशाह हंसला मात्र. त्यानें उत्तर कांहींएक केलें नाहीं. त्यावरून त्याची परवानगी आहे असें समजून मीं आपल्या तिसऱ्या भावाची गोष्ट चालू केली.

---

## न्हाव्याच्या तिसऱ्या भावाची गोष्ट.

महाराज, माझ्या तिसऱ्या भावाचें नांव अल्नास्कर. आमचा बाप जोंपर्यंत जिवंत होता, तोंपर्यंत अल्नास्कर यानें कोणत्याही कामास हात लावला नाहीं. तो आपला वेळ गमण्यांत घालवी. तो असा बेशरम होता कीं, त्यानें दररोज संध्याकाळीं बापाजवळून पैसे मागून घ्यावे,आणि त्यावर दुसरे दिवशीं निर्वाह करावा;पण आपल्या पोटाचासुद्धां धंदा करूं नये. पुढें आमचा बाप पुष्कळ म्हातारा होऊन मेला. त्या वेळेस त्याच्याजवळ सातशें रुपये राहिले होते. ते आम्हीं सातजणांनीं वांटून घेतल्यामुळें एकेकास शंभर शंभर रुपये मिळाले. अल्नास्कर यापाशीं इतका पैसा पूर्वीं कधींच आला नव्हता, त्यामुळें त्या पैशाचें काय करावें हें त्यास सुचेना. मग त्यानें पुष्कळ वेळ मनांत विचार करून शेवटीं बोहऱ्याचा धंदा करण्याचा निश्चय करून त्या पैशांच्या बाटल्या, कुप्या, प्याले, बरण्या, तबकें, वगैरे कांचेचीं भांडीं घेतलीं, आणि तीं सर्व एका मोठ्या हाऱ्यांत भरलीं. मग दुकानाकरतां एक लहानशी जागा भाड्यानें घेऊन तेथें तो हारा पुढें घेऊन गिऱ्हाइकांची वाट पाहात भिंतीशीं पाठ टेंकून तो बसला.

याप्रमाणें पुढल्या हाऱ्यांतील सामानावर नजर लावून तो तेथें बसला असतां पुढील कल्पनातरंग त्याच्या मनांत उद्भवले,व त्यांत तो गर्क होऊन आपणाशीं बोलत असतां त्याचें तें भाषण त्याच्या शेजारीं एक शिंपी बसला होता, त्यानें ऐकिलें. अल्नास्कर आपल्याशीं म्हणूं

लागला कीं, " मजपाशीं काय ते शंभर रुपये होते. ते मीं या कांचेच्या सामानांत घातले. हें सामान फुटकळ विकून दोनशें रुपये उभे केले पाहिजेत. त्या दोनशें रुपयांचें आणखी कांचसामान घेऊन चारशें रुपये करीन. असाच हा धंदा करतां करतां थोडक्या वेळानें मजजवळ चार हजार रुपये होतील. मग चार हजारांचे आठ हजार करण्यास फार कठिण पडावयाचें नाहीं. पुढें दहा हजारांचें बारदान झालें कीं, लागलीच कांचा विकण्याचा धंदा सोडून जवाहिरी होईन, व मोतीं, हिरे, माणकें, वगैरे रत्नें विकण्याचा रोजगार सुरू करीन. पुढें मला हवा तितका पैका जवळ झाला म्हणजे मग एक छानदार टोलेजंग वाडा, बागबगीचे, दासदासी, घोडे वगैरे खरेदी करीन; व मोठा इतमाम बाळगून लोकांत आपलें नांव गाजेसें करीन. तथापि लाख रुपये जवळ होईतोंपर्यंत मी धंदा सोडणार नाहीं, आणि ईश्वराची कृपा असेल तर लाख रुपये मिळण्यास काय अवकाश आहे ? मग लक्षापति झालों म्हणजे मला शाहजाद्याची योग्यता खचित आली असें होईल. नंतर मला मुख्य वजिराच्या कन्येला मागणी घालण्यास कांहीं हरकत राहणार नाहीं. मग मी मुख्य प्रधानास असें कळवीन कीं, ' तुमची कन्या मोठी सुंदर, शहाणी व अनेक उत्तम गुणांनीं युक्त आहे, अशी तिची कीर्ति पुष्कळ दिवस आमच्या कानांवर असल्यामुळें तिला वरण्याची आमची मर्जी आहे; तर तुम्ही ही मागणी मान्य कराल तर लग्नाचे दिवशींच आम्ही तिला स्त्रीधनार्थ एक हजार मोहोरा देऊं. ' हें बोलणें मुख्य प्रधानास नाकबूल होण्याचा संभव दिसत नाहीं; परंतु कदाचित् मूर्खपणानें किंवा उर्मटपणानें तो जर तसें करीलच, तर मी त्याचे वाड्यांत शिरून तिला त्याच्या देखत जबरीनें घरीं घेऊन येईन. मी येवढा श्रीमंत झाल्यावर माझ्यापुढें त्या बापड्याचें काय चालणार आहे ? प्रधानकन्येशीं लग्न लावल्यावर तिच्या सेवेकरतां मी दहा चांगल्या हुशार दासी तिला घेऊन देईन; शाहजाद्यासारखा पोषाक करून उत्तम प्रकारच्या आरबी घोड्यावर बसून शहरांत

मोठ्या डौलानें फिरत जाईन; घोड्यावरचें जीन रुप्याचें करून तें भरगच्ची कापडानें मढवीन; व त्यास ठिकठिकाणीं हिरे, मोत्यें लावीन. माझ्या पुढें व मागें पुष्कळ चाकर दौडतील, आणि थाटानें माझी स्वारी रस्त्यानें मुख्य प्रधानाच्या घराकडे चालली असतां, लहानमोठे सर्व लोकांचे डोळे मजकडे लागतील; व ते सर्व माझ्या ऐश्वर्यानें दिपून जाऊन मला भुईपर्यंत लवून सलाम करतील. मुख्य प्रधानाच्या घराजवळ घोड्यावरून उतरून मी पायऱ्यांवरून चढत असतां दुतर्फा माझे चाकर उभे राहतील. मी आल्याची बातमी समजतांच मुख्य वजीर दरवाजाशीं सामोरा येऊन मोठ्या आदबीनें माझा हात धरून मला दिवाणखान्यांत नेईल, आणि मुख्य ठिकाणीं मला बसवून आपण लीनता दाखविण्याकरतां माझ्यापुढें बसेल. मग माझ्या हुकुमानें माझ्या चाकरांनीं हजार हजार मोहोरांनीं भरलेल्या दोन थैल्या आणल्या असतील, त्यांपैकीं एक थैली मी हातीं घेऊन ती मुख्य वजिराच्या हातीं देईन, आणि म्हणेन कीं, 'लग्नाच्या दिवशीं हजार मोहोरा देऊं केल्याप्रमाणें या हजार मोहोरा आणल्या आहेत. या घ्या.' नंतर हजार मोहोरांची दुसरी थैली त्याच्या हातीं देऊन बोलेन कीं, 'ही आणखी हजार मोहोरांची दुसरी थैली घ्या. ही तुम्हांस मी अशाकरतां देतों यावरून तुम्ही असें समजा कीं, मी बोलतों त्याप्रमाणें करतों इतकेंच नाहीं, तर मी कबूल केलें असेल, त्यापेक्षां सुद्धां अधिक देतों.' याप्रमाणें मीं केलें असतां सर्व दुनिया माझें औदार्य वाखाणूं लागेल. नंतर मी तशाच थाटानें वजिराच्या घरून आपल्या घरीं येईन. मग मी तिच्या बापास भेटलों, याबद्दल माझे आभार मानण्याकरतां मुख्य प्रधानाची कन्या मजकडे आपल्या पदरचा एखादा चाकर पाठवील. तो आला असतां त्यास मी उत्तम प्रकारचा पोषाक देईन, व एखादा मोठा उंची दागिना देणगीदाखल देऊन परत पाठवीन; पण माझा उपकार फेडावा म्हणून ती प्रधानकन्या जर मला कांहीं परत देणगी मजकडे पाठवील, तर ती मी घेणार नाहीं; ती परत लावून देईन.

लग्न होऊन माझी बायको घरीं आली असतां मी तिला पूर्वीं माझी परवानगी घेतल्यावांचून आपल्या महालांतून कोणत्याही सबबीनें बाहेर जाण्याची अगदीं मनाई करीन, व मी तिच्या महालांत कधीं कधीं गेलों असतां असा वागेन कीं, तिला वाटेल कीं, हा कोणी फारच थोर मनुष्य आहे. सारांश, माझ्या घरांतली शिस्त पाहून सगळ्या शहरांतले लोक तिचा कित्ता घेतील, असें करीन मी सर्व-काळ उंच उंच पोषाख घालीन, कीं, ते पाहून पाहाणारानें दिपूनच जावें. मी जेव्हां जेव्हां बायकोच्या महालांत जाईन, तेव्हां तेव्हां अत्यंत श्रेष्ठ ठिकाणीं बसत जाईन, व मोठ्या गंभीर मुद्रेनें व मोठ्या आढ्यतेनें आपल्याच तोऱ्यांत गर्क असल्यासारखा बसेन. कोणा-कडे इकडे तिकडे पाहाणार नाहीं, किंवा कोणाशीं बोलणार नाहीं. माझी बायको—प्रधानाची कन्या—उत्तम प्रकारचा पोषाक करून व उंची जवाहीर अंगावर घालून माझ्यापुढें उभी राहील, तरी मी तिजकडे न पाहिल्यासारखें करीन. मग तिच्याजवळ उभ्या राहिलेल्या दासी मोठ्या आर्जवानें व मर्यादेनें मला आळवून म्हणतील, 'महाराज, धनीसाहेब, केव्हांच्या येऊन हात जोडून उभ्या आहेत, आपण त्यांकडे पाहातसुद्धां नाहींत, यासाठीं त्या फार खट्टू होऊन त्यांचें तोंड उतरून गेलें आहे. त्याकडे कृपेच्या दृष्टीनें पहावें.' याप्रमाणें त्यांनीं अतिलीनतेनें भाषण केलें तरी मी एक शब्द-सुद्धां बोलणार नाहीं, व तिकडे पाहाणार नाहीं. त्यामुळें त्यांस मोठें आश्चर्य वाटेल, व त्या मनांत फार खिन्न होतील. मग त्या माझ्या पायांस लागून नानाप्रकारें मला विनवूं लागतील, 'व दया करा म्हणतील. याप्रमाणें त्यांनीं पुष्कळ वेळ केलें म्हणजे मी कंटाळल्या-सारखें करून डोकें वर उचलीन, व प्रधानकन्येकडे पाहून नाक मुरडून पुनः मुखस्तंभ होऊन दिमाखानें मिशांवर हात फिरवीत बसेन. त्यावरून दासींस असें वाटेल कीं, मला बायकोचा पोषाक व शृंगार न आवडल्यामुळें मी असें करितों, आणि या समजुतीनें त्या तिला विशेष चांगली नटविण्याकरितां घेऊन जातील. इकडे मीही आपल्या दिवाणखान्यांत जाऊन पहिल्यापेक्षां छानदार पोषाख

व दागिने घालून येईन. नंतर माझ्या बायकोस दासींनीं अधिक सजवून आणिलें तरी मी खुष झाल्यासारखें दाखविणार नाहीं. मग त्या पुनः माझ्या पायांवर लोळण घेऊन पहिल्याप्रमाणें माझी पुनः खुशामत करूं लागतील. असो. याप्रमाणें लग्नाच्या पहिल्याच दिवशीं मी असा पाठ घातल्यानें, हा फार खंदा नवरा आहे, याशीं अत्यंत मर्यादेनेंच फार जपून वागलें पाहिजे असें प्रधानकन्येच्या चित्तांत पुरें ठसेल.

अल्नास्कर आपल्याशीं आणखी म्हणतो—याप्रमाणें माझ्या लग्नाचे सर्व सोहळे झाले म्हणजे पांचशें मोहोरांची एक थैली घेऊन आपल्या बायकोच्या दासींस बक्षीस देईन. असें केलें असतां त्या खूष होऊन माझ्या रंगमहालांतून बाहेर जातील. तरी मी माझ्या बायकोशीं एक चकार शब्द बोलणार नाहीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती तें गाऱ्हाणें आपल्या आईला म्हणजे प्रधानाच्या बायकोला सांगेल. नंतर ती आई मला भेटावयाला येईल व मोठ्या अदबीनें माझ्या हाताचें चुंबन करून ती गरिबीनें मजशीं बोलूं लागेल. 'अहो जांवईबोवा' असें फार सलगीचें संबोधन केल्यास यांस राग येईल, अशी तिला भीति वाटून 'अहो महाराज' असें संबोधन करून ती मला म्हणेल कीं, 'माझ्या पोरीची आपण हेळसांड करूं नये असें माझें आपणापाशीं पदर पसरून मागणें आहे. महाराज, मी आपणांस खात्रीनें सांगतें कीं, तिचे पंचप्राण आपल्या पायांपाशीं आहेत.' याप्रमाणें अत्यंत मर्यादेनें व गरिबीनें सासूनें विनवणी केली तरी मी तिशीं एक अक्षरसुद्धां न बोलतां तसाच फुगून बसेन. नंतर आपला उपाय हरला हें पाहून ती एक रुप्याचा प्याला सरबतानें भरून माझ्या बायकोच्या हातीं देईल आणि म्हणेल कीं, 'मुली, हा प्याला तूं आपल्या हातानें आपल्या पतीस दे.' तेव्हां ती मद्याचा प्याला माझ्या तोंडाशीं आणील. मग तसें तिनें केलें असतां तिच्या वटवटीनें कंटाळल्यासारखें करून मी पराकाष्ठेचा रागावलों असें दाखवून डोळे खूप वटारून तिच्याकडे पाहीन, व

तिच्या गालावर एक चांगली चपराक देईन, व जोरानें अशी तिला लाथ मारीन कीं, ती कोलांट्या खात पलंगापासून दूर जाऊन मूर्च्छित पडेल.

अल्नास्कर या मनोराज्यांत इतका निमग्न होऊन गेला होता कीं, त्यास आपण वास्तविक कोठें आहों याचें भान राहिलें नाहीं. त्यास वाटलें कीं, प्रधानकन्या खरोखरीच आपली विनवणी करीत आहे, आणि त्या आवेशांत त्यानें त्या मनोराज्यांतील प्रधानकन्येस मारण्याकरितां जी लाथ झाडली. ती त्याच्या कांचसामानाच्या हाऱ्यावर बसून तो हारा पालथा होऊन त्यांतील सर्व कुप्या वगैरे फुटून त्यांचे तुकडे तुकडे झाले!

त्याच्या शेजारच्या दुकानांत एक शिंपी बसला होता, तो हें सर्व भाषण ऐकत होता. तो शिंपी, यानें लाथेनें हारा लवंडून दिला हें पाहून मोठ्यानें हसूं लागला, आणि म्हणाला, 'अरे निर्दया दुष्टा, आपल्या अल्पवयी निरपराधी बायकोस उगीचच्या उगीच पीडा करण्यास तुला लाज वाटत नाहीं? मूर्खा, असल्या सुंदर तरुण स्त्रीस रडतांना पाहून ज्या तुझें अंतःकरण द्रवलें नाहीं, तो तूं खरो-खर पाषाणहृदय होय. अरे, मी जर तुझा सासरा म्हणजे मुख्य वजीर असतों, तर असल्या निर्दयाला तुला पांचशें फटके मारून तुझी सगळ्या शहरांतून धिंड काढिली असती.'

हें त्या शिंप्याचें भाषण ऐकून व कांचांचा खळखळाट ऐकून अल्नास्कर शुद्धीवर आला, आणि आपल्या स्वतःच्या गर्वानें आपला सर्वस्वीं नाश झाला हें पाहून दुःखानें आपला ऊर बडवूं लागला, व केंस तोडूं लागला; आणि त्यानें एवढ्या मोठ्यानें रडण्यास आरंभ केला कीं, त्याचा आक्रोश ऐकून भोंवतालचे दुकानदार काय झालें म्हणून पाहावयास तेथें जमले. ही गोष्ट सुमारें दुपारच्या वेळीं घडली. त्या दिवशीं शुक्रवार असल्यामुळें रस्त्यानें नेहमींपेक्षां अधिक लोक मशिदींत निमाज पढण्यास जाण्याकरितां चालले होते. त्यांनीं या दुकानीं गर्दी पाहून तेही काय आहे हें पहावयास तेथें

गोळा झाले. त्या समाजांत कोणांस त्या अल्नास्कराची दया आली, व कितीएक त्याचा मूर्खपणा पाहून त्यास हंसूं लागले. असो. याप्रमाणें त्याचा सर्व माल फुटून गेल्यामुळें अल्नास्कराच्या अंगांतली मात्र गुर्मी अगदीं उतरून गेली. मग तो दीन स्वरानें विलाप करीत बसला असतां, त्या वाटेनें एक श्रीमंत स्त्री घोड्यावर बसून चालली होती, तिनें आपला घोडा थांबवून आपल्या चाकराकडून ' तो इतका आक्रोश कां करीत आहे ? ' म्हणून शोध करविला. त्या वेळीं तेथें जमलेल्या माणसांनीं तिला सांगितलें कीं, ' बाईसाहेब, या गरीब मनुष्याजवळ जें थोडेसें द्रव्य होतें तें सर्व खर्चून त्यानें हें कांचेचें सामान उदीम करण्याकरतां घेतलें होतें, व तें पाटी खालीं पडून फुटून गेलें. त्यामुळें हा बापडा आतां पुढें पोट कसें भरावें त्याच्या फिकिरींत पडून शोक करीत आहे. ' ती हकीकत ऐकून त्या बाईस त्याची करुणा आली व तिनें आपल्या एका चाकरास हुकूम केला कीं, ' अरे, तुझ्यापाशीं जी मोहोरांची थैली आहे, ती या गरीब मनुष्यास दे. ' त्या थैलींत पांचशें मोहरा होत्या. त्या मिळतांच अल्नास्करास जो हर्ष झाला तो सांगण्याची सोय नाहीं. या आनंदानें तो हर्षवायु होऊन मरतो कीं काय असें भोंवतालच्या लोकांस वाटलें. त्यानें त्या बाईस हजारों आशीर्वाद दिले. मग त्या दुकानाचें त्यास कांहीं काम नसल्यामुळें तें बंद करून तो घरीं आला.

त्या दिवशीं अकल्पित त्याचें दैव उघडून त्याजवळ इतका पैसा आला त्याबद्दल तो विचार करीत बसला असतां त्याच्या दरवाज्यावर कोणी थाप मारतांना त्यानें ऐकिलें. मग ' कोण दाराशीं आहे?' म्हणून त्यानें विचारलें असतां ' मी ' म्हणून उत्तर आलें. त्या स्वरावरून कोणी स्त्री आहे असें समजल्यावरून त्यानें उठून दार उघडलें. त्या वेळेस दाराशीं एक स्त्री आली होती. ती त्यास म्हणाली, ' बाबा, देशील तर तुजपाशीं मला एक मागणें आहे. आतां निमाज पढण्याचा समय झाला आहे, व हातपाय धुवाव-

याला थोडें पाणी देशील तर मी निमाज पढेन आणि मग घरीं जाईन,इतकेंच माझें तुझ्याजवळ मागणें आहे.' अल्नास्करानें पाहिलें, तों ती बाई पोक्त वयाची असून संभावित दिसत होती, त्यामुळें ती ओळखीची नव्हती तरी तिला त्यानें घरांत येऊं दिलें व हात-पाय धुवावयाला तिला एक तांब्याभर पाणी देऊन आपण आपल्या ठिकाणीं पुन: येऊन बसला. त्यास त्या दिवशीं मोहोरा मिळाल्या होत्या, त्याचा त्यास फार मोटा चमत्कार वाटला होता, व दुसरी कांहीं गोष्ट सुचत नव्हती. मग त्यानें त्या मोहरा थैलींतून काढून एका कंबरखिशांत एकेक मोजून भरल्या. इकडे त्या बाईचा निमाज आटपल्यावर ती त्याजवळ आली आणि आणि तिनें दोन वेळां त्याच्या पायांवर डोकें ठेवून त्यास पुष्कळ दुवा दिला व त्याचे भारी उपकार मानले.

त्या बाईच्या अंगावरील कपडे फार गलिच्छ होते, त्यावरून व ती त्याच्या पायां पडली त्यावरून ही कांहीं धर्म मागते असें वाटून तो तीस दोन मोहरा देऊं लागला. परंतु तें पाहतांच ती बाई रागवल्यासारखें करून मागें हटली आणि त्यास म्हणाली, ' याचा अर्थ हा काय ? तुम्ही मला भिकारीण समजतां कीं काय ? तुम्ही त्या मोहरा आपल्याजवळ ठेवा. मी तुमच्या घरीं भीक मागावयास नाहीं आलें. माझी धनीन या शहरांत राहतें, तिच्या-जवळ मी असतें. ती इतकी श्रीमंत आहे कीं, तिच्या कृपेनें मला कोणत्याही गोष्टीची वानवा नाहीं. '

अल्नास्कराच्या अंगीं तादृश धूर्तता नसल्यामुळें त्यास त्या ढोंगी बाईनें ठकविण्याकरितां केलेला कावा उमज़ला नाहीं.मग ती खरें बोलते असें समजून तो तिला विचारूं लागला कीं, ' तुझी धनीन माझ्या दृष्टीस पडेल काय ? ' तिनें उत्तर केलें, ' होय. तुमची फारच इच्छा असल्यास तुम्हांस ती दाखवीन, व मी मनावर घेतलें तर तिच्याशीं तुमचें लग्न सुद्धां करून देईन. मग तुम्हांस सुरेख बायको व मोठी दौलत एकदम मिळेल. तर मर्जी असल्यास आपल्या मोहोरा घेऊन

चला मजबरोबर. उशीर तरी कशास पाहिजे? आतांच्या आतांच तुमची दोघांची गांठ घालून देतें.' मग एकाएकीं पुष्कळ द्रव्य मिळालें, व एकाएकीं अकल्पित रीतीनें उत्तम स्त्रीही प्राप्त होण्याचा चांगला रंग दिसूं लागला, असें पाहून अल्नास्कर हर्षानें अगदीं वेडा होऊन गेला. त्यास विचार म्हणून अगदीं राहिला नाहीं. मग मोहोरांचा कसा कंबरेस बांधून तो त्या म्हातारीमागें चालता झाला.

जातां जातां ती म्हातारी एका हवेलीशीं उभी राहिली. तिच्या दरवाजावर तिनें थाप मारतांच एका दासानें तो उघडला. नंतर त्या म्हातारीनें त्यास आंत नेऊन एका दिवाणखान्यांत बसविलें, आणि 'मी आपल्या धनिनीस घेऊन येतें' असें म्हणून ती निघून गेली. तो दिवाणखाना चांगला भव्य असून तेथील सामान फार उत्तम होतें. त्यावरून हें कोणा तरी मोठ्या श्रीमंताचें घर आहे असें अल्नास्करास वाटलें. त्या ठिकाणीं अंमळ उष्मा होत असल्यामुळें त्यानें पागोटें काढून ठेवलें व खिडकीजवळच्या एका कोचावर वारा घेत तो पडला. इतक्यांत घरधनीन आली. तिच्या अंगावरील दागिने व पोषाख हीं बरींच उत्तम होतीं; व तिचें सौंदर्य तर फारच उत्कृष्ट होतें. तिला पाहतांच तो उठून उभा राहिला. तें पाहून ती म्हणाली, 'महाराज, उठलां कशाला? बसा खालीं.' आणि असें भाषण करून तीही त्याच्या शेजारीं येऊन बसली. 'तुम्ही भेटला, फार उत्तम झालें; कोठें असतां?' याप्रमाणें कांहीं वेळ इकडल्या तिकडल्या गोष्टी ती बोलत बसली असतां 'आतां परत येतें' असें म्हणून ती कांहीं मिष करून तेथून निघून गेली. मग अल्नास्कर तिची वाट पाहत तेथें बसला असतां एकाएकीं एक काळाकभिन्न शिद्दी आंत आला. त्याची मुद्रा भयंकर असून त्याच्या हातीं नागवी तरवार होती. त्यानें डोळे वटारून धमकीनें यास विचारलें कीं, 'कोण रे तूं? येथें कशास बसलाहेस?' त्यास पाहून अल्नास्कराची भयानें बोबडी वळली. त्याच्या तोंडांतून शब्द निघेना. मग त्या शिद्द्यानें त्याचे कपडे व मोहोरा हिसकावून घेतल्या व तलवारीनें त्यास

कितीएक ठिकाणीं भोंसकलें. त्यामुळें तो गरीब तेथें जमिनीवर निपचीत पडला; व त्यास शुद्धि चांगली होती, तथापि त्यानें हातपाय वगैरे अगदीं हालविले नाहींत. मग तो मेला असें समजून शिद्यानें टाळी वाजविली. ती खूण होतांच दरवाजा उघडून दासीनें संकेताप्रमाणें ताटभर मीठ आणलें. नंतर त्या दोघांनीं त्या बिचाऱ्याच्या जखमांस तें मीठ चोळलें असतां त्यास पराकाष्ठेची इजा झाली, तथापि त्यानें हूं कां चूं केलें नाहीं. नंतर ती दासी व तो शिद्दी हीं तेथून गेलीं. मग ज्या दुष्ट म्हातारीनें त्यांस ठकवून तेथें आणलें होतें, तिनें येऊन त्याची तंगडी धरून त्यास ओढीत एका पेंवापाशीं नेऊन तें उघडून त्यास आंत ढकलून दिलें. खालीं पडण्याच्या धक्क्यानें त्यास प्रथम मूर्च्छा आली; परंतु कांहीं वेळानें सावध होऊन पाहतो तों आपण एका पेंवांत पडलों आहों असें त्यास समजलें. याचप्रमाणें त्या दुष्टांनीं जीव घेऊन ढकलून दिलेल्या माणसांचीं पुष्कळ मढीं पडलीं होतीं. त्याच्या अंगास मीठ घांसलें होतें, तेंच त्याचा प्राण वांचवण्यास या ठिकाणीं कारण झालें. असो. कांहीं वेळानें त्यास उठून बसण्याचें सामर्थ्य आलें. मग दुसऱ्या दिवशीं रात्रीं तो उठून त्या पेंवाचें दार युक्तीनें उघडून बाहेर आला आणि अंगणांत अंधाराच्या एकीकडल्या एका ठिकाणीं दडून बसला. सकाळीं ती दुष्ट म्हातारी आणखी लोक फसवून आणण्याकरितां बाहेर गेली, तेव्हां तिनें थोरला दरवाजा उघडला. त्या संधीस ती बाहेरून दूर गेल्यावर हाही हळूंच आपल्या ठिकाणाहून निघून त्या मारेकऱ्याच्या घरांतून पळून गेला. तो प्रथम ( न्हावी सांगतो ) माझ्या घरीं आला आणि झालेली सर्व हकीकत त्यानें मला सविस्तर सांगितली.

नंतर मीं त्यास पथ्यपाणी घालून व उत्तम प्रकारचीं औषधें देऊन एका महिन्यांत चांगला बरा केला. मग त्यानें मनांत निश्चय केला कीं, ‘ ज्या दुष्ट कृतघ्न म्हातारीनें आपणांस फसवून जीव घेण्याची मसलत केली, तिचा आधीं सूड घ्यावयाचा.’ नंतर त्या उद्देशानें त्यानें कांचेच्या

तुकडयांनीं भरलेला एक मोठा खिसा कंबरेस बांधून व छानदार तलवार लपवून जवळ घेऊन, म्हाताऱ्या बाईचें सोंग घेऊन तो बाहेर पडला. नंतर कांहीं वेळ इकडे तिकडे रस्ते धुंडाळल्यावर एका गल्लींत ती दुष्ट म्हातारी त्याच्या दृष्टीस पडली. मग तिच्या-जवळ जाऊन जनानी स्वर काढून तो तिला म्हणाला कीं, 'बाई, मी नवखी असल्यामुळें या शहरांतली मला अगदीं माहिती नाहीं. मी इराणाहून कालच येथें आलें. मजपाशीं पांचशें मोहोरा आहेत त्या मला पारखून घ्यावयाच्या आहेत व खर्चाकरितां त्यांपैकीं एक दोन मोडून रुपये व खुर्दा करावयाचा आहे; तर बाई, मला सराफ आळी कोठें आहे, ती सांगाल, तर मोठे उपकार होतील.' हें भाषण त्या म्हातारीला खरें वाटून तिला मोठा हर्ष झाला. तिला वाटलें कीं, आपणास खाशी शिकार सांपडली. मग तिनें उत्तर केलें, 'बाई, तुम्ही मला विचारलें, फार चांगलें झालें, तुमचे श्रम वांचले, माझ्या घरीं चला. माझा मुलगा सराफ आहे तो तुमच्या मोहोरा चांगल्या पारखून देईल व तुम्हांस रुपये व खुर्दाही त्याच्या-पाशीं मिळेल. तर चला लौकर मजबरोबर. उशीर झाला तर तो कदाचित् आपल्या दुकानावर जाईल.' मग अल्नास्कर त्या ढोंगी म्हातारीच्या मागून त्या पूर्वीच्या वाड्यांत गेला.

नंतर तिनें त्यास पहिल्या दिवाणखान्यांत नेऊन तेथें बसविलें. व 'मी मुलाला बोलावून आणतें' म्हणून निमित्त सांगून ती आपण निघून गेली. इतक्यांत तो दुष्ट पूर्वींचा शिद्दी म्हातारीच्या मुलाच्या मिषानें तेथें येऊन त्यास म्हणाला, 'बाई, तुमच्या मोहोरा पारखा-वयाच्या आहेत ना? या माझ्यामागून या खोलींत, तेथें पारखून देतो.' असें म्हणून तो त्यास मारण्याकरितां त्या खोलींत घेऊन चालला. परंतु अल्नास्करास तें कपट ठाऊक होतें. त्यानें 'होय' म्हणून मागून जात असतां आपल्या झग्यांतून लपवून ठेवलेली तरवार हळूंच काढून त्या द्वाड शिद्याच्या मानेवर असा सपाटून वार मारला कीं, एका तडाक्यानें त्याचें डोकें साफ तुटून जमिनीवर

पडलें. नंतर एका हातांत तें डोकें घेऊन दुसऱ्या हातानें तें धड तंगडीला धरून त्यानें ओढीत त्या पूर्वीच्या पेंवापाशीं नेलें, आणि दार उघडून दोन्ही आंत टाकून दिलीं. इतक्यांत संकेताप्रमाणें ती दासी मिठानें भरलेलें ताट घेऊन आली. पण अल्नास्कर हातांत रक्तानें भरलेली नागवी तरवार घेऊन उभा आहे, म्हातारी नाहीं, असें पाहून ती दासी हातांतलें ताट खालीं टाकून पळूं लागली. परंतु ( न्हावी म्हणतो. ) माझा भाऊ जलद धांवणारा असल्यामुळें त्यानें तत्काळ गांठून तिचेंही डोकें उडवलें. हा गलबला ऐकून काय धांदल आहे म्हणून पहावयास ती ढोंगी म्हातारीही तेथें आली. तिला पाहतांच माझ्या भावानें तिला पकडलें, आणि म्हटलें कीं, ‘ अगे दुष्टे, तूं मला ओळखलेंस ? ’ तिनें भयानें कांपत कांपत उत्तर केलें, ‘ महाराज, आपणांस पूर्वीं कधींही पाहिलें असें मला आठवत नाहीं. आपण कोण आहां ? ’ अल्नास्कर म्हणाला, ‘ अगे दुष्टे, तूं महिन्यापूर्वीं माझ्या घरीं येऊन मला निमाज पढावयाचा आहे, मला हातपाय धुवायाला पाणी द्या म्हणून माझी विनवणी केली नव्हतीस? आतां आठवलें कां तुला मी कोण तो ? ’ ते शब्द ऐकतांच ती त्याच्या पायावर डोकें ठेवून त्यापाशीं क्षमा मागूं लागली. परंतु तिच्या बोलण्याकडे लक्ष न देतां त्यानें तिचे चार तुकडे केले.

नंतर घरधनी म्हणून जी स्त्री मोडत होती, तेवढी मात्र राहिली. तिला घरांत काय वृत्तांत झाला तो समजला नव्हता. मग माझा भाऊ तिला शोधूं लागला. ती आपल्या खोलींत बसली होती. ती त्यास नागवी तरवार हातांत घेऊन येतांना पाहतांच भयानें घाबरी झाली व जीवदान देण्याविषयीं त्याची प्रार्थना करूं लागली. त्यास तिची दया येऊन तो सौम्य स्वरानें तिला पुसूं लागला कीं, ‘ तूं अशी चांगली प्रतिष्ठित दिसतेस, आणि या असल्या दुष्ट मारेकऱ्याच्या संगतीस कशी राहिलीस ? ’ तिनें उत्तर केलें कीं, ‘ मी एका प्रतिष्ठित व श्रीमंत सावकाराची बायको होतें. एक दिवस

माझ्या घरीं ती द्वाड म्हातारडी आली आणि म्हणाली कीं, बाई, माझ्या घरीं लग्न आहे. त्या समारंभास तुम्ही आला तर मजवर मोठे उपकार होतील. ' असें म्हणून तिनें फारच गळ घातली, व मीही मूर्खपणानें तिच्या बोलण्यावर विश्वास ठेवून शेवटीं ' होय ' म्हटलें. मग मी अंगावर पुष्कळ दागिने घालून व उत्तम प्रकारचा पोषाख करून व बरोबर शंभर मोहोरांची थैली घेऊन तिच्या-बरोबर या वाड्यांत आलें. येथें मला त्या मेल्या शिद्यानें कैदी करून टाकिलें. या गोष्टीस आज तीन वर्षें झालीं. मला येथें राहण्याची अगदीं खुषी नव्हती, पण काय करूं ? निरुपाय होऊन राहणें कपाळीं आलें. ' माझ्या भावानें विचारलें, ' अगे, पण हा शिद्दी असे लोकांचे जीव घेऊन त्यांस लुटीत होता; तेव्हां त्यानें पैसा खूप जमवला असेल; नाहीं बरें ? ' तिनें उत्तर केलें, ' पैसा पुष्कळ म्हणून काय विचारतां त्यानें अशी जबरदस्त दौलत जमवली आहे कीं, ती तुम्ही घेऊन जाल तर तुमच्या सात पिढ्यांचें दारिद्र्य नाहींसें होईल. ' असें बोलून तिनें अल्नास्करास एका खोलींत नेलें. तेथें सोन्यानें भरलेल्या इतक्या पेट्या होत्या कीं, त्या पाहून त्याची छातीच दडपून गेली. त्यास भ्रांति पडली कीं, 'मी जागा आहें कीं स्वप्न पाहत आहें, कोण जाणे ! ' नंतर ती स्त्री त्यास म्हणाली कीं, ' पाहतां काय ? जा लवकर. हमाल घेऊन या आणि हें द्रव्य आपल्या घरीं घेऊन जा. हें सर्व आतां तुमचें आहे. '

त्या गोष्टीविषयीं माझ्या भावास विशेष आग्रह करण्याची गरज नव्हती. तो तत्काळ बाहेर गेला, व होईल तितकी जलदी करून दहा ओझेवाले घेऊन आला. परंतु तेथें येऊन पाहतो तों वाड्याचा थोरला दरवाजा उघडा पडला होता. तो पाहून त्यास आश्चर्य वाटलें. परंतु आंत जाऊन पहातो तों त्याहीपेक्षां नवलाची गोष्ट त्याचे दृष्टीस पडली. ती अशी कीं, ज्या खोलींत त्यानें सोन्यानें भरलेल्या पेट्या पाहिल्या होत्या, तेथून त्या पेट्या व ती स्त्री दोन्हींही नाहींशीं झालीं. ती स्त्री यापेक्षां विशेष धूर्त व विशेष चपळ

होती. तिनें गोड गोड बोलून त्यास ओझेवाले आणावयास बाहेर पाठविलें, आणि तो बाहेर गेला इतक्या वेळांत जलदी करून ती सगळी दौलत तिनें लांबवून आपणही कोणीकडे नाहींशी झाली. त्यानें तिला शोधून काढण्याकरितां सगळें घर धुंडाळलें; परंतु ती त्यास सांपडली नाहीं. नंतर " जळत्या घराचा पळता वांसा, " ह्या म्हणीप्रमाणें त्यानें घरांतील भांडींकुंडीं वगैरे जें काय सांपडलें, तें सर्व गोळा करून तें ओझेवाल्यांच्या डोक्यावर देऊन आपल्या घरीं नेलें. तें सामान एकंदर मिळून पुष्कळ किंमतीचें असल्यामुळें, त्याच्या ज्या पांचशें मोहरा गेल्या होत्या, त्याचा चांगला वचपा त्यांत निघून चुकला. परंतु माझा भाऊ तो वाडा धुवून नेत असतां ती गोष्ट शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं पाहिली होती व ती त्यास वहिमाची वाटल्यावरून त्यांनीं ती शहरच्या कोतवालाच्या कानांवर घातली.

इकडे, हातची मोठी शिकार निसटून गेली तरी आपला तोटा न होतां थोडासा नफाच झाला, इतक्यावरच जिवाचें समाधान करून अल्नास्कर त्या दिवशीं रात्रीं मोठ्या सुखांत होता. परंतु दुसऱ्या दिवशीं सकाळीं उजाडलें नाहीं तों कोतवालाचे शिपाई येऊन त्यांनीं त्यास पकडलें, आणि ' आमच्या धन्यानें तुला बोलावलें आहे, तिकडे चल, ' असें ते त्यास म्हणूं लागले. माझा भाऊ पुष्कळ त्यांच्या हातींपायीं पडला, व त्यांनीं सोडावें म्हणून त्यानें त्यांस लांचही देण्याचें कबूल केलें; परंतु त्यांनीं त्याच्या बोलण्याकडे तिळमात्रही लक्ष न देतां त्याच्या मुसक्या आंवळल्या व कोतवालाकडे त्यास ओढीत चालविलें. वाटेनें जात असतां माझ्या भावाचा एक स्नेही भेटला. त्यानें त्यांस थांबवून या गृहस्थास असा कां नेतां हो ? ' म्हणून विचारलें, व ' तुम्हांस मीं पुष्कळ पैसे देतों, तुम्ही यास सोडून द्या, व तो घरीं सांपडला नाहीं म्हणून कोतवालास सांगा, ' म्हणून त्यानें त्या शिपायांस पुष्कळ आग्रह केला. परंतु तें कांहींएक न ऐकतां त्यांनीं माझ्या भावास कोतवालापुढें नेऊन उभें केलें.

तो येतांच कोतवालानें त्यास विचारलें कीं, 'काल संध्याकाळीं आपल्या घरीं भांडींकुंडीं वगैरे सामान आणिलेंस तें कोठून आणिलेंस?' अल्नास्करानें उत्तर केलें कीं, 'महाराज, मी सर्व हकीकत इत्थंभूत आपणांस सांगावयास तयार आहें. कांहींएक चोरीत नाहीं; पण मला सरकारचें अभय पाहिजे. तें द्यावें म्हणजे सांगतों.' कोतवाल म्हणाला, 'कांहीं चिंता नाहीं. सांग, तुला अभय आहे.' नंतर माझ्या भावानें ती ढोंगी म्हातारी निमाज पढण्याच्या मिषानें त्याच्या घरांत आली, तेथून आरंभ करून ती तरुण सुंदर स्त्री सोन्यानें भरलेल्या पेट्या घेऊन नाहींशी झाली, असें समजेतोंपर्यंत सर्व सविस्तर हकीकत कोतवालास सांगितली. त्यानें त्या शिद्याचा, दासीचा व त्या ढोंगी म्हातारीचा जीव घेतल्याची गोष्टसुद्धां चोरली नाहीं. याप्रमाणें सर्व पाढा वाचून तो सरतेशेवटीं कोतवालास म्हणाला कीं, 'महाराज, माझ्या पांचशें मोहोरा गेल्या त्याबद्दल त्या वाड्यांतलीं भांडींकुंडीं वगैरे सामान मीं घरीं आणलें आहें. माझा निष्कारण तोटा झाला, हें मनांत आणून सरकारांनीं तें मला राखूं द्यावें. त्यांत मीं कांहीं अन्याय केला आहे असें नाहीं.'

कोतवालानें तो मजकूर ऐकून घेतल्यावर तत्काळ आपले शिपाई पाठवून माझ्या भावाच्या घराहून तो सर्व माल आणविला. नंतर तो अल्नास्करास म्हणाला कीं, 'अरे, तुझा गुन्हा फार मोठा आहे. न्यायाप्रमाणें पाहतां, तुला मोठी शिक्षा केली पाहिजे; तथापि तुला पूर्वीं मी वचन देऊन चुकलों, यास्तव तसें मला करतां येत नाहीं. तर तुला सांगतों कीं, तूं आतांच्या आतां शहरांतून निघून जा. खबरदार, जर पुनः तुला या शहरांत पाहिलें, तर तुला देहांत शिक्षा करीन.' त्यानें त्यास असें सांगण्याचें कारण इतकेंच होतें कीं, तो तेथें राहिला तर कदाचित् आपल्यावर ( कोतवालावर ) पातशाहाजवळ फिर्याद करील, तर ती न व्हावी. असा हुकूम झाला तेव्हां बापड्या अल्नास्कराला तत्काल बगदाद सोडून जावें लागलें. तो तेथून निघून दुसऱ्या गांवीं जात असतां रस्त्यानें चोरांनीं गांठून

त्याच्याजवळ होतें नव्हतें तें सर्व बुचाडून त्याला अगदीं नागवा-उघडा करून ते चोरटे निघून गेले. याप्रमाणें त्याची अवस्था झाल्याचें वर्तमान मला समजल्यावर मी बरोबर कांहीं कपडे घेऊन त्याच्या शोधार्थ गेलों, व त्यास शोधून काढून त्यास ते कपडे दिले व त्यास गुप्तपणें या शहरांत आणून माझ्या सामर्थ्याप्रमाणें मी त्याचा समाचार घेतला. ही माझ्या तिसऱ्या भावाची गोष्ट.

न्हावी पातशाहास म्हणतो—महाराज, आतां माझ्या चवथ्या भावाची मात्र हकीकत सांगावयाची राहिली आहे, ती सांगतों. सरकारांनीं मेहेरबानी करून ऐकावी म्हणजे झालें.

---

## न्हाव्याच्या चवथ्या भावाची गोष्ट.

माझ्या चवथ्या भावाचें नांव क्षाक्बक्. त्याच्या ओंठावर केंस असत. तो बराच उद्योगी होता. आमचा बाप मेला तेव्हां त्याच्या वांट्यास जे शंभर रुपये आले होते, ते त्यानें व्यापारांत घालून आपला बराच निर्वाह चालविला होता. परंतु पुढें कांहीं दिवसांनीं त्याचें दैव फिरून त्याचा रोजगार एकदम बुडला व अन्न मिळे-नासें होऊन तो भीक मागूं लागला. हा भीक मागण्याचा धंदा त्यानें मोठ्या धूर्तपणानें चालविला होता. तो दारावरील पहारेक-ऱ्यांची किंवा घरांतलि चाकरांची आर्जव करून किंवा त्यांस लांच देण्याचें कबूल करून श्रीमान लोकांच्या घरांत प्रवेश करून घेई, व यजमानापर्यंत जाऊन त्यास आपलें दैन्य दाखवी, म्हणजे बहुतकरून त्यांपासून त्याला चांगली भिक्षा मिळे.

एक दिवस तो रस्त्यानें चालला असतां एक मोठी टोलेजंग हवेली त्याच्या नजरेस पडली. मग दरवाज्यांतून डोकावून आंत पाहतो तों तेथील चाकरमाणसांच्या संख्येवरून व आंतील ऐश्वर्या-वरून तो वाडा कोणी मोठ्याच श्रीमंताचा असावा, असें त्यास वाटलें. नंतर तो जवळ जाऊन ‘ हा कोणाचा एवढा वाडा ? ’

म्हणून देवडीवरील एका पाहरेकऱ्यास विचारूं लागला. पाहरेकऱ्यानें उत्तर केलें कीं, ' अरे, असा सवाल करतोस, तो तूं आलास तरी कोठून ? हा अमीरसाहेबांचा वाडा अलम दुनियेला ठाऊक असतां तुला कसा समजला नाहीं ? ' त्या अमीराचा उदारपणाविषयीं व गरिबांस धर्म करण्याविषयीं चोहींकडे मोठा नांवलौकिक गाजत होता, व ती कीर्ति क्षाक्बक् यानेंही पुष्कळ ऐकिली होती. त्यावरून तो त्या पहारेकऱ्याजवळ कांहीं भीक मागूं लागला. पाहरेकरी म्हणाला, ' अरे बाबा, तूं असा भितोस कां ? तूं खुशाल आंत यजमानाकडे जा. वाड्यांत भिकाऱ्यांस जावयाची बंदी अगदीं नाहीं. यजमान असतील तेथें जाण्याची त्यांस एकंदर परवानगी आहे, तर तूं त्यांकडे बेधडक जा. ते तुला खचींत संतुष्ट करून परत लावतील. '

इतक्या ममतेचें भाषण पहारेकरी करील असें माझ्या भावास वाटलें नव्हतें. मग त्यानें त्या पहारेकऱ्याचे पुष्कळ आभार मानून त्याच्या परवानगीनें तो वाड्यांत शिरला. ती इमारत फारच मोठी होती. तींत जेव्हां तो कांहीं वेळ फिरला तेव्हां त्यास अमीरसाहेब कोठें आहेत याचा शोध लागला. शेवटीं तो एका मोठ्या चौकांत आला. तो चौक फारच सुशोभित होता व त्याची बांधणी फार उत्कृष्ट होती. त्या चौकांतून तो बगीचांत गेला. त्या बगीचांत अनेक प्रकारचीं उत्तम व चित्रविचित्र फुलझाडें व फळझाडें मोठ्या बेतानें लावलीं होतीं, व मधून मधून फिरण्याकरतां नानाप्रकारच्या रंगांच्या संगमरवरी दगडांच्या वाटा बांधल्या होत्या. बगीचाच्या चोहीं बाजूंस चौसोपी होती. या चौसोपीस बगीचाच्या बाजूंस भिंती नव्हत्या; तर उंची कापडाचे मोठमोठे पडदे मात्र बांधले होते. उन्हाच्या वेळेस उष्णता न यावी म्हणून हे पडदे सोडीत व ऊन गेलें म्हणजे बगीचाची थंड व सुगंध हवा येण्याकरतां ते पडदे वर बांधीत.

माझ्या भावास तें रमणीय स्थल पाहून व्हावा तसा आनंद झाला

नाहीं. कारण त्या बिचाऱ्याचें सर्व लक्ष भिक्षेकडे लागलें होतें. नंतर त्या चौसोपींत अत्यंत शृंगारलेला जो भाग होता तेथें तो गेला. त्या ठिकाणीं पलंग, आरसे, तसबिरी, पडदे वगैरे बहुमोल सामान उत्तम रीतीनें मांडून व लावून ठेवलें होतें, व भिंतीवर व छतावर सोनेरी शाईनें वेलबुट्टी वगैरे काढल्या होत्या. त्या ठिकाणीं एका पलंगावर श्रेष्ठस्थानीं एक गृहस्थ बसला होता. तो वयानें वृद्ध असून त्याच्या उरावर लांब व पांढरी दाढी लोंबत होती. तो दिसण्यांत फार भव्य, शांत, आनंदवृत्ति व कृपाळू दिसत होता. या चिन्हांवरून माझ्या भावानें तर्क बांधला कीं, हाच घरचा मालक अमीरसाहेब असावा. तो त्याचा तर्क खरा होता. घरधन्यानें या याचकास पाहतांच मोठ्या ममतेनें त्यास अलीकडे बोलाविलें व त्यास बसावयास सांगून 'तूं कां आलास?' म्हणून विचारलें. माझ्या भावानें मोठ्या गरीबीनें दीन मुद्रा करून सांगितलें कीं, 'महाराज, आपल्यासारख्या उदार व थोर सरदारांनीं केलेल्या धर्मावर उपजीविन करणारा मी दीन, दुबळा, भिकारी आहें; व आपली साऱ्या दुनियेंत गाजणारी कीर्ति ऐकून आपणांस आपलें दैन्य कळविण्याकरतां आपल्या पायापाशीं आलों आहें.' हा घरधनी खरोखरी उदार व कोमल हृदयाचा होता. ईश्वरानें त्यास संपत्तिही दिली होती. या असल्या धर्मात्म्याची गांठ पडली, हें क्षाक्बकाचें खरोखरी मोठें दैवच समजावयाचें.

हें त्याचें दीनवचन ऐकून अमीरास त्याचा फारच कळवळा आला. मग तो ममतासूचक स्वरानें त्यास म्हणाला, 'अरे, मी या बगदाद शहरांत रहात असतां येथेंही तुझ्यासारखा दुःखी प्राणी आहेना? धिक्कार असो माझ्या संपत्तीला!' हें भाषण ऐकून माझ्या भावास वाटलें कीं, 'आतां हा खरोखरी कांहीं तरी मोठा धर्म करील.' मग तो त्यास अनेक प्रकारचे आशीर्वाद देऊन म्हणाला, 'महाराज, मी खरोखरीच अत्यंत दीन आहें.' अमीरानें उत्तर केलें, 'कांहीं चिंता नाहीं. इतःपर मी तुझें पोषण करीन. तुला यापुढें घरोघर भीक मागण्याची गरज नाहीं.' माझा भाऊ पुनः म्हणाला, 'महाराज, मी

देवाची शपथ वाहून सांगतों कीं,'आज मी साऱ्या दिवसाचा उपाशीं आहें. मी अजून तोंडांत पाणीसुद्धां घातलें नाहीं.' अमीर आश्चर्य करून बोलला, 'काय, संध्याकाळ होत आला तरी तूं अजून कांहीं खाल्लें नाहींस ? अरेरे ! बापड्या, तुझा जीव भुकेनें फारच व्याकुळ होत असेल !' मग मोठ्या स्वरानें चाकरांस हांक मारून तो म्हणाला, 'अरे, कोण आहेरे पलीकडे ? लौकर हात धुवावयास पाणी आणि तस्त घेऊन या.'

वास्तविक म्हटलें म्हणजे कोणी एक चाकर आला नाहीं किंवा कांहीं नाहीं. तरी जसें काय एका चाकरानें तस्त खालीं धरलें आहे व दुसरा वरून पाणी ओतीत आहे, याप्रमाणें तो अमीर अंगरख्याच्या अस्तन्या मागें सारून हात चोळूं लागला, व 'ये, हात धू,' म्हणून माझ्या भावास बोलावूं लागला. हें पाहून शाकूबकास वाटलें कीं, घरधनी रंगेला असल्यामुळें आपली मस्करी करीत आहे. मग माझा भाऊही स्वतः थट्टेबाजच होता व गरीबांची चेष्टा करण्याची श्रीमान् लोकांस कधीं कधीं खोड असते, हेंही तो स्वतःच्या अनुभवावरून जाणत होता, यास्तव तो घरधन्याजवळ बसून त्याच्याप्रमाणें आपणही हात चोळूं लागला.

मग चाकरांस हुकूम करीत आहों असें दाखवून अमीर म्हणाला, 'अरे, या गरीब बिचाऱ्यास भूक फार लागली आहे, तर खाना लौकर घेऊन या. आम्हांस येथें तिष्ठत बसवूं नका.' असें बोलून तो अंमळशानें खाना खात आहों असें करूं लागला. खरोखरी पुढें कांहींएक नव्हतें, तरी ताटांतून पदार्थ उचलल्यासारखें करून तो तोंडांत घालून चावल्याप्रमाणें तो उगीच तोंड हालवूं लागला. आणि माझ्या भावास म्हणाला कीं, 'अरे, ये, जेवूं लाग. तूं येथें अगदीं परकेपणा धरूं नको. अरे, अजून जेवूं कां लागत नाहींस ? तुला फार भूक लागली होती ना ?' मग माझ्या भावानें त्यासारखें उगीच हात तोंडाशीं नेऊन चावल्यासारखें तोंड हालवण्यास आरंभ केला, आणि म्हटलें, 'महाराज, जेवतों ना ?' अमीरानें विचारलें,

' मित्रा, ही पोळी कशी आहे ? तुला ती गोड लागते ना ?' माझ्या भावानें उत्तर केलें, ' महाराज, गोड म्हणून काय सांगूं ? अशी पांढरी, स्वच्छ व नाजूक पोळी मी जन्मांत कधीं खाल्ली नव्हती. ' अमीर बोलला, ' तर मग आज ती पोळी पोट भरून खा.अरे, ज्या दासीनें ही पोळी तयार केली, ती पांचशें मोहरा देऊन मीं विकत घेतली आहे. ' माझ्या भावानें केवळ कल्पनेनें जी पोळी खाल्ली होती, तिची व ती करणाऱ्या स्वयंपाकिणीची याप्रमाणें तारीफ केल्यानंतर त्यानें पुनः चाकरास हांक मारून त्यास शिजवलेली बकऱ्याची सागोती आणावयास सांगितली. खरोखरीं म्हटलें म्हणजे सागोती–बिगोती आली नाहीं किंवा कांहीं नाहीं. तथापि स्वतः ती खाल्ल्यासारखें करून त्यानें माझ्या भावास विचारलें कीं, ' अशी मसाला लावून तयार केलेली सागोती तूं पूर्वीं कधीं खाल्ली होती कीं नाहीं ?' त्यानें उगीच मिटक्या मारून उत्तर केलें, ' महाराज, हा पदार्थ तर फारच उमदा झाला आहे. असा पूर्वीं मीं कधींच खाल्ला नव्हता, आणि यामुळेंच त्यावर मी इतका तुटून पडलों आहें. ' अमीर म्हणाला, ' तुला पदार्थ आवडतात हें पाहून मला फार संतोष वाटतो. तर तबकांतले सर्व पदार्थ तूं खाऊन टाक; परत जाऊं नको. ' इतक्यांत त्यानें चाकरांस आज्ञा केली कीं, ' मध, बेदाणा, पिस्ते वगैरे गोड मसाला भरून तयार केलेलें बदक घेऊन या. ' मग पोळी व सागोती याचप्रमाणें बदक आल्यावर घरधन्यानें त्याच्या वाखाणणीस प्रारंभ करून म्हटलें कीं, ' हें बदक फारच उत्तम आहे, तरी तूं याचा एक पंख व पाय मात्र मासल्याकरितां खाऊन पाहा. फार खाऊन पोट भरूं देऊं नको. अद्यापि उत्तम उत्तम पक्वान्नें पुष्कळ यावयाचीं आहेत, तीं खावयास भूक असूं दे. ' सारांश, याचप्रमाणें त्यानें कितीएक पक्वान्नें चाकरांकडून आणवलीं व माझ्या भावानें याचप्रमाणें खाल्लीं. वास्तविक म्हटलें तर तो बिचारा भुकेनें खरोखरी व्याकुळ झाला होता व या कल्पनेंतल्या मोठमोठ्या उमद्या पक्वान्नांपेक्षां खरी साधी भाकर त्यास

मिळाली असती, तर त्यानें त्या सर्व पक्वान्नांस लाथ मारून ती भाकर मोठ्या आनंदानें घेतली असती. असो; अमीरानें माझ्या भावास जी मानसिक मेजवानी घातली, तींत त्यानें कोंकराच्या सागोतीप्रमाणें दुसऱ्या कोणत्याही जिनसांची तारीफ केली नाहीं. तो म्हणाला कीं, 'हीं कोंकरें मी पिस्ते चारून तयार करतों, व असा हा पदार्थ माझ्या घराखेरीज तुला दुसऱ्या कोठेंही आढळणार नाहीं. तर तूं तो यथेच्छ खा.' असें नुस्तें बोलून तो थट्टेबाज म्हातारा थांबला नाहीं, तर त्यानें त्या कल्पित पदार्थाचा तुकडा तोडल्यासारखें करून त्यास घास देण्याकरतां माझ्या भावाच्या तोंडाशीं हात नेला, आणि म्हटलें कीं, 'हा तुकडा खा, म्हणजे तुझी खात्री होईल कीं, मी या पक्वान्नांची इतकी तारीफ जी करीत आहे ती यथायोग्य आहे.' माझ्या भावानें डोकें पुढें करून व तोंड उघडून तो त्याच्या हातचा घांस घेतल्यासारखें केलें व चावल्याप्रमाणें तोंड हालवून मोठ्या आनंदानें तो गिळल्याप्रमाणें दाखविलें. अमीर म्हणाला, 'मला खात्री वाटते कीं, हा जिन्नस तुला खूपच आवडला असेल. का तो अपूर्व आहे कीं नाहीं?' माझ्या भावानें उत्तर केलें, 'अमीरसाहेब, उत्तम म्हणून काय सांगूं? त्याचें वर्णन मला तोंडानें करवत नाहीं. महाराज, थोडक्यांत सांगतों कीं, आपल्या घरच्यासारख्या जेवणाचा बेत व उमदे पदार्थ कोठेंही नसतील.' नंतर अमीरानें चाकरांस हांक मारून सांगितलें कीं, 'अरे सांबारें आणा रे.' मग तें मानसिक जेवणांतलें सांबारें आल्यावर त्यानें माझ्या भावास विचारलें, 'का मित्रा, या सांबाऱ्याचा भुरका मारलास का? त्यांतलि खुमारी कशी आहे?' माझ्या भावानें उत्तर केलें, 'अमीरसाहेब, असें सांबारें मीं जन्मांत कधीं चाखलें नाहीं. फारच उत्कृष्ट आहे. महाराज, यांत खुबी अशी आहे कीं, यांत लवंगा, वेलदोडे, जायफळ, मिरीं, आलें, केशर वगैरे अनेक मसाल्याचे जिन्नस घातले आहेत, परंतु ते अशा बेतानें घातले आहेत कीं, त्यांची रुचि व स्वाद एकमेकांच्या योगानें

न झांकतां निरनिराळीं अनुभवास येताहेत. फार काय सांगूं ? या पदार्थांची भट्टी फारच नामी साधली आहे. ' घरधनी म्हणाला, ' ठीक आहे, तर झोड सडकून. ' इतक्यांत त्यानें चाकरास आणखी हांक मारून त्यास आणखी तें सांबारें आणण्यास सांगितलें. परंतु इतक्यांत माझा भाऊ म्हणाला, 'महाराज, पुष्कळ झालें. आतां आणखी खावयास माझ्या पोटांत जागा राहिली नाहीं. ' घरधनी म्हणाला, ' तर मग आतां फळफळावळ येऊं द्या. ' नंतर पहिलीं तादें उचलून फळांनीं व मिठाईनें भरलेलीं नवीं ताटें येण्यास चाकरांस फुरसत देण्याकरितां कांहीं वेळ थांबलेंसें करून तो पुनः माझ्या भावास म्हणाला, ' मित्रा, हे बदाम खा; हे ताजे असून फार उत्तम आहेत. ' ते कल्पित बदाम घेऊन फोडल्यासारखे करून खाऊं लागले. नंतर याचप्रमाणें आणखी कितीएक प्रकारचा मेवा व फळें खावयास दिलीं. शेवटीं एक प्रकारच्या साबण्या घेतल्यासें करून तो माझ्या भावास म्हणाला, ' मित्रा, ही साबणी खा. ही फार गुणकारी आहे.हिच्या अंगीं पचनशक्ति फारच उत्कृष्ट आहे. ' क्षाक्बक् यानें ती कल्पित साबणी खाल्ल्यासारखी करून म्हटलें, ' अमीरसाहेब, हा जिन्नस फारच उमदा आहे. हींत कस्तुरीचा सुवास फारच खुमारीदार येत आहे. ' घरधनी म्हणाला, ' आम्ही या साबण्या घरीं करतों व हा जिन्नस व दुसरा कोणताही जिन्नस तयार करतांना पैशाकडे अगदीं पाहात नाहीं. पैसा पाण्यासारखा खरचतों, तेव्हां अशी मनाजोगी वस्तु होते. नंतर माझ्या भावास आणीक खाण्याविषयीं आग्रह करून तो पुनः म्हणाला, ' मित्रा, तूं आलास तेव्हां म्हणालास कीं, मी आज साऱ्या दिवसांत कांहीं खाल्लें नाहीं, माझा जीव भुकेनें अगदीं कासावीस झाला आहे; पण त्याप्रमाणें तूं कांहींच खाल्लें नाहींस, असें कां बरें ? तूं येथें अगदीं संकोच करूं नको. ' माझ्या भावानें उत्तर केलें, ' अमीरसाहेब, मला जेवणाचा आतां खरोखरी कंटाळा आला. आतां आणखी एक घांससुद्धां घेण्याचें सामर्थ्य राहिलें नाहीं. ' वास्तविक म्हटलें

म्हणजे त्या बिचाऱ्याचें तोंड उगीच हालवून हालवून खरेंच दुखूं लागलें होतें. घरधनी म्हणाला, ' बरें तर, मद्य तर थोडेसें पिशील कीं नाहीं ? असल्या जेवणावर मद्य प्यायल्यावांचून गम्मत नाहीं. ' माझ्या भावानें उत्तर केलें, ' अमीरसाहेब, मीं मद्यास शिवत देखील नाहीं. कारण तें न पिण्याचा मीं बहुत वर्षें नेम धरला आहे. तर धन्यांनीं एवढ्या गोष्टीविषयीं बंद्यास आग्रह करूं नये. ' अमीर म्हणाला, ' मित्रा, हे कुठले म्हाताऱ्या बायांसारखे नेम-धर्म काढले आहेस ? मी नाहीं ऐकायाचा असली पोकळ सबब. मी तर मद्य प्यायल्यावांचून तुला नाहीं सोडणार. ' क्षाकूबकानें उत्तर केलें, 'धनीसाहेबांचा इतका आग्रह असला तर मी आपला नेम सोडूनही मद्य पितों; नाहीं म्हणत नाहीं. पण आज बहुत वर्षें माझी दारू पिण्याची संवय सुटली आहे; यास्तव अंमल येऊन कदाचित् माझ्या हातून त्या अमलांत अनन्वित व अमर्यादेची गोष्ट होईल असें मला भय वाटतें, आणि याच कारणानें मी नाहीं म्हणत होतों. तर धन्यास आणखी एक वेळ विनंति करतों कीं, मला आपण या भान-गडींत न घातलें तर फारच बरें होईल. ' घरधन्यानें उत्तर केलें, ' तें कांहीं नाहीं. तुला दारू प्यायली पाहिजे. ' असें म्हणून त्यानें चाकरास हांक मारून मद्याच्या कुप्या व प्याले आणण्यास हुकूम केला. खरोखरी म्हटलें म्हणजे जेवण व फळफळावळ याप्रमाणें मद्यही कल्पितच होतें; वास्तविक कांहींच नव्हतें. धन्यानें कुपींतून प्याल्यांत ओतल्यासारखें करून तें चालीप्रमाणें आपण अगोदर प्याल्यासारखें दाखविलें व दुसऱ्यानें प्याला भरल्यासारखें करून माझ्या भावापुढें हात केला आणि म्हटलें, ' मित्रा, हा प्याला पी आणि हें तुला कसें काय लागतें तें मला सांग. ' माझ्या भावानें मोठ्या अदबीनें तो प्याला हातीं घेतला, मग बतावणी पुरी करण्या-साठीं त्या मद्याचा रंग चांगला आहे कीं नाहीं, हें पहाण्याकरतां तो उजेडांत धरला, व स्वाद चांगला येतो कीं नाहीं, हें पाहण्या-करतां तो नाकाशीं नेला आणि शेवटीं तोंडास लावून मोठ्या

आनंदानें मिटक्या मारीत त्याचें प्राशन केलेसें दाखविलें. नंतर तो घरधन्यास म्हणाला, 'अमीरसाहेब, ही दारू उंची आहे खरी, तरी असावी तशी कडक नाहीं. आणखी अंमळ कडक असती तरी बहार होती.' घरधन्यानें उत्तर केलें, 'मित्रा, तूं असा मागता हो म्हणजे कडकही मिळेल.' असें म्हणून त्यानें दुसऱ्या कुपींतून ओतल्यासारखें करून दुसरी दारू माझ्या भावास दिली. याप्रमाणें आग्रह करून दुसरी दारू कितीएक प्याले तें काल्पित कडक मद्य पाजिलें असतां क्षाकूबक त्याचा कैफ येऊन गुंगल्यासारखें करूं लागला, व त्यानें एकाएकीं हात उगारून अमीराचे थोबाडीत अशी सपाटून एक चपराक मारिली कीं, तो तिनें धाड्दिशीं खालींच पडला. माझा भाऊ आणखी दुसरीही चढवणार होता, इतक्यांत घरधन्यानें उठून बसून त्याचा हात धरला, आणि म्हटलें कीं, 'अरे, तुला वेड लागलें कीं काय ? अशी मस्ती काय करतोस?' मग माझ्या भावानें शुद्धीवर आल्यासारखें करून हात जोडून पायां पडून मोठ्या नम्रतेनें उत्तर केलें, 'महाराज, बंद्याच्या हातून मोठीच आगळीक झाली; माफी असावी. धन्यांनीं मेहेरबानी करून या दासास आपल्या पंक्तीचा लाभ व मान दिला, ते उपकार त्यावर डोंगराएवढे झाले आहेत. परंतु तितकी ती गोष्ट पुरी करून त्यास दारू पिण्यास आग्रह केला नसता तर बरें होतें. मी आपणांस पूर्वींच विनंति केली होती कीं, दारू पिण्याची मला अलीकडे बहुत दिवसपर्यंत संवय नाहीं; त्यामुळें ती प्यालों असतां माझ्या हातून अमर्यादेची गोष्ट कदाचित् होईल. असो; होऊं नये ती गोष्ट झाली. परंतु झाल्यास आतां काय उपाय आहे ? तर आपण या दासास क्षमा करावी असें पदर पसरून पुनः माझें मागणें आहे.' असें म्हणून त्यानें त्याचे पायांवर डोकें ठेविलें.

याप्रमाणें माझ्या भावाचें भाषण ऐकून घरधनी तोंडांत मारल्याबद्दल किंचितही न रागावतां मोठमोठ्यानें हंसूं लागला. तो म्हणाला, 'अरे, तुझ्यासारख्या स्वभावाचा मनुष्य मी आज

फार वर्षें शोधीत आहे. परंतु मला कोणी सांपडला नाहीं; तूं आज मनाप्रमाणें सांपडलास. फार उत्तम झालें. माझ्या तूं तोंडांत मारलीस तिची तुला माफी करतों; इतकेंच नव्हे तर या घटकेपासून मी तुला आपल्या जिवलग व खऱ्या मित्रांतला एक असें समजतों. इतः-पर हें तुझेंच घर असें समज. मी केलेली मस्करी तूं मोठ्या धिम्मे-पणानें सोसून मोठ्या चतुराईनें तिची बतावणी व शेवट केला, त्याबद्दल तुला मी मोठी शाबासकी देतों. असो; इतका वेळ मस्करी झाली. आतां तुला खरोखरीची मेजवानी देतों. ' असें म्हणून त्यानें संकेताची टाळी वाजविली. ती ऐकतांच कितीएक चाकर एकदम तेथें आले. त्यांस त्यानें खाना आणण्यास हुकूम केला असतां त्यांनीं तत्काळ तयारी केली. मग माझ्या भावानें पूर्वीं केवळ कल्प-नेंत जीं पक्कान्नें खाल्लीं होतीं, त्यांचा वास्तविक स्वाद घेतला.सारांश, त्या मेजवानीनें माझ्या भावास पराकाष्ठेचें समाधान वाटलें व या अमीराचाही त्यावर पराकाष्ठेचा लोभ जडला. त्यानें त्यास तेथल्या तेथेंच उत्तम प्रकारचा पोषाख दिला व नेहमीं आपल्या वाड्यांत राहावयास सांगितलें.

माझा भाऊ नशीब फिरल्यामुळें गरीब झाला होता खरा, तथापि तो मूर्ख नव्हता. त्याच्या अंगीं पुष्कळ गुण होते. ते दृष्टीस पडल्या-वरून त्या अमीराची मर्जी त्यावर फारच बसून, त्यानें थोड्या दिवसांत त्यांस आपला मुख्य कारभार दिला; व क्षाक्बकानेंही तें काम मोठ्या चातुर्यानें व इमानानें केलें. त्यानें धन्यास व हाताखालच्या सर्व माणसांस खूष राखून सर्वांकडून वाहवा म्हणून घेतलें. तो अमिराच्या पदरीं सुमारें वीस वर्षें होता. पुढें तो उदार व दयाळू अमीर फार वृद्ध होऊन मरण पावला. त्यास कोणी मूल-बाळ वगैरे नसल्यामुळें त्याची दौलत सरकारांत जप्त होऊन गेली. असें झालें असतां क्षाक्बक् पुनः दरिद्री झाला. मग त्यास वैराग्य होऊन त्यानें मक्केच्या यात्रेस जाण्याचा निश्चय करून यात्रेकऱ्यांच्या

मेळ्याबरोबर तो निघाला. परंतु तो मेळा अरबस्थानांतून चालला असतां वाटेंत चोरांनीं त्यास गांठून तो लुटला.

माझा भाऊ ज्या चोराच्या हातीं सांपडला होता, त्यानें त्यास गुलाम करून घरीं नेलें. खंडाबद्दल पैसा देऊन आपणांस तो सोडवून घेईल या भ्रांतीनें तो चोर क्षाक्बकास बहुत छळी, व त्यास दररोज चाबकानें मारी. माझ्या भावानें त्यास वारंवार सांगावें कीं, ' मला तूं अशी कितीही पीडा केलीस तरी कांहीं उपयोग नाहीं. मी अत्यंत भिकारी आहे; व माझी दया येऊन तुला पैसा देऊन माझी सुटका करील असा या दुनियेंत कोणी नाहीं. तर तूं मला उगीच कां छळतोस ? मी तुझा गुलाम झालों आहें; तुला पाहिजे तें तूं मजकडून काम करून घे; किंवा मला कोणास तरी विक; त्यांत तुझा कांहींतरी नफा होईल; परंतु चाबकांनीं मला असें मारून तुझा कोणताही फायदा नाहीं. ' याप्रमाणें सामोपचारानें व युक्तीनें माझ्या भावानें त्यास बहुत सांगितलें व त्यास दया यावी म्हणून तो त्यापुढें पुष्कळ रडला. परंतु त्या निर्दय चोराच्या हृदयास द्रव म्हणून आला नाहीं. त्या दुष्टास वाटलें होतें कीं, हा मनुष्य खंडाबद्दल आपणांस पुष्कळ द्रव्य देईल. परंतु त्यापासून कांहींच मिळण्याचा रंग दिसेना. तेव्हां निराश होऊन तो दुष्ट फारच चवताळला, व त्यानें एके दिवशीं मोठा सुरा घेऊन त्या बापड्या अनाथ क्षाक्बकाचे ओठ चिरून टाकले; आणि त्यास एका उंटावर घालून एका ओसाड डोंगराच्या माथ्यावर नेऊन टाकिलें; परंतु त्याची आयुष्यमर्यादा बळकट म्हणून त्याच डोंगराच्या माथ्यावर कोणी वाटसरू या बगदाद शहरास येत होते, ते त्यास भेटल्यावरून त्याची हकीकत त्यांनीं मला कळविली. नंतर मी मोठ्या त्वरेनें तेथें जाऊन त्यास घरीं आणलें व माझ्यानें होईल तितका त्याचा समाचार घेतला.

याप्रमाणें त्या न्हाव्याचें भाषण ऐकल्यावर मेजवानीस जमलेल्या आम्हां सर्वांची खात्री झाली कीं, त्या तरुण लंगड्या गृहस्थानें त्या

न्हाव्यावर वटवट करण्याबद्दल जो ठपका ठेवला होता, तो खोटा नव्हता. तथापि आम्ही त्या न्हाव्यास मेजवानीस राहून घेतलें. जेवणखाण झाल्यावर आम्ही गप्पा मारीत व ख्यालीखुशाली करीत दिवेलागणीची वेळ होईपर्यंत तेथेंच बसलों होतों. संध्याकाळच्या सुमारास मी तेथून उठून दुकानीं आलों.

या वेळेस मी दुकानीं बसलों असतां आपला ठेंगणा कुबडा तेथें आला. तो त्या वेळेस कैफानें पुष्कळ झिंगला होता. तो तेथें बसून गाऊं लागला. तें त्याचें चमत्कारिक गाणें मला आवडल्यावरून माझ्या मनांत असें आलें कीं, यास घरीं घेऊन जावें, म्हणजे याचें गाणें आपल्या बायकोसही ऐकावयास सांपडेल व तिचेंही दोन घटका मनोरंजन होईल. मग मी त्यास जेवावयास बोलावून घरीं घेऊन गेलों. त्या दिवशीं रात्रीं माझ्या बायकोनें मासे तयार केले होते. ते आम्ही खात बसलों असतां त्या कुबड्याच्या घशांत माशाचें हड्डूक अडकून त्याचा दम कोंडला, आणि तो एकाएकीं मूर्च्छित होऊन खालीं पडला. मी व माझ्या बायकोनें तो शुद्धीवर येण्याविषयीं सुचले तेवढे उपाय केले; परंतु कांहीं उपयोग होईना. शेवटीं हा खचित मेला असें आम्हांस भासून आम्ही फारच घाबरलों. मग हें लचांड आपल्या गळ्यांतून निघावें म्हणून आम्ही दोघांनीं त्यास उचलून या यहुदी वैद्याच्या जिन्यांत नेऊन टाकिलें. यहुदी वैद्यानें आपल्यावरचें अरिष्ट टाळण्याकरितां तें प्रेत या मुसलमान वाण्याच्या घरांत टाकलें, व त्या वाण्यानें तें गुपचूप नेऊन रस्त्यांत बसविलें. तेथें या ख्रिस्ती सावकाराचा धक्का त्यास लागून तें खालीं पडलें व मूळची हकीकत ठाऊक नसल्यामुळें आपण यास मारिलें अशी त्या सावकारास भ्रांति झाली. शिंपी काशगरच्या सुलतानास म्हणतो 'महाराज, याप्रमाणें आपल्या ठेंगण्या कुबड्याच्या मरणाची वास्तविक हकीकत आहे, व ती सरकारच्या पायांपाशीं जाहीर केली आहे. तिचा विचार करून, आम्ही सरकारच्या दयेस किंवा कोपास पात्र आहों, याचा निर्णय करणें सरकारांकडे आहे.'

हें भाषण ऐकून काशगरचा सुलतान खुष झालासा दिसला, व व त्याची ही प्रसन्न मुद्रा पाहून शिंपी व त्याचे सोबती दुसरे तिघे कैदी यांच्या जिवांत थोडासा जीव आला. मग सुलतान म्हणाला कीं, ' त्या तरुण लंगड्या मनुष्याची गोष्ट, त्या न्हाव्याची गोष्ट व त्याच्या चार भावांच्या गोष्टी, या माझ्या नकल्या कुबड्याच्या गोष्टीपेक्षां खरोखरी चमत्कारिक आहेत हें मी कबूल करतों. परंतु मीं वचन दिल्याप्रमाणें तुम्हांस माफी देऊन घरीं जाऊं देण्यापूर्वीं व या बापड्या कुबड्यास मूठमाती देण्यापूर्वीं, ज्या न्हाव्याच्या गोष्टींनीं आज तुम्हांस जीवदान मिळालें, त्या न्हाव्यास स्वतः एकदां पहावें अशी माझी इच्छा आहे, आणि ज्या अर्थीं तो या माझ्या नगरांतच आहे, त्या अर्थीं त्यास आणावयाचें अगदीं कठिण नाहीं. ' असें म्हणून त्यानें आपले शिपाई बरोबर देऊन त्या शिंप्यास त्या न्हाव्यास शोधून आणण्याकरतां पाठविलें.

नंतर शिंप्यानें या न्हाव्यास लौकर शोधून आणून सुलतानापुढें उभें केलें. तो न्हावी सुमारें नव्वद वर्षांचा म्हातारा दिसत होता. त्याची दाढी व भिंवया पिकून अगदीं पांढऱ्या दिसत होत्या. त्याचे कान व नाक फारच लांब होते. त्याची ती चमत्कारिक मुद्रा पाहून सुलतानास हंसूं आलें. मग तो हंसें आवरून त्यास म्हणाला, 'अहो मौनधारीबुवा, आम्हीं असें ऐकिलें आहे कीं, तुम्हांस चमत्कारिक अशा बहुत गोष्टी येताहेत; तर त्यांपैकीं एक दोन गोष्टी तुम्ही सांगाव्या अशी आमची फार इच्छा आहे, व याच हेतूनें तुम्हांस येथें बोलावून आणिलें आहे. ' न्हाव्यानें उत्तर केलें, ' महाराज, मला ज्या चमत्कारिक गोष्टी येत असतील त्याविषयीं आपण मग बोलूं; पण मी एक गोष्ट विचारतों तिचें उत्तर सरकारांनीं मेहेरबानी करून मला अगोदर द्यावें. मी इतकेंच विचारतों कीं, हा ख्रिस्ती सावकार, हा यहुदी वैद्य व हा मुसलमान वाणी हे येथें कां आले आहेत ? व हा ठेंगणा कुबडा येथें कचेरींत असा कां पडला आहे ?' त्याचा तो धिटाईचा प्रश्न ऐकून सुलतानास हंसें आलें. नंतर तो

म्हणाला, 'अरे, या गोष्टीची चौकशी करून तुला काय फायदा आहे ?' न्हाव्यानें उत्तर केलें, 'राजाधिराज, ही चौकशी करण्यापासून मला मोठा फायदा आहे. तो असा कीं, यावरून सरकारच्या मनांत येईल कीं, कितीएक वेडे अजाण लोक मला वाचाळ म्हणतात; पण मी वास्तविक तसा नव्हे; तर मी फारच थोडें बोलणारा आहें व यावरूनच समजूतदार व माझा गुण ओळखणाऱ्या लोकांनीं "मौनधारी" असें मला प्रतिष्ठादायक नांव दिलें आहे.'

हें भाषण ऐकून तर सुलतान फारच हंसूं लागला. मग त्यानें त्याचें कोड पुरवण्यासाठीं आपल्या एका चाकराकडून त्या कुबड्याची हकीकत त्यास सांगविली. ती गोष्ट ऐकल्यावर न्हाव्यानें डोकें हालविलें, आणि त्या चेष्टेनें असें सुचविलें कीं, त्यास ती गोष्ट सर्वथैव खरी वाटली नाहीं. नंतर तो म्हणाला, 'खरोखर ही गोष्ट फारच मौजेची आहे. पण या कुबड्यास जवळ घेऊन नीट पहावें अशी माझी इच्छा आहे.' मग सुलतानानें तसें करण्याविषयीं परवानगी दिल्यावर तो त्या कुबड्याजवळ जाऊन बसला, व त्यानें त्याचें डोकें आपल्या दोन्ही गुढघ्यांवर धरून नीट लक्ष लावून त्यास पाहिलें; आणि त्यास असें हंसूं आलें कीं, आपण राजाच्या कचेरींत बसलों आहों, याचें भान त्यास न राहून त्या हंसण्याच्या झपाट्यांत तो उताणा पडला! मग पुनः उठून तो हंसत हंसत राजास म्हणाला, 'महाराज, "कोणीही कारणावांचून मरत नाहीं" ही जी प्राचीन म्हण आहे, ती खरी आहे. जर कोणाची गोष्ट सोनेरी अक्षरांनीं लिहावयास योग्य असेल, तर ती या ठेंगण्या कुबड्याची होय! असा चमत्कार मीं पूर्वीं कधीं ऐकलासुद्धां नाहीं; मग पाहिला कोठला असेल!'

हें त्याचें भाषण ऐकून कचेरींत बसलेल्या सर्व लोकांस असें वाटलें कीं, हा न्हावी थट्टा करीत असावा, किंवा म्हातारपणाच्या योगानें याची अक्कल जाऊन यास खूळ लागलें असावें.

नंतर सुलतानानें त्यास विचारलें कीं, 'अरे मौनधारीबुवा,

सगळी कचेरी दणाणून देण्यासारखा इतक्या मोठ्यानें हंसलास त्याचें कारण काय ?' न्हाव्यानें उत्तर केलें, 'राजाधिराज, मी आपल्या पायांची शपथ वाहून सांगतों कीं, हा आपला ठेंगणा कुबडा खरोखरी मेला नाहीं; याच्या अंगांत अद्यापि जीव आहे. मी म्हणतों खरें किंवा खोटें याचा प्रत्यय सरकारास येथल्या येथें आतां आणून देतों. मी म्हणतों असें न झाल्यास मला आपण मूर्ख म्हणावें.' असें बोलून त्यानें औषधांची एक लहानशी पेटी खिशांतून काढली. ती पेटी सर्वकाळ तो आपल्याबरोबर बाळगीत असे. नंतर ती पेटी उघडून तींतून त्यानें एक लहानशी कुपी काढली व तींतील अर्क त्या कुबड्याच्या मानेस त्यानें कांहीं वेळ चोळला. मग एक लोखंडी हत्यार काढून त्याच्या योगानें, त्याची दांतखीळ बसली होती, ती उघडली आणि एक बारीक चिमटा त्याच्या तोंडांत घालून त्यानें त्याच्या घशांत अडकलेलें माशाचें हड्डूक युक्तीनें बाहेर ओढून काढलें आणि तें तसेंच चिमट्यांत धरलेलें सुलतानास व दरबारांतल्या सर्व लोकांस दाखविलें. त्यानें तसें करतांच एक दोन पळांत त्या ठेंगण्या कुबड्यानें शिंक दिली, व हातपाय आंखडले होते ते ताणून हळूच डोळे उघडले, आणि जीव परत आल्याचीं दुसरीही कितीएक चिन्हें त्यानें दाखविलीं.

हा अपूर्व चमत्कार पाहून काशगरचा सुलतान व त्याच्या दरबारांतील सर्व मंडळी आश्चर्यानें थक्क झाली. तो ठेंगणा कुबडा एक सगळी रात्र व दुसरा सगळा दिवस अगदीं निश्चेष्ट होऊन पडला होता; जिवंत असेल म्हणून कोणाच्या स्वप्नीं सुद्धां नव्हतें; तो एकाएकी जिवंत झाला या गोष्टीचें सर्वांस नवल तर वाटलेंच, परंतु या म्हाताऱ्या न्हाव्याच्या कसबाचें व ज्ञानाचें आश्चर्य त्यास त्याहीपेक्षां अधिक वाटलें. त्या सर्वांची खात्री झाली कीं, त्या म्हाताऱ्याच्या अंगीं पुष्कळ बोलण्याच्या वगैरे कांहीं वाईट खोडी असल्या तरी एकंदरींत त्याच्या अंगांत अलौकिक गुण आहेत व त्या गुणांबद्दल त्यांनीं त्याची मोठी तारीफ केली व त्यास ते मोठा विद्वान् समजूं लागले.

# झेन अलसनाम नामक राजा व यक्षांचा राजा ह्यांची गोष्ट.

पूर्वी बसोरा नामक शहरांत एक राजा राज्य करीत होता. त्याजपाशीं संपत्ति पुष्कळ असून त्याजवर त्याची प्रजा फारच संतुष्ट असे. परंतु त्याला संतति नव्हती या गोष्टीचें त्याला मोठें दुःख होतें. तो आपल्या राज्यांतील फकीर, जोगी, महंत वगैरे लोकांस पुष्कळ दानधर्म करीत असे. त्याच्या मनांतला हेतु असा कीं, त्यांपैकीं एखाद्या पुण्यवानाच्या प्रार्थनेनें परमेश्वरास करुणा येऊन तो आपणाला संतान देईल. हा त्याचा हेतु सिद्धीस गेला. त्याची राणी गरोदर राहिली व सुदैवेंकरून तिला पुत्रच झाला. त्याचें नांव त्यानें झेन अलसनाम ( मदनाचा पुतळा ) असें ठेविलें.

राजानें आपल्या राज्यांतील सर्व मोठमोठ्या ज्योतिष्यांस बोलाविलें, व ‘ मुलाचीं लक्षणें कशीं काय आहेत ?’ म्हणून त्यांस विचारलें. त्यांनीं त्याचे जन्मकाळचे ग्रह पाहून सांगितलें कीं, ‘ हा शतायुषी, शूर आणि धैर्यवान् असा होईल; परंतु त्याच्यावर संकटें इतकीं मोटमोठीं येणार आहेत कीं, त्यांपुढें याच्या धैर्याचा टिकाव मुळींच लागणार नाहीं.’ राजाला भाकिताची कांहींच धास्ती वाटली नाहीं. तो म्हणाला, ‘ कांहीं चिंता नाहीं; तो शूर निपजेलना ? बस्स आहे. राजेलोकांस संकटाचे प्रसंग हे आलेच पाहिजेत. कारण असे प्रसंग आले म्हणजे त्यांच्या अंगचे गुण कसास लागतात, व ते आपलीं कर्तव्यकर्में बजावण्यास लायक होतात.’ असें म्हणून राजानें त्या ज्योतिष्यांची संभावना करून त्यांना वाटेस लावलें.

या नवानवसांनीं झालेल्या मुलास त्यानें केवळ आपल्या तळहाताच्या फोडाप्रमाणें वागविलें. त्याला अंमळ समजूं लागतांच त्याच्या विद्याभ्यासासाठीं त्यानें मोठमोठ्या विद्वान् शिक्षकांची योजना केली. पुढें क्रमाक्रमानें सर्व गोष्टींत त्यास तरबेज

करण्याचा त्याचा इरादा होता; इतक्यांत राजा आजारी पडला, व त्यांतून तो बरा होईलसें दिसेना. त्या दुखण्यापुढें सर्व वैद्यांनीं हात टेकले. तेव्हां आतां आपण वांचत नाहीं असें त्यास वाटून त्यानें झेन यास आपल्याजवळ बोलाविलें, आणि त्याला पुष्कळ बोधाच्या गोष्टी सांगितल्या. त्यांत मुख्य हें ध्यानांत ठेवण्यास सांगितलें कीं, तूं आपल्या प्रजेवर विशेष कडक हुकूम न चालवितां होईल तेथपर्यंत तिजवर दया करून तिची प्रीति संपादन कर; हांजी हांजी करणाऱ्या लबाड लोकांच्या बोलण्याकडे लक्ष देऊं नको; बक्षीस व शिक्षा हीं दोन्ही विचारानें देत जा; कारण पुष्कळ वेळां असें घडतें कीं, राजे लोक हे कावेबाज लोकांच्या बकवृत्तीस भुलून सर्वांशीं नुकसान करून घेतात व जे बिचारे सज्जन असतात, त्यांना मात्र विनाकारण त्रास देतात.'

नंतर लवकरच राजा मरण पावला. तेव्हां तेथल्या चालीप्रमाणें राजपुत्र झेन यानें सात दिवसपर्यंत सुतक धरून आठवे दिवशीं तो सिंहासनारूढ झाला; व त्यानें आपल्या नांवाचें शिक्कामोर्तब वगैरे सर्व केलें. सर्व कामगार लोक आपल्यास अगदीं नमून असून आपापलीं कामें दक्षतेनें करीत आहेत हें पाहून त्याला मोठा आनंद झाला व तो त्यांतच अगदीं निमग्न होऊन गेला. सारांश, त्याला राज्यप्राप्तीचें परमसुख वाटूं लागलें. प्रजेचें आपल्या संबंधाचें कोणतें कर्तव्य आहे, येवढें मात्र त्याच्या लक्षांत असे पण आपण तिजकरितां काय केलें पाहिजे याचा मुळींच तो विचार करीत नसे. तेव्हां अर्थातच त्याजपासून तीस सुख होईनासें झालें. पुढें त्यानें असें केलें कीं, राज्यांतील चटसारीं मोठमोठीं कामें गैरमाहीत, मदोन्मत्त व कामांध अशा तरुण लोकांच्या हातीं दिलीं व त्यांच्या संगतीनें तो व्यभिचारकर्में करूं लागला, व अनेक प्रकारचीं इतर दुर्व्यसनें त्यास लागलीं. तो सदासर्वकाळ त्यांतच गुंग असे. राज्यांत काय चाललें आहे याची त्याला दादही नसे; यामुळें चोहोंकडे बेबंदशाही होऊन गेली. पैसा म्हणजे काय हें त्याच्या खिजगणतींत

नव्हतें. त्यानें हवे त्यास हवे तितके पैसे द्यावे. अशा रीतीनें त्याच्या मर्जीतल्या लोकांनीं त्याचा सर्व खाजिना धुऊन नेला.

त्याची आई ही फार शहाणी आणि समजूतदार बायको होती. ती आपल्या मुलास त्याच्या ह्या उधळेपणाबद्दल व बदफैलीपणाबद्दल पुष्कळ रागें भरे. ती त्यास म्हणे, ' तूं जर असाच हा क्रम चालविशील, तर तुझी सर्व संपत्ति जाईल, इतकेंच नव्हें, तर तुझी प्रजाही तुजवर नाखुष होऊन बंड करील व त्यापासून तूं आपल्या राज्याला व कदाचित् जिवालाही मुकशील. ' ती त्याला पुष्कळ बोध करी पण त्याच्याकडे त्यानें कधींही लक्ष दिलें नाहीं. शेवटीं तिनें भविष्य केल्याप्रमाणें झालें. रयत लोकांचीं मनें बिथरलीं व बंडाचाही उद्भव झाला. परंतु त्याच्या आईनें लोकांस चार गोष्टी सांगून मोठ्या चातुर्यानें सर्व स्थिरस्थावर केलें.

झेन याच्या आईनें ही स्थिति कांहीं चांगली नाहीं असें पाहून, ती त्यास म्हणाली, ' बाबारे, हा राज्याचा येवढा थोरला गाडा अनुभवी, पोक्त शहाण्या व इमानी लोकांवांचून नीट चालावयाचा नाहीं. त्यास हे बारावर्षे सोळावर्षे कांहीं उपयोगाचे नाहींत. त्यांनीं पाहिलास ना कसा सगळा नाश करून टाकला आहे तो ! याकरतां माझें ऐकशील तर आतां तरी ह्या पोरांस काढून टाकून पूर्वींचे सर्व कामगार त्या त्या कामावर पुनः नेमून टाक म्हणजे पहा पुनः कशी पूर्ववत् सर्व व्यवस्था सुरळीत चालते ती ! ' झेन यानें या गोष्टीस एकदांचा रुकार दिला व त्याप्रमाणें व्यवस्था करण्यास आपल्या आईसच सांगितलें.

झेन यास आपली सर्व संपत्ति चोरापोरीं गेली हें पाहून फार पश्चात्ताप झाला. त्याची वृत्ति अगदीं उदासीन झाली व त्याला कांहींच गोड वाटेना. पुढें एके दिवशीं रात्रीं एक वृद्ध मनुष्य त्याच्या स्वप्नांत येऊन त्यास म्हणाला, ' झेन, तूं हें लक्षांत ठेव कीं, संकटाच्या पाठीमागून आनंद हा आहेच व दुःखाच्या पाठीमागून सुख हें आहेच; तेव्हा आतां तुला आपल्या दुःखाचा परिहार व्हावा

अशी इच्छा असेल तर ऊठ आणि मिसर देशाची वाट धर. केरो शहरास गेलास म्हणजे तुझें नशीब उदयास येईल.'

झेन ह्यास ह्या स्वप्नाचें मोठेंच आश्चर्य वाटलें व सकाळीं उठल्याबरोबर त्यानें आपल्या आईस तें मोठ्या उत्सुकतेनें सांगितलें. पण तिला त्याचें हंसूं मात्र आलें. ती म्हणाली, 'बेटा, आतां ह्या स्वप्नाच्या भरंवशावर तूं का मिसरदेशास जाणार?' झेन म्हणाला, 'कां नाहीं बरें? सगळींच स्वप्नें खोटीं असतात कीं काय? नाहीं.कांहींचे प्रत्यय येतात. मला याबद्दल गुरुजींनीं पुष्कळ गोष्टी सांगितल्या आहेत; व त्यांवरून ह्या गोष्टीवर माझा विश्वास बसला. शिवाय हें स्वप्नच असें कांहीं चमत्कारिक आहे कीं, ह्यासंबंधानें माझी पूर्वीं कोणी खात्री केली नसती, तरी ह्या स्वप्नाचा मला खरेपणा वाटल्यावांचून राहता ना. कारण, मला जो म्हातारा मनुष्य दिसला, त्याच्या अंगीं कांहीं अमानुष शक्ति मला दिसून आली. तो नुसता वयोवृद्ध असल्यावरूनच मला केवळ पूज्य वाटला असें नाहीं, तर त्याच्या अंगीं तसेंच कांहीं विलक्षण तेज दृष्टीस पडलें. सारांश, आपला पैगंबर ज्या प्रकारचा होता म्हणून म्हणतात, त्या प्रकारचा तो मनुष्य मला भासला, आणि खरोखर विचारशील तर मला स्वप्नांत येऊन त्यानेंच दर्शन दिलें असावें, व त्याला माझी दया येऊन त्यानें माझ्या दुःखाचा परिहार करण्याचें मनावर घेतलें असावें असें मला वाटतें. एकंदरीनें त्याच्या बोलण्यावर माझा पक्का भरंवसा बसला आहे. त्यानें जें मला वचन दिलें आहे, व ज्याप्रमाणें करण्यास सांगितलें आहे, तें एकसारखें माझ्या मनांत घोळत आहे.' राणीनें त्याला पुष्कळ बुद्धिवाद सांगितला; पण ज्याचें नांव तें,—त्याला तें कांहीं रुचलें नाहीं! शेवटीं त्यानें राज्याची व्यवस्था तिजवर सोंपवून दिली, आणि एके दिवशीं रात्रीं कोणास बरोबर न घेतां तो गुप्तपणें केरो शहरास जाण्याकरितां राजवाड्यांतून निघाला.

पुष्कळ त्रास व श्रम सोसून तो केरो शहरास जाऊन पोहोंचला. या शहरासारखीं सुंदर व विस्तीर्ण शहरें पृथ्वींत फारच थोडीं अस-

तील. तो त्या शहरांतील एका मशिदींत जाऊन उतरला. तो फार थकून गेल्यामुळें त्या ठिकाणीं पडतां पडतां त्याला झोंप लागली. तितक्यांत त्याला स्वप्न पडून तो पूर्वींचाच म्हातारा मनुष्य त्याला दिसला. तो त्यास म्हणाला, ' तूं माझ्या बोलण्यावर भरंवसा ठेविलास, आणि वाटेचे हाल व त्रास सोसून येथें आलास, येणेंकरून मला फार संतोष झाला पण तुला मीं इतकें दूर बोलाविलें, तें फक्त तुझी कसोटी पाहण्याकरितां बोलाविलें व तूं मोठा दृढनिश्चयी आणि धैर्यवान् आहेस याविषयीं माझी खात्री झाली. तुला मी अत्यंत संपत्तिवान् व सुखी करावें अशी तुझी योग्यता आहे. आतां तूं बसोरा येथें परत जा. तेथें तुझ्या वाड्यांतच तुला इतकें द्रव्य सांपडेल कीं तूं पृथ्वींतील सर्व राजांहून श्रीमंत होशील. '

झेन यास या स्वप्नापासून मुळींच आनंद झाला नाहीं. तो जागा झाल्यावर मनांत म्हणाला, ' अरेरे ! मी कसा फसलों गेलों पहा ! तो पैगंबर कसचा ! माझें मन व्यग्र झाल्यामुळें मला उगाच आपला कांहीं तरी भास झाला, दुसरें कांहीं नाहीं ! व माझ्या ध्यानींमनीं सगळा तो असल्यामुळें मला तो स्वप्नांत पुनः दिसला यांत कांहीं नवल नाहीं. आतां येथें राहून आपल्याला काय कर्तव्य आहे ? मुकाट्यानें आपलें बसोरा येथें परत जावें, हें बरें. मी आपला हा प्रवास करण्याचा उद्देश फक्त आईलाच कळविला येवढें तरी बरें झालें ! जर कां हें लोकांस कळतें तर ते माझी फजिती करून टाकते !'

याप्रमाणें त्याच्या मनांत विचार येऊन तो परत आपल्या राज्यांत यावयास निघाला. तो घरीं येऊन पोहोंचतांच त्याची आई म्हणाली, ' कसें काय बेटा, तुझा मनोरथ सिद्धीस गेला ? ' त्यानें झालेली सर्व हकीकत तीस सांगितली. तेव्हां त्याला ह्या आपल्या भोळसरपणाबद्दल फारच लज्जा वाटली आहे असें तिला दिसल्यावरून, याला आपण आतां यासंबंधानें आणखी बोललों अगर हंसलों तर याला जास्त वाईट वाटेल असें तिला वाटलें; सबब तिनें तसें न करतां उलटी त्याची समजूत केली. ती म्हणाली, 'बेटा, तूं आपल्या

मनाला कांहीं वाईट वाटूं देऊं नको. परमेश्वरानें तुझ्या कपाळीं संपत्ति लिहिली असली, तर ती घरीं बसल्या तुजकडे चालत येईल. तूं स्वस्थ ऐस. तुला आतां मी सांगतें एवढें मात्र तूं कर; काय ? तर हा हलकटपणा सोडून देऊन विचारानें व शहाणपणानें वागत जा. गाणें-बजावणें नाच-तमाशे दारू वगैरेंनीं तुझी किती नासाडी केली हें तूं पहातच आहेस; याकरितां ही तूं अजीबात सोडून दे. आपल्या प्रजेच्या हितासाठीं झटत जा. तूं प्रजेचें हित केलेंस म्हणजे तुला कशाचीही वाण नाहीं हें तूं पक्कें समज.'

झेन म्हणाला, 'आई, तुझ्या गळ्याशपथ आजपासून तूं सांगशील त्याप्रमाणें मी चालेन, व तूं आपल्या पसंतीनें नेमिलेल्या प्रधानांच्या सांगण्याप्रमाणें राज्यव्यवस्था चालवीन, परंतु त्याच दिवशीं रात्रीं पुनः त्याच्या स्वप्नांत तो पूर्वीचा वृद्ध मनुष्य येऊन त्यास म्हणाला, 'झेन, तुझा उदयकाळ होण्याची वेळ समीप आली आहे. तूं उद्यां सकाळीं उठतांक्षणींच एक कुदळ घेऊन आपल्या बापाच्या खोलीची जमीन खण. तेथें तुला अपार द्रव्य सांपडेल.'

झेन सकाळीं उठून आपल्या आईकडे धांवतधांवतच गेला; आणि रात्रीं पडलेलें हें नवें स्वप्न मोठ्या उत्सुकतेनें त्यानें तीस सांगितलें. ती हंसून म्हणाली,' खरेंच बेटा, त्या मनुष्यानें तुझी अगदीं पाठच पुरविली ! त्यानें तुला दोनदां फसविलें ! येवढें त्याला पुरें झालें नाहीं ! आतां पुनःआणखी त्याच्यावर भरंवसा ठेवावासें तुला वाटतें काय ? ' झेन म्हणाला, ' त्याच्या बोलण्यावर माझा आतां मुळींच भरंवसा नाहीं; तथापि मी उगीच आपल्या मनाची खात्री करण्याकरितां बाबांच्या खोलीची जमीन एकदां खणून पाहतों. ' हें ऐकून राणीला फारच हंसूं आलें. ती म्हणाली, ' मला असें वाटलेंच होतें. बरें, तूं आपला एकदां संशय फेडून घे; मिसरदेशाला जाण्यापेक्षां यांत श्रम तरी कमी आहेत इतकेंच मी समाधान मानतें ! '

झेन म्हणाला, ' पण आई, ह्या तिसऱ्या स्वप्नाचा मी राहून राहून जों जों विचार करतों, तों तों त्यावर माझा भरंवसा बसतो.



तेव्हां एकाएकीं एक पांढरा दगड त्याच्या दृष्टीस पडला तो त्यानें काढला.

[ पान २२१

कारण, पूर्वीच्या दोहींशीं याचा संबंध जुळतो; आणि म्हणूनच त्या म्हाताऱ्याच्या बोलण्याची आणखी एकवार प्रचीति पहावी असें मला वाटतें. पहा त्यानें प्रथम मला मिसरदेशास जावयास सांगितलें. तेथें गेल्यावर त्यानें मला सांगितलें कीं, तुझी कसोटी पहाण्याकरितां तुला मी इतके दूर आणिलें तर तूं आतां परत बसोऱ्यास जा म्हणजे तेथें तुला द्रव्यप्राप्ति होईल; व तें द्रव्य कोठें सांपडणार तें ठिकाण त्यानें मला गेल्या रात्रीं सांगितलें. म्हणून या तिन्ही स्वप्नांचा एकमेकांशीं संबंध जुळतो असें मी म्हटलें. पण हें सगळें खोटें ठरलें तरी चिंता नाहीं. मीं आपला त्यानें सांगितल्याप्रमाणें करणार. कारण, तसें करण्यांत आपलें नुकसान थोडेंच आहे! शिवाय, त्यानें म्हटल्याप्रमाणें तेथें खरोखरच द्रव्य असून आपण विनाकारण त्याच्या बोलण्याचा भरंवसा न धरिला आणि तसेंच बसलों, तर आपण आपल्या हातानें आपलें नुकसान करून घेतलें असें होईल; त्या बिचाऱ्याकडे मग काय दोष ?'

याप्रमाणें बोलून तो तेथून उठला, आणि कुदळ घेऊन एकटाच आपल्या बापाच्या खोलींत गेला; त्यानें ती जमीन बरीच खोल खणली पण द्रव्याचें कांहींच चिन्ह दिसेना. तेव्हां तो अंमळ थांबला आणि म्हणाला, 'आई मला हंसली त्याप्रमाणें खरोखरच माझें हंसूं होऊं पहात आहे, कीं काय न कळे!' तथापि त्यानें धैर्य सोडिलें नाहीं. त्यानें ती जमीन जरा आणखी खोल खणली तेव्हां एकाएकीं एक पांढरा दगड त्याच्या दृष्टीस पडला. तो त्यानें काढला तों त्याच्या खालीं एक दार त्याच्या दृष्टीस पडलें. त्याला एक मोठें थोरलें कुलूप घातलेलें होतें, तें त्यानें त्या कुदळीनें फोडिलें व तें दार उघडिलें. त्याच्या खालीं पांढऱ्या संगमरवरी पाषाणांचा एक जिना होता. त्यानें लागलीच एक मेणबत्ती लाविली, व तो त्या जिन्यांतून खालीं उतरला. तेथें एक खोली होती. तिची जमीन पांढऱ्या संगमरवरी पाषाणांची असून कडीपाट व भिंती स्फटिकांच्या होत्या. तेथें चार मोठमोठ्या घडवंच्या होत्या व त्या प्रत्येकींवर दहा दहा बरण्या

होत्या. झेन याला वाटलें कीं, यांत बहुधा दारू असावी; व ती जुनी असल्यामुळें उत्तमच असेल यांत संशय नाहीं. तेव्हां त्यानें त्या बरण्यांपैकीं एका बरणीचें झांकण काढिलें, आणि पहातो तों तींत तोंडोतोंड मोहरा भरल्या आहेत! हें पाहून त्याला पराकाष्ठेचा आनंद व आश्चर्य वाटलें. मग त्यानें त्या सर्व बरण्या उघडून पाहिल्या. त्याही सर्व पहिलीप्रमाणेंच भरल्या होत्या. त्यानें त्यांतील एक ओंजळभर मोहरा घेतल्या, आणि त्या तो आपल्या आईकडे घेऊन आला.

झेन यानें आईस हें सर्व सांगतांच तिलाही मोठा आनंद झाला. ती त्यास म्हणाली, 'बेटा, आतां तरी पैसा पूर्वींसारखा उधळून टाकूं नको, व आपल्या शत्रूंस आनंद मानण्याचा प्रसंग आणूं नको!' झेन यानें उत्तर केलें, 'आई,पूर्वीं जी गोष्ट होऊन गेली ती गेली, पण आतां तुझ्या इच्छेबाहेर मी पाऊलही टाकायचा नाहीं याबद्दल तुला खात्री असूं दे.'

झेन याच्या बापानें हें द्रव्य इतकें गुप्त रीतीनें ठेविलें होतें कीं, त्याविषयीं राणीलाही कांहींएक माहीत नव्हतें. ती त्यास म्हणाली, 'बेटा, चल तें मला दाखीव पाहूं?' तेव्हां तो तिला त्या खोलींत घेऊन गेला. तिनें लक्षपूर्वक चोहोंकडे पाहिलें, तों आणखी एक लहानशी बरणी तिच्या दृष्टीस पडली. हिच्याकडे झेन याचें लक्ष पूर्वीं गेलें नव्हतें. त्यानें ती उघडून पाहिली तों तींत एक सोन्याची किल्ली सांपडली. राणी म्हणाली,' बेटा, ही दुसऱ्या अशाच एखाद्या खजिन्याची किल्ली असावीसें वाटतें.आपण चोहोंकडे पाहूं,म्हणजे ही कोठें लागते हें आपणाला कदाचित् कळेल.'

त्यानें चोहोंकडे बारीक नजरेनें पाहिलें, तों एके ठिकाणीं किल्लीचें भोंक त्याला दिसलें. तेथें त्यानें ती लावून पाहिली, तों ती चालली. किल्ली फिरवितांच एक दार उघडलें. त्यांतून तीं दोघें आंत गेलीं तों त्यांना दुसरी एक खोली लागली. तिच्या मध्यभागीं सोन्याच्या मोठमोठ्या नऊ तिवया असून त्यांपैकीं आठांवर हिऱ्यांचे एकसंधी

पुतळे होते. त्यांचें तेज इतकें होतें कीं, तेथें स्वच्छ प्रकाश पडला होता !

झेन म्हणाला, 'काय चमत्काराची गोष्ट आहे ! ह्या इतक्या मौल्यवान् चिजा बाबांनीं कोठून पैदा केल्या भगवान् जाणे !' त्या नवव्या रिकाम्या तिवईच्या संबंधानें त्याला फारच आश्चर्य वाटलें. कारण, तिजवर पांढऱ्या रंगाची सॅटिन पसरलेली असून तिजवर असें लिहिलेलें होतें कीं, "प्रियपुत्रा, हे आठ पुतळे मिळविण्याला मला पराकाष्ठेचे श्रम पडले आहेत. हे जरी अतिशय सुंदर आहेत, तरी या पृथ्वींत आणखी एक नववा पुतळा आहे त्याच्या पासंगालाही हे पुरावयाचे नाहींत. तो प्राप्त करून घेण्याची तुला इच्छा असेल, तर तूं केरोशहरास जा. तेथें माझा एक गुलाम राहतो. त्याचें नांव मुबारीक असें आहे. त्याची गांठ पडण्याला तुला कांहीं अडचण पडणार नाहीं. कोणीही तुला भेटेल त्याला तूं त्याचें नांव सांगितलेंस, कीं, तो तुला त्याचें घर दाखवील. तो भेटला म्हणजे त्याला तूं आपली सर्व हकीकत कळीव. तूं माझा मुलगा आहेस हें त्याला कळतांच तो नववा पुतळा ज्या ठिकाणीं आहे तेथें तो तुला नेईल. आणि तो तुझ्या हातीं लागण्याची युक्ति तुला सांगेल.

हें वाचतांच झेन आपल्या आईला म्हणाला, 'तर मग तो नववा पुतळा आपल्याला मिळालाच पाहिजे; नाहींपेक्षां आपलें जिणें व्यर्थ आहे. तो या सर्वांहूनही अत्यंत मौल्यवान् आहे. त्या अर्थीं तो केवळ अजब चीज असेल यांत संशय नाहीं. तर मी आतां केरो शहरास जाण्याची तयारी करितों; तूंही मला आतां मोडता घालणार नाहींस अशी माझी खात्री आहे.' राणी म्हणाली, 'नाहीं बेटा, या गोष्टीस माझें पूर्ण अनुमोदन आहे. तुझ्यावर पैगंबराची पाखर आहे, त्या अर्थीं तो तुझा सर्व प्रकारें सांभाळ करील. तुला वाटेल तेव्हां तूं खुशाल चालता हो. तुझे प्रधान व मी राज्याची सर्व व्यवस्था नीट ठेवितों, तूं कांहीं काळजी करूं नको.' झेन

यानें लागलीच निघण्याची तयारी केली. पण बरोबर लवाजमा वगैरे कांहींएक घेतला नाहीं; थोडेसे गुलाम मात्र घेतले.

वाटेंत कांहीं अडथळा न येतां तो केरो येथें पोहोंचला. तेथें पोहोंचतांच मुबारिक याच्या घराचा त्यानें शोध केला. त्यास लोकांनीं सांगितलें कीं, 'तो घरचा मोठा श्रीमान् असून एखाद्या उमरावाप्रमाणें मोठ्या थाटानें राहतो. त्याच्या घरीं जाण्याला कोणालाही अटकाव नाहीं. त्यांत परक्या ठिकाणच्या मनुष्यास तर मुळींच नाहीं.' त्यास त्या लोकांनीं त्याचें घर दाखविलें. त्यानें दरवाज्याला धक्का देतांच एका गुलामानें तो उघडला, व तो झेन यास म्हणाला, 'आपण कोण, व येथें काय उद्देशानें आलां आहां?' झेन यानें उत्तर केलें, 'मी मुशाफर आहे, मुबारिकसाहेबाच्या औदार्याची वार्ता ऐकून त्यांच्या येथें उतरण्याच्या उद्देशानें आलों आहे.' त्या गुलामानें त्यास अंमळ थांबण्यास सांगून तो आपल्या धन्याकडे गेला, आणि त्यानें त्यास ही हकीकत सांगितली. त्यावरून त्यानें झेन यास आंत घेऊन येण्याविषयीं त्याला सांगितलें. तो गुलाम परत येऊन झेन यांस आंत घेऊन गेला; व त्याची भेट घेण्याकरितां ज्या दिवाणखान्यांत मुबारिक बसला होता तेथें त्यास घेऊन आला. तो दिवाणखाना हंड्या, झुंबरें व नानाप्रकारच्या तसबिरा यांनीं फारच सुशोभित केलेला होता. मुबारिक यानें झेन याचें मोठें आदरातिथ्य करून त्यास म्हटलें, 'आपण कृपा करून माझ्या येथें आलां याबद्दल मी आपला फार आभारी आहें.' झेन यानेंही त्यांच्या थोरपणाबद्दल त्यास उलट आभार दर्शवून म्हटलें, 'मी बसोऱ्याच्या माजी राजाचा मुलगा; मला झेन अलसनाम म्हणतात.' मुबारिक म्हणाला, 'अहो, बसोऱ्याच्या राजेसाहेबांच्या पदरींच पूर्वीं मी होतों पण त्यांना मूलबाळ कांहीं नव्हतें. तुमची किती वर्षांची उमर आहे?' झेन म्हणाला, 'मला वीस वर्षें आहेत. आपण आमच्या येथून आल्यास किती वर्षें झालीं?' मुबारिक म्हणाला 'बावीस वर्षें झालीं असावीं. पण तुम्ही त्यांचेच

चिरंजीव याबद्दल माझी कशी खात्री करणार?' झेन म्हणाला, 'माझ्या बापाच्या खोलीखालीं एक तळघर आहे, त्या ठिकाणीं मला मोहोरांच्या चाळीस बरण्या सांपडल्या.' मुबारिक म्हणाला, 'यांखेरीज आणखी कांहीं सांपडलें कां?' झेन म्हणाला, 'आणखी नऊ सोन्याच्या तिवया सांपडल्या. त्यांपैकीं आठांवर हिऱ्याचे पुतळे आहेत व नवव्या तिवयीवर पांढरी साटीण घातली असून, तिजवर ह्या आठही पुतळ्यांहून मोलवान् जो एक नववा पुतळा आहे, तो कोणत्या रीतीनें प्राप्त होईल हें बाबांनीं लिहून ठेविलें आहे. तो कोठें आहे, तें तुम्हांला ठाऊक असेलच; कारण तुम्ही तो मला दाखवाल असें त्या साटिणीवर लिहिलें आहे.'

झेन याच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच मुबारिक यानें त्याच्या पायांवर डोकें ठेविलें; व त्याच्या हाताचें वारंवार चुंबन घेतलें; नंतर तो म्हणाला, 'परमेश्वरानें तुम्हांला येथें आणिलें ही त्यानें मजवर मोठीच कृपा केली. तुम्ही बसोऱ्याच्या राजेसाहेबांचे चिरंजीव आहां याविषयीं आतां माझी खात्री झाली. तुम्हांला तो अमोलिक पुतळा पाहण्याची इच्छा असल्यास तो दाखवावयास मीं तुम्हांला नेईन, पण तुम्ही दमून भागून आला आहां, याकरितां कांहीं दिवस विश्रांति घ्या. आज आमच्या घरीं येथील सरकारी कामगारांना मेजवानी आहे. सर्व मंडळी आलेली आहे. मी तेथेंच बसलों होतों. इतक्यांत तुमची वर्दी येऊन पोहोंचली. आतां कृपा करून तुम्ही आपल्या पंक्तीचा लाभ आम्हांस द्यावा अशी माझी विनंति आहे.' झेन म्हणाला, 'ठीक आहे, मजकडून कांहीं हरकत नाहीं.' तेव्हां ती मंडळी ज्या बंगल्यांत बसली होती, त्या ठिकाणीं झेन यास मुबारिक हा घेऊन गेला. मग सर्वजण भोजनास बसले. मुबारिक झेन याजपुढें हात जोडून उभा राहिला, व त्यास मोठ्या नम्रतेनें म्हणाला,' 'तुम्हांला फार श्रम झाले आहेत; तर आतां सावकाश होऊं द्या. त्यानें स्वतः त्यास आग्रहपूर्वक पक्वान्नें वगैरे वाढलीं. तें जेवावयास आलेल्या मंडळींस मोठें आश्चर्य वाटलें, व ते एकमेकांत कुजबुजूं

लागले कीं, 'मुबारिकसाहेब एवढा याचा आदरसत्कार करितात, तो हा आहे तरी कोण ?'

जेवण झाल्यावर मुबारिक सर्व मंडळींस म्हणाला, 'गृहस्थहो, मी ह्या पाहुण्यांचा एवढा मान ठेविला याचें तुम्हांस आश्चर्य वाटूं देऊं नका. कारण, माझे यजमान बसोऱ्याचे राजेसाहेब त्यांचे हे चिरंजीव आहेत. मला यांच्या वडिलांनीं विकत घेतलें होतें, त्यांचा काळ होई-पर्यंत त्यांनीं मला गुलामपणापासून मुक्त केलें नव्हतें, तेव्हां अद्यापिही मीं त्यांचा गुलामच आहें. यास्तव मजवर व माझ्या सर्व मालमत्तेवर त्यांची सत्ता आहे.' हें ऐकतांच झेन म्हणाला, 'मुबारिकसाहेब, मी ह्या जमलेल्या सर्व मंडळींसमक्ष तुम्हांस सांगतों कीं, या वेळेपासून तुम्हांस मीं मुक्त केलें आहे. तुमच्यावर व तुमच्या मालमत्तेवर माझा कांहीं वारसा राहिला नाहीं; याखेरीज आणखी तुम्हांकरितां मी काय करूं तें तुम्ही विचार करून मला सांगा.' हें ऐकून मुबारिक यानें झेन याजपुढें साष्टांग नमस्कार घातला, आणि त्याचे अतिशय आभार मानिले. नंतर भोजनास बोलावलेल्या गृहस्थांस मुबारिक यानें नजरनजराणे दिले, व ते आपापल्या घरीं गेले.

दुसरे दिवशीं झेन मुबारिक यास म्हणाला, 'मला आतां विश्रांति पुष्कळ झाली, मी कांहीं येथें चैनीखातर आलों नाहीं, तर तो नववा पुतळा प्राप्त करून घेण्याकरतां आलों आहे; व मला एकसारखा त्याचा निदिध्यास लागला असल्यामुळें, तो प्राप्त होईपर्यंत मला चैन म्हणून पडावयाचें नाहीं. याकरितां त्या उद्योगास आतां लागावें हें बरें.' मुबारिक म्हणाला, 'ठीक आहे, मजकडून तयारी आहे. पण ह्या कामांत मोठमोठीं संकटें येणार आहेत, व तुम्हांस संकटांचा मुळींच अनुभव नाहीं. तेव्हां याचा विचार कसा काय?' झेन यानें उत्तर केलें, 'किती कां संकटें येईनात, मी तीं भोगण्यास तयार आहे. मी एक तर आपला हेतु सिद्धीस नेईन, नाहींपेक्षां मरून जाईन. या जगांत ज्या ज्या गोष्टी घडतात, त्या सर्व ईश्वरेच्छेनें घडत असतात. तेव्हां त्या कोणी टाळूं म्हटल्यास कधींही टळावयाच्या नाहींत. आतां तुम्ही फक्त

मजप्रमाणेंच आपल्या मनाचा निर्धार करून मजबरोबर चला म्हणजे झालें.'

मुबारिक यानें झेन याचा दृढनिश्चय पाहून निघण्याची तयारी करण्याविषयीं नोकर लोकांस सांगितलें. तयारी होतांच देवाचें नांव घेऊन ते निघाले. त्यांना बऱ्याच मजला कराव्या लागल्या. शेवटीं एके दिवशीं ते एका आंबराईपाशीं आले, व तेथें घोड्यावरून खालीं उतरले. मुबारिक यानें बरोबर जे लोक आणिले होते, त्यांस तो म्हणाला, 'तुम्ही हे घोडे व सामानसुमान सांभाळा, आम्ही कांहीं कामाकरितां जरा जाऊन येतों.' नंतर तो झेन यास म्हणाला, 'आतां आपल्याला स्वतःच पुढें गेलें पाहिजे. तो नववा पुतळा ज्या ठिकाणीं आहे त्या ठिकाणानजीक आपण आलों आहों. आतां मात्र भितां कामा नये हो! हीच काय ती मोठी आणबाणीची वेळ आहे!'

याप्रमाणें बोलत बोलत ते एका तलावापाशीं आले. मुबारिक म्हणाला, 'आतां ह्यांतून आपणाला पलीकडे गेलें पाहिजे,' झेन म्हणाला, 'आपल्यापाशीं होडी तर नाहीं, मग कसें जातां येईल?' मुबारिक यानें उत्तर केलें, 'आतां एका क्षणांत यक्षांच्या राजाची होडी आपणाला न्यावयास येईल. पण मी सांगतों हें तुम्ही पक्कें ध्यानांत ठेवा; काय तर तुम्ही अगदीं मौनव्रत धारण करा. त्या होडीवरच्या कोळ्याचें रूप तुम्हांला मोठें विलक्षण दिसेल; पण त्याच्याशीं तुम्ही एक चकारशब्दही बोलूं नका; व एकंदरीनें कसलाही प्रसंग येवो, तुम्ही तोंडांतून ब्रदेखील काढूं नका. मी तुम्हाला वारंवार इतकें बजावून सांगतों याचें कारण असें कीं, आपण होडींत बसल्यावर जर का तुमच्या तोंडावाटें एक अक्षर निघालें तर लागलीच होडी बुडून जाईल.' झेन म्हणाला, 'बरें आहे, मी अगदीं गप्प बसेन. तुम्ही काय काय करावयाचें तें मला सांगा मात्र; मी याप्रमाणें करण्यांत अणुमात्र अंतर करीन तर मग मला म्हणा!'

याप्रमाणें त्यांचें बोलणें चाललें आहे तों एकदम त्या तलावांत होडी दिसूं लागली. ती रक्तचंदनाच्या लांकडाची केलेली होती. तिची डोलकाठी अंबरनामक वृक्षाची असून शीड निळ्या रंगाच्या साटिणीचें होतें. तिजवर एकच कोळी होता. त्याचें डोकें हत्तीच्या डोक्यासारखें असून अंग वाघासारखें होतें. ती होडी मुबारिक व झेन यांजपाशीं येऊन पोहोंचतांच त्या राक्षसी प्राण्यानें आपल्या सोंडेनें एकेकास उचलून होडींत ठेविलें व एका क्षणांत तो ती पलीकडच्या कांठाशीं घेऊन गेला. नंतर त्यानें पूर्ववत् त्यांना उचलून कांठावर ठेविलें व लागलीच तो व ती होडी अदृश्य झाली.

मुबारिक म्हणाला, ' आतां आपणांस बोलावयास हरकत नाहीं. हा सर्व प्रदेश यक्षांच्या राजाच्या ताब्यांतला आहे. जगामध्यें अशीं सुंदर स्थळें फारच थोडीं असतील ! चोहोंकडे नीट नजर देऊन पहा. इतका रमणीय देखावा कोठें तरी असेल काय ? सद्धर्मानें वागणारांस अंतीं स्वर्गसुख जें प्राप्त होतें, त्याची ही खरोखर प्रतिमाच आहे यांत कांहींच संशय नाहीं ! हें पहा, चोहोंकडे बाग लागून गेले आहेत. यांत सर्व प्रकारचीं सुवासिक व इतर प्रकारच्या फुलांचीं झाडें व वनस्पती आहेत. हीं फळझाडें पहा किती सुंदर दिसताहेत तीं ! यांच्या फांद्या फळांच्या भारानें कशा जमिनीस लागल्या आहेत ! हजारों पक्षी मधुर स्वर काढीत आहेत, ते किती बरें कानाला संतोष देत आहेत ! असें आनंददायक स्थळ सगळ्या पृथ्वींत कोठेंतरी सांपडेल काय ? ' झेन याला तें सर्व पाहून इतका आनंद झाला कीं, तो त्याला शब्दांनीं व्यक्त देखील करून दाखवितां येईना ! तो जों जों आणखी पुढें गेला, तों तों त्याला त्याहूनही विशेष आनंद झाला.

शेवटीं ते यक्षांच्या राजाच्या वाड्यासमोर आले. तो सर्व पाच व हिरे यांनीं बांधिला होता. त्याच्या सभोंवतीं मोठा खंदक असून त्या खंदकाच्या कांठाकांठानें झाडें लाविलेलीं होतीं. तीं फारच उंच गेलेलीं असून त्यांच्या शाखांचा विस्तार अतिशय झालेला होता; त्या योगानें

राजवाड्यांत ऊन मुळींच येत नसे. राजवाड्याची देवडी सोन्याची होती. तिच्या समोरच्या बाजूस त्या खंदकावर एक पूल होता, तो फक्त एकाच माशाच्या हाडाचा केलेला होता; तरी त्याची लांबी सुमारें सहा वांव व रुंदी तीन वांव होती. त्या पुलाच्या तोंडीं राक्षसाएवढाले कितीएक यक्ष हातांत मोठमोठे लोखंडी भाले घेऊन राजद्वाराचें रक्षण करण्याकरितां उभे होते.

मुबारिक म्हणाला, ‘ आतां आपणांस पुढें जातां कामा नये. हे यक्ष आपल्याला भाले मारून ठार करून टाकतील. याकरितां आपणापाशीं त्यांना येतांच येणार नाहीं, अशा प्रकारचें कांहीं मंत्र-साधन आपणाला केलें पाहिजे. ’ नंतर त्यानें आपणांबरोबर एक पिशवी आणिली होती. तिच्यांतून पिवळ्या तापत्याच्या लांबलांब लंगोट्या काढल्या. त्यांपैकीं एक त्यानें आपल्या कंबरेला बांधिली, व दुसरी गळ्याला बांधिली; आणि बाकीच्या झेन यास देऊन त्यालाही त्याचप्रमाणें करण्यास सांगितलें. नंतर त्यानें सकलादीचे दोन लहान लहान तुकडे जमिनीवर टाकले व त्यांच्या कांठावर कित्येक प्रकारचे हिरे व स्फटिक, आणि कस्तुरी हीं पसरलीं. त्या सकलादीच्या तुकड्यांपैकीं एकावर तो स्वतः बसला व दुसऱ्यावर झेन बसला. मग तो झेन यास म्हणाला—‘ आपल्यासमोर जो हा राजवाडा दिसत आहे, त्यांतून मी यक्षांच्या राजास मंत्रानें पाचारण करितों. ईश्वर करो आणि तो सौम्यवृत्ति धारण करून येवो, म्हणजे आपण मिळविली! कारण या राजश्रीची तबियत कोणत्या कलावर जाईल याची मलाही खरोखर भीतिच आहे! आपण येथें आलों हें पाहून त्याची तबियत गरम झाली, तर तो राक्षसाचें रूप धारण करून येईल; व ती गोष्ट जर त्याला मानवली तर तो एखाद्या परमरूपवान् पुरुषाच्या रूपानें प्रगट होईल.तो आपल्यासमोर आला कीं, लागलीच तुम्ही उठून त्यास मुजरा करा. पण या सकलादी-वरून मात्र हलूं नका. जर का हिऱ्याच्या पलीकडे केंसाइतके गेलां तर झालीच तुमची गुडाखू असें समजा! तुम्ही त्याला म्हणा

कीं, ' यक्षराज, आपला सेवक जो माझा बाप, त्यास परमेश्वराचा दूत यम हा घेऊन गेला; तर आपणाला माझी अशी प्रार्थना आहे कीं, त्याचा ज्याप्रमाणें आपण सांभाळ केला, त्याप्रमाणेंच माझाही करावा. ' त्यानें जर तुम्हांला विचारलें कीं, ' तुझें काय म्हणणें आहे ? ' तर तुम्ही म्हणा कीं, म्हणणें दुसरें कांहीं नाहीं; तो तेवढा नववा पुतळा मला मिळावा. '

याप्रमाणें झेन यास सांगून मुबारिक यानें मंत्र म्हणण्यास प्रारंभ केला. तो लागलीच विजेचा लखलखाट होऊन त्यांचे डोळे दिपून गेले. इतक्यांत मोठ्यानें मेघांचा गडगडाट झाला व सर्व प्रदेश अंधारमय होऊन गेला. त्याप्रमाणें मोठा सोसाट्याचा वारा वाहूं लागला. चोहोंकडून भयंकर आरोळ्या ऐकूं येऊं लागल्या. जमीन थरथरा कापूं लागली आणि प्रलयकाळ जो म्हणतात तोच येऊन ठेपला कीं काय असें होऊन गेलें.

झेन हा भयानें अगदीं चकित होऊन गेला, व त्या आरोळ्या ऐकून पुढील चिन्ह ठीक नाहीं असें त्यास वाटलें; पण मुबारिक याला या गोष्टीच्या संबंधानें चांगली माहिती होती, यामुळें त्याला त्याचें कांहींच वाटलें नाहीं. तो किंचित् हंसून झेन यास म्हणाला, ' हूं भिऊं नका, धैर्य धरा; हें सर्व चाललें आहे तें ठीक आहे. यांत वाईट मुळींच नाहीं. ' इतक्यांत यक्षांचा राजा परमरूपवान् पुरुषाचें रूप धारण करून त्या ठिकाणीं प्राप्त झाला. तथापि त्याची मुद्रा किंचित् उग्रच दिसत होती.

मुबारिक यानें पूर्वीं सांगून ठेविल्याप्रमाणें झेन यानें यक्षांच्या राजास मुजरा केला, तेव्हां तो हास्यवदन करून म्हणाला, ' मुला, तुझ्या बापावर माझी मोठी मर्जी होती, व जेव्हां जेव्हां तो मला भेटावयास येई, तेव्हां तेव्हां त्याला मी एक पुतळा बक्षीस देत असे. मुला, तुझ्याबरही माझी त्याच्यापेक्षां कांहीं कमी ममता आहे असें तूं समजूं नको. तुझा बाप मरण पावण्यापूर्वीं मला भेटावयास आला होता त्या वेळीं मींच त्याला मजास त्या मातिणीवर तीं अक्षरें

लिहून ठेवण्यास सांगितलें होतें; व त्यास असें वचन दिलें होतें कीं, मी तुझ्या मुलावर नेहमीं आपली पाखर ठेवीन, आणि तुला दिलेल्या आठ पुतळ्यांहूनही अत्यंत सुंदर जो नववा पुतळा मजपाशीं आहे तो मी त्यास देईन. तूं स्वप्नांत वृद्ध मनुष्य पाहिलास तो मीच; त्या मोहोरांच्या बरण्या व ते आठ पुतळे जे तुला तळघरांत सांपडले, ते कोणत्या रीतीनें तुला प्राप्त होतील हें मीच तुला सांगितलें. तुला जीं कांहीं आजपर्यंत संकटें वगैरे भोगावीं लागलीं, त्यांत माझेंच पुष्कळ अंग आहे; निदान त्यांस मी कारणीभूत तरी झालों आहे. तूं कोणता हेतु मनांत धरून आला आहेस तें मीं समजलों. तुझा हेतु सिद्धीस जाईल. तो नववा पुतळा देण्याचें तुझ्या बापाला मींच वचन दिलें होतें, तर तुला मी तो देईन. पण माझी एक अट अशी आहे कीं, एक अविवाहित मुलगी मी तुम्हांला आणून देईन, अशी तुला शपथ घेतली पाहिजे. ती मुलगी रूपानेंही उत्तम असली पाहिजे, व तुला आपले मनोविकार इतके स्वाधीन ठेविले पाहिजेत कीं, तूं तिला येथें घेऊन येत असतां तिच्यावर तुझें मन बिलकुल जातां कामा नये.

झेन यानें विचार न करितां ती गोष्ट करण्याविषयीं शपथ घेतली. नंतर तो यक्षांच्या राजास म्हणाला, ‘ पण महाराज, सुदैवेंकरून आपण म्हणतां तशी सुंदर मुलगी मला सांपडली, तर तिच्या अंगीं दुसरे जे गुण पाहिजेत ते आहेत कीं नाहींत हें मीं कसें समजावें ? ’ यक्षांच्या राजानें हंसून उत्तर केलें, ‘ ही अडचण तर खरीच; तुम्हां लोकांना तें समजण्याची पंचाईतच आहे. कारण, ती ज्ञानशक्ति तुमच्या ठायीं नाहीं. परंतु मीही त्या गोष्टीच्या संबंधानें केवल तुझ्यावरच अवलंबून राहीन असें नाहीं. तुला मी एक आरसा देईन, त्याचा तुला तुझ्या नुसत्या कल्पनेपेक्षां बराच जास्त उपयोग होईल. तुला एकादी कुमारिका आढळली, म्हणजे तूं त्या आरशांतून तिला पाहा. ती जर निष्कलंक असेल तर आरसा स्वच्छ राहील,—त्याजवर डागबिग कांहीं पडणार नाहीं; व तसें नसल्यास तो मळकट दिसूं लागेल; आणि असें झालें म्हणजे ती

कांहीं निष्कलंक नाहीं—निदान तिच्या मनांत तरी एखादे वेळीं पापवासना आली होती—असें तूं समज. असो; आतां तूं जी शपथ घेतलीस, तिची पक्की आठवण धर, व आपला बोल खरा करून दाखीव. नाहींपेक्षां तुजवर जितकी माझी कृपा झाली आहे, तितकीच अवकृपा होईल; व मग मी तुझा प्राण घेतल्यावांचून राहणार नाहीं.' झेन यानें पुनः प्रतिज्ञापूर्वक सांगितलें कीं, 'मी बोलण्याप्रमाणें करून दाखविल्यावांचून कधींही राहाणार नाहीं.'

नंतर यक्षांच्या राजानें झेन याच्या हातांत एक आरसा दिला; आणि तो म्हणाला, 'मुला. हाच तो मीं तुला सांगितलेला आरसा. हा घेऊन जा आणि वाटेल तेव्हां परत ये.' झेन व मुबारिक या या उभयतांनीं त्याचा निरोप घेतला, आणि परत ते त्या तलावापाशीं आले. तेथें तो पूर्वीं कोळी होडी घेऊन आलेला होताच. त्यानें त्यांना होडींत बसवून अलीकडे आणिलें मग ते आपले घोडे व नौकर लोक होते त्या ठिकाणीं आले, व त्यांसह केरो शहरास सुखरूप येऊन पोहोंचलें.

झेन मुबारिक याचे घरीं कांहीं दिवस राहिला. नंतर एके दिवशीं तो त्यास म्हणाला, 'चला आतां आपण यक्षांच्या राजाकरितां एखादी मुलगी पाहण्यास बगदाद येथें जाऊं.' मुबारिक यानें उत्तर केलें, 'बगदादेसच कशाला जायाला पाहिजे? येथें कां मुलींना तोटा गेला आहे?' झेन म्हणाला, 'तें खरें पण त्या आहेत कोठें हें आपणाला कसें समजावें?' मुबारिक यानें उत्तर केलें, 'अं:, त्याची तुम्हांला काळजी नको. येथें माझ्या ओळखीची एक स्त्री आहे. तिला मी हें काम सांगतों. ती तें उत्कृष्ट तऱ्हेनें बजावील.'

मुबारिकानें म्हटलेली स्त्री खरोखरच तशी कर्तृत्वाची होती. त्यानें तिला सांगतांच तिनें सोळा वर्षांच्या वयाच्या एकीपेक्षां एक वरचढ अशा रूपवती मुली झेन यास दाखविल्या. त्यानें प्रत्येकीस आरशांत पाहिलें पण एकीलाही पाहातांना आरसा साफ असेल

तर शपथ ! तो अगदीं मलिन होऊन जाई. सगळ्या शहरांतल्या व राजवाड्यांतल्या एकूणएक मुलींची अशी फजिती उडून गेली !

याप्रमाणें केरो येथें आपल्याला हवी तशी मुलगी मिळत नाहीं हें पाहून ते बगदाद येथें गेले. तेथें त्यांनीं भरवस्तीच्या ठिकाणीं एक मोठा सुंदर वाडा भाड्यानें घेतला आणि त्यांत ते मोठ्या थाटानें राहिले. त्यांचे येथें सर्वांस मुक्तद्वार भोजनास मिळे. सगळी मंडळी जेवून उठल्यावर जें कांहीं शेष राही, तें ते दरवेशी वगैरे गरीब लोकांस देत. तेणेंकरून त्यांचाही चांगला निर्वाह होत असे.

हे दोघे ज्या पेठेंत राहात असत, त्याच पेठेंत एक इमाम राहात असे. त्याचें नांव आबूबेकर असें होतें. त्याच्या अंगीं हा एक मोठा अवगुण होता कीं, त्याला दुसऱ्याचें चांगलें कधींही पाहावत नसे. श्रीमंत म्हणून जेवढे लोक, तेवढ्यांचा तो फार द्वेष करी. याचें कारण दुसरें कांहीं नाहीं ! तर आपण दरिद्री असतां इतर लोक श्रीमंत कां असावे, हेंच काय तें ! लोक हवे तसें जेवतात, खातात, चांगला कपडालत्ता व दागदागिने घालतात, व आपण भुकेबंगाल ! हें पाहून त्याच्या तळव्याची आग मस्तकास जाई. झेन हा मोठा श्रीमंत व उदार आहे हें ऐकून त्याजविषयीं त्याच्या मनांत फार मत्सर उत्पन्न झाला. तेव्हां एके दिवशीं मशिदीमध्यें निमाज पढून झाल्यावर तेथल्या सर्व लोकांस तो म्हणाला, बांधवहो, आपल्या पेठेंत कोणी परदेशचा माणूस आलेला आहे, तो लोकांस शेंकडों रुपये देतो असें माझ्या ऐकिवांत आलें आहे. मला वाटतें कीं, हा कोणी लबाड मनुष्य आसावा, ह्यानें स्वदेशांत कोणाचें घर बुडविलें असेल व येथें निर्धास्त चैन करण्याकरितां आला असेल. तेव्हां या गोष्टीचा आपणांला विचार करणें जरूर आहे. अशा प्रकारचा मनुष्य अमुक पेठेंत राहतो असें खालिफाच्या कानांवर गेलें तर, आळीकरांनीं हीं गोष्ट लागलीच आम्हांस कां कळविली नाहीं असें तो म्हणेल व आपणा सर्वांस शासन करील. आपण आपलें सर्वांना सांगितलें आहे रे बोवा ! आपल्याकडे आतां त्याचें कांहीं नाहीं ! ’ तेव्हां

लोकांना काय! "दुनिया झुकती है" या न्यायानें त्या सर्वांनीं म्हटलें, 'हो खरेंच इमामसाहेब' तुम्हीं म्हटलें हें कांहीं खोटें नाहीं. आपण प्रथमच या गोष्टींची खबरदारी ठेवावी हें चांगलें; आतां तुमच्याच मनांत पहिल्यान्दा ही गोष्ट आली आहे, तर तिजबद्दल सरकारांत वर्दी तुम्हीच द्या म्हणजे झालें.' आबूबेकर यास हेंच हवें होतें! लोकांचें बोलणें ऐकून त्यास मोठा हर्ष झाला आणि त्यानें घरीं येऊन अर्ज तयार केला; व दुसरे दिवशीं तो कालिफाकडे नेऊन गुजरण्याचा त्यानें निश्चय केला.

मुबारिक हा त्या मशिदींत निमाज पढण्याकरितां आलेला होता. त्यानें हें सर्व ऐकतांच केलें काय, कीं, पांचशें मोहोरांची एक थैली व कितीएक उंची उंची कपड्यांचा बस्ता घेऊन तो आबूबेकर याचे घरीं आला. त्यास पाहून आबूबेकर यानें रागावून म्हटलें, 'तुम्हीं कोणहो ? येथें कशाला आला ?' मुबारिक यानें मोठ्या नम्रतेनें त्याच्यापुढें ती थैली व कपड्यांचा बस्ता ठेवून म्हटलें. 'इमामसाहेब, मी आपल्या शेजारीं रहात असून आपल्या छायेखालीं आहें.' झैन राजा हा आपल्या आळींत रहात आहे. त्याजकडून मी आलों आहे; त्यानें आपली लोकोत्तर पवित्रता व सौजन्य यांविषयीं वार्ता ऐकल्यावरून आपला परिचय व्हावा अशी इच्छा त्यास उत्पन्न झाली आहे,व त्याजबद्दल त्यानें आपणांस विनंती करण्याकरितां मला आपलेकडे पाठविलें आहे, आणि ही अल्प भेट आपण स्वीकारावी अशी त्याची विनंति आहे.' हें ऐकून आबूबेकर याचा हर्ष त्रिभुवनांत माईना!' तो मुबारिक यास म्हणाला, 'तर मग तुमच्या राजसाहेबांचा मजकडून मोठाच अपराध झाला पण तुम्हांस माझी विनंती आहे कीं, तुम्ही मजकरितां त्याची क्षमा मागा. मी अद्यापि त्यांचे भेटीस आलों नाहीं, याची मला शरम वाटते. असो. आतां उद्यां मी त्यांच्या भेटीस खास येतों. तेव्हां आपलें आणखी बोलणें होईलच.'

दुसरे दिवशीं आबूबेकर हा मशिदींत निमाज पढण्याकरितां गेला, तेव्हां त्यानें सर्व लोकांस सांगितलें, 'गृहस्थहो, ज्याला शत्रु

नाहीं असा एकही मनुष्य या जगांत नाहीं. त्यांत विशेषतः जे श्रीमंत असतात, त्यांच्या पाठीस तर लोक एकसारखे हात धुऊन लागलेले असतात. काल संध्याकाळीं ज्या मनुष्याविषयीं मीं तुम्हांस सांगितलें त्याच्या संबंधानें एका लबाडानें माझे कान फुंकले म्हणून मी तसें बोललों. पण वास्तविक विचाराल तर तो मोठा सज्जन व सत्त्वधीर आहे; तर अशा परमयोग्य पुरुषाच्या संबंधानें आपण कालिफास खोटी बातमी देऊन त्या बिचाऱ्याची विनाकारण नुकसानी करावी हें योग्य नाहीं.'

आबूबेकर यानें आदले दिवशींच्या भाषणानें झेन यांजविषयीं लोकांच्या मनाचा जो वाईट ग्रह करून टाकिला होता, तो त्यानें आपल्या या भाषणानें अगदीं नाहींसा करून टाकिला. नंतर तो घरीं गेला आणि सणावाराच्या दिवशीं घालण्याचा जो त्याचा पोषाख होता तो घालून झेन याचे भेटीस आला. झेन यानें त्याचा मोठा सत्कार. केला नंतर लोकसंप्रदायाप्रमाणें उभयतांच्या इकडच्या तिकडच्या थोड्याशा गोष्टी झाल्यावर आबूबेकर झेन यास म्हणाला, 'तुमचा येथें बरेंच दिवस मुक्काम होणार आहे वाटतें?' झेन यानें उत्तर केलें, 'सोळा वर्षांची कुमारिका मला पाहिजे आहे. व ती मिळेपर्यंत या ठिकाणीं मला रहावयाचें आहे.' आबूबेकर म्हणाला, 'तुम्ही म्हणतां तशी मुलगी तुम्हांला मिळणें दुरापास्त आहे. पण माझ्या आढळण्यांत एक अशा प्रकारची मुलगी आहे. तिचा बाप पूर्वी कालिफाचा मुख्य वजीर होता. पण त्यानें बरेंच दिवसांपासून तें काम सोडून दिलें असून तो आपला सुखवस्तु होऊन राहिला आहे; व आपल्या मुलीला उत्तम प्रकारचें शिक्षण देण्यांत तो आपला सर्व वेळ घालवीत असतो. तुमची मर्जी असल्यास मी त्याजकडे जाऊन तुम्हाकरतां तिजविषयीं त्याजपाशीं गोष्ट काढतों. तुम्हांसारखा कुलीन व गुणवान् वर आपल्या कन्येस मिळत आहे हें पाहून त्याला मोठा आनंद होईल अशी माझी खात्री आहे.' झेन यानें उत्तर केलें, 'या गोष्टीची इतकी घाई करून उपयोगी नाहीं. ती मुलगी अगोदर मला

हवी तशी आहे अशी माझी खात्री झाल्यावांचून मी तिच्याशीं विवाह करणार नाहीं. तिच्या सौंदर्याच्या संबंधानें तुम्ही माझी खात्री कराल, पण ती निष्कलंक असल्याविषयीं कशी करणार?' आबूबेकर म्हणाला, 'त्या संबंधानें तुम्ही तरी कशी खात्री करून घेणार?' झेन यानें उत्तर केलें, 'ती माझ्या एकदां दृष्टीस पडली पाहिजे, कीं मी लागलीच तिची परीक्षा करून सोडीन.' आबूबेकर किंचित् हंसून म्हणाला, 'तर मग तुम्ही मुखसामुद्रिकांत मोठे निष्णात दिसतां बोवा! बरें, कांहीं चिंता नाहीं. तिच्या बापाच्या घरीं मी तुम्हांला नेतों; व त्याच्यासमक्ष एक क्षणभर तिला तुमच्यासमोर आणून उभी करतों.'

आबूबेकर यानें झेन यास वजीराच्या घरीं नेलें. त्यानें झेन याचें कुलशील व थोर पदवी ह्यांविषयीं वजीरास सांगतांच त्यानें लागलीच आपल्या मुलीस हांक मारिली, आणि तिच्या तोंडावरचा बुरखा काढवून तिला झेन ह्याजपुढें उभें केलें. झेन यानें अशी अनुपमेय लावण्यवती स्त्री कधींच पाहिली नव्हती, यामुळें तिजकडे पहात तो अगदीं चित्रासारखा स्तब्ध राहिला. नंतर त्याचें चित्त अंमळ थाऱ्यावर आल्यावर त्यानें आपल्या जवळचा आरसा काढिला, आणि तिला पाहिला, तों तो आरसा जशाचा तसाच स्वच्छ राहिला; किंचित् देखील मलिन दिसला नाहीं.

याप्रमाणें ती मुलगी आपल्या कसोटीस उतरली असें पाहून झेन यानें वजीरास ती आपणाला देण्याविषयीं विनंती केली. त्यानें 'होय' म्हणून, लागलीच काजीला बोलावून आणून तेथल्या तेथेंच तो विधि करविला. हें झाल्यावर झेन यानें वजीरास आपल्या घरीं नेलें, व त्यास मोठ्या थाटाची मेजवानी करून बहुमोलाचा नजराणा दिला. नंतर त्यानें मुबारिक याचे हातीं जडावाच्या सुंदर मोठमोठ्या दागिन्यांनीं भरलेली एक पेटी नवऱ्या मुलीकडे पाठविली. ती मुबारिक त्या मुलीकडे घेऊन गेला, आणि त्यानें तीस झेन याचे घरीं आणिलें. नंतर मोठ्या थाटानें लग्नाचा सोहळा झाला. हें सर्व

उरकल्यावर मुबारिक झेन यास म्हणाला, 'आतां आपण येथून निघून केरो शहरास जाऊं; कारण आपण यक्षांच्या राजास दिलल वचन आपणाला पुरें केलें पाहिजे.' झेन म्हणाला, 'हो अलबत, त्याची तर मला फार काळजी आहे. पण खरोखर विचाराल तर, मुबारिकसाहेब, मी तुम्हांला सांगतों कीं,यक्षांच्या राजाच्या म्हणण्यास मीं जरी रुकार दिला आहे, तरी त्याप्रमाणें आतां माझें मन माघार घेतें; व ही जी स्त्री मला प्राप्त झाली आहे, तिला बसोऱ्यास घेऊन जाऊन आपली पट्टराणी करावी अशी माझ्या मनांत इच्छा उत्पन्न झाली आहे.' मुबारिक म्हणाला, 'असें नाहीं हो उपयोगीं ! कसेंही करून तुम्हांला आपल्या मनाला आवर घातलाच पाहिजे व यक्षांच्या राजास दिलेलें वचन पुरें केलें पाहिजे.' झेन म्हणाला, 'बरें तर, तुम्ही आतां इतकें तरी करा कीं, तिला इतःपर माझ्या दृष्टीस पाडूं नका. कारण आतांपर्यंत मीं तिला जितकें पाहिलें आहे, तेवढ्यानेंच माझ्या मनाची मोठी चलबिचल झाली आहे !'

मग मुबारिक यानें निघण्याची तयारी केली, व ते दोघेही त्या मुलीसुद्धां केरो येथें जाऊन पोहोंचले. तेथून लागलीच ते यक्षांच्या राजाच्या मुलुखांत गेले. तेथें गेल्यावर ती मुलगी मुबारिक यांस म्हणाली, 'आपण आतां बरींच आलों नाहीं बरें ? आतां आपलें राज्य येथून जवळच असेल नाहीं ?' मुबारिक म्हणाला, 'मुली, आतां तुला खरें सांगण्यास हरकत नाहीं ? तूं समजलीस कां ? तुला झेनराजानें वरिलें खरें, पण तें सगळें थोतांड आहे! त्यानें तुझ्या बापाकडून तुला काढण्याकरितां ती केवळ युक्ति केली. तुला त्यानें आपलें तनमन मुळींच अर्पण केलें नाहीं, व बसोरा येथें नेऊन तुला पट्टराणी करण्याचा त्याचा मुळींच उद्देश नाहीं. यक्षांच्या राजानें त्याजपाशीं एक अत्यंत पवित्र स्त्री मागितली होती, व झेन यानें पुष्कळ मुली पाहिल्या पण त्याला हवी तशी तूंच एक सांपडलीस; तेव्हां आतां तो तुला त्या राजाच्या स्वाधीन करणार.' हें ऐकून त्या मुलीला अतिशय दुख झालें, व तिनें रडून आकांत केला, तें

पाहून झेन व मुबारिक ह्यांसही फार वाईट वाटलें. ती म्हणाली, ‘महाराज, मजवर दया करा; माझें या ठिकाणीं कोणी नाहीं; माझ्या बापाकडून तुम्ही मला काढून आणून माझा असा जर विश्वासघात केलात, तर त्याबद्दल परमेश्वरापाशीं तुम्हांस जाब द्यावा लागेल !’

ती इतकें जरी बोलली, व तिनें रडून आकांत केला, तरी त्याचा कांहींएक उपयोग न होतां त्यांनीं तिला यक्षांच्या राजाचे स्वाधीन केलें. त्यानें तिला पहातांच त्यास मोठा आनंद झाला व तो म्हणाला, ‘ झेन, तूं मजकरितां जी मुलगी पाहून आणिलीस, ती सुंदर असून निष्कलंक आहे, व तूं इतके श्रम सोसून आपला शब्द शेवटीं खरा केलास हें पाहून मला फार संतोष झाला आहे. तूं आतां आपल्या राज्यांत परत जा. घरीं पोहोंचतांच तूं आपल्या त्या तळघरांत जाऊन पहा, म्हणजे तेथें तो नववा पुतळा तुझ्या दृष्टीस पडेल. मी यक्षांकडून तो तेथें नेऊन ठेववितों. ’ झेन यानें यक्षांच्या राजाचे मोठे आभार मानिले. व तो आणि मुबारिक हे केरो येथें आले. झेन हा येथें फार दिवस राहिला नाहीं; कारण तो नववा पुतळा पहाण्याची त्यास फार उतावळी झाली होती. आपल्या इच्छेप्रमाणें तो पुतळा आपल्याला मिळणार असें पाहून जरी त्यास आनंद झाला तरी त्या मुलीचा आपण विश्वासघात केला ही गोष्ट त्याच्या मनाला खाऊं लागली. तो आपल्या मनांत म्हणाला, ‘ त्या स्त्रीला मी तिच्या बापापासून तोडून यक्षाच्या स्वाधीन केलें, हा मजकडून केवढा प्रमाद घडला ! ’

याप्रमाणें झेन राजाचें मन अतिशय व्यग्र होऊन गेलें. शेवटीं तो बसोरा येथें येऊन पोहोंचला. तो आला त्या दिवशीं राजधानींतल्या लोकांनीं मोठा आनंदोत्सव केला. झेन हा वाड्यांत येतांच आपल्या आईस भेटला व झालेला सर्व वृत्तांत त्यानें तीस सांगितला. त्याचा हेतु सिद्धीस गेला हें पाहून तिला मोठा हर्ष झाला. ती त्यास म्हणाली, ‘ बेटा, यक्षांचें राजानें तो पुतळा तळघरांत आहे म्हणून सांगितलें, त्याअर्थीं तो तेथें असेलच; चल, तर आतां

आपण तो पाहूं.' मग तीं दोघें लागलींच तळघरांत गेलीं, पण तेथें पहातात तों त्या नवव्या तिवईवर पुतळा असावयाचा तो मुळींच नसून तेथें एक अत्यंत लावण्यवती मुलगी त्यांच्या दृष्टीस पडली. हें पाहून त्यांना पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें; व त्यांतूनही जी मुलगी आपण यक्षांचे राजाच्या स्वाधीन केली होती, तीच ही आहे असें जेव्हां त्यानें पाहिलें, तेव्हां तर त्याच्या आश्चर्यास पारावारच नाहींसा झाला! ती मुलगी झेन यास म्हणाली, 'महाराज, मला या ठिकाणीं पाहून आपणांला मोठेंच नवल वाटलें असेल यांत संशय नाहीं. याहूनही जास्त मोलाची वस्तु आपल्याला सांपडेल अशी आपणांस आशा होती व ती सफल न झाल्याकारणानें आपण जे येवढे श्रम केले ते उगीच केले, असें खचित आपणांस वाटेल; व मीही कबूल करितें कीं, आपल्या श्रमाचें फळ आपणांला यांत खरोखर मिळालें नाहीं.' झेन म्हणाला, 'छे छे, असें म्हणूं नको. माझ्या अंतःकरणांत काय आहे हें सर्वसाक्षी परमेश्वर जाणत आहे. तुझा प्रथम स्वीकार करून यक्षांच्या राजास दिलेलें वचन मोडावें हा विचार अनेक वेळां माझ्या मनांत आला होता पण तसें करण्यापासून आपणां उभयतांसही सुख झालें नसतें. आतां फार बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. पण त्या पुतळ्याच्या संबंधानें म्हणशील तर तसले शेंकडों पुतळे तुजवरून ओंवाळून टाकावे अशी तुझी योग्यता आहे. या जगांत जेवढी म्हणून संपत्ति आहे, तिजपेक्षां तुझ्या सहवासाचें सुख अधिक प्रिय आहे.'

हें बोलणें चाललें आहे इतक्यांत मोठी मेघगर्जना होऊन तें तळघर हाललें. त्यामुळें झेन याच्या आईस फार भीति वाटली. पण तितक्यांत यक्षांचा राजा तेथें प्रगट झाला, आणि त्यानें तिची भीति नाहींशी केली. तो तिला म्हणाला, 'बाई, तुमच्या मुलाचें रक्षण करण्याचा मी पतकर घेतला असून त्याजवर माझी पूर्ण कृपादृष्टि आहे. त्याला या अल्पवयांत आपले मनोविकार स्वाधीन ठेवितां येतात कीं नाहीं, येवढेंच मला पहावयाचें होतें, म्हणून मीं हें सर्व

केलें. आतां त्यानें मला दिलेलें वचन त्याजकडून बरोबर रीतीनें पाळलें गेलें नाहीं हें मी जाणून आहे, पण याबद्दल मी त्याला दोष देत नाहीं. कारण, मानवी स्वभावाच्या दुर्बलत्वाचा हा गुणच आहे. नंतर झेन याजकडे वळून तो म्हणाला, ' मुला, तुला मी जो नववा पुतळा देणार होतों, तो हाच; आतां ह्या स्त्रीबरोबर तूं सुखानें नांद; हिनें तुजवर सदोदित प्रीति करावी अशी जर तुझी इच्छा असेल, तर हिजखेरीज इतर स्त्रिया केवळ मातेसमान समजून हिजवर आपलें प्रेम ठेव; आणि तूं असें केलेंस म्हणजे मग हिच्या पातिव्रत्याविषयीं मी जबाबदार आहे. ' याप्रमाणें बोलून तो अदृश्य झाला. झेन यानें मोठ्या आनंदानें, त्याच दिवशीं बडा दरबार भरवून तिला आपली पट्टराणी केल्याविषयीं सर्व रयतेस जाहीर केलें. पुढें त्यांची एकमेकांवरची प्रीति दिवसेंदिवस वृद्धिंगत होऊन तीं पुष्कळ वर्षें सुखानें नांदलीं.

---

# राजपुत्र खुदादाद व त्याचे भाऊ ह्यांची गोष्ट.

हारननामक शहरीं प्राचीनकाळीं एक राजा राज्य करीत होता. तो मोठा नीतिमान्, सदसद्विचारी आणि बलाढय असा होता. तो आपल्या प्रजेस फारच ममतेनें वागवीत असून, तीही त्याजवर मोठी खूष असे. सारांश, त्याला उणेपणा म्हणून कोणत्याही गोष्टीचा नव्हता. पण एका गोष्टीचें मात्र त्याला मोठें दुःख होतें. ती कोणती तर त्याला संतति मुळींच नव्हती. त्याला अत्यंत रूपवती अशा पन्नास स्त्रिया असून मूल एकही होईना, सबब आपल्याला संतति व्हावी म्हणून तो नेहमीं परमेश्वराची प्रार्थना करीत असे. एके दिवशीं त्याच्या स्वप्नांत एक मोठा रूपवान् व भव्य पुरुष येऊन तो त्यास म्हणाला, ' राजा, तूं आजपर्यंत जी माझी मनोभावें करून प्रार्थना केलीस, तिच्या योगानें मला संतोष झाला आहे; तर तुझा इष्ट हेतु लवकरच सिद्धीस जाईल. तूं सकाळीं उठतांक्षणींच इतकें

कर कीं, निमाज पढून बागेंत जा, आणि माळ्याकडून एक डाळिंब आणीव, त्याचे तुला वाटतील तेवढे दाणे खा; म्हणजे तुझा हेतु परिपूर्ण होईल.

राजा जागा होऊन या स्वप्नाचा विचार करूं लागला. तेव्हां त्यास मोठा आनंद झाला; व त्यानें परमेश्वराची भक्तिपुरःसर पुनः प्रार्थना केली. नंतर सकाळीं उठून तो निमाज पढला व बागेंत जाऊन त्यानें एक डाळिंब आणविलें; आणि त्याचे बरोबर पन्नास दाणे मोजून खाल्ले. तेव्हां त्याच्या पन्नासही राण्या गरोदर राहिल्या. परंतु पिरोज ह्या नांवाची एक होती, ती मात्र गरोदर असल्याचें चिन्ह दिसेना. यामुळें राजाची तिजवरची मर्जी अगदीं नाहींशी होऊन ती त्याला एखाद्या दुश्चिन्हाप्रमाणें भासूं लागली. तो म्हणाला, ' परमेश्वरानें माझ्या इतर सर्व बायकांवर कृपादृष्टि केली असून हिला एकटीलाच वगळली, यावरून ही त्याच्या कृपेस पात्र नाहीं हें स्पष्ट आहे ' यास्तव हिला ठार मारावें असा त्यानें निश्चय केला. पण त्याच्या वजीरानें त्याला दोन गोष्टी सांगून ह्या दुष्ट विचारापासून त्याचें मन फिरविलें. तो म्हणाला, 'महाराज, सर्व बायकांची शरीरप्रकृति सारखीच असते असें नाहीं. तेव्हां पिरोज ही गरोदर असल्याचें जरी हल्लीं कांहीं चिन्ह दिसत नाहीं, तरी ती गरोदर नसेलच असेंही म्हणवत नाहीं. ' राजानें उत्तर केलें, ' बरें, तुम्ही म्हणतां तर मी तिचा जीव घेत नाहीं, पण ती माझ्या येथें नको. तिनें पाहिजे तिकडे चालतें व्हावें. ' वजीर म्हणाला. ' महाराज, आपला चुलत भाऊ सामरराजा याजकडे तिला आपण पाठवून द्यावें म्हणजे झालें. ' राजानें 'बरें आहे,' म्हणून तिला सामर याजकडे रवाना केलें; व त्यास असें लिहून कळविलें कीं, ' हिची चांगली व्यवस्था ठेवावी, व ही गरोदर असेल तर प्रसूत झाली म्हणजे मला ताबडतोब कळवावें. '

पिरोज ही सामर याच्या येथें येऊन पोहोंचतांच तिच्या गर्भारपणाचीं चिन्हें दिसूं लागलीं. नऊ महिने पूर्ण झाल्यावर ती सुंदर

पुत्ररत्न प्रसवली. सामरराजानें हारनच्या राजास हें शुभ वर्तमान लिहून कळविलें. त्याला याबद्दल मोठा आनंद झाला, पण त्यानें उलट सामरराजास असें लिहिलें कीं, ' माझ्या बाकीच्या सर्व राण्यांसही पुत्र झाले आहेत, तेव्हां येथें हल्लीं मुलांची कांहीं वाण नाहीं; याकरितां तुम्ही पिरोज हिच्या मुलास तूर्त नांव खुदादाद (परमेश्वरानें दिलेला ) असें ठेवावें; आणि पुढें मी त्यास आणावयास पाठवीन तेव्हां त्यास इकडे पाठवून द्यावें. '

सामर राजानें खुदादाद ह्यास शिकविण्याकरितां उत्तम विद्वान् शिक्षक ठेवून त्याजकडून फार चांगला विद्याभ्यास करविला. तसेंच घोड्यावर बसणें, तिरंदाजी करणें वगैरे राजपुत्रास आवश्यक अशा कलांचाही अभ्यास त्यानें त्याजकडून करविला. यांत तर तो इतका प्रवीण झाला कीं, तो अठरा वर्षांचा असतांच हा कोणी महान् योद्धा होईल अशीं त्याचीं चिन्हें दिसूं लागलीं; आणि त्याचा जन्म शूराच्या पोटीं झाला असल्यामुळें, केवळ घोडा फिरविण्यांत व शिकार करण्यांत त्याला कांहीं हंशील वाटेनासें होऊन, आपल्या हातून मोठमोठे पराक्रम व्हावे अशी त्यास सहजच इच्छा झाली. तेव्हां एके दिवशीं तो आपल्या आईस म्हणाला, ' आई, मला येथें राहाण्याचा अगदीं कंटाळा आला आहे. मला वाटतें, मोठमोठीं शौर्याचीं कृत्यें करून दुनियेंत आपलें नांव गाजवावें. याकरितां लढाईस जाण्याविषयीं तूं मला परवानगी दे. बाबांस शत्रूंना फार त्रासवून सोडिलें आहे, असें असतां ते मला कां नाहीं साहाय्यास बोलावीत ? मला त्यांनीं आजपर्यंत असें दुसऱ्याच्या घरीं कां ठेविलें ? माझे बाकीचे भाऊ बाबांच्या घोड्याशीं घोडा चालवून लढाई करीत असतील व मी असेंच माशा मारीत राहावें हें चांगलें का ? ' पिरोजनें उत्तर केलें, ' बेटा, तुझा लौकिक व्हावा अशी मलाही फार इच्छा आहे. त्यांच्या शत्रूंशीं लढून यापूर्वीच तूं कीर्ति मिळवितास, पण तसा योग आला नाहीं यास काय उपाय ? ते बोलावीत तोंपर्यंत तुला दम खाल्ला पाहिजे. ' खुदादाद म्हणाला,

'छे छे, आई, आतां माझ्यानें स्वस्थ बसवत नाहीं. मी बाबांना केव्हां पाहीन असें मला झालें आहे; व मला असें वाटतें कीं, प्रथम त्यांना आपण कोण हें न समजूं देतां त्यांच्या पदरीं जाऊन रहावें, पुष्कळ शौर्याचीं कृत्यें करावीं, आणि मग त्यांस ओळख द्यावी. त्यांनीं आपणाला ओळखण्यापूर्वी त्यांची आपण मर्जी संपादावी यांतच पुरुषार्थ आहे.' पिरोज हिला ही गोष्ट पसंत पडून तिनें त्यास त्याप्रमाणें करण्यास आपलें अनुमोदन दिलें. मग एके दिवशीं शिकारीस जाण्याच्या निमित्तानें तो सामर याचे घरून निघाला. त्यानें सामर यास आपला उद्देश कळविला नाहीं; याचें कारण–तो कदाचित् आपल्याला मोडता घालील अशी त्याला शंका आली.

खुदादाद एका पांढऱ्या सुंदर घोड्यावर बसला. त्या घोड्याच्या लगामाच्या कड्या सोन्याच्या असून, त्या घोड्याला जे नाल मारले होते तेही सोन्याचेच होते. त्याचें जीन अस्मानी रंगाच्या साटिणीचें होतें, व त्यावर मोत्यांचें जाळीकाम केलेलें होतें. त्यानें जी तरवार बरोबर घेतली होती, ती एका सबंध हिऱ्याची केलेली असून तिचें म्यान चंदनी लांकडाचें होतें; आणि त्यास पाच व माणकें जडविलेलीं होतीं. त्यानें आपल्या खांद्यावर धनुष्य व बाणांचा भाता घेतला होता. तो मूळचाच मोठा देखणा असून अशा प्रकारचा त्याचा थाट, मग त्याच्या त्या एकंदर तेजाला काय पुसावें? त्या थाटानिशीं तो हारन शहरीं येऊन दाखल झाला. त्यानें लवकरच राजदरबारीं लोकांत आपली ओळख करून राजाची भेट घेतली, आणि त्याच्या पदरीं राहण्याची आपली इच्छा दर्शविली. त्याचें तें तेज पाहून, किंवा स्वाभाविक पुत्रप्रेमाच्या योगानेंच म्हणा, राजाची तेव्हांच त्याजवर मर्जी बसली; व त्यालाही आपल्या सैन्यांत मनुष्याची जरूर होतीच, तेव्हां त्याचा मोठा आदर करून 'तुम्ही कोण? कोठून आलां?' वगैरे हकीकत त्यानें त्याला विचारिली. खुदादाद म्हणाला, 'मी केरो येथील एका अमीराचा मुलगा आहे. मी चैनींखातर प्रवास करण्याकरितां निघालों आहें. येतां येतां आपल्या

राज्यांत आलों. तों मला असें कळलें कीं, आपल्या जवळपासच्या राजांशीं आपला संग्राम चालला आहे. सबब आपल्या सेवेस राहून आपल्यास साहाय्य झाल्यास करावें, अशा इच्छेनें मी येथें आलों आहे.' हें ऐकून राजास फार आनंद झाला; व त्यानें त्यास एका पलटणीचा अधिकारी नेमिलें.

राजपुत्रानें लवकरच कित्येक लढायांत शत्रूंचा पाडाव करून जय मिळविला. त्यामुळें त्याची मोठी कीर्ति झाली. सैन्यांतील त्याच्या बरोबरीचे व इतर अधिकारी आणि त्याच्या हाताखालचे शिपाई यांना तो फारच प्रिय झाला. तो जसा शूर होता, तसाच मोठा चतुरही होता; यामुळें राजाची त्याजवर फारच मर्जी बसली. मुख्य वजीर व इतर प्रधान हेही नेहमीं खुदादाद याच्या भेटीस येऊं लागले; व त्याचा स्नेह संपादण्याविषयीं इतके झटूं लागले कीं, राजाच्या इतर मुलांशीं दोन दोन दिवस त्यांचें भाषणही होईनासें झालें. तेव्हां अर्थातच त्यांस राग आला. व या आपल्या अपमानास कारण हा नवा आलेला मनुष्य आहे, असें जाणून ते त्याचा द्वेष करूं लागले. परंतु राजाची त्याजवर इतकी मर्जी बसून गेली होती कीं, त्याच्या संबंधानें त्यास कोणीं कांहींही सांगितलें तरी तो तिकडे बिलकुल लक्ष देत नसे; व हा मोठा अलौलिक गुणवान् पुरुष आहे अशी त्याची कित्येक गोष्टींवरून बालंबाल खात्री झाल्याकारणानें, तो पुढें सदोदित त्यास आपल्याजवळच ठेवूं लागला. त्याचें तें खुबीदार व शहाणपणाचें भाषण ऐकून राजाला फारच संतोष वाटे, व इतर राजपुत्रांचें वय जरी त्याच्या इतकेंच होतें, तरी त्यास त्यानें खुदादाद ह्याच्या ताब्यांत दिलें, व 'तुम्हांस जें काय करणें तें याच्या हुकुमानें करीत जा' असें त्यांस सांगितलें.

या कारणामुळें तर त्या राजपुत्रांच्या तळव्याची आग मस्तकास गेली. ते म्हणाले, 'काय चमत्कार आहे! बाबांनीं आम्हांला एकीकडे सारून या गोमाजीला केवळ आपल्या नाकाचा बाल करून ठेविलें! बरें, ठेविलें तर ठेविलें, पण आणखी त्याच्या ताब्यांतही

आम्हांस दिलें! आणि आतां आम्हांला त्याच्या ओंजळीनें पाणी प्यावें लागणार! छीः, हें कांहीं कामाचें नाहीं. ह्या राजश्रीचा आतां सूड घेतल्यावांचून इलाजच नाहीं.' त्यांपैकीं एकजण म्हणाला, 'आपण सर्वजण मिळून त्याला मारून टाकूं म्हणजे झालें!' दुसरा म्हणाला, 'हें तर अगदींच वाईट हो! याच्या योगानें आपलाच उलटा नाश होईल. त्याला आपण मारलें म्हणजे बाबांची आपल्यावरून अगदींच मर्जी उतरेल; व ते आपणांस राज्य करण्यास नालायक ठरवितील, तर असें उपयोगीं नाहीं. ही ब्याद आपोआप येथून नाहींशी होईल अशी कांहीं तरी युक्ति काढली पाहिजे. मला वाटतें आपण त्याला विचारून शिकारीस म्हणून जावें, आणि एखाद्या शहरीं जाऊन रहावें. मग आपण आलों नाहीं म्हणजे बाबांस अर्थातच काळजी लागेल; व तसें झालें म्हणजे आपल्याला त्यानें जाऊं कसें दिलें, असा बाबा त्याजवर दोष ठेवतील; व त्या रागाच्या आवेशांत त्याला घालवून देतील, अगर, प्रसंगविशेषीं त्याचें डोकें देखील उडवितील!'

सर्व राजपुत्रांस ही युक्ति पसंत पडली व ते खुदादाद याजकडे गेले आणि त्यांनीं त्याजपाशीं शिकारीस जाण्यास परवानगी मागितली; व 'आम्ही आजच्या आजच परत येतों' असें त्यास सांगितलें. खुदादाद यास "इकडे आड आणि इकडे विहीर" असें झालें. शेवटीं त्यानें त्यांस जाण्यास परवानगी दिली. ते आपल्या संकेताप्रमाणें अर्थातच आले नाहींत, तेव्हां राजानें 'ते कोठें आहेत?' म्हणून विचारलें. खुदादाद म्हणाला, 'महाराज, ते शिकारीस गेले आहेत. त्यांस जाऊन आज तीन दिवस झाले, पण ते गेले त्याच दिवशीं त्यांनीं परत येऊं म्हणून म्हटलें होतें.' हें ऐकून राजास चैन पडेनासें झालें, व त्यानें आणखी एक दिवस वाट पाहिली. तरी जेव्हां ते आले नाहींत, तेव्हां तो फारच घाबरला, व रागानें खुदादाद ह्यास म्हणाला, 'मूर्खा, तूं माझ्या पोरांना कोणीकडे धाडलेंस; तुला त्यांजबरोबर जाण्याची अक्कल कशी नाहीं सुचली? तुझ्यावर भरं-

शानें जें काम सोंपविलें, तें तूं अशा रीतीनें बजाविलेंस काय ? जा आतां येथून तें कोणीकडे गेले असतील त्यांचा शोध करून त्यांना घेऊन ये; नाहींतर तूं मेलास असें समज. '

हे शब्द ऐकून खुदादाद याच्या मनाला भयाचा चरका बसला. त्यानें ढाल, तलवार, वगैरे हत्यारें घेतलीं, व घोड्यावर बसून तो निघाला; आणि जसा एखादा गुराखी आपलीं गुरें हरवलीं म्हणजे त्यांना रानोमाळ शोधीत फिरतो, त्याप्रमाणें त्यानें चोहींकडे आपल्या भावांचा शोध केला पण शोध मुळींच लागेना. तेव्हां तो केवळ दुःखसमुद्रांत बुडून गेला, आणि म्हणाला, ' अरेरे ! माझ्या भावांची काय गत झाली असेल कोण जाणें ! ते का शत्रूच्या हातीं लागले, का काय झालें असेल तें असो ! मी येथें येऊन बाबांना दुःख मात्र देण्यास कारण झालों ! मीं त्या पोरांना शिकारीस जाण्यास परवानगी देऊं नये, दिली; बरें त्यांच्या बरोबर तरी जावें, तर तसेंही केलें नाहीं ! आतां करावें तरी काय ? ' याप्रमाणें तो मोठ्या विवंचनेंत पडला.

मग तसाच त्यांचा शोध करीत करीत तो एका मोठ्या विस्तीर्ण अरण्यांत गेला. त्याच्या मध्यभागीं काळ्या रंगाच्या संगमरवरी पाषाणांचा मोठा थोरला किल्ल्यासारखा एक वाडा होता, त्या वाड्याजवळ तो गेला. तेव्हां त्या वाड्याच्या एका खिडकींत बसलेली एक अत्यंत लावण्यवती स्त्री त्याच्या दृष्टीस पडली. तिच्या अंगावर दागदागिने वगैरे मुळींच नव्हते; व तिचे केंस मोकळे सुटलेले असून अंगावरचीं वस्त्रें फाटलेलीं होतीं. आणि ती मोठ्या दुःखांत आहे असें तिच्या मुद्रेवरून खुदादाद यास दिसून आलें. त्यास पहातांच ती म्हणाली, ' ' महाराज, तुम्ही येथें क्षणभरही राहूं नका. आल्या वाटेनें लवकर चालते व्हा. नाहींपेक्षां, या वाड्याचा मालक एक राक्षसी मनुष्य आहे, त्याच्या हातांत तुम्ही सांपडाल. तो कोण आहे म्हणाल तर, एक काळाकभिन्न व मोठा धिप्पाड असा शिद्दी आहे. तो मनुष्यभक्षक आहे. या वाड्याच्या आसमंतात् जे कोणी दुर्दैवी लोक येतात, त्या सर्वांस पकडून तो येथें आणून ठेवितो. मग

त्यांची सुटका होण्याची आशाच नको! पुढें आज एक, उद्यां दुसरा, याप्रमाणें प्रत्येकास तो मारून खातो.

खुदादाद त्या स्त्रीस म्हणाला, 'तुम्ही आतां आपल्या मनांतील सर्व भीति टाका, व तुम्ही कोण, कोठच्या येवढें कृपा करून सांगा.' ती स्त्री म्हणाली, 'मी केरो येथील एका मोठ्या कुलवान् गृहस्थाची कन्या आहें. मी काल ह्या रस्त्यानें बगदादेस चाललें असतां त्या राक्षसानें मजबरोबरच्या सर्व लोकांवर हल्ला करून त्यांची कत्तल उडाविली; आणि मला येथें आणिलें. आतां मला तो मारून टाकील तर तें मी सुख मानीन पण तेवढें तरी माझ्या कपाळीं आहे कोठें? कारण, तो मला वश करण्याविषयीं यत्न करीत आहे व बऱ्या बोलानें मी त्याच्या म्हणण्यास राजी व्हावें म्हणून त्यानें आतांपर्यंत विचार करण्यास फुरसत दिली आहे; आणि शेवटपर्यंत मी आपला हेका सोडिला नाहीं, म्हणजे अर्थात् उद्यां तो मजवर जुलूम करणार. आतां तुम्ही तरी त्याच्या कचाटयांत सांपडूं नका.' असें तुम्हांस मी पुनः सांगतें. त्या राक्षसाची आतां येण्याची वेळ झाली. त्याला येथून कांहीं अंतरावर कित्येक मुशाफर वाटेनें जातांना दिसले,त्यांस धरून आणण्याकरितां तो गेला आहे. तर आतां तुम्ही क्षणभरही येथें न रहातां लवकर चालते व्हा. तुम्ही आतां त्याच्या हातांतून सुटाल कीं नाहीं याचा बहुधा मला संशयच वाटतो.

तिचें बोलणें संपत आहे तों तो शिद्दी येऊन दाखल झाला. त्याचें शरीर खरोखर एखाद्या राक्षसायेवढें होतें; आणि त्याची मुद्रा तर अतिशयच भयंकर होती. तो एका मोठ्या खंद्या तातंरी घोड्यावर बसला होता. त्याच्या हातांत जी तरवार होती, ती इतकी मोठी व जड होती कीं, त्याच्याखेरीज इतरांला ती पेलण्याजोगी नव्हती. खुदादाद यास तें अवाढव्य प्रकरण पाहून मोठें आश्चर्य वाटलें व या भयंकर प्रसंगीं आपणांस सहाय्य होण्याविषयीं त्यानें परमेश्वराची प्रार्थना केली. नंतर त्यानें आपली तरवार उपसली, व त्या शिद्द्याशीं सामना करण्यास तो तयार झाला. तेव्हां शिद्दी त्यास म्हणाला,

' पोरा, उगीच कशाला ही तडफड करतोस ? मुकाट्यानें शरण ये कसा ! ' पण खुदादाद यानें आपल्या भिवया चढवून कांहींएक न बोलतां असें दर्शविलें कीं, आपण लढाई करून आपलें संरक्षण करण्यास सिद्ध आहों. तो त्या शिद्यावर चालून गेला. आणि त्यानें आपल्या तलवारीनें त्याच्या पायावर एक जबर वार केला. त्या शिद्यानें आपणाला जखम लागल्यामुळें येवढ्या मोठ्यानें किंकाळी फोडली कीं, तिच्या आवाजानें तें सर्व मैदान दणाणून गेलें. त्यानें मोठ्या त्वेषानें खुदादाद याजवर उलट वार केला. त्याच्या योगानें खुदादाद याचीं शंभर वर्षे पुरीं व्हावयाचीच वेळ आली होती, पण त्यानें मोठ्या चातुर्यानें आपला घोडा त्वरित फिरवून तो वार चुकविला. आणि तो शिद्दी दुसरा वार करणार, इतक्यांत त्यानें जलदी करून त्याच्या उजव्या दंडावर जोरानें आणखी एक वार केला. त्यासरसा त्या भयंकर तरवारीसुद्धां त्याचा तो हात तुटून पडला; आणि त्यामुळें त्या दुष्टाचें अवसान नाहींसें होऊन तो धाडकन् घोड्यावरून खालीं आपटला. तो कड्यासारखा कोसळला तेव्हां जमीन देखील हादरली ! खुदादाद घोड्यावरून उतरला, व तत्क्षणीं त्यानें तरवारीनें आपल्या शत्रूचें डोकें उडविलें.

ती स्त्री भयंकर द्वंद्वयुद्धाचा काय परिणाम होतो तें मोठ्या उत्सुकतेनें पहात होती व राजपुत्रास यश यावें म्हणून एकसारखी परमेश्वराची प्रार्थना करीत होती. त्यानें त्या राक्षसाची मान तोडतांच तिनें मोठ्यानें आनंदाची आरोळी मारिली. खुदादाद याचें भव्य व तेजस्वी रूप आणि त्याचा महान् पराक्रम पाहून तिला वाटलें कीं, हा कोणी तरी राजपुत्र असावा यांत संशय नाहीं. ती त्यास म्हणाली, ' महाराज, आपण आरंभिलेलें काम आतां कृपा करून शेवटास न्या. त्या दुष्टाच्या आंगरख्याच्या खिशांत किल्ल्या आहेत, त्या घेऊन वाड्याचा दरवाजा उघडा, व मला येथून सोडवा. '

राजपुत्रानें त्याच्या खिशांतला किल्ल्यांचा जुडगा काढून घेतला, व

तो दरवाजा उघडून आंत गेला; तों ती स्त्री त्याला भेटण्याकरितां आली. ह्याचे आपणावर अतिशय उपकार झाले हें दर्शविण्याकरितां ती त्याजपुढें साष्टांग नमस्कार घालण्याच्या बेतांत होती. पण राजपुत्रानें तसें करूं दिलें नाहीं. ती त्याच्या शूरत्वाची फारच तारीफ करून म्हणाली, 'खरोखर आपण या पृथ्वींत अद्वितीय वीर आहां यांत संदेह नाहीं.' त्यानेंही तिच्या चांगुलपणाबद्दल तिची उलट स्तुति केली. तिला त्यानें पूर्वीं दुरून पाहिलें होतें, यामुळें तिचें खरें स्वरूप त्याच्या चांगलें नजरेस पडलें नव्हतें. पण जवळून तिला पाहून त्याला आपल्या नेत्रांचें पारणें फिटलें असें वाटलें. अशा अमोलिक स्त्रीरत्नाची आपल्या हातून सेवा घडल्याबद्दल खुदादाद यास जो आनंद झाला असेल त्यापेक्षां त्या स्त्रीस त्या काळाच्या जबडयांतून आपली सुटका झाल्याबद्दल अधिक आनंद झाला असेल कीं काय याची कल्पना ज्याची त्यानेंच करावी!

इतक्यांत कांहीं माणसांचें विव्हळणें व रडणें राजपुत्राच्या कानीं आलें. तें ऐकून तो म्हणाला, 'हे दुःखोद्गार कोठून येतात बरें? हें ऐकून माझें काळीज तर फाटून जातें!' त्या स्त्रीनें एका दाराकडे बोट दाखवून म्हटलें, 'महाराज, तीं पहा त्या चांडाळानें माणसें कोंडून ठेविलीं आहेत. तीं किती असतील तीं भगवान् जाणे! या सर्वांच्या हातापायांत त्यानें बिडया घातल्या आहेत. यांपैकीं दररोज एकेक त्याच्या भक्ष्यस्थानीं पडणार होतें!'

राजपुत्र म्हणाला, 'असें काय? तर माझ्या हातून त्या दुष्टाचा नाश झाला ही फारच आनंदाची गोष्ट झाली. कारण, त्या योगानें या हतभागी प्राण्यांचे जीव वांचले. बरें तर, चला आपण त्या बिचाऱ्यांना लवकर बंधमुक्त करूं. आपण त्यांस सोडविण्यास गेल्यापासून त्यांना किती आनंद होईल हें तुम्ही आपल्या स्वतःच्याच अनुभवावरून पहा!' असें म्हणून तीं दोघें त्या दारापाशीं गेलीं; तों त्या बिचाऱ्यांनीं दुःखामुळें एकच कल्लोळ करून सोडिला होता, तो त्यांच्या कानीं स्पष्ट आला. तो ऐकून तर खुदादाद यास

त्यांची फारच दया आली; व त्यांना केव्हां मोकळें करीन असें त्यास झालें. मग लागलीच त्यानें त्या दाराच्या कुलपास किल्ली लाविली. पण त्या कुलपाची ती किल्ली नव्हती, म्हणून त्यानें नीट पाहून दुसरी लाविली. ती खडबड ऐकून ते बिचारे फारच घाबरले, व मोठमोठ्यानें ओरडूं लागले. कारण, नेहमींच्या सांप्रदायाप्रमाणें तो राक्षस आतां आपल्याकडे येणार व आपल्यांपैकीं एकास स्वतः खाण्याकरितां घेऊन जाणार असें त्यास वाटलें.

इतक्यांत राजपुत्रानें दार उघडलें, आणि आंत पहातों तों एक मोठें भुयार असून त्यांत उजेड येण्यास एक लहानशी जाळी मात्र होती. तो खालीं उतरून गेला तों त्या ठिकाणीं शंभर सवाशें लोक गुरें बांधतात त्याप्रमाणें खुंटयांस जखडून बांधून टाकलेले त्याच्या दृष्टीस पडले. राजपुत्र त्यांस म्हणाला, ‘ भले गृहस्थ हो ! तुम्हांस आतांपर्यंत डोळ्यांपुढें एकसारखा मृत्यु दिसत होता, पण परमेश्वरानें कृपा करून त्यापासून तुमची सुटका करण्याची वेळ आणिली, याबद्दल त्या जगन्नियंत्याची तुम्ही मनोभावेंकरून स्तुति करा.तुम्हांस खाण्याकरितां ज्या काळपुरुषानें येथें कोंडून ठेविलें होतें, त्यास मी आतांच यमसदनास पोहोंचाविलें व तुमची आतां मी येथून मुक्तता करणार. ’ हें ऐकतांच त्या सर्वांनीं जो आनंदघोष केला, त्यामुळें सर्व दिशा दणाणून गेल्या. मग लागलीच राजपुत्र व ती स्त्री हीं त्यांस मोकळें करावयास लागलीं. त्यांच्यापैकीं जो मोकळा होई, तोही लागलीच त्यांना मदत करावयास लागे. याप्रमाणें थोडक्याच वेळांत ते सर्व मोकळे झाले.

त्या सर्वांनीं खुदादाद याच्या पायांवर लोटांगण घातलें; आणि त्यानें आपणांस जीवदान दिलें याबद्दल त्याचे फारफार आभार मानून ते सर्व बाहेर पडले. तेव्हां खुदादाद हा ज्यांच्या शोधाकरतां निघाला होता व ज्यांच्याविषयीं त्याची बहुतेक निराशाच झाली होती, ते त्याचे भाऊ त्या लोकांमध्यें त्याच्या दृष्टीस पडले ! त्या वेळीं त्यास किती आश्चर्य व आनंद वाटला असावा बरें ! तो म्हणाला,

' राजपुत्रांनो, तुम्हीच का रे हे माझ्यासमोर आहां! का माझा हा नुसता दृष्टिभ्रम आहे! प्रियसख्यांनो, तुमचा पिता तुम्हांकरितां पराकाष्ठेचें दुःख करीत आहे. बरें पण तुम्ही सर्वही खुशाल आहांना? कारण, तुम्हांपैकीं एकही जर नसेल, तर तुमची सुटका केल्याचा जो मला आनंद झाला आहे, तितकेंच पुनः दुःख होणार आहे!'

तेव्हां ते एकूणपन्नासही राजपुत्र खुदादाद याजपुढें आले, आणि त्या सर्वांस त्यानें आलिंगन दिलें. त्यांनीं खुदादाद याची वाहवा केली व बाकीच्याही लोकांनीं आपल्यावर झालेल्या त्याच्या ह्या उपकारांबद्दल त्याचे पराकाष्ठेचे आभार मानले. नंतर त्या किल्ल्यांत ते चोहोंकडे फिरले. त्यांना तेथें अपार द्रव्य सांपडलें; तसेंच रेशमी व भरजरीचीं मौल्यवान वस्त्रें, इराण देशांतील मोठमोठ्या किंमतीच्या सत्रंज्या व गालीचे, आणि चीन व इतर देशांतील शेंकडों प्रकारचा व्यापारांचा माल,जो त्या शिद्यानें वाटमारी करून जमा केलेला होता, तो त्यास सांपडला. तेथें जे व्यापारी होते, त्यांचा जो कांहीं त्यांत माल व पैसाअडका होता, तो त्यांचा त्यांनीं ओळखून घेतला, व बाकीचा खुदादाद यानें सर्वांत विभागून दिला. नंतर तो त्यास म्हणाला, 'आतां तुम्ही हा माल वगैरे नेणार कसा? आपण येथें भयाण अरण्यांत आहों, येथें घोडीं वगैरे मिळण्याचा मुळींच संभव नाहीं.' तेव्हां त्यांपैकीं एकजण म्हणाला, ' महाराज, त्या रामोशानें आमचे घोडे, उंट वगैरे सर्व धरून आणिले होते. ते कदाचित् त्याच्या तबेल्यांत असतील.' खुदादाद म्हणाला, ' हो, असतील कदाचित्; चला आपण पाहूं तर खरें!' त्यावरून ते तबेल्यांत गेले; तों त्यांचीं सर्व जनावरें त्यांना सांपडलीं. तसेंच त्या राजपुत्रांचे घोडेही सर्व सांपडले. हे सर्व लोक सुटून आले असें पाहून, तेथें त्या शिद्याचे नोकर जे दुसरे कांहीं शिद्दी होते, त्यांनीं ताडलें कीं, आपला धनी यांनीं खास मारिला. तेव्हां ते झटदिशीं आडवाटांनीं पळून गेले. ह्या मंडळींपैकीं कोणीच त्यांच्या वाटेस गेलें नाहीं. आपली सुटका झाली, व आपला माल, घोडींपाडीं

हीं सर्व सांपडलीं याबद्दल या मंडळीला मोठा आनंद होऊन, त्यांनीं आपला रस्ता धरण्याचा निश्चय केला. मग पुनः खुदादाद ह्याचे अतिशय आभार मानून, व त्याचा निरोप घेऊन ते चालते झाले.

ते गेल्यावर खुदादाद हा त्या स्त्रीस म्हणाला, 'तुम्हांस बगदादेस जावयाचें आहे, तर तेथपर्यंत तुम्हांला पोंचविण्याकरितां येण्याचा मीं बेत केला आहे, व हे राजपुत्रही त्याप्रमाणें करण्यास मागेंपुढें पहाणार नाहींत अशी माझी खात्री आहे.' त्यावरून ते सर्व तिला म्हणाले, 'तुम्हाला तुमच्या स्वस्थानीं नेऊन पोंचविल्यावांचून आम्हांला प्रशस्त वाटणार नाहीं.'

तिनें उत्तर केलें, 'सज्जनहो, माझा देश येथून फार दूर आहे. यासाठीं तुम्हांस इतका दूरचा प्रवास करावयास लावणें मला योग्य दिसत नाहीं. ऊंस गोड लागला म्हणून तो मुळासकट खावा कीं काय ? खेरीज मी तुम्हांस खरेंच सांगतें कीं, मला आतां पुनरपि आपल्या देशास मुळींच जाणें नाहीं.' मग खुदादाद याजकडे वळून ती म्हणाली, 'मी केरो येथील राहणारी आहे असें जें पूर्वीं तुम्हांपाशीं सांगितलें, तें आपलें उगीच कांहीं तरी सांगितलें. वास्तविक विचाराल तर मी एका राजाची कन्या आहे. एका दुष्ट कृतघ्न मनुष्यानें माझ्या बापाचें राज्य बळकावून त्यास मारून टाकल्यामुळें मला आपला जीव घेऊन तेथून पळून येणें भाग पडलें.'

याप्रमाणें राजकन्येचें भाषण ऐकून खुदादाद तिला म्हणाला, 'तुम्हांस जीं संकटें भोगावीं लागलीं, त्याबद्दल मला फार वाईट वाटतें. पण आतां तुमची अनिष्ट दशा संपली असें समजा. कारण ह्या राजपुत्रांनीं तुम्हाला अभय दिलें आहेच. तर ते तुम्हांस आपल्या राजधानीस घेऊन जातील, व तुम्ही ही गोष्ट मान्य करावी, अशी माझी इच्छा आहे. त्या ठिकाणीं राजेसाहेब तुमचें मोठ्या ममतेनें लालनपालन करतील; व तेथें तुमची मानमान्यता उत्तम प्रकारें राहील. शिवाय वास्तविक विचाराल तर, माझें तुमच्यावर प्रेम बसलें आहे, व त्याचप्रमाणें तुमचें मजवर असेल तर,

त्या राजपुत्रांच्या समक्ष आपला उभयतांचा विवाह व्हावा अशीही माझी इच्छा आहे.' राजकन्येनें मोठ्या आनंदानें ती गोष्ट मान्य केली. नंतर त्याच वेळीं तेथें त्या उभयतांचा विवाह झाला. तेथें सर्वप्रकारची अन्नसामग्री होतीच. कारण त्या शिद्दयास नर-मांसाचा कंटाळा येई तेव्हां तो एरवींचें अन्नही खात असे. त्याचप्रमाणें उंची दारू व फळफळावळही तेथें होती. नंतर सर्वांनीं भोजन केलें. मग बाकीची सर्व सामग्री बरोबर घेऊन त्यांनीं हारनशहराचा रस्ता धरिला. येतां येतां ते हारनपासून एक दिवसाचे मजलेवर आले. तेव्हां त्यांनीं एका मोठ्या आंबराईत मुक्काम केला. तेथें जेवण झाल्यावर आनंदांत सर्वांच्या गोष्टी चालल्या असतां खुदादाद म्हणाला, 'राजपुत्रांनो, मी कोण आहें हें आतांपर्यंत तुम्हांस कळविलें नाहीं. पण आतां मी तुम्हांस सांगतों कीं, मी तुमचा प्रत्यक्ष भाऊच आहें, समजलां ? माझें नांव खुदादाद. तुम्हांप्रमाणेंच हारनचा राजा माझा बाप असून पिरोजराणी ही माझी आई होय. सामरराजाच्या येथें मी लहानाचा मोठा झालों. नंतर राजकन्येस लक्षून तो म्हणाला, 'प्रिये, तुझ्याशींही आतांपर्यंत मीं ही गोष्ट चोरली. याबद्दल मी तुझी क्षमा मागतों. यापूर्वींच जर ही गोष्ट मीं तुला कळविली असती, तर आपणां उभयतांच्या पदवींत महदंतर आहे अशी जी तुझी समजूत होऊन तुझ्या मनाला आपल्या विवाहाच्या संबंधानें कांहीं अंशीं वाईट वाटलें असेल, तें वाटलें नसतें, नाहीं बरें ?' राजकन्या म्हणाली, 'महाराज, नाहीं नाहीं; असें आपण मनांत देखील आणूं नका. प्रथम आपल्यावर जी माझी प्रीति बसली, ती आतांपर्यंत प्रतिक्षणीं वृद्धिंगत होत गेली आहे. तेव्हां त्याकरितां म्हटलें म्हणजे ही गोष्ट मला आपण सांगायालाच पाहिजे होती असें नाहीं.'

खुदादाद ह्याशीं आपलें भावाचें नातें आहे हें ऐकून राजपुत्रांनीं आपणांस फारच आनंद झाला असें वरवर दाखविलें, पण अंतर्यामीं त्यांना या गोष्टीचें फार दुःख वाटलें. मग त्याच दिवशीं खुदादाद

व त्याची पत्नी या उभयतांनीं तंबूमध्यें शयन केलें असतां सर्व भाऊ एकत्र जमले, व त्या दुष्टांनीं त्याला ठार मारण्याचा बेत केला. खुदादाद यानें आपणांस जीवदान दिलें हे त्याचे उपकार त्यांनीं मनांत देखील आणिले नाहींत ! तेथें तर कृतघ्नपणाची कमालच झाली असें म्हटलें पाहिजे ! असो; त्यांच्यांपैकीं एक जो फारच दुष्ट होता तो म्हणाला, ‘ असें केल्यावांचून आपणांस इलाजच नाहीं; कारण, याजवर बाबांची अतिशयच मर्जी बसली आहे; व त्यांना हा आपला मुलगा आहे असें समजलें व आपण इतके असतां आपल्या-च्यानें त्या शिद्द्यास जिंकवलें नाहीं, व या एकट्यानें त्याचा नाश केला असें कळलें, म्हणजे मग तर ते ह्याला देव्हाऱ्यांतील देवच समजतील, व आपणाला टाकून याला गादीचा वारस करतील; आणि मग याच्या अंकित आपणांस रहावें लागणार! ’ त्या सर्वांचीं मनें अगोदरच बिथरलीं होतीं व या भाषणामुळें आणखी आगींत तेल पडल्यासारखें झालें. ते लागलीच खुदादाद याच्या तंबूंत गेले, आणि त्या महाचांडाळांनीं त्याचें अंग शेंकडों ठिकाणीं भाल्यांनीं भोंसकलें, आणि तो मेला असें समजून व राजकन्येस तशीच रडत टाकून हे हारनशहरास चालते झाले व दुसऱ्या दिवशीं तेथें जाऊन पोहोंचले.

आपले मुलगे आले हें पाहून राजास अत्यानंद झाला. कारण त्यांच्याविषयीं त्याची अगदीं निराशाच होऊन गेली होती. त्यानें त्यांस विचारिलें, ‘ बाळांनो, इतके दिवस तुम्ही कोठें होतां ? ’ त्यांनीं त्यास काय उत्तर द्यावयाचें याचा विचार पूर्वींच करून ठेविला होता. ते म्हणाले, ‘बाबा, आम्हाला प्रवासाची गोडी लागल्या कार-णानें या शहरीं दोन दिवस रहावें, त्या शहरीं दोन दिवस रहावें, असे रमत रमत आम्ही आलों, त्यामुळें इतके दिवस लागले; दुसरें कांहीं नाहीं.’

इकडे, खुदादाद हा रक्तानें न्हाला आहे, व त्यास उगीच किंचित् धुगधुगी मात्र आहे हें पाहून त्या बिचाऱ्या राजकन्येची काय

अवस्था झाली असेल हें सांगायलाच नको ! तिनें पराकाष्ठेचा शोक केला. तिनें आपल्या पतीचें सर्वांग आंसवांनीं भिजवून टाकिलें, आपलें डोकें फोडून घेतलें, केंस तोडिले व आणखी शेंकडों प्रकारांनीं आपल्या देहास क्लेश करून घेतले. ती म्हणाली, ' प्रियकरा आतां तूं मला सोडून जाणार का रे ! अरे, ते तुझे प्रत्यक्ष भाऊ असतां तुला मारायाला त्यांचे हात वाहिले तरी कसे ! अथवा ते तुझे भाऊ तरी कशाचे ! साता जन्मांचे वैरीच म्हटलें पाहिजेत ! त्यांनीं या रूपानें येऊन तुझा सूड उगविला. अरे दुष्टांनो, तुम्हीं कोणीही असा; पण यानें तुम्हांस मृत्यूपासून सोडविलें, एवढें तरी तुम्ही मनांत आणावयाचें होतें ! पण मी तुम्हांस तरी काय म्हणून बोल लावावा ! मीच मुळीं हतभागी ! तेव्हां परमेश्वराचेच मनांत मला सुख द्यावयाचें नाहीं हेंच खरें ! भगवंता, मला पतीवांचून ठेवावें असेंच जर तुझ्या मनांत होतें, तर मला तूं तो प्राप्त तरी कशाला करून दिलास ? पूर्वीं एक दिला होतास त्याची तशी दशा केलीस, आणि आतां याची अशी केलीस !'

अशा प्रकारें राजकन्या अत्यंत शोकग्रस्त होत्साती खुदादाद याजकडे एकसारखी टक लावून बसली होती. तो तसाच निश्चेष्ट पडला होता, तरी त्याला जी थोडी धुगधुगी होती ती तशीच कायम होती हें पाहून ती तेथून उठली, व जवळच एक शहर होतें तेथून शस्त्रवैद्यास आणण्याकरितां धांवत धांवत गेली. सुदैवेंकरून तिला लवकर एकजण भेटला, व तो लागलींच तिजबरोबर यावयास निघाला. पण तीं दोघें तंबूत येऊन पहातात तों तेथें खुदादाद मुळींच नाहीं ! यावरून त्यांनीं असा तर्क केला कीं, एखाद्या श्वापदानें त्यास नेलें असावें; मग तर राजकन्येच्या शोकास अंतच नाहींसा झाला ! तें पाहून त्या शस्त्रवैद्यासही मोठें दुःख झालें; व तिला तशा स्थितींत एकटी टाकून जाणें त्यास बरें न वाटून तो तीस म्हणाला, ' बाई, आतां तुम्ही कृपा करून माझ्या घरीं चला. तेथें तुमचें मी कांहीं उणें पडूं देणार नाहीं; व

तुमच्या वैऱ्याकरितां जेवढें म्हणून मजकडून होण्यासारखें असेल तेवढें मी करीन.'

आतां येथें राहून तरी काय करावयाचें आहे असा राजकन्येनें विचार करून ती त्या वैद्याबरोबर गेली. ती कोण, कोणाची वगैरे त्यास कांहीं माहीत नव्हतें, तरी त्यानें तिची फार चांगल्या प्रकारें बरदास्त ठेविली. तिचें दुःख कमी होण्याकरितां त्यानें आपल्या-कडून झाले तितके उपाय केले; पण त्यांपासून तें कमी न होतां उलटें अधिकच होत गेलें. तेव्हां एके दिवशीं तो वैद्य तीस म्हणाला, 'बाई, तुम्ही आपली सर्व हकीकत तरी एकदां मला सांगा, म्हणजे तुमच्या दुःखनिवारणाचा कांहीं उपाय मला सुचल्यास मी करीन. तुम्ही दिवसभर रडत मात्र बसतां, पण अशानें कसें होईल ? कांहीं विचार केला पाहिजे. म्हणजे एखादी तोड निघेल. प्रयत्नाअंतीं पर-मेश्वर. कित्येक वेळां असें देखील घडतें कीं, एखाद्या गोष्टीची अगदीं निराशा झाली असतांही ती मनुष्याला साध्य होते.'

हें बोलणें ऐकून राजकन्येस अंमळ धीर आला, व तिनें आपला आजपर्यंतचा सर्व वृत्तांत त्या वैद्यास सांगितला. तो ऐकून वैद्य तिला म्हणाला, 'असें जर आहे, तर मी तुम्हांला सांगतों कीं, तुम्ही आतां हें दुःख करण्याचें सोडून द्या. धैर्य धरा, आणि पति-व्रतेचा धर्म जगवा. तुम्हांस आपल्या पतीच्या वैऱ्यांचा सूड घेणें अवश्य आहे. आतां मी तुमचा शिपाई होतों, आणि आपण हारनच्या राजाकडे जाऊं तो मोठा न्यायी व दयाळू आहे. तेथें गेल्यावर तुमचें काम इतकेंच कीं, त्याच्या मुलांच्या ह्या दुष्ट कृत्यांची हुबेहूब तसबीर त्याच्या डोळ्यांपुढें उभी राहील अशा प्रकारें ही झालेली सर्व हकीगत त्यास तुम्ही सांगावी; व हें काम तुम्ही उत्तम प्रकारें कराल अशी माझी खात्री आहे.' राजकन्या म्हणाली, 'फार उत्तम आहे. तुमची युक्ति मला पसंत वाटते. त्या दुष्टांचा सूड घेणें हें माझें कर्तव्यकर्म आहे; व तुम्ही माझ्या पाठीशीं आहां त्या अर्थीं मला कशाचीही काळजी नाहीं. तुम्ही म्हणाल त्या

वेळेस मी निघण्यास सिद्ध आहे.' तिचा हा निश्चय पाहून त्या वैद्यानें भाड्याचे दोन उंट केले, व त्यांवर बसून तीं दोघें हारन-शहरीं आलीं.

तीं एका धर्मशाळेंत उतरलीं. त्या वैद्यानें धर्मशाळेच्या मालकास राजाच्या दरबारांतील हालहवाल कशी आहे म्हणून विचारलें, तेव्हां तो म्हणाला, 'काय सांगावें! आमचे राजेसाहेब केवळ दुःखार्णवांत बुडून गेले आहेत. त्यांना एक खुदादाद या नांवाचा मुलगा होता, तो त्यांचेपाशीं पुष्कळ दिवस परस्थाप्रमाणें राहिला होता, तो राजेसाहेबांचे हुकुमावरून कांहीं कामानिमित्त बाहेर गेला तो फिरून परत आला नाहीं; व त्याचें काय झालें याचा कांहींच पत्ता लागत नाहीं. पिरोज या नांवाची राजाची एक राणी आहे, तिचा तो मुलगा होता. तिनें त्याच्या शोधाकरितां कोणताही प्रयत्न करण्याचें कांहीं ठेविलें नाहीं; पण सर्व व्यर्थ झालें. तो राजपुत्र फारच गुणवान् असल्यामुळें सर्वांस त्याची मोठी हळहळ लागून गेली आहे. राजाला आणखी पुष्कळ पायलीचे पंचवीस मुलगे आहेत. पण उपयोग काय? ते सर्व पाजींतले पाजी आहेत, एकालाही खुदादाद याच्या नखाची देखील सर येणें नाहीं. तो राजपुत्र बहुधा मरण पावला असावा असें मला वाटतें. कारण तो जिवंत असतां तर आजपर्यंत इतका शोध केल्यावर कांहीं का त्याचा पत्ता लागता ना?'

हें ऐकून वैद्याच्या असें मनांत आलें कीं, राजकन्येनें पिरोज-राणीची एकांतीं भेट घ्यावी, पण हें करणें मोठें धोक्याचें आहे, यास्तव फार बेताबातानें तें केलें पाहिजे असें त्याला वाटलें; कारण, राज-पुत्रांस जर कळलें कीं, आपली भावजय येथें आली आहे तर तिचा येण्याचा उद्देश काय हें त्यांच्या सहज लक्षांत येऊन ते तिची व पिरोजराणीची गांठ पडण्यापूर्वी हरयुक्ति करून तिला येथून पळवितील; व तिला कोणीकडे नेऊन मारून टाकतील. तेव्हां आतां याला काय तोड काढावी याविषयीं त्याला विचार पडला. शेवटीं

राणीची व राजकन्येच्या जिवाच्या संरक्षणाची कांहीं तरी तजवीज करणें जरूर आहे असें त्यास वाटलें. मग त्यानें तीस सांगितलें कीं तुम्ही येथेंच कांहीं वेळ असा, राणीसाहेबांची भेट होऊन आपलें कार्य होण्याला निर्भय मार्ग कोणता, याचा मी तानमान पाहून येतो.'

तो वैद्य राजवाड्याच्या रस्त्यानें चालला असतां एक स्त्री उत्तम प्रकारें शृंगारलेल्या खेचरावर बसून चाललेली त्याच्या दृष्टीस पडली. तिच्या मागून कित्येक दासी व स्वार आणि खोजे हे चालले होते. ती स्त्री चालली असतां रस्त्यावरील लोक दुतर्फा उभे राहून जमिनीस डोकें लावून तिला मुजरा करीत. या वैद्यानेंही त्याप्रमाणेंच केलें; आणि त्याच्या शेजारीं एक दरवेशी उभा होता त्यास तो म्हणाला, 'ही स्त्री राजाच्या राण्यांपैकीं कोणी आहे वाटतें ?' त्यानें उत्तर केलें, 'हो. ही राणीच आहे. हिला लोक इतका सन्मान देतात याचें कारण—राजाचा खुदादाद या नांवाचा एक महान् पराक्रमी पुत्र होता, तो इच्या पोटीं झाला होता. त्याची हकीगत तुम्हांला माहीतच असेल.'

वैद्य पुढें कांहींएक न बोलतां पिरोजराणीच्या मागोमाग चालला. राणी एका माशिदींत गेली. या ठिकाणीं, खुदादाद हा सुखरूप यावा म्हणून राजाच्या हुकुमावरून काजी वगैरे लोक निमाज पढत होते. निमाज पढून झाल्यावर राणीनें सर्वांस एकेक मोहोर वाटली; व ती परत जाऊं लागली, तेव्हां तो वैद्य जलदी करून एका खोजापाशीं आला, आणि त्यास म्हणाला, 'अहो, राणीसाहेबांपाशीं मला कांहीं गुप्त गोष्ट बोलावयाची आहे; तर त्यांची माझी भेट करून द्याल तर तुमचे मजवर फार उपकार होतील.' त्यानें उत्तर केलें, 'तुम्हांला जें काय बोलावयाचें आहे, तें जर खुदादाद याच्या संबंधाचें असेल, तर आजच्या आजच मी तुमची त्यांची भेट करून देतों. पण तसें नसेल तर त्यांची भेट घेण्याविषयीं तुम्ही व्यर्थ खटपट करूं नका. कारण, त्यांना रात्रंदिवस एकसारखा डोळ्यांपुढें खुदादाद दिसत

आहे; त्याच्याशिवाय त्यांना कांहींएक सुचत नाहीं. तेव्हां दुसरी कसलीही गोष्ट असली तरी त्या तिजकडे मुळींच लक्ष देणार नाहींत.' वैद्यानें उत्तर केलें, 'याच्याखेरीज मला दुसरी कसलीही गोष्ट बोलावयाची नाहीं.' तो खोजा म्हणाला, 'चला तर मग मजबरोबर. मी वाड्यांत गेल्याबरोबर तुम्हांस त्यांना भेटवितों.'

पिरोजराणी ही राजवाड्यांत जाऊन पोहोंचतांच त्या खोजानें तिला सांगितलें कीं, 'कोणी परगांवचा मनुष्य आलेला आहे, व खुदादाद याच्या संबंधानें कांहीं गुप्त गोष्ट त्याला आपणास कळवावयाची आहे.' त्याच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच राणी म्हणाली 'आण, आण लवकर त्या मनुष्याला इकडे, मला ऐकूं दे काय तो म्हणतो तें.' त्यावरून त्या खोजानें वैद्यास राणीकडे नेलें. तेव्हां तिनें, आपल्या भरंवशाच्या दोन दासी होत्या त्यांच्याशिवाय बाकीच्यांस निघून जाण्यास सांगितलें, व ती वैद्यास म्हणाली, 'माझ्या प्रियपुत्राच्या संबंधानें तुम्हांला कांहीं बातमी लागली आहे म्हणून ऐकिलें?' त्यानें तिजपुढें साष्टांग नमस्कार घातला, व तो म्हणाला, 'महाराज, तो वृत्तांत फारच लांब आहे, व तो ऐकून आपणांस मोठें आश्चर्य वाटेल.' नंतर खुदादाद व त्याचे भाऊ यांची सर्व गोष्ट त्यानें राणीस सांगितली. ती सर्व तिनें फार लक्षपूर्वक व मोठ्या उत्सुकतेनें ऐकिली; पण शेवटीं त्यांनीं त्याचा खून केला हे शब्द जेव्हां त्याच्या तोंडावाटें निघाले, तेव्हां जणूं काय आपल्यावरच तरवारीचे घाव पडले असें तिला वाटून ती मूर्च्छित पडली. मग तिच्या दासींनीं तिला सावध केलें, तेव्हां बाकीची हकीकत त्यानें तीस सांगितली. ती ऐकल्यावर राणी त्यास म्हणाली, 'जा तर मग, त्या राजकन्येला येथें घेऊन या. तिची तुम्हीं खातरजमा करून सांगा कीं, महाराज व मी उभयतांही तुला आपली सून समजून येथें ठेवून घेतों.' ती त्यास म्हणाली, 'तुम्हीं

मजकरितां येवढी खटपट केली आहे, तर तुम्हांलाही चांगलें इनाम मिळेल याबद्दल खात्री ठेवा.'

वैद्य निघून गेल्यावर पिरोजराणी ही तशीच दुःख करीत बसली होती. तिला एकसारखा डोळ्यांसमोर खुदादाद दिसूं लागला. तेणें-करून राहून राहून तिला रडण्याचा हुंदका येई. ती म्हणाली,'बाळा, आतां कोठून रे तूं मला दिसणार! सामरराजाच्या येथून जेव्हां तूं मला विचारून निघून गेलास, तेव्हां तुजवर असा मृत्यूचा घाला पडेल म्हणून माझ्या स्वप्नींही नव्हतें! मीं चांडाळणीनें तुला जाऊं नको असें म्हटलें असतें तरी बरें झालें असतें, पण तूं मजपाशींच राहतास तर तुझी अशी कीर्ति झाली नसती हें खरें, पण तूं आपला सुखरूप असतास म्हणजे मजवर हा दुःखाचा प्रसंग तरी येता ना!' याप्रमाणें बोलत असतां तिला रडूं आवरेनासें होऊन तिनें मोठ्यानें हंबरडा फोडिला. हें पाहून तिच्या दोघी दासींनाही मोठें दुःख वाटलें; व त्याही रडायाला लागल्या. ह्याप्रमाणें त्या तिघी शोका-कुल झाल्या असतां, तितक्यांत राजा तेथें आला; व त्यांची अशी स्थिति पाहून तो राणीस म्हणाला, 'खुदादाद याजविषयीं कांहीं वाईट वार्ता तुम्हांला कळली कीं काय?' तिनें उत्तर केलें, 'आतां त्याची वार्ताच राहिली नाहीं! तो आपणाला सोडून गेला! त्यांतही आपणाला आणखी दुःख कसें तें पहा कीं, त्याचा प्रेत-संस्कारही आपल्या हातून होण्याला मार्ग नाहीं! कारण, बहुधा त्याला श्वापदांनीं खाऊन टाकिलें असावें.' नंतर त्या वैद्याच्या तोंडून त्याची जी हकीकत तिनें ऐकिली होती, ती इत्थंभूत त्यास सांगितली व विशेषेंकरून त्याच्या भावांच्या अत्यंत क्रूर व नीच कर्माचें तिनें मोठें हृदयभेदक वर्णन केलें.

हें ऐकून राजास पराकाष्ठेचें दुःख झालें; व आपल्या पुत्रांच्या दुष्टपणाबद्दल त्याला अत्यंत क्रोध आला तो म्हणाला, 'हे कृतघ्न महापातकी कारटे, जे आपणांला अत्यंत दुःख देण्यास कारण झाले, त्यांना त्यांच्या अपराधानुरूप शासन लवकरच मिळेल.' इतकें

बोलून तो त्या रागाच्या सपाट्यांत उठून एकदम दरबारांत गेला, तेथें त्याचे प्रधान, अमीरउमराव वगैरे बसले होते. तसेंच अर्जदार वगैरे दुसरे कित्येक लोक होते. राजाची ती अत्यंत क्रोधयुक्त मुद्रा पाहून लोकांस वाटलें कीं, याचा कोणी तरी महान् अपराध केला आहे यांत कांहीं संशय नाहीं. तो सिंहासनावर बसतांच त्यानें आपल्या हासन नामें मुख्य वजीरास जवळ बोलावून म्हटलें, 'हासन, तुला कांहीं आज जरूरीचा हुकूम सांगावयाचा आहे. तो इतकाच कीं, आतांच्या आतां हुजरातींपैकीं एक हजार स्वार बरोबर घे, आणि माझ्या सर्व मुलांस कैद करून खुनी अपराध्यांच्या तुरुंगांत नेऊन टाक. हें करण्यास एका क्षणाचाही विलंब करूं नको.' हें ऐकून सर्वांनीं तोंडांत बोटें घातलीं व ते मनांत म्हणाले हा आज काय विलक्षण प्रकार घडतो आहे कोण जाणे? मुख्य वजीर कांहीं एक न बोलतां 'महाराजांची आज्ञा प्रमाण.' असें म्हणून चालता झाला. मग राजानें दरबार बरखास्त करून अर्जदार वगैरे लोकांस सांगितलें कीं, 'मी आजपासून एक महिनाभर कांहीं एक कामकाज पहाणार नाहीं, याकरितां तुम्ही आतां आपापल्या घरीं जा.'

वजीर परत येईपर्यंत राजा तेथेंच बसला होता. तो येतांच त्यांस राजा म्हणाला, 'त्या कारट्यांना बंदीखान्यांत टाकलें ना?' वजीरानें उत्तर केलें, 'होय महाराज, हुकुमाप्रमाणें मी त्यांस बंदीखान्यांत पोहोंचवून आलों.' राजा म्हणाला, 'मला आणखीही कांहीं काम तुम्हांस सांगावयाचें आहे.' असें म्हणून तो त्यास घेऊन पिरोज राणीच्या महालांत गेला! आणि 'खुदादाद याची बायको कोठें आहे?' म्हणून त्यानें तिला विचारिलें. तिनें 'ती धर्मशाळेंत आहे' असें सांगतांच राजानें वजीरास हुकूम केला कीं, त्या धर्मशाळेंत जा, आणि त्या मुलीच्या योग्यतेप्रमाणें तिचा सन्मान करून तिला घेऊन या.'

वजीरानें लागलेच दरबारचे सर्व लोक बरोबर घेतले, आणि

दर्याबादची राजकन्या जेथें होती तेथें तो आला. त्यानें आपल्या-बरोबर एक पांढऱ्या रंगाचें छानदार खेंचर सोनें, हिरे व माणकें यांच्या दागिन्यांनीं शृंगारवून आणिलें होतें; त्याजकडे बोट करून तो राजकन्येस म्हणाला, ' महाराज, आपणांला वाड्यांत घेऊन येण्याविषयीं सरकारांनीं मला हुकूम केला आहे, तर या खेंचरावर बसून आपण मजबरोबर चलावें. ' त्यावरून ती त्या खेंचरावर बसली, व त्या मंडळीबरोबर राजवाड्यांत गेली. त्या वैद्याकरितांही वजीरानें एक उत्तम तातेरी घोडा आणविला होता, त्यावर बसून तोही तिजबरोबर गेला. अशा प्रकारें ही स्वारी थाटानें चालली असतां ती पाहण्याकरितां खिडक्यांतून व रस्त्यांतून लोकांची एकच गर्दी होऊन गेली होती; व ही स्त्री चालली आहे ती खुदादाद याची बायको आहे असें जेव्हां त्यांस समजलें, तेव्हां त्यांनीं जो आनंदघोष केला तेणेंकरून सर्व दिशा दणाणून गेल्या. पण राज-पुत्राच्या मरणाची वार्ता जर त्यांना कळली असती तर तितकेंच त्यांना दुःख झालें असतें, इतका कांहीं तो त्यांस प्रिय झाला होता !

लवकरच ही सर्व मंडळी राजवाड्याजवळ जाऊन पोहोंचली. राजकन्येस आंत घेऊन जाण्याकरितां स्वतः राजा दरवाज्यापर्यंत आला होता, त्यानें तिला हातांत धरून पिरोज राणीच्या महालांत नेलें, तेव्हां तेथें जो कांहीं प्रकार घडला तो ऐकला असतां एखादा पाषाणहृदयाचा मनुष्य असला, तरी त्यालाही रडूं आल्यावांचून रहाणार नाहीं ! राजकन्येला आपल्या सासूसासऱ्यांकडे पाहून अपरिमित दुःख झालें; आणि आपल्या प्रियपुत्राच्या स्त्रीकडे पाहून त्या उभयतांसही दुःख झालें. राजकन्येनें राजाच्या पायांवर लोटांगण घातलें; तेव्हां तिला इतकें रडूं कोसळलें कीं, तिच्या तोंडांतून एक शब्दही निघेना. पिरोजराणीचीही तशीच अवस्था झाली. तिच्यावर दुःखाचा केवळ पर्वत कोसळला ! त्या दोघींची ही स्थिति पाहून राजाचा अगदींच धीर सुटला, व त्यानें मोठ्यानें हुंबरडा फोडिला ! मग काय विचारावें ! सर्वच रडायाला लागलीं,

व तेथें एकच हलकल्लोळ होऊन गेला! कांहीं वेळानें ती रडारड बंद झाली, व राजकन्येनें आपली व आपल्या पतीची सर्व हकीकत थोडक्यांत सांगून आपल्या पतीस मारिल्याबद्दल राजपुत्रांस योग्य शासन मिळावें म्हणून राजास विनंति केली. राजा म्हणाला,' मुली, त्या कारट्यांना मी देहान्त शासन करणार, समजलीस? पण खुदादाद यास त्यांनीं मारिलें याबद्दल मला चोहोंकडे जाहीर केलें पाहिजे. कारण, तसें न करितां जर मी त्यांना शिक्षा दिली, तर याला वेड लागलें आहे असें लोक मला म्हणतील व दंगा करतील. तरी त्याचा अंत्यसंस्कार मी आधीं करणार; नंतर दुसरी गोष्ट.'
हें झाल्यावर राजधानीजवळच्या थोरल्या आंबराईत पांढऱ्या संगमरवरी पाषाणाची एक मोठी कबर बांधण्याविषयीं वजीरास हुकूम केला; व राजकन्येस आपली सून असें लागलींच कबूल करून तिला राहाण्याकरितां राजवाड्यांत स्वतंत्र जागा नेमून दिली; आणि तिच्या तैनातीस दासदासी वगैरे सर्व कांहीं द्यावयाचें तें देऊन तिची उत्तम प्रकारची व्यवस्था राहील असें केलें.

वजीरानें थोडक्याच वेळांत राजच्या हुकुमाप्रमाणें कबर बांधिली. तींत एक थडगें बांधवून त्याजवर खुदादाद याचा पुतळा बसविला. नंतर त्याचें उत्तरकार्य करण्याचा एक दिवस नेमिला. त्या दिवशीं शहरांतील सर्व लोक तेथें आले होते. तो एकंदर विधि झाला तो प्रकार असा—राजा, मुख्य वजीर व दरबारचे इतर लोक हे प्रथम त्या कबरीमध्यें गेले. तेथें बसण्याकरितां काळ्या रंगाच्या साटिणीच्या सत्रंज्या घातल्या होत्या, व त्यांवर सोनेरी वर्खाचीं फुलें काढिलीं होतीं. नंतर घोडस्वारांची एक मोठी पलटण त्या कबरीभोंवतीं उभी राहिली. त्या स्वारांनीं खालीं माना घातल्या होत्या. त्यांनीं कांहींएक न बोलतां कबरीभोंवतीं दोन प्रदक्षिणा घातल्या. तिसऱ्या प्रदक्षिणेचे वेळीं ते सर्व दारापाशीं येऊन उभे राहिले, आणि मोठ्यानें म्हणाले, 'राजपुत्रा, तुला पुनः जिवंत करण्याचें जर मनुष्याच्या शक्तीचें काम असतें,

तर आतांच्या आतांच आम्ही तरवारीच्या जोरानें तुझा जीव परत आणिला असता; पण ही गोष्ट परमेश्वराधीन पडली; त्याच्या सत्तेपुढें मनुष्याचें काय चालावयाचें आहे!' असें म्हणून ते मागें हटले. नंतर शंभर म्हातारे फकीर काळ्या रंगाच्या खेंचरावर बसून तेथें आले. त्या सर्वांच्या दाढ्या लांब व पांढऱ्या शुभ्र होत्या. हे लोक लहानपणापासून अरण्यामध्यें गुहेंत रहात असत; व फक्त हारनच्या राजघराण्यांतील कोणी मरण पावलें म्हणजे त्याच्या प्रेतसंस्काराकरितां तेवढे बाहेर येत; एरवीं कधींही लोकांच्या नजरेस पडत नसत. त्या प्रत्येकानें आपापल्या डोक्यावर एकेक कुराणाचें पुस्तक हातानें धरिलें होतें. त्यांनीं कांहींएक शब्द न उच्चारितां त्या कबरीभोंवतीं तीन प्रदक्षिणा घातल्या. तिसऱ्या वेळीं ते दारापाशीं राहिले, व त्यांपैकीं एकजण म्हणाला, 'राजपुत्रा, तुझ्याकरितां आम्हीं पाहिजे तें केलें असतें. परमेश्वराच्या प्रार्थनेनें जर तूं जिवंत होण्यासारखा असतास, तर आम्हीं सर्वांनीं तुजकरितां त्याला आळविलें असतें; पण तुझा जीव हरण करण्याचें त्याच्या मनांत आलें, तेव्हां तेथें कोणाचा उपाय चालणार!' असें म्हणून ते सर्व फकीर कबरीपासून दूर झाले; नंतर राजा व त्याचे दरबारचे लोक उठून उभे राहिले, व त्यांनीं खुदादाद याच्या पुतळ्याभोंवतीं तीन प्रदक्षिणा घातल्या. नंतर राजा म्हणाला, 'प्रियपुत्रा, तूं आतां मला अंतरलास ना?' हें बोलतांना त्यानें मोठ्यानें दुःखाचा सुस्कारा टाकला, व तें सर्व थडगें अश्रूंनीं भिजविलें. हें पाहून सर्व दरबारी लोकांच्या डोळ्यांतूनही खळखळां अश्रुधारा वाहूं लागल्या. नंतर ते सर्व बाहेर पडले; व त्या कबरीचें दार बंद केलें. हें झाल्यावर सर्व लोक शहरांत परत आले.

दुसरे दिवशीं राजाच्या हुकुमावरून सर्व मशिदींत काजी लोक निमाज पढूं लागले. असें सतत आठ दिवस चाललें होतें. नववे दिवशीं राजानें आपल्या मुलांचा शिरच्छेद करण्याचा निश्चय केला. त्या दुष्टांनीं खुदादाद ह्याशीं कृतघ्नपणा करून क्रूरपणानें त्याचा

*

जीव घेतला, याबद्दल सर्व लोकांस त्याच्याविषयीं फारच संताप आला होता, व त्यांचा शिरच्छेद केलेला पाहून आपले डोळे निववण्याविषयीं त्यांना फार उतावळी झाली होती. सर्व तयारी झाली, व आतां त्यांस फांशीं चढविणार, इतक्यांत अशी बातमी येऊन पोहोंचली कीं, राजाचे शत्रु पूर्वींपेक्षांही फार मोठें सैन्य घेऊन कडेकोट तयारीनिशीं शहरावर चाल करून येत आहेत व ते इतक्यांत येऊन थडकतील. हें ऐकून तें फांशीं देण्याचें काम त्या वेळीं राजानें तहकूब ठेविलें. ह्या गोष्टीच्या योगानें सर्व लोक घाबरून गेले. व या वेळीं खुदादाद असता तर पूर्वींप्रमाणें शत्रूंस पिटाळून लावता असें वाटून त्यांना त्याविषयीं हळहळ वाटली. परंतु राजानें बिलकुल न घाबरतां तत्काळ सैन्य तयार केलें, व शत्रूंवर प्रथम आपणच हल्ला करावा अशा उद्देशानें तो सैन्यासहित निघाला. शत्रूंकडील हेरांनीं जाऊन त्यांना बातमी सांगितली कीं, 'हारनचा राजा तयारीनिशीं आपणावरच हल्ला करण्यास येत आहे तेव्हां त्यास लढाई देण्याकरितां त्यांनीं आपलीं सैन्यें एकत्र जमविलीं व ते त्याची वाट पहात उभे राहिले.

हारनच्या राजाच्या व त्यांच्या सैन्याची नजरानजर होतांच लढाई सुरू झाली, व पहिल्या हल्ल्यांत हारनच्या राजानें आपल्या शत्रूंस मागें हटविलें, पण तेही कांहीं कमी नव्हते. त्यांनींही उलट मोठ्या आवेशानें त्याजवर हल्ला केला. तेव्हां मोठ्या निकराचें युद्ध चाललें. त्या वेळीं असंख्य लोक मरण पावले, व रणभूमीवर रक्ताचे पाट वाहूं लागले. शेवटीं जय कोणाचा याविषयीं निश्चय होईना, तेव्हां राजाच्या शत्रूंनीं विचार केला कीं, याच्या भोंवतीं सैन्याचा वेढा घालून याला कोंडून टाकून मग यावर हल्ला केल्यावांचून आपणाला जय मिळत नाहीं. त्यांचें सैन्य फार मोठें होतें. राजाच्या सैन्याभोंवतीं वेढा पडूं लागला, इतक्यांत काय झालें कीं दुरून एक मोठी थोरली घोडेस्वारांची टोळी भरधांव तेथें धांवत आली. तिला पाहून उभयपक्षांसही धास्ती पडली. कारण हे लोक आतां कोणाला

कुमक करणार हें उभयतांसही कळेना. पण हा संशय लवकरच दूर झाला. कारण, त्या स्वारांनीं मोठ्या आवेशानें राजाच्या शत्रूंवर हल्ला करून त्यांस पिटाळून लाविलें. ते इतकेंच करून राहिले नाहींत तर त्यांनीं कित्येक कोसपर्यंत पाठलाग करून त्या बहुतेकांची कत्तल उडविली.

हारनचा राजा हें सर्व पहात स्तब्ध राहिला होता. ज्या स्वारांनीं त्यास साहाय्य केल्यामुळें त्याचा जय झाला, त्यांच्या शौर्याची त्यानें फार तारीफ केली. त्यांतूनही विशेषतः त्यांच्यावरचा जो मुख्य होता, त्याचें अद्वितीय शौर्य पाहून त्याला मोठेंच आश्चर्य वाटलें; आणि त्या उदार व शूर पुरुषाची भेट केव्हां घेईन, व त्यास आपले आभार केव्हां दर्शवीन, असें त्यास झालें. सबब तो त्याच्या भेटीकरितां जाऊं लागला. इतक्यांत तोच स्वतः राजाकडे आला. त्याला पाहून राजास इतका आनंद व आश्चर्य वाटलें कीं, त्या योगानें त्याचें देहभानही नाहींसें झालें. हा शूर पुरुष कोण म्हणाल तर राजाचा प्रिय पुत्र खुदादाद हाच होता! तो राजापुढें हात जोडून उभा राहिला, व मोठ्या नम्रतेनें त्यास म्हणाला, ‘बाबा, मी आज आपल्या दृष्टीस पडलों हें पाहून आपणास खरोखरच आश्चर्य वाटत असेल, कारण मी खास मरण पावलों असें आजपर्यंत आपण समजला असाल; आणि खरोखरच परमेश्वरानें आपल्या अद्भुत शक्तीनें मला वांचाविलें नसतें तर या चरणांची सेवा करण्याला मी आज राहिलों नसतों.’ राजा म्हणाला, ‘खुदादाद प्रियपुत्रा, तूंच कारे हा माझ्याशीं बोलत आहेस! तूं मला, खरोखरच पुनः प्राप्त झालास का! बाळा, तुझी इतःपर भेट होईल अशी मला मुळींच आशा नव्हती!’ असें म्हणून त्यानें त्याला पोटाशीं धरण्याकरितां हात पुढें केले, तों लागलींच खुदादाद पुढें सरसावून उभयतांनीं एकमेकांस घट्ट मिठी मारिली.

पुष्कळ वेळपर्यंत एकमेकांस सोडावेंसें वाटेना. नंतर राजा खुदादाद यास म्हणाला, ‘बाळा, त्या कारटयांस तूं त्या राक्षसाच्या

हातून सोडविल्याबद्दल त्यांनीं तुला काय बक्षीस दिलें ती सर्व हकीकत मला कळली आहे. पण तूं त्याबद्दल आतां कांहीं खेद करूं नको. त्यांच्या दुष्कर्माचें फळ त्यांना आजच मिळेल. चला, आतां आपण वाड्यांत जाऊं. तुझ्या आईनें तुजकरितां अन्नपाणी टाकिलें आहे व रडून रडून तिची दृष्टिदेखील मंद झाली आहे. तर आतां तूं तिला भेटून सुखी कर. मला आज जो जय प्राप्त झाला, तो केवळ तुझ्याच शौर्याच्या योगानें झाला, हें तिला समजलें म्हणजे किती बरें हर्ष होईल!' खुदादाद म्हणाला, 'बाबा, पण त्या शिद्द्याशीं जो माझा भयंकर प्रसंग घडला, व मी आपल्या भावांना त्याजपासून सोडविलें, त्याबद्दलची हकीकत आपल्याला कशी समजली? माझ्या भावांपैकीं एखाद्यास कृतकर्माचा पश्चात्ताप होऊन त्यानें हें सर्व आपणांस सांगितलें कीं काय?' राजानें उत्तर केलें, 'नाहीं बाळा, तुझ्या भावांच्या दुष्ट कृत्यांबद्दल त्यांना शासन मिळावें म्हणून तुझी पत्नी, दर्याबादची राजकन्या ही मजकडे आली व तिनें तो सर्व वृत्तांत मला सांगितला. ती हल्लीं आपल्या वाड्यांतच आहे.' हें ऐकून खुदादाद यास किती आश्चर्य व आनंद झाला असेल तो कल्पनेनेंच समजावा! मग तो राजास म्हणाला, 'बाबा, चला तर आतां आपण लवकर वाड्यांत जाऊं, आईला व माझ्या प्रियपत्नीला मी केव्हां पाहीन असें मला झालें आहे.'

मग राजा सेनेसहित जयजयकार करीत राजधानींत परत आला. त्या वेळचा तो आनंद काय सांगावा! शहरांतील लोकांनीं त्या दिवशीं मोठा उत्सव केला; आणि 'राजा व राजपुत्र खुदादाद हे चिरायु होवोत!' अशी मनोभावेंकरून परमेश्वराची प्रार्थना केली. राजा व राजपुत्र हे उभयतां पिरोजराणीच्या महालांत गेले ती व दर्याबादची राजकन्या चातकाप्रमाणें त्यांचा मार्गप्रतीक्षा करीत होत्या. कारण, खुदादाद येऊन त्यानेंच आज शत्रूंस पादाक्रांत करून सोडविलें, ही बातमी पूर्वींच त्यांना कळली होती. त्या सर्वांच्या भेटी झाल्या; तेव्हां त्यांच्या नेत्रांतून कांहीं वेळपर्यंत आनंदाश्रू चालले

होते. हें झाल्यावर खुदादाद यानें आपण मृत्यूच्या दाढेंतून कशा प्रकारें पार पडलों हें सर्वांस सांगितलें.

तो म्हणाला, 'मी त्या तंबूंत बेशुद्ध पडलों असतां दैवयोगानें तेथें एक कुणबी आला. त्यानें माझी ती अवस्था पाहून झटकन् मला एका खेंचरावर बांधून आपल्या घरीं नेलें; आणि कांहीं वनस्पति चावून त्यानें ती माझ्या जखमांस लाविली. तिचा असा कांहीं विलक्षण गुण कीं, थोड्याच दिवसांत माझ्या सर्व जखमा भरून येऊन मी अगदीं बरा झालों. मग मी त्या कुणब्याचे मोठे आभार मानून आपल्या अंगावरचे हिरे वगैरे सर्व त्यास बक्षीस दिलें. नंतर मी राजधानीस यावयास निघालों; इतक्यांत मला कळलें कीं, आपल्यावर शत्रू चाल करून येत आहेत; तेव्हां मी त्या गांवांतील लोकांस आपलें नांवगांव कळविलें, व तुम्ही या वेळेस धैर्य धरून आपल्या राजास साहाय्य केलें पाहिजे असें सांगून त्यांस हुरूप आणिला. तेव्हां ते लागलेच आपलीं शस्त्रें घेऊन घोड्यावर बसून मजबरोबर निघाले.'

त्याचें बोलणें संपलें तेव्हां राजा म्हणाला, 'परमेश्वरानें खुदादाद याचें रक्षण केलें याबद्दल त्याचे आपण फार उपकार मानले पाहिजेत; पण जे दुष्ट त्याच्या नाशास प्रवृत्त झाले, त्यांना आतां त्यांच्या अपराधाबद्दल देहान्त प्रायश्चित्त मिळणें जरूर आहे.' पण खुदादाद म्हणाला, 'बाबा, ते किती जरी दुष्ट व कृतघ्न असले, तरी आपल्या रक्तमांसापासून झाले आहेत. यास्तव मी त्यांस क्षमा करितों; व आपणही त्यांस क्षमा करावी अशी मी आपणांस विनंती करितों.' खुदादाद याचें हें अनुपम औदार्य पाहून राजाचा कंठ सद्गदित झाला, व त्याच्या नेत्रांतून आनंदाश्रू चालले. त्यानें तत्काळ खुदादाद यास आपल्या गादीचा वारस केल्याबद्दल सर्व लोकांस जाहीर केलें. यानंतर बाकीचे राजपुत्र जे कैदेंत होते, त्यांस बेड्यांसकट राजानें आपल्यासमोर आणविलें. तेव्हां लागलीच खुदादाद यानें त्यांच्या बेड्या काढविल्या, व त्या प्रत्येकांस त्यानें प्रेमानें आलिंगन दिलें. खुदादाद याच्या ह्या सुशीलतेबद्दल लोकांस फारच संतोष झाला व

त्यांनीं त्याची अपूर्व प्रशंसा केली. शेवटीं जो शस्त्रवैद्य दर्याबादच्या राजकन्येच्या इतका उपयोगीं पडला, त्याला राजानें मोठी नेमणूक करून दिली.

---

## एक झोंपी गेलेला जागा केला त्याची गोष्ट.

कालीफ हरून अलरशीद राज्य करीत असतां बगदाद शहरांत एक मोठा धनाढ्य व्यापारी रहात असे. त्याची बायको वयानें फार वृद्ध झाली होती. त्यास सुमारें तीस वर्षांचे उमरीचा एकुलता एक मुलगा होता.त्याचें नांव अबूलहसन.यास त्या मातापितरांनीं चांगली चालरीत लाविली होती,व आपल्या हुकुमाबाहेर कधींही फिरूं दिलें नाहीं. पुढें तो व्यापारी मरण पावला, व मोठ्या काटकसरीनें आणि मेहनतीनें बापानें जोडलेली सर्व दौलत अबूलहसनास मिळाली. बापाच्या जिवंतपणीं अबूलहसनास स्वतःच्या इच्छेनें वागण्यास कधींही सांपडलें नाहीं. खाऊनपिऊन राहण्यासच पुरे न पुरे इतका मात्र पैसा बाप देत असे. त्यावर एक पैसा खर्च करूं म्हटलें तर बापाकडून त्यास कधींही मिळाला नाहीं. हा आपल्या वयाच्या तरुण लोकांस मनाप्रमाणें वागून हव्या त्या मौजा मारतांना पाही, तेव्हां यास आपल्या स्थितीविषयीं फार वाईट वाटे. तेव्हां बापाच्या दौलतीचा आतां स्वतःच मुखत्यार झाल्यावर बापाची वहिवाट सोडून देऊन त्यानें ती दौलत खर्च करण्याचा कांहीं निराळाच विचार काढला,आणि आपल्या मोठ्या दौलतीप्रमाणें आपण छानछोकींत रहावें असें त्यास वाटूं लागलें. त्यानें आपल्या द्रव्याचे दोन वांटे केले. त्यांतील एक खर्च करून त्यानें कांहीं शेतवाड्या व बगदाद शहरांत कांहीं घरेंही खरेदी केलीं. यांपासून दरसाल बरेंच उत्पन्न व्हावें अशीं हीं होतीं, तरी हें उत्पन्न खर्चाकडे न लावतां तसेंच सांचूं द्यावयाचें असा त्यानें बेत केला. आतां दुसरा वांटा राहिला; तो, इतक्या दिवस बापाच्या जांचामुळें जें आपलें सुख अंतरलें तें यथेच्छ

भोगण्यांत उडवायाचा; पण या रकमेशिवाय इतर पैशास अगदीं कधींहीं हात लावावयाचा नाहीं, असा त्यानें मनाचा निर्धार केला.

असा बेत केल्यावर अबूलहसनानें आपणाप्रमाणें तरुण व श्रीमान् अशा लोकांचा मेळा जमाविला, आणि जेणेंकरून मौजेंत व आनंदांत काळ जाईल तें तें तो करूं लागला. दिवसरात्रीं दोन्ही वेळां मित्रमंडळास मेजवान्या होऊं लागल्या. ही बहार दररोज चालून आणखी नव्या नव्या तऱ्हाही प्रत्यहीं होत. असें होतां होतां सहज एक वर्ष लोटलें, व वर्ष संपतें तोंच अबूलहसनानें चैनीबाबद म्हणून जी एक रक्कम ठेविली होती तिचा पार फडशा उडाला. तेव्हांपासून तो आपल्या मित्रांस मेजवान्या देईनासा झाला. मग त्याचे मित्र कशाला त्याकडे येताहेत ? ते त्यास भेटतनासेही झाले. हा त्यांच्या दृष्टीस पडतांच यास ते चुकावून जाऊं लागत, व यदाकदाचित् याची कोणाची अकस्मात् गांठ पडली, व हा त्यांशीं बोलणें काढूं लागलाच तर ते अनेक सबबी लढवून निसटून जात.

अबूलहसनानें आपल्या मित्रांच्या नादीं लागून जो इतका पैसा धुळीस मिळविला, त्याबद्दल त्यास इतकें वाईट वाटलें नाहीं; पण जे त्यास नुकतेच आपला जिवलग मित्र म्हणत होते व ‘ तुझी आमची मैत्री कधींहीं सुटावयाची नाहीं ’ म्हणून आणाशपथा वहात होते, त्यांची वृत्ति एका क्षणांत पालटून ते आपणास विचारेनासेही झाले, हा त्यांचा कृतघ्नपणा व हलकटपणा पाहून त्यास विशेष खेद झाला. मग तो एके दिवशीं खिन्न मुद्रेनें आपल्या आईच्या खोलींत गेला, व तिच्यापासून दूर एका माच्यावर खालीं मान घालून बसला. त्यास पाहातांच त्याची आई म्हणाली, ‘ मुला, झालें काय? तूं आज असा खिन्न कां दिसतोस ? तुझी रोजची वृत्ति आज दिसत नाहीं ! अरे, तूं इतका कष्टी कां होतोस ? तुझा पैसा गेला खरा पण सर्वस्व तर गेलें नाहींना ! तूं जेव्हांपासून बेसुमार खर्च करूं लागलास, तेव्हांच मी भविष्य करून ठेविलें कीं, तुझा पैसा फार दिवस राहणार नाहीं. तूं आपला मुखत्यार होतास. मग मी कशाला तुझ्या

खर्चाआड येऊं? आणि त्यांतूनही तूं अगोदर विचारानें दौलतीचा अर्धा वांटा राखून ठेवला आहेस, मग कां बरें उगीच खेद करावा?' असें म्हणतांच अबूलहसनास रडें कोसळलें, तरी तें तसेंच सांवरून तो म्हणाला 'आई ग, आतां माझा मला अनुभव येऊन माझे डोळे उघडले, व दारिद्र्याचें दुःख कसें आहे तें समजूं लागलें. खरेंच, ज्याप्रमाणें सूर्यास्त झाल्याबरोबर प्रकाशही नाहींसा होतो, त्याप्रमाणेंच दारिद्र्य आलें म्हणजे सर्व सुखाचीही वार्ता नाहींशी होते. आधीं सर्व लोक जी आपली वाखाणणी करीत असतात, भाषणास चांगलें चांगलें म्हणतात, तें सर्व दारिद्र्य आलें कीं विपरीत होतें. लोकांस तोंड दाखविण्याची देखील आपणांस लाज होते; व सर्व रात्रभर दुःख करावें लागतें. फार तर काय? विपत्तींत आलेला मनुष्य इष्टमित्रांसही परक्यासारखा भासूं लागतो. आई, तूंच पहा, गेल्या सालभर मीं मित्रांशीं कसा वागत होतों! त्यांस मोठ्या थाटाच्या मेजवान्या करण्यांत मीं आपला सर्व पैसा खलास केला! आणि आतां मेजवान्या मिळतनाशा झाल्या तों सर्वजण मला सोडून गेले! अर्धें द्रव्य ठेवण्याची तरी मला ईश्वरानें बरी बुद्धि दिली. तेंही याप्रमाणें मीं उधळलें नाहीं, येवढें बरें झालें. मीं जी शपथ वाहिली ती कधीं मोडणार नाहीं; व हा जो अर्धा वांटा माझ्या नशिबानें राहिला आहे, त्याचा तरी सद्व्यय करीन. पण आधीं या मित्रांकडे जाऊन ते मला कांहींतरी पैशाची मदत करितात किंवा नाहीं हें एकदां पहावें असें माझ्या मनांत आहे. त्यांपासून म्हणजे आपणांस उपयोग करून घ्यावा असा माझा मुळींच उद्देश नाहीं. इतकें मात्र पहावयाचें कीं, यांचे अंगीं कृतज्ञता कितपत आहे.'

त्याची आई म्हणाली, 'मुला, तुला ही प्रचीति पहावयाची असली तर पहा, माझी ना नाहीं. पण मी तुला येथून सांगतें कीं, ही सर्व तुला भ्रांति आहे. त्यांकडे जाऊन कांहींएक उपयोग होणार नाहीं. या वेळीं तुझ्याकामीं एक मात्र आहे, तें कोण म्हणशील तर तूं राखून ठेवलेलें द्रव्यच,—दुसरें कांहीं नाहीं. मुला, तुझ्यासारखे

लोक ज्यास मित्र म्हणून जिवाशीं बाळगतात, त्यांची खरी परीक्षा तुम्हांला होत नाहीं. पण हें सांगणें मला नलगे.त्याचा प्रत्यय तुलाच येईल.' अबूलहसनानें उत्तर केलें ' 'आई, तूं म्हणतेस तें मी पक्केपणीं जाणत आहें; पण येवढेंच कीं, मीं स्वतः अनुभव घेतला म्हणजे संशय अगदीं जाईल.'

मग लागलाच अबूलहसन घराबाहेर पडला, आणि वेळ अशी चांगली पाहून गेला कीं, सर्व मित्रांची गांठ घरीं पडली. मग त्यानें आपणावर गुदरलेलें संकट निवेदन करून आपणास पैशाची मदत करण्याविषयीं त्यांची विनवणी केली. तो असेंही त्यांस सांगूं लागला कीं, 'ही दैवदशा सरून माझें सर्व सुरळीतपणें चालूं झालें, म्हणजे तुमच्या पैशाची फेडही करून देण्यास मी तयार आहें.' तरी त्यानें 'माझ्या सर्व नाशास तुम्ही कारण झालां' असें एका शब्दानेंही बोलून दाखविलें नाहीं; मनांतलि उद्देश हा कीं,आपणांस दुःस्थितींतून सोडविण्याची परोपकारबुद्धि कोणास तरी होते कीं नाहीं तें पहावें. इतकें करून ते वळेनात, तेव्हां त्यानें त्यांस अशी आशाही दाखवून ठेविली कीं, 'तुम्हां मित्रांच्या मदतीनें पुढें असेही दिवस येतील कीं, जेव्हां पूर्वीप्रमाणें मेजवान्या देऊन तुम्हांस संतुष्ट करण्याचें सामर्थ्य माझ्या अंगीं येईल.'

याप्रमाणें त्यांची अबूलहसनानें परोपरी विनवणी केली, पण त्यांतून कोणासही त्याची कींव आली नाहीं. कित्येकांनीं तर त्यास मुळींच धुडकावून दिलें. ते म्हणाले, 'तूं कोण? कोठचा? कोणाला माहित? आम्ही तुला कधीं पाहिलेंदेखील नाहीं. येथें तुझें येण्याचें काम काय?' अशीं उत्तरें ऐकून त्या बिचाऱ्याची जी अवस्था झाली ती काय सांगावी! तो दुःख करीत व संतापतच घरीं आला व तसाच आईकडे जाऊन तिला म्हणाला, 'आई, तूं सांगितलेंस तेंच खरें. अशा अधम, घातकी व कृतघ्न मनुष्यांस मित्र हें नांव साजतें तरी कां? हे कसचे माझे मित्र!' मी त्यांचा सर्वांचा त्याग केला. त्यांचें तोंडही पुन्हां पाहणें नको.

या निश्चयापासून अबूलहसन कधीं तिळमात्रही ढळला नाहीं. तरी न जाणों, त्याच्या विरुद्ध वागण्याचें आपल्या मनांत कधीं येईल, म्हणून त्यानें अशी शपथ वाहून घेतली कीं, 'इतःपर कधींही बगदाद शहरांत राहाणाऱ्या कोणास जेवावयास बोलवायाचें नाहीं.' मग नुकतीच जी पैक्याची पेटी खलास झाली होती, तींत त्यानें राखून ठेवलेला सर्व ऐवज ठेवला. तींतून दररोज एक रोजाच्या खर्चास पुरे इतका मात्र पैसा काढावयाचा व त्यांत नित्य एका पाहुण्यास जेवावयास घालावयाचें. तशीच त्यानें दुसरी अशी शपथ वाहून घेतली कीं, ' तो पाहुणा बगदादशहरचा राहिवासी नसून त्याच दिवशीं त्या शहरांत आलेला असावा;व फक्त एक रात्र त्याला बिऱ्हाडास जागा देऊन त्याची बरदास्त ठेवावयाची व दुसरे दिवशीं सकाळीं त्याची बोळवणी करावयाची. '

मग अबूलहसन नित्य सकाळीं पाहुणचाराची सामुग्री मिळविण्याच्या तजाविजींत लागे, व संध्याकाळ होतांच बगदादच्या पुलावर जाऊन बसे. मग कोणीं उपरा शहराकडे येतांना त्यास दिसतांच तो त्याजवळ मोठ्या आदबीनें जाऊन त्या रात्रीं आपल्या घरीं उतरण्यास त्यास बोलावी; आणि त्यास आपली रोजची वहिवाट सांगून आपल्या घरीं आणी. रात्रीचें जेवण साधेंसुधेंच खरें, पण तें पाहुण्यास चांगलें आवडेसें असे. जेवण सुमारें मध्यरात्रीपर्यंत लांबे व तशा गप्पाही चालत. बहुधा चाल म्हटली म्हणजे घरगुती, राज्यसंबंध अशाच गोष्टी लोक बोलतात; पण कसला जरी विषय निघाला तरी त्यावर अबूलहसन संभाषण करी. त्याचा स्वभाव गमती असे व त्याच्या बोलण्यांतही अशीच ऐकणारास रंजविण्याची शक्ति असे. म्हणून कोणतीही गोष्ट निघाली असतां संभाषणास तो अशी बहार व असा रस आणी कीं,कोणी स्वभावतः उदास असला तरीही त्यास त्याच्या बोलण्यानें हुरूपच यावा व गम्मत वाटावी.

दुसरे दिवशीं सकाळीं पाहुण्याची बोळवण करितांना तो त्यास

म्हणे, ' जेथें जेथें आपण जाल, तेथें तेथें ईश्वर आपणांस सुखी राखो ! याउप्पर आपणां दोघांचें भोजन एकत्र कधींही घडणें नाहीं व हीच तुमची आमची भेटाभेट. असें आपणांस निक्षून सांगितल्याबद्दल राग नसावा. काल आपणांस बोलावितांनाच मी आपली नित्याची वहिवाट आपणांस कळविली आहे. असें कां म्हणून विचाराल तर त्याचें उत्तर एवढेंच कीं, असें करणें मला अवश्य आहे. परमेश्वर तुमचें रक्षण करो ! '

अबूलहसन आपल्या नेमाच्या बाहेर कधींही वागला नाहीं. एकदां पाहुणचार दिलेल्या मनुष्याकडे तो पहात देखील नसे व त्याशीं बोलतही नसे. जरी तो त्यास रस्त्यांत, पेठेंत किंवा लोकसमाजांत—कोठेंही भेटला, तरी त्यानें न पाहिलेसेंच करावें; आणि त्यानें मुद्दाम हटकलेंच तरीही न बोलतां निघून जावें. अशा हरएकप्रकारें तो त्यांच्या वाऱ्यासही उभा रहात नसे. याप्रमाणें पुष्कळ दिवस लोटले. मग एके दिवशीं सूर्यास्तापूर्वीं कांहीं वेळ तो पुलावर नेहमींप्रमाणें बसला असतां, तिकडून कालीफ हरून अलरशीद याची स्वारी आली. पण त्यानें आपला वेष इतका पालटला होता कीं, तो कालीफ म्हणून कोणास समजून येऊं नये !

या कालीफाचे वजीर, न्यायनिवाडा करणारे अधिकारी आपापलीं कामें इमानानें व हुषारीनें करीत असत, तरी जातीनें सर्व तपासणी करण्याची कालीफास हौस असे. हा बगदाद शहरांत तऱ्हेतऱ्हेच्या वेषानें फिरे, हें मागें अनेक वेळां सांगितलें आहे. तसेंच, तो त्या शहरच्या आसपासही फिरत असे. बगदाद शहरांत येण्याचे दोन मोठे रस्ते होते. त्यांपैकीं कधीं या रस्त्यावर, व कधीं त्या रस्त्यावर, याप्रमाणें दर महिन्याच्या पहिल्या दिवशीं फिरण्याची याची वहिवाट असे. त्या दिवशीं पहिली तारीख होती, म्हणून तो बगदाद शहरच्या पुलाकडे मोसल शहरच्या व्यापाऱ्याचा वेष घेऊन येत होता व त्याच्यामागें एक धष्टपुष्ट असा दास होता.

पातशाह केलेल्या वेषावरून मोठा संभावित व्यापारी दिसत

होता. तेव्हां हा मोसल शहरांतून आलेला असावा असें वाटून अबूलहसन त्याकडे गेला आणि त्यास सलाम करून मोठ्या आदबीनें त्याच्या हाताचें चुंबन करून त्यास म्हणाला, ' महाराज, प्रवासाच्या दगदगीनें आपण भागलां असाल, तर आजची रात्र माझ्या घरीं बिन्हाडास येऊन माझा पाहुणचार घेतल्यास मजवर फार उपकार होतील. तुम्हीं आलां हें फार चांगलें झालें; तर चलावें माझ्या घरीं. ' मग आपण केलेला नियम त्यानें त्यास थोडक्यांत सांगितला.

हें सर्व ऐकून पातशहास फार चमत्कार वाटला, व हें आहे तरी काय तें पहावें असें वाटलें. मग तो त्यास म्हणाला, ' ठीक आहे; बगदाद शहरांत येतांच असा अकल्पित सत्कार तुम्हांकडून मिळतो आहे, त्यास माझी काय ना आहे ? चला, हा मी येतों. '

दैवयोगानें आज अबूलहसनास जो पाहुणा मिळाला, त्याचें ऐश्वर्य माहीत नसल्यामुळें त्याशीं तो बरोबरीच्या नात्यानें वागला. त्यानें त्यास घरीं नेऊन एका छानदार दालनांत उंच स्थानीं मांडलेल्या एका कोंचावर बसावयास जागा दिली. जेवणाची तयारी होतीच. मग दोघेही एकदम बसले. अबूलहसनाची आई पक्वान्नें करण्यांत मोठी सुगरण होती. तिच्या हातचींच पक्वान्नें तिनें त्यांस घातलीं. तीं साधीं असून उत्तम प्रकार केलेलीं होतीं. अबूलहसन कालिफाचे समोर बसला होता; व दोघांनींही आपणांस हवें तें घेऊन कांहींएक न बोलतां यथेच्छ भोजन केलें. जेवण संपल्यावर कालिफाच्या दासानें तोंड धुवावयास पाणी आणलें, व अबूलहसनाच्या आईनें त्या दोघांस मुखशुद्धीकरितां द्राक्षें, सीताफळें, पेरू, नानाप्रकारच्या पोळ्या वगैरे पदार्थ दिले.

कालिफाचा स्वभाव गमती होता. त्यास अबूलहसनाच्या भाषणानें फार मौज वाटली. मग त्यानें त्यास त्याचें नांव, हुद्दा वगैरे विचारलें. तेव्हां तो म्हणाला, ' महाराज, माझें नांव अबूलहसन. माझा बाप कांहीं वर्षांपूर्वीं वारला. तो व्यापारी असून,

जरी माठो धनाढ्य नव्हता, तरी त्यास कोणत्याही गोष्टींची कमताई नव्हती. त्याच्या मागें मला जी दौलत मिळाली, ती बापाच्या नांवलौकिकानें राहण्यास मला चांगली पुरे इतकी होती. पण बापाची जरब-मला फार होती, व मी मोठा झालों तरी मला स्वच्छंदानें वागावयास सांपडलें नव्हतें, म्हणून पुढचे तरी दिवस सुखांत काढावें असें मला वाटलें. तरुण लोकांच्या हातांत पैसा आला म्हणजे बहुतकरून ते कांहींही विचार न करतां बेबंद वागूं लागतात व हरएक व्यसनांत पडून कवडी न् कवडी उधळून टाकतात, आणि मग जन्मभर पश्चात्ताप करीत बसतात. पण मीं आपल्या दौलतीचा खर्च अशा विचारानें केला नाहीं. मीं आपल्या द्रव्याचे दोन वांटे केले. एक-घरें वगैरे जीं खरेदीं केलीं त्यांचा वसूल; व दुसरा-रोख पैसा. यांपैकीं रोख पैसा मात्र चैनीकडे लावावयाचा. पण पहिल्या वांट्यांस बोटही लावावयाचें नाहीं, असा मी मनाचा निर्धार केला. मग मीं आपल्या वयाच्या तरुण लोकांचा मेळा जमवून त्यांस नित्य मोठ्या थाटाच्या मेजवान्या देऊं लागलों, व जी जी म्हणून हौस होती ती ती पुरवून घेतली. पण अशी रेलचेल चालणार किती दिवस? एक वर्ष लोटतें न लोटतें तों सर्व रक्कम खलास झाली, व माझे मित्रही मजकडे येत-नासे झाले. मग मी त्यांकडे जाऊन आपली झालेली सर्व दशा त्यांस सांगितली, पण कोणीही मला मदत करीना. तेव्हां त्यांची दोस्ती सोडून देऊन मीं आपला खर्च कमी केला, व मिळकतीच्या ताळ्यावर आणला. त्याच वेळेस मीं असा नेम केला कीं, मंडळींत कोठेंही मिसळायाचें नाहीं. फक्त बगदाद शहरांत येणारा एक उपरा मात्र नित्य घरीं बोलवायाचा. व त्या रात्रभर त्याची बरदास्त ठेवायाची. बाकीचें सर्व तुम्हांस कळविलेंच आहे. आज तर तुमचे पाय या घरास लागल्यानें मी आपणास मोठा नशीबाचा समजतों.'

हा अबूलहसनाचा वृत्तांत ऐकून कालीफ म्हणाला, 'तुम्ही

स्वतःचे मुखत्यार असूनही, इतर लोकांप्रमाणें सर्वस्व न उधळतां जे विचारानें वागतां, त्या तुमची तारीफ करावी तितकी थोडीच आहे; व एकदां केलेल्या निश्चयापासून तुम्ही ढळला नाहीं हा तरी तुमचाच निर्धार ! दुसरा कोणी असतां तर रोख पैसा फस्त करून जिनगीबिनगी देखील विकून टाकून पार होता. तुम्ही खरोखर सर्व जगांत धन्य आहां. तुम्हास प्रत्यहीं संभावित लोकांचा समागम घडतो, त्याजबरोबर बोलूनचालून तुम्ही त्यास संतुष्ट करतां, व यामुळें तुमचा भलेपणा लोकांत गाजतो.

मग कालीफ अबूलहसनास म्हणाला, ' आजच्या प्रवासानें मी फार थकलों आहे, त्यामुळें मला निजावेंसें वाटतें, व तुमची झोंपमोड होते आहे तेंही मला गोड वाटत नाहीं. तुम्ही जो हा माझा येवढा सत्कार केलांत, तो मी कधीं विसरणार नाहीं. पण माझ्या जीवास अशी खुरखुर लागली आहे कीं, तुमच्या उपकाराची फेड तरी कशी करावी ? तेव्हां माझें तुम्हाजवळ येवढें मागणें आहे कीं, तुमच्या मनांतून एकादी गोष्ट करावयाची असून ती होत नसेल, किंवा तुमचा कांहीं हेतु असेल, तर तोही मला कृपा करून सांगावा, म्हणजे त्याविषयीं मी तजवीज करीन. जरी मी तुम्हांस साधारण व्यापारी दिसतो, तरी मी स्वतः किंवा मी आपल्या मित्रांच्या हातून तुमचें कार्य साधून देईन. '

हें भाषण ऐकून अबूलहसन म्हणाला, " महाराज, ह्या ज्या सर्व गोष्टी आपण मला देऊं केल्या, त्या देण्याचें सामर्थ्य तुमच्या अंगीं पूर्ण आहे, हें मी पक्कें जाणतों. पण मी आपणांस वास्तविक आहे तें सांगतों. महाराज, ईश्वरानें मला सर्व प्रकारें सुखी ठेविलें आहे. मला कोणत्याही प्रकारची विवंचना किंवा ददात नाहीं. मीं तुम्हांस सांगितलेंच आहे कीं, मोठ्या लौकिकास चढावें, किंवा लोकांत मानमान्यता व्हावी, हेंही माझ्या मनांतून नाहीं; जें माझ्या नशिबानें मला मिळतें आहे, यांत माझा संतोष आहे. माझें आतां येवढेंच म्हणणें आहे कीं, हें जें तुम्ही मला देऊं करीत आहां, व

आज मज गरिबाची भाजीभाकरी जी आपण गोड करून घेतली तेवढ्यानेंच मजवर फार मेहेरबानी झाली. तथापि येथें एका गोष्टीनें मला फार खेद होतो. ती कोणती म्हणाल तर ऐका. तुम्हांस माहीतच आहे कीं, बगदाद शहरच्या अनेक पेठा आहेत, व दर-एक पेठेला एकेक मशीद व एकेक इमाम आहे; अशाकरितां कीं, त्या लोकांस नेमलेल्या वेळीं निमाजास बोलावून आणावें. या पेठेचा इमाम एक म्हातारा मनुष्य आहे. तो मोठा दुष्ट दिसतो, व पक्का लुच्चा आहे. त्यासारखेच येथें दुसरे चौघे म्हातारे आहेत. ते नित्य त्या इमामाच्या घरीं जमतात. अशी ती चांडाळचौकडी जमली म्हणजे, याचें उणें काढ, त्याची कुटाळकी कर असा क्रम चाल-वितात. असा त्यांचा त्रास आम्हांस सोसावा लागतो. व त्यांच्या चहाड्यांनीं आमचें परस्परांत वैमनस्य वाढतें. ते कोणास धाक दाख-वितात, कोणास धमक्या देतात, कीं त्यामुळें आम्हीं आपणांस त्यांच्या स्वाधीन करून त्यांच्या छंदानें वागावें. असे ते दुष्ट धर्माची वार्ताही सोडून देऊन उलटें लोकांस सुखानेंही राहूं देत नाहींत. त्यांस पाहिलें म्हणजे माझ्या अंगाचा संताप होतो.'

कालीफ म्हणाला, 'तर मग एकूण तुमच्या मनांत या गोष्टीचा बंदोबस्त करणें आहे, नव्हे?' अबूलहसन म्हणाला, 'होय, आहे खरेंच; जर कोणी आपला कालीफ हरून् अल्‌रशीद याच्या जागीं मला एक दिवसभर बसवील, तर माझ्या मनाजोगतें मला करतां येईल.' कालीफ म्हणाला. 'असें जर झालें तर तुमच्या मनांत काय करावयाचें आहे?' अबूलहसन म्हणाला, 'मी कालीफ झालों तर अगोदर एक गोष्ट करीन, कीं जेणेंकरून सर्व भल्या लोकांस संतोष होईल? ती ही कीं, त्या चारम्हाताऱ्यांना शंभर शंभर फटके तळपायांवर देववीन, व त्या गुलाम इसमाला चारशें देईन. या-शिवाय त्यांच्या खोडी जातात कोठून!'

हा अबूलहसनाचा बेत ऐकून कालिफास फार गम्मत वाटली. त्यास वाटलें कीं, हा म्हणतो तसें होऊं दिल्यास मोठी बहार पहा-

वयास सांपडेल. मग त्यास तो म्हणाला, 'अशी तुमची इच्छा पाहून मला फार आनंद वाटतो. तुम्हांस त्या दुष्टांचीं खोटीं कर्में आवडत नाहींत, व त्यास शासनकर्ता कोणी नाहींसा पाहून तुमचा तिळपापड होतो, हें अगदीं वाजवी आहे. तुम्हांस कालिफानें आपला अधिकार देऊन तुमच्याकडून त्या दुष्टांचें पारिपत्य झाल्यास मोठी मौज होईल, व तुम्हीं म्हणतां हें होणें अगदीं दुर्घट आहे असेंही नाहीं. कालिफास तुमचा स्तुत्य उद्देश समजला तर तोही आपला अधिकार एक दिवसभर तुम्हांस देईल, असें मला खास वाटतें. जरी मीं या शहराचा राहणारा नव्हें, व नुसता व्यापारी आहे, तरी मीं कालिफास याबद्दल चार गोष्टी सांगितल्या तर त्याच्यानें सहसा नाहीं म्हणवावयाचें नाहीं, अशी माझी त्याजपाशीं पत आहे.'

अबूलहसन म्हणाला, 'हें कांहीं होणें नाहीं; तुम्हीं माझी सर्व मस्करी चालविली आहे. जर ही गोष्ट कालिफाच्या कानांवर गेली, तर त्यालाही खचीत हंसूं येईल. आतां असें कदाचित् झालें तर होईल, कीं तो या गोष्टीचा तपास करून त्या इमामांस व त्या चौघां म्हाताऱ्यांस शिक्षा करील. बाकी कांहीं नाहीं.'

कालिफानें उत्तर केलें, 'एकूण ही तुमची थट्टा केली असें तुम्ही समजतां? छे छे! मी कोठचा कोण, अगदीं अनोळखी असूनही तुम्ही माझा येवढा सत्कार केलांत, अशा तुम्हां योग्य मनुष्याची मी मस्करी करीन काय? कधीं नाहीं! मी तुम्हांस खास सांगतों कीं, ही गोष्ट ऐकून कालीफ देखील तुम्हांस हांसणार नाहीं पण आतां बोलणेंच पुरें. अगदीं मध्यरात्र होत आली. चला, जाऊन निजूं.'

मग अबूलहसन म्हणाला, 'बरें तर, राहूं द्या हें बोलणें. तुमच्या झोंपेस मीं हरकत करीत नाहीं पण हें येवढेंसें मद्य मात्र उरलें आहे. तर तुमची खुषी असल्यास हें येवढें संपवून टाकून मग जाऊन निजूं. आतां तुम्हांला येवढेंच एक सांगायाचें राहिलें आहे कीं, तुम्ही उद्यां सकाळीं जेव्हां येथून जाल, तेव्हां मी जागा नसल्यास जातांना

तेवढें दार लावा, आणि मग जा.' कालिफानें 'हो,खचीत लावीन,' म्हणून उत्तर दिलें.

अबूलहसन बोलत असतां, कालिफानें मद्याचा शिसा व दोन्ही प्याले आपल्याजवळ घेतले. मग त्यांतील एक प्याला आपण घेऊन, दुसऱ्या प्याल्यांत कालिफानें अबूलहसनास न कळतां आपल्या-जवळची थोडीशी पूड टाकली, व तीवर मद्य ओतून प्याला भरला. मग तो अबूलहसनाच्या पुढें करून म्हणाला, 'येवढा वेळ प्याले भरून द्यावयाचा श्रम आपणांस पडला. तर आतां हा शेवटला एक मी तुम्हांस आपल्या हातानें देतों, हा मजकरतां आपण घ्यावा.'

अबूलहसनानें तो प्याला घेतला, व मोठ्या खुषीनें एका दमास सगळा पार केला.पण तो प्याला पुनः मेजावर ठेवी न ठेवी तों त्या पुडीचा गुण होऊं लागला. त्यास एकदम झोंपेनें घेरलें.व तो डुलक्या खाऊं लागला. तें पाहून कालिफास हंसूं आलें. कालिफानें आपणा-बरोबर जो एक दास आणला होता तो जेवण होतांच कालिफाकडे येऊन बसला होता. त्यास कालीफ म्हणाला, 'अरे, घे याला खांद्यावर व चल मजबरोबर; पण हें घर नीट लक्षांत ठेव हो! पुढें कदाचित् मी सांगितल्यावरून तुला यांस येथें आणावें लागेल.'

मग कालीफ व त्याच्या मागून अबूलहसनास खांद्यावर घेतलेला त्याचा दास,असे दोघे घराबाहेर पडले.त्यांनीं दरवाजा न लावतां मुद्दाम उघडा ठेवला. मग वाड्याजवळ येतांच कालीफ एका गुप्त दरवाज्यानें आंत शिरला व त्यानें दासास हुकूम केला कीं, माझ्या निजायाच्या मंदिरांत यास घेऊन ये. मग दासानें अबूलहसनास त्या मंदिरांत आणिलें. येथें पातशाहाच्या वाड्यांतील सर्व मंडळी बसली होतीच. त्यांस कालीफ म्हणाला. 'या मनुष्याच्या अंगावरचे कपडे काढून यास माझ्या पलंगावर निजवा. मग माझा बेत काय आहे तो तुम्हांस कळवीन.'

हुकुमाप्रमाणें अबूलहसनाचे कपडे काढून त्याच्या अंगावर कालि-फाचा रात्रीचा पोषाक घातला व त्याला पलंगावर निजविलें

तोंपर्यंत सर्व मंडळी जागीच होती. मग राजवाड्यांतील सर्व हुद्देदारांस बोलावून त्यास कालीफ म्हणाला, ' हा जो मनुष्य येथें निजला आहे, हा उद्यां सकाळीं उठतांच मजप्रमाणें यास मान द्या, व हा जें जें म्हणेल, किंवा जो जो हुकूम करील, तें सर्व करून माझ्याप्रमाणें याशीं वागा. त्याच्याशीं बोलतांना किंवा यांस उत्तर देतांना माझ्या नांवानें यास हांक मारा. व फार काय ? हा खरोखरच पातशाहा आहे असें यास समजा. यांत व माझ्यांत काडीचाही अंतर ठेवूं नका. '

कालिफाच्या या भाषणावरून सर्वांनीं जाणलें कीं, आज या मनुष्याची मौज करावयाचें कालिफाच्या मनांत आहे. मग सर्वांनीं त्यास मुजरा करून आपापल्या हुद्याप्रमाणें नव्या कालिफाशीं वागण्याची तयारी केली. कालिफानें जाफर वजिरास बोलावणें पाठवलें होतें, तोही इतक्यांत आला. त्यास कालीफ म्हणाला, ' वजीर, तुम्हांला आतां बोलावून आणण्याचें कारण इतकेंच कीं, हा जो मनुष्य येथें निजला आहे, हा उद्यां माझा पोषाक घालून सिंहासनावर बसेल, त्या वेळेस तुम्ही किंचित्‌ही आश्चर्य झालेंसें दाखवूं नये, मजप्रमाणें याशीं मोठ्या आदबीनें बोलूनचालून जसें तुम्ही मजशीं वागतां त्याप्रमाणेंच त्याच्याशीं वागा; व हा जे जे हुकूम करील ते ते बजावा. मग हा कोणास मोठालीं इनामें देऊं लागून त्यामुळें तिजोरीसही जरी धक्का पोहोंचूं लागला, तरी चिंता नाहीं. याप्रमाणें सर्व अमीरलोकांस वगैरे देखील ताकीद करा; व ही जी मौज मी करणार आहें, तिचा कोणत्याही प्रकारें बिघाड न होईल अशी तजवीज ठेवा. येवढेंच तुम्हांस सांगायाचें होतें, दुसरें कांहीं नाहीं.'

मग मुख्य वजीर गेल्यावर कालीफ दुसऱ्या खोलींत गेला, व त्यानें खोजांतला मुख्य मश्रूर यास त्याचें काम सांगून दिलें. याप्रमाणें कालिफानें सर्व प्रकारची तजवीज केली. त्याच्या मनांत कीं, अबूलहसनाची इच्छा पूर्ण करावी व यास एक दिवस आपला अधिकार देऊन हा काय करतो तें पहावें. नंतर अबूलहसन जागा

होण्याच्या आधीं मला उठवायास ये ' अशी त्यानें मश्रूरास ताकीद दिली; कारण पुढें होणारा सर्व चमत्कार त्याला स्वतः पाहावयाचा होता.

दुसऱ्या दिवशीं सांगितल्या वेळीं मश्रूरानें कालिफास जागें केलें. मग अबूलहसन ज्या खोलींत निजला होता तिच्याजवळच्या खोलींत कालीफ गेला. त्या खोलीला जाळी होती, त्यामुळें तो स्वतः कोणाच्या दृष्टीस न पडतां त्यास मात्र सर्व दिसलें. मग कालिफाच्या हुकुमाप्रमाणें सर्व लोक आपआपल्या हुद्द्याप्रमाणें येथें येऊन मुकाट्यानें बसले. व अबूलहसन उठून काय हुकूम करील याची वाट पहात राहिले प्रातःकाळीं होऊन निमाजाची वेळ येऊन ठेपली, तेव्हां अबूलहसनाच्या उशाशीं जो बसला होता.त्याच्याजवळ कांहीं औषध होतें, तें त्यानें त्याच्या नाकाजवळ धरलें.तसें करतांच अबूलहसनास शिंका आल्या व डोळे न उघडतां एके बाजूस वळून तो खोकूं लागला. तेव्हां बिछान्याची खराबी होऊं नये, म्हणून खाकरा टाकण्याकरितां चाकरांनीं त्याच्यापुढें सोन्याचें तस्त केलें. हा सर्व प्रकार कालिफानें आदल्या रात्रीं जी पूड दिली होती तीमुळें घडला. पूड जशी जास्त किंवा कमी द्यावी त्याप्रमाणें झोंप जास्त किंवा कमी लागेत. मग उशीवर पुनः डोकें ठेवून अबूलहसनानें डोळे उघडले, व थोडथोडा उजेड होता तरी आपण मोठ्या मंदिरांत आहों असें त्यानें पाहिलें. त्या मंदिराच्या छतावर नानाप्रकारचीं चित्रें काढलीं होतीं, त्यास सोनेरी झालर होती,व तेथें चोहोंकडे रुजामे, गालिचे, सोन्याचीं भांडीं वगैरे सामान सुरेख रीतीनें मांडून ठेविलें होतें. तसेंच उंची पोषाक केलेले पुष्कळ खोजेही त्याजजवळ मोठ्या अदबीनें बसले होते. मग त्यानें आपल्या पलंगपोसाकडे पाहिलें. तो किरमिजी रंगाचा असून त्यास मोत्यें लाविलीं होतीं; तसाच शेजारीं एक रत्नांनीं मढवलेला पोषाक होता;व जवळ एका तक्क्यावर कालिफाचा मुकुट होता.



इतक्यांत खोजांतला मुख्य जो मश्रूर तो पुढें आला व भुंईपर्यंत लवून मुजरा करून मोठ्या नम्रतेनें म्हणाला. [ पान २८३

हें सर्व पाहून अबूलहसनास फार अचंबा वाटला, व तो अगदीं गोंधळून गेला. आपण स्वप्नांत आहों असें त्यास वाटलें; तरी तें स्वप्न त्यास इतकें छानदार वाटलें कीं, हें स्वप्न नसून खरोखरच असें असेल तर बरें! मग तो आपणांशीं म्हणतो,' एकूण मी कालिफ झालों! पण छेः कालिफ कसचा! हें सर्व स्वप्न आहें. काल मी आपल्या पाहुण्याबरोबर बोलत असतां मला जी इच्छा झाली होती, तिचेंच हें स्वप्न मला दिसत आहे.' मग पुनः निजावें म्हणून त्यानें डोळे मिटले. तेव्हां एक खोजा जवळ येऊन म्हणूं लागला, 'राजाधिराज, आपण जातां पुनः निजूं नये. निमाजाची वेळ झाली, दिवस येऊं लागला. पहा. मग मोठा अचंबा वाटून अबूलहसन स्वतःस म्हणतो ' अहो, मी जागा आहें कीं निजलों आहें?' पुनः डोळे झांकून म्हणतो, ' पण मी खास निजलोंच आहें? यांत कांहीं संशय नाहीं!'

अबूलहसन कांहीं उत्तर न करितां पुनः निजलासें पाहून तो खोजा पुनः म्हणतो, ' महाराज, मी बोलतों याची मला माफी असावी. आपण नेहमीं सकाळीं निमाज पढतां असें असतां आजच तो नियम मोडावयाचें मनांत असलें तर कोण जाणे! पण आतां उठावयाची वेळ झाली, सूर्योदयाचा समय जवळ आला आहे.'

अबूलहसन म्हणतो, 'अरे, मी झोंपेंत आहें असें मला उगीच वाटलें, मी खराखुराच जागा आहें. जागा नसतों तर या मनुष्याचें बोलणें मला कसें ऐकूं आलें असतें!' मग त्यानें पुनः डोळे उघडले व चांगली सकाळ झाली असल्यामुळें आतां त्यास सर्व स्पष्ट दिसूं लागलें. मग तो मोठ्या उल्हासवृत्तीनें बिछान्यावर उठून बसला. त्यास वाटलें कीं, 'अरे काल मी कोण होतों! आणि आज पहा मला केवढें ऐश्वर्य आलें; त्याची आनंदी मुद्रा पाहून कालिफानें त्याच्या मनांतलें जाणलें, व तेणेंकरून त्यास फार समाधान वाटलें.

मग डोळ्यावरचे हात काढून वर पाहतो तों खिडकींतून सूर्याचीं कोंवळीं किरणें आंत पडलेलीं त्यानें पाहिलीं.

इतक्यांत खोजांतला मुख्य जो मश्रूर तो पुढें आला व भुईपर्यंत

लवून मुजरा करून मोठ्या नम्रतेनें म्हणाला, 'राजाधिराज, ह्या दासास या पायांपाशीं कांहीं विनंती करणें आहे, त्यास माफी असावी. नित्याच्या नियमाप्रमाणें आज महाराजांस उठावयास उशीर झाला, व निमाजाची वेळ अंतरून गेली तर प्रकृतीस अवस्था वगैरे नसल्यास आपण नेहमींप्रमाणें तक्तावर बसून दरबार भरवावा, फौजावर ठेविलेले आपले सरदार, मुलखामुलखांवरचे अंमलदार व तसेच सर्व बडे लोक कचेरींत जाण्याकरितां आपल्या स्वारीची वाट पहात आहेत.'

हें मश्रूरचें भाषण ऐकून अबूलहसनाची खात्री झाली कीं, आपण कांहीं स्वप्न पहात नाहीं. होत आहे हें सर्व खरेंच आहे! तरी तो मोठ्या घोंटाळ्यांत पडला व काय करावें हें त्यास सुचेना. मग मश्रूराकडे पाहून तो त्यास विचारूं लागला, 'अरे, तूं कोणाला बोलतोस हें? आतां राजाधिराज म्हणून कोणाला म्हणालास? तूं तरी कोण आहेस हें देखील मला ठाऊक नाहीं. तूं मला भलताच समजून असें बोलत आहेस, नव्हे?'

या ठिकाणीं मश्रूराशिवाय दुसरा कोणी असतां तर अबूलहसनाच्या प्रश्नांस त्याच्यानें उत्तर देववतें ना. पण मश्रूरास कालिफानें सर्व शिकवून ठेवलेंच होतें, म्हणून त्यानें न गोंधळतां खासें उत्तर केलें. तो म्हणाला, 'धनीसाहेब, सरकार, आपण आज माझी गरिबाची परीक्षा पाहण्याचें मनांत आणलें आहे असें वाटतें. महाराज, सर्व पृथ्वीचे सत्ताधारी व ईश्वरानें या पृथ्वीवर नेमलेले धर्माध्यक्ष सद्धर्मपालक आपण नाहीं का? खावंदांचीं इतकीं वर्षें चाकरी करून इतक्यांत ह्या आपल्या दासास सरकार विसरून गेलें! सरकारची मज गरिबावर गैरमर्जी झाली असल्यास पुनः मेहरनजर करण्यांत यावी! पण महाराज, गेल्या रात्रीं आपल्या जिवास चैन नसावेंसें मला वाटतें.' हें मश्रूराचें भाषण ऐकतांच अबूलहसनास मोठें हंसूं आलें, व त्या सपाट्यांत त्यानें पुनः बिछान्यावर अंग टाकलें. तिकडे कालिफासही मोठें हंसूं आलें, पण मौज चाललेली

बंद होईल या भयानें त्यानें तें आवरलें. अबूलहसन तसाच पुष्कळ वेळ हंसून मग उठून बसला, व दुसऱ्या एका खोजास हांक मारून त्यास म्हणाला, 'अरे,तूं सांग मी कोण आहें तो!' तेव्हां तो मोठया नम्रतेनें म्हणाला, 'महाराज, आपण सद्धर्मपालक, व ईश्वरानें नेमलेले धर्माध्यक्ष आहां!' अबूलहसन म्हणाला, 'चल लुच्च्या, तूं लबाड बोलतोस.'

मग आपल्याजवळ बसलेल्या एका दासीस अबूलहसन म्हणाला, 'इकडे ये; हें माझें बोट चाव पाहूं, म्हणजे मी जागा आहें कीं, झोंपेंत आहें हें मला समजेल.' कालीफ हें सर्व दडून पहात आहें हें त्या दासीस माहीत होतें तेव्हां आपलें चातुर्य पातशहास दाखवावयाची ही बरी संधि आहे असें वाटून तिला मोठा आनंद झाला. मग ती गंभीर मुद्रेनें अबूलहसनाकडे आली, व त्यानें पुढें केलेल्या बोटावर आपले दांत हळूच ठेवून तिनें थोडी वेदना भासविली.

मग झटकन् आपला हात काढून घेऊन अबूलहसन म्हणाला, 'खरेंच, आतां खास मी झोंपेंत नाहीं. पण हें कसें बरें झालें असेल, कीं एका रात्रींत मी कालीफ झालों!' नंतर अबूलहसनाच्या मनांत उठावयाचें आहे असें समजून मश्रूरानें त्यास हात देऊन उठविलें. मग तो उभा राहतांच सर्वांनीं एकच जयजयकार केला. अबूलहसन म्हणतो, 'अहो, काय चमत्कार! काल रात्रीं मी अबूलहसन होतों, आणि आज पहावें तों कालीफ झालों! हें कसें बरें झालें असेल!' मग अबूलहसनाच्या अंगावर लवकरच कालिफाचा पोषाक चढविला. नंतर त्याच्या दोहों बाजूंस सर्व मंडळी दुतर्फा उभीं राहिलीं आणि मश्रूर पुढें होऊन त्याच्या मागून अबूलहसन चालला. मग एकदम दरबारच्या दालनाचा दरवाजा उघडला. मश्रूर पुढें चालला आणि तक्ताच्या पायऱ्यांशीं जाऊन उभा राहिला. मग त्यानें व दुसऱ्या एका खोजानें अबूलहसनास वर चढावयास हात दिले व तो तक्तावर बसला. तेथें पुनः कालि-

फाच्या नांवानें जयजयकार झाला, व अबूलहसनाच्या दोहों बाजूंस समशेरबंद लोकांचा खडा पाहारा होता, तो त्यानें पाहिला.

मग कालीफ ती खोली सोडून दरबारच्या समोरच्या खोलींत आला. कधीं स्वतः दरबारांस न जावेसें वाटल्यास कालीफ या खोलींत बसत असे, व तेथून, वजीर कसें काम चालवितो तें पहात असे. अबूलहसनास आपल्या जागीं बसलेला पाहून व त्यानें धारण केलेली गंभीर मुद्रा पाहून कालिफाच्या मनास संतोष वाटला.

मग मुख्य वजिरानें सिंहासनापुढें दंडवत घातलें. नंतर तो उठून म्हणाला, ' सद्धर्मपालक महाराज, ईश्वर आपणास या लोकांचें व परलोकाचें हरएक सुख व ऐश्वर्य देवो व आपल्या शत्रूंस पाताळाच्या अग्नींत टाको. '

ह्या सर्व झालेल्या वृत्तांतावरून व मुख्य वजिराच्या या भाषणावरून आपण खरोखर कालीफ आहों कीं नाहीं हा संशय अबूलहसनानें सोडून दिला, व हा चमत्कार कसा झाला या गोष्टीचा विचार न करतां तो कालिफाचा अंमल चालवूं लागला. मग वजिराकडे बघून त्यानें विचारलें कीं, 'तुम्हांस कांहीं बोलावयाचें आहे कीं काय ?' वजीर म्हणाला, ' राजाधिराज, आपल्या दरबारचे अमीर-उमराव, वडे लोक सर्व दरवाज्याशीं उभे आहेत, व सरकारच्या हुकुमाची वाट पहाताहेत. ' मग अबूलहसनानें हुकूम देतांच दरवाजा उघडला; आणि अमीरउमराव वगैरे सर्व दरबारी मंडळी सिंहासनापुढें येऊन आपल्या हुद्द्याप्रमाणें अबूलहसनास सलाम करून वजिरानें सांगितल्याप्रमाणें आपापल्या जाग्यावर जाऊन बसलीं. याप्रमाणें दरबार भरल्यावर सर्वजण स्तब्ध बसले.

मग सिंहासनापुढें उभें राहून वजिरानें लोकांचे अर्ज, खटले वगैरे सर्व अबूलहसनास तपशीलवार निवेदन केले. ह्या अर्जांत वगैरे फारसा अर्थ नव्हता, तरी अबूलहसनाचे निवाडे ऐकून कालिफास आश्चर्य वाटलें. त्यानें यत्किंचितही न गोंधळतां सर्व निकाल मोठ्या

समंजसपणानें केले. व लोकांच्या अर्जास रुकार द्यावयाचा किंवा त नामंजूर करावयाचे, तें सर्व यथान्याय केलें.

हें चाललें असतां मध्येंच अबूलहसनानें शहरच्या कोतवालास पाहिल्यावर त्यास आपणांकडे बोलाविलें, आणि तो वजिरास म्हणाला,' अंमळ थांबा. या कोतवालास एक निकडीचें काम सांगावयाचें आहे.' मग त्यानें येऊन साष्टांग नमस्कार घातल्यावर अबूलहसन त्यास म्हणाला, ' कोतवाल, होईल तितकी जलदी करून या शहरच्या अमक्या गल्लींत जा. ( ती कोणची वगैरे अबूलहसनानें नांवानें सांगितली. ) तेथें एक मशीद आहे. एक इमाम व दुसरे चार म्हातारे असतात, त्या सर्वांस पकडून त्यांपैकीं त्या चार म्हाताऱ्यांस पायांवर शंभर शंभर कोरडे द्या व त्या इमामाच्या पायांवर चारशें द्या. हें झाल्यावर त्या पांचजणांस गाढवावर शेंपटीकडे तोंड करवून चिंध्या अंगावर घालून बसवा. अशी विटंबना करून त्यांची सर्व शहरभर धिंड काढा; शिवाय त्यांच्यामागें दवंडी पिटणाऱ्यानें ओरडून असें म्हणावें कीं, ' नसत्या उलाढाल्या करून आपल्या शेजाऱ्यांत जे कोणी वैमनस्य आणूं पहातात, व त्यांस सर्व प्रकारें त्रास देतात,त्यांस अशी शिक्षा केली जाते; आणखी असें करा कीं, आतां हे पांचजण शहराच्या ज्या मह ल्ल्यांत रहाताहेत, तेथून त्यांस घालवून द्या, व ' या ठिकाणीं पुनः पाऊल घातलें तर खबरदार ' अशी त्यांस सक्त ताकीद करा. हें सर्व कृत्य होऊन त्यांची धिंड काढण्याकडे दुसऱ्या शिपायांस गुतवून देऊन तुम्ही झालेला सर्व मजकूर येथें येऊन कळवावा.'

शहरच्या कोतवालानें हा हुकूम ऐकून आपल्या मस्तकावर हात ठेवला, आणि तेणेंकरून असें दर्शविलें कीं, ' हा हुकूम न बजावल्यास माझें डोकें गमावण्यासही मी तयार आहे.' मग पुनः साष्टांग नमस्कार घालून व आज्ञा घेऊन तो चालता झाला.

हा निक्षून सांगितलेला हुकूम ऐकून कालिफास विशेष समाधान वाटलें; कारण आतां यावरून त्यास खास समजून आलें कीं, त्या

इमामास व चार म्हाताऱ्यांस शासन करण्याचें याच्या मनांत फार होतें, व त्याकरतांच कालिफाचा अधिकार आपणांस एक दिवस असावासें त्यास वाटलें.

इतक्यांत राहिलेले सर्व अर्ज वजिरानें अबूलहसनापुढें सादर केले, व त्याचें संपतें आहे तोंच कोतवाल येऊन दाखल झाला. मग नेहमींप्रमाणें साष्टांग नमस्कार घालून त्यानें हकीकत सांगण्यास आरंभ केला. तो म्हणाला, ' सद्धर्मपालक राजाधिराज सरकारच्या हुकुमाप्रमाणें त्या पांच जणांस मी पकडलें व महाराजांचे हुकूम मी कसे बजावले हें ह्या पत्रावरून आपणांस कळेल. ह्यावर तें सर्व कृत्य डोळ्यांनीं पाहिलेल्या मोठमोठ्या लोकांच्या सह्या आहेत.' असें म्हणून त्यानें खिशांतून कागद काढला, व अबूलहसनास दिला.

अबूलहसनानें साक्षींच्या सह्यासुद्धां सर्व कागद वाचला. ते साक्षीदार त्याच्या माहितींतले होते. मग वाचणें संपल्यावर त्या कोतवालाला पाहून तो हंसून म्हणाला, 'हें आज ठीक झालें, मला फार संतोष झाला.तुम्ही बसा आपल्या जागीं आतां. ' मग मनांत मोठें समाधान वाटून तो आपल्याशींच म्हणाला, ' मीं कांहीं केलें कीं पुरें. या लोकांस फार चौकशा कराव्या लागत व सभ्य लोकांस मी घरीं बोलावून त्यांस मेजवान्या वगैरे दिल्या असतां या लुच्च्यांचें फार पित्त खवळत असे ! बरी गुलामांची खाज निवाली ! ' हे त्याचे विचार त्याच्या मुद्रेवरून कालिफानें जाणलें व त्यामुळें त्यास फारच मौज वाटली.

मग अबूलहसन वजिरास म्हणाला, ' खजीनदारापासून हजार मोहोरांची एक पिशवी घ्या आणि हा कोतवाल आतां जिकडून जाऊन आला, तिकडे पाठवून " अबूलहसन चैनी" ज्याला म्हण- तात त्याच्या आईस ती पोंहचती करा. ह्या नांवाचा मनुष्य तेथें सर्वांस जाहीर आहे. त्याचें घर विचारल्यास तेथें कोणीही सांगेल जा, जा, लवकर.

जाफर वजिरानें मस्तकावर हात ठेवून हुकूम बजाविण्याविषयींची आपली तत्परता दाखविली, व त्या कालिफापुढें दंडवत घालून तो निघून गेला. मग खजिनदारापासून तेवढी थैली घेऊन ती आपल्या एका दासाच्या डोक्यावर देऊन त्यानें ती अबूलहसनच्या आईस नेऊन दिली; आणि तिला येवढेंच सांगितलें कीं, 'ही थैली कालिफानें पाठवून दिली आहे.' त्या बिचारीला आंतली गोष्ट कांहींच माहीत नसल्यामुळें फारच आश्चर्य वाटलें. ती म्हणाली, 'ही थैली मला देण्यांत कालिफाचा हेतु तरी काय असावा, कांहींच समजत नाहीं.'

वजीर तिकडे गुंतला असतां शहरच्या कोतवालानें आपल्या संबंधाच्या पुष्कळ गोष्टी अबूलहसनास समजाविल्या. इतक्यांत वजिरानें येऊन 'हुकुमाप्रमाणें तजवीज केली' म्हणून अबूलहसनास कळविलें. मग मुख्य खोजा मश्रूर ह्यानें अमीरउमराव वगैरे दरबारी लोकांस कचेरी बरखास्त म्हणून खूण केली. तेव्हां सर्व लोकांनीं सिंहासनाजवळ येऊन त्यांनीं अबूलहसनास सलाम केला, व ते सर्व निघून गेले. पुढें कालिफाचा खासगत पहारा व मुख्य वजीर हेच मात्र काय ते अबूलहसनाजवळ राहिले.

मग कांहीं वेळानें मश्रूर व दुसरा एक खोजा यांनीं दोहों बाजूंस अबूलहसनास धरून त्याच्या आज्ञेवरून त्यास सिंहासनाखालीं उतरविलें; व तो पहिल्यानें ज्या खोलींत होता, तेथपर्यंत दोघेही स्वारीबरोबर राहिले; मग एकटा वजीरच अबूलहसनाजवळ राहिला. त्या खोलींत जातांच अबूलहसनानें वजिरास निघून जाण्यास सांगितलें. मग वजिरानें कालीफ ज्या खोलींत बसला होता तेथें जाऊन झालेला सर्व वृत्तांत त्यास निवेदन केला. तो ऐकून कालिफास फार मौज वाटली.

नंतर अंमळशानें मश्रूरानें येऊन अबूलहसनास एका खोलींत नेलें. तेथें खाण्याचे सर्व चांगले पदार्थ मेजावर मांडून ठेवले होते. मग अबूलहसन येतांच मधुर वाद्यें वाजविण्याची व

गाण्याची एकच गर्दी उडाली. तेव्हां तर त्यास इतका आनंद झाला कीं, तो अगदीं देहभान विसरून गेला. मग तो आपणांशीं म्हणतो, ' जर हें खरोखर स्वप्नच असेल, तर फारच मोठें आहे, व आणखी केवढा वेळ राहील कोण जाणे! पण छे! यास स्वप्न कसें म्हणावें? मी तर चांगला शुद्धीवर आहें ! मी प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहतों, कानांनीं ऐकतों, इकडून तिकडे चालतों! मग स्वप्नांत कसा असेन ? बरें, असो. कांहीं कां असेना ! ईश्वरास माहीत खरें काय तें ! त्याजवर माझा विश्वास आहे. तरी पण वास्तविक पाहतां मी कालीफच आहें असें मला वाटतें. कां तर, इतकें ज्याचें ऐश्वर्य, असा कालिफाशिवाय या पृथ्वीवर दुसरा कोण असणार आहे ? माझा जो हा येवढा सन्मान झाला व होत आहे, व आज जे मी हुकूम केले, तेही तावडतोब बजावण्यांत आले, या सर्व गोष्टींवरून तर मी खचीत कालीफच आहेसें मला वाटतें ! '

मग अबूलहसनास खाणें पुरें झालें असें पाहून त्या दासींपैकीं एकजण जवळच्या खोजास म्हणाली, ' जा रे, लवकर पाणी आणा; महाराजांस मुखशुद्धीकरितां दुसऱ्या महालांत जावयाचें आहे. ' मग, त्या सगळ्याजणी उठल्या व खोजांच्या हातांतलें कोणी सोन्याचें तस्त, कोणी गडवा, कोणी रुमाल वगैरे घेऊन गुढगे टेकून अबूलहसनापुढें बसल्या. मग तोंड धुणें वगैरे झाल्यावर एका खोजानें दुसऱ्या महालाचें दार उघडलें, तेव्हां मश्रूरानें पुढें होऊन या दुसऱ्या महालांत अबूलहसनास नेलें. हा महालही पहिल्याप्रमाणेंच मोठा होता; पण यांत उत्कृष्ट तजाबिरा लाविल्या होत्या; रुजामे, गालिचे वगैरे पसरले होते; व पहिल्यापेक्षां यांतील सरंजाम अगदीं निराळा होता.

नंतर संध्याकाळची वेळ झाली तेव्हां अबूलहसन तिसऱ्या महालांत गेला. तोही बाकींच्याप्रमाणें सुशोभित केला होता. रात्र झाली होती, यास्तव या महालांत तऱ्हेतऱ्हेचे हजारों दिवे लावले

होते. अबूलहसन येतांच तेथेंही बाकींच्या महालांप्रमाणें स्त्रिया वाद्यें वाजवूं लागल्या. तेथें एका मेजावर पोळ्या, पुऱ्या, तसेंच सुकीं केळीं वगैरे सुके जिन्नस मांडून ठेवले होते.

मग अबूलहसनानें आपणांस जें हवें तें त्या मेजावरच्या पदार्थांतून काढून घेतलें. नंतर एक दासी मद्याच्या मेजाजवळ गेली. मग एक प्याला भरून त्यांत तिनें थोडीशी पूड टाकिली, तीच आदल्या रात्रीं कालिफानें अबूलहसनाच्या प्याल्यांत टाकिली होती. मग प्याला अबूलहसनास देऊन ती म्हणाली, ' राजाधिराज, आपलें आरोग्य कायम रहावें या हेतूनें हा प्याला आपली दासी आपणांस देऊं म्हणते, तर महाराजांनीं याचा आदर करावा.'

अबूलहसनानें तो मद्याचा प्याला घेऊन पिऊन टाकला. तेव्हां गुंगी येऊन त्यास गाढ झोप लागली. तोंड तसेंच उघडें राहिलें, डोळे मात्र मिटले. सारांश, कालिफानें पहिल्यानें आपल्याबरोबर आणतांना जशी त्याची अवस्था होती, तीप्रमाणेंच आतांही झाली. या वेळेस तर कालिफाच्या दृष्टीस फारच मौज पडली. अबूलहसनाच्या हातचा प्याला गळाला तो एकीनें अलगद झेलून घेतला. मग कालीफ स्वतः आपल्या खोलींतून निघून त्या दिवाणखान्यांत आला, आणि अबूलहसनाच्या अंगावर त्याचे पहिले कपडे पुनः चढवावयास सांगून, ज्या दासानें पूर्वीं अबूलहसनास खांद्यावर घेऊन आणिलें होतें, त्यासच यास पुनः घरीं पोहोंचवून पूर्वींच्याच खोलींतल्या पूर्वींच्याच पलंगावर नेऊन ठेव, व येतांना दार उघडें ठेवून ये ' असा त्यानें हुकूम केला.

त्या दासानें अबूलहसनास खांद्यावर घेऊन त्याच्या घरीं नेलें; व 'हुकुमादाखल काम करून आलों ' म्हणून कालिफास कळविलें. कालीफ म्हणाला, 'बरें झालें. अबूलहसनाच्या मनांत एकच दिवस कालीफ व्हावयाचें होतें, आणि त्या इमामाचें व चार म्हाताऱ्यांचें पारिपत्य करावयाचें होतें; तेवढें मी त्याच्याकडून करविलें, आतां पुरें झालेंच.'

दुसऱ्या दिवशीं अबूलहसन फार वेळपर्यंत जागा झाला नाहीं. मग त्या पुडीचा अंमल अगदीं नाहींसा झाल्यावर त्यानें डोळे उघडले, आणि पहातो तों आपण आपल्याच घरांत आहों असें त्यानें पाहिलें! मग तर त्यास फारच अचंबा वाटला. नंतर जीं दासींचीं नांवें त्यास आठवलीं, त्या नांवांनीं तो हांका मारूं लागला, आणि म्हणाला, 'काय गे तुम्ही गेलां तरी कोठें? या मजकडे.'

याप्रमाणें अबूलहसन मोठ्यानें ओरडून हांका मारूं लागला, तेव्हां त्याची आई जवळच्याच खोलींत होती ती धांवत त्याकडे आली, आणि त्यास म्हणाली, 'मुला, काय झालें? असा ओरडतोस कां?' हे शब्द ऐकून अबूलहसनानें वर डोकें उचललें व आपल्या आईकडे निष्ठुरपणानें पाहून म्हटलें, 'बाई, तूं मुला म्हणून कोणाला म्हणतेस?' तेव्हां त्याची आई म्हणाली, 'कोणाला म्हणजे? तुला! तूं माझा मुलगा अबूलहसन नव्हेस काय? तूं इतक्यांत आपणांसही विसरून गेलास हें मोठें नवल आहे!' अबूलहसन म्हणाला, 'काय गे थेरडे, मी तुझा मुलगा? तुला चळ लागला, तूं शुद्धीवर बोलत नाहींस. मी अबूलहसन नव्हे, मी कालीफ आहें, समजलीस?' आई म्हणाली, 'मुला, चूप बैस; एखाद्यानें जर असें ऐकलें तर तो तुला वेड लागलें आहे असें समजेल.' अबूलहसन म्हणाला, 'तुलाच आधीं वेड लागलें आहे. मी तुला पुनः सांगतों, कीं, मी सद्धर्मपालक आहें, व मला या पृथ्वीवर ईश्वरानें आपला प्रतिनिधि नेमलें आहे.' हें ऐकून अबूलहसनाची आई दुःखाच्या आवेशानें ओरडून म्हणाली, 'हाय रे मुला! तुला खरोखरच वेड लागलें का रे? तुला कोणत्या भुतानें पछाडलें रे? तूं असें भलभलतेंच काय बोलतोस? देवा, माझ्या लेंकरावर दया कर, आणि सैतानाच्या तडाक्यांतून यास सोडव! मुला, मी तुझी आई आहे व तूं माझा मुलगा अबूलहसन आहेस.'

मग, आपण कालीफ आहों अशी जी अबूलहसनास भ्रांति पडलीशी त्याच्या आईस वाटली, ती दूर करण्याकरितां तिनें त्यास

पुष्कळ गोष्टी सांगितल्या. शेवटीं ती म्हणाली, ' या ज्या खोलींत तूं बसला आहेस ती तुझी आहे; ही कालिफाला बसण्यास योग्य नाहीं, हें तुला समजत नाहीं काय? तर मी जें तुला येवढा वेळ सांगत आहें, त्याचा चांगला विचार कर; उगीच भलत्याच कल्पना मनांत आणूं नको. ' हें आईचें सर्व भाषण अबूलहसनानें स्वस्थपणें ऐकून घेतलें, व तोंडावर दोन्ही हात ठेवून तो उगीच विचार करीत बसला कीं, ' मीं जें हें सर्व पाहिलें व ऐकिलें, तें खरेंच होतें किंवा नुसता भास होता! ' नंतर डोळ्यांवरचे हात काढून जसा एखादा झोंपेंतून जागा होऊन बोलतो, त्याप्रमाणें तो म्हणाला, ' मला आतां खास वाटतें कीं, मी अबूलहसन आहें; तूं माझी आई आहेस; व मी आपल्या खोलींत आहें. ' मग चोहोंकडे पाहून तो आणखी म्हणाला, ' मी अबूलहसनच आहें यांत कांहींएक संशय नाहीं. पण हें वेड माझ्या डोक्यांत कशानें शिरलें हें मला समजत नाहीं. ' हें लेकाचें बोलणें ऐकून अबूलहसनच्या आईस वाटलें कीं, आतां याची भ्रांति सगळी दूर झाली; व ती त्यास स्वप्नाविषयींच आणखी प्रश्न विचारूं लागली. तों इतक्यांत एकाएकीं दचकून अबूलहसन आपल्या आई-कडे निष्ठुर मुद्रेनें पाहूं लागला, आणि म्हणाला, ' म्हातारडे, सगळी भ्रांतींत ही बडबड चालविली आहेस. तूं माझी आई नव्हेस व मीही तुझा लेक नाहीं; तर मी खचीत कालीफच आहें, व तूं कितीही बडबड केलीस तरी ती मी खरी मानणार नाहीं. ' मग त्याची आई म्हणाली, ' मुला, हें बोलणेंच आतां एकीकडे राहूं दे, आपण दुसऱ्या कांहीं गोष्टी बोलूं; नाहीं तर भलतेंच संकट आपणां-वर येऊन गुदरेल. त्या आपल्या गल्लींतल्या इमामाची व त्या चार म्हाताऱ्यांची काल काय दशा झाली, ती सगळी हकीकत तुला सांगतें, ऐक. काल कोतवालानें येऊन त्या पांचाहीजणांस पकडलें, व प्रत्येकास वेतानें खूप फटके दिले. मग त्यांची सर्व रस्त्यांतून धिंड काढली, व त्यांच्यापुढें एक मनुष्य मोठ्यानें ओरडून लोकांस सांगत होता कीं, जे कोणी दुसऱ्यांच्या कामांत कांहीं संबंध नसतां उगीच नसती

उठाठेव करतात, व तेणेंकरून शेजाऱ्यांत वैमनस्य पाडतात, त्यांस असें शासन केलें जातें. याप्रमाणें रस्तोरस्तीं त्यांस फिरविल्यावर त्यांस सक्त ताकीद झाली कीं, तुम्ही या आळींत पुनः पाऊल ठेवूं नये.' हा सर्व वृत्तांत सांगण्यांत अबूलहसनच्या आईचा इतकाच हेतु होता कीं, मी कालीफ आहें अशी जी आपल्या लेकाला भ्रांति झाली आहे तीपासून त्याचें मन काढावें. पण आदले दिवसाचें सर्व कृत्य आपल्या लेकाकडून घडलें हें तिला मुळींच माहीत नव्हतें. यामुळें ह्या तिच्या वृत्तांतानें त्याचें मन दुसरीकडे न लागतां, मी कालीफ आहें, ही त्याची भ्रांति अधिक दृढ मात्र झाली. तो आईचें बोलणें ऐकून घेऊन म्हणाला, 'मी तुझा मुलगा नव्हे, व अबूलहसनही नव्हे,तर खचीत कालीफच आहें; आणि या तूं सांगितलेल्या हकीकतीवरून तर मला संशयच उरला नाहीं. तर तूं खचीत समज कीं, त्या इमामास व चार म्हाताऱ्यांस जी शिक्षा दिली ती मी देवविली. मी खास कालीफ आहे; इतःपर तें सारें स्वप्न होतें, असें अक्षरही मजपाशीं काढूं नको. आतां जसा मी जागा आहें त्याचप्रमाणें त्या वेळेसही चांगला जागा होतों. तेथें कोतवालानें जें मला सांगितलें कीं, 'महाराज, हुकुमाप्रमाणें काम केलें, तेंच तूं आतांही सांगतेस, हा तुझा मजवर उपकार आहे; व त्या इमामाचें व चार लबाड म्हाताऱ्यांचें ठीक पारिपत्य झालें म्हणूनही मला फार आनंद वाटतो. आतां मला एवढेंच समजत नाहीं, कीं मी येथें कसा आलों, इतकेंच. असो. ईश्वराच्या दयेनें सर्व गोष्टी बऱ्या झाल्या. मी तर खराच सद्धर्मपालक कालीफ आहें, आणखी तूं कितीही सांगितलेंस तरी तें मी बिलकुल मानणार नाहीं.'

हें अबूलहसनाचें बोलणें ऐकून त्याच्या आईची खात्री होऊन गेली कीं, आपल्या लेकास खास वेड लागलें. मी कालीफ आहें, मी कालीफ आहे, अशी विलक्षण भ्रांति आपल्या लेकास कां झाली, व ती न सोडण्याचा त्याचा इतका आग्रह कां, हें त्या बिचारीस कोठून समजणार ? तेव्हां सहजच तिला वाटलें कीं, हा शुद्धीवर

बोलत नाहीं. मग ती म्हणाली, 'तुझ्यावर देवानें दया करावी हें माझें त्यापाशीं पदर पसरून मागणें आहे. मुला, असा वेड्यासारखा बकूं नको. तूं खचीत ईश्वराचा कांहीं अन्याय केला आहेस तर त्याबद्दल त्याची क्षमा माग, आणि बुद्धीस चळ न होण्याविषयीं प्रार्थना कर. जरकरितां तुला असें बडबडतांना कोणीं ऐकिलें, तर तुला लोक काय म्हणतील बरें? गोष्ट कानगोंनें कोठच्या कोठें जाते, हें तुला ठाऊक नाहीं काय?'

ह्या आईच्या बोलण्यानें अबूलहसनास अधिकच संताप आला. तो म्हणाला, 'म्हातारे, उगीच बैस म्हणून तुला एकदां सांगितलें ना? आतां जर ऐकणार नाहींस, तर पहा अशी तुझी खोड काढीन कीं, तुला जन्मभर आठवण राहील. मी सद्धर्मपालक कालीफ आहें, माझें म्हणणें तुला मानलें पाहिजे.' असें तो बोलला, तेव्हां त्याच्या आईला वाटलें कीं, याच्या वेडाची आतां कमाल झाली. मग ती बिचारी दुःखानें आणि शोकानें व्याकूळ होऊन डोकें व ऊर बडवून घेऊं लागली. व तिनें मोठ्यानें रडण्यास आरंभ केला. ही आईची अवस्था पाहून अबूलहसनास तिची दया न येतां उलटा तो रागानें अगदीं वेडा होऊन गेला. मग हातांत एक वेताची छडी घेऊन तो आईवर धांवला आणि छडी उगारून म्हणाला, 'चांडाळणी, सांग मला मी कोण तो. सांग लौकर.' मुलगा असा मारायला निघाला असतांही त्या आईस यत्किंचित् सुद्धां भय वाटलें नाहीं. तिनें त्याकडे ममतेनें पाहून उत्तर केलें, 'मुला, जिनें तुला जन्म देऊन लहानाचा मोठा केला, त्या आपल्या आईचीही ओळख टाकण्याइतका तूं ईश्वरास विन्मुख झाला असशील असें माझें मन घेत नाहीं. खरेंच, तूं माझा मुलगा अबूलहसन आहेस, आणि आपला धनी जो कालीफ हरून् अल्‌रशीद त्याचा किताब तूं आपणास लावून घेतोस हें फार गैर करतोस. कालच त्यानें आपणाला एक मोठा नजराणा पाठवून दिला. मुला, खरेंच मी तुला सांगायाचेंच विसरलें. काल मुख्य वजीर जाफर यानें मजकडे येऊन माझ्या

स्वाधीन एक हजार मोहरांची पिशवी केली, आणि मला सांगितलें कीं, ह्या मोहरा कालिफांनीं तुम्हांस बक्षीस दिल्या आहेत; तुम्ही त्यांच्या कल्याणार्थ ईश्वरापाशीं प्रार्थना करा. '

हें ऐकून तर अबूलहसनाच्या अंगांत पिसें चढलें. त्याच्या आईनें त्याला आतां जी मोहोरांची हकीकत सांगितली तीवरून त्याची पक्की खात्री झाली कीं, आपण खरोखरच कालीफच. मग आईच्या अंगावर ओरडून तिला म्हणतो, ' म्हातारडे, आतां तरी मी सांगतों तें तुला खरें वाटेल कीं नाहीं, कीं मी आपला मुख्य वजीर जाफर तुजकडे पाठवून त्या हजार मोहरा तुला देवविल्या; व त्यानेंही माझा हुकूम मी कालीफ होतों म्हणूनच ऐकिला! मी सांगतों तें खरें न मानतां मला भलतेंच सांगून आग्रह धरितेस, कीं मी तुझा मुलगाच म्हणून! तुला सगळा पोरखेळ वाटला आहे आं! ' असें म्हणतांना रागाच्या सपाट्यांत मी करतों काय आणि नाहीं काय हें त्याचें भान अगदीं उडून गेलें. तो आपल्या आईस त्या छडीनें झोडपीत सुटला. त्या बिचाऱ्या आईस गोष्ट अशा थरास जाईल हें वाटलें देखील नव्हतें. मग ती ' धांवा, ' ' धांवा, ' ' मेलें, मेलें, ' म्हणून मोठ्यानें ओरडली, तेव्हां शेजारचे लोक तिजकडे धावून आले. तों तीस अबूलहसन प्रत्येक छडीला विचारी कीं, 'मी कालीफ आहे कीं नाहीं? सांग. ' त्याप्रमाणें तीही प्रत्येक वेळीं ममतेनेंच उत्तर देई कीं, ' छे, तूं माझा मुलगा आहेस. '

शेजारीपाजारी जमून आंत येततोंपर्यंत अबूलहसनाचा राग कांहींसा कमी होऊं लागला. पहिल्यानें जो शेजारी धांवला, तो त्याच्या व त्याच्या आईच्या मध्यें होऊन व त्याच्या हातची छडी घेऊन त्यास म्हणाला, ' अबूलहसन, काय करतोस हें? हें करतांना तुला ईश्वराचें भय नाहीं वाटत? खायलाप्यायला देऊन ममतेनें वाढविलेला मुलगा कधींतरी आईवर हात उगारतो का? तुझी ही आई तुजवर इतकी ममता करते, तिला अशी बडवतांना तुला कांहीं शरम नाहीं वाटत? ' असें तो शेजारी बोलला. पण अबूलहसनानें

त्याकडे नुस्तें पाहिलें, उत्तर कांहींएक केलें नाहीं. मग जसे दुसरे लोक जमायला लागले, तसें त्या सर्वांस न्याहाळून पाहून तो म्हणाला, 'कोणता तो अबूलहसन, ज्याला तुम्ही असें बोलतां तो? काय ? मला अबूलहसन म्हणतां ? '

हें त्याचें भाषण ऐकून त्या शेजाऱ्यांस मोठा अचंबा वाटला. मग जो पहिल्यानें बोलला होता तो अबूलहसनास म्हणाला, ' काय रे, जिनें तुला वाढविलें, व जिच्या बरोबर तूं नेहमीं राहतोस त्या तुझ्या आईलाही तूं जाणत नाहींस ? ' अबूलहसन म्हणाला, "निघा येथून, तुम्ही सर्व लुच्चे लोक आहां ! मी हिला जाणत नाहीं व तुम्हांलाही जाणत नाहीं, आणि कधींही यापुढें जाणणार नाहीं. मी अबूलहसन नव्हे, कालीफ आहें. पण थांबा, हें तुम्हांला चांगलें समजावून दिलें पाहिजे. '

हें त्याचें बोलणें ऐकिल्यावर शेजाऱ्यांची खात्री झाली कीं, यास वेड लागलें. तेव्हां न जाणों, हा रागाच्या सपाट्यांत कोणाचा घातपात करील असें भय पडून त्यांनीं धिंगामस्ती करीत असतांही त्यास धरून पायांपासून तों डोक्यापर्यंत आंवळून टाकला. इतक्यांत एकजण वेड्यांच्या दवाखान्याच्या अधिकाऱ्याकडे गेला. आणि त्यास घेऊन आला. तो आपणाबरोबर एक छडी, बेड्या आणि कांहीं लोक असें घेऊन आला. आपणास वेडा समजून बांधून नेतील असें अबूलहसनास वाटलें नव्हतें. पण दवाखान्याचा अधिकारी व त्याच्या बरोबरचे लोक यांस पाहिल्यावर आपणा स्वतःस मोकळें करण्याकरितां त्यानें खूप झटापट केली. पण दवाखान्याच्या अधिकाऱ्यानें जेव्हां खांद्यावर दोन तीन छड्या सपाटून लगावल्या, तेव्हां तो उगीच राहिला, आणि त्या अधिकाऱ्यास व त्याच्या लोकांस हवें तें त्यांनें करूं दिलें. त्यांनीं लागलींच त्याच्या हातापायांत बेड्या चढविल्या; आणि ते त्यास दवाखान्याकडे घेऊन चालले. तेथें गेल्यावर त्या अधिकाऱ्यानें त्यास आर्धी पन्नास चमक्या यथास्थित दिल्या. आणि मग नेऊन त्याच्या

खोलींत त्यास बसविलें. याप्रमाणें तो मनांत कांहीं दया न आणतां तीन आठवडेपर्यंत त्यास नित्य मार देत गेला; व दररोज बजावीत गेला कीं, ' ध्यानांत ठेव, तूं कालीफ नाहींस बरें ! '

अबूलहसनाची आई त्यास भेटण्याकरितां दररोज दवाखान्यांत येई, व आपल्या लेकाची ती अवस्था पाहातांना तिच्या डोळ्यास पाणी येई. तो नित्य अधिकच वाळत चालला. रोजच्या मारामुळें त्याचें सर्वांग काळेंनिळें दिसूं लागलें, व त्याच्या अंगावर वळ उठून ते इतके ठणकत कीं, त्यास बिछान्यावर इकडून तिकडे वळतां येईनासें झालें. त्याशीं चार सुखाचे शब्द बोलून त्याचें दुःख हलकें करण्यास व अजून त्याची भ्रांति तशीच आहे किंवा काय हें पाहण्यास त्याची आई त्याजवळ राहिली असतां पण करते काय ? तिनें कालिफाविषयीं शब्द काढला कीं पुरे, तो तिजवर असा चवताळे कीं, तिला तेथून दुःख करीत घरीं परत येणें पडे.

असें चालत असतां कित्येक दिवसांनीं, कालिफाचा पोषाख घालून आपण त्याचा अंमल चालविला, आपली आज्ञा सर्व लोकांनीं शिरसामान्य केली, इत्यादि गोष्टींचें स्मरण अबूलहसनाच्या मनांतून बुजत चाललें. मग तो केव्हां आपणाशींच म्हणे, ' अरे, जर मी खरोखरीच कालीफ होतों असें म्हणावें, तर माझ्या स्वतःच्या पोषाखानिशीं मी घरीं कसा आलों ? माझ्याबरोबर तेथले खोजे व दासी कां नाहीं आल्या ? माझा मुख्य वजीर जाफर व दुसरे सर्व अमीर व सरदार जे माझ्या पायां पडत होते, त्या सर्वांनीं मला कसें सोडलें ? खरोखर जर ते माझे आज्ञांकित असते, तर इतका वेळ मला या दुःखाच्या ठिकाणीं ते राहूंच देते ना. खचीत हें सर्व स्वप्नच समजलें पाहिजे, दुसरा मार्ग नाहीं. हें खरें कीं, मी त्या इमामास व चार म्हाताऱ्यांस शिक्षा देवविली; व तसेंच जाफर वाजिरास माझ्या आईकडे हजार मोहोरा पोहोंचवायास मी हुकूम दिला, व हुकुमाप्रमाणें कामेंही बजावलीं गेलीं. या सर्व गोष्टी मला खऱ्याशा वाटतात खऱ्या, पण अशा प्रकारच्याच हजारों दुस-

ज्याही गोष्टी आहेत कीं, ज्या मला समजत नाहींत; व कधीं समजणारही नाहींत; तेव्हां आतां आपण सर्वज्ञ ईश्वरावरच भरंवसा ठेवून रहावें एवढीच गोष्ट खरी.'

एके दिवशीं असें झालें कीं, अबूलहसन याप्रमाणें विचार करीत आहे, तों त्याची आई त्याजकडे आली. इतके दिवस त्या दवाखान्यांत काढल्यामुळें त्याची पूर्वींची कळा पालटून त्याच्या अंगावर अगदीं वाईट कळा दिसूं लागली. ती पाहून त्या बिचाऱ्या आईस फार रडें आलें. मग रडतच ती त्याच्याशीं नेहमींप्रमाणेंच बोलूं लागली, व आज तोही नित्याप्रमाणें जळफळ न करतां तिच्याशीं सौम्यपणें बोलूं लागला; तें पाहून तिला फार बरें वाटलें. मग ती म्हणाली, 'मुला, आतां तुला कसें वाटतें? अजून तरी त्या द्वाड कल्पना तुझ्या डोक्यांतून गेल्या कीं नाहींत? कोणीं मेल्या भुताखेतानें तुझ्या मनांत त्या भरवल्या असतील कोण जाणे!' हें ऐकून अबूलहसन मोठ्या शांतवृत्तीनें म्हणाला, 'आई, तूं म्हणतेस तेंच खरें; मीं आपली चूक पदरांत घेतली. तसाच माझ्या हातून जो घोर अन्याय घडला, त्याचीही तूं मला क्षमा केली पाहिजेस. त्याचा मला आतां फार तिटकारा येतो. तसेंच मी आपल्या शेजाऱ्यास दुर्भाषणें बोललों, त्याबद्दलही त्यांची माफी मला मागणें आहे. हा सर्व अनर्थ माझ्या स्वप्नानें झाला, आणि तें स्वप्न इतकें खरें भासण्यासारखें होतें कीं, तें दुसऱ्या कोणास जरी पडतें तरी त्याच्याकडूनही त्यानें मजप्रमाणेंच वाईट गोष्टी करविल्या असत्या. फार तर काय? पण या क्षणींही मला त्याविषयीं इतका संदेह आहे कीं, तें सर्व मीं खरेंच पाहिलेंसें मला वाटतें. पण तें वास्तविक कांहीं असो, मी त्यास स्वप्नाहून भिन्न कधीं मानणार नाहीं. मला आतां खास समजतें कीं, मी कालीफ नव्हें, तर तुझा मुलगा अबूलहसनच आहे. तो माझ्या तोंडास काळोखी आणणारा आणि शरमेचा दिवस मी कधींही विसरणार नाहीं. आई, इतःपर मी तुझा नेहमीं सन्मान राखीन, आणि तुला

दुःख होईल असें कांहीं करणार नाहीं.' पहिला भ्रमिष्टपणा सोडून देऊन अशा समंजस रीतीनें अबूलहसनास बोलतांना ऐकून त्याच्या आईच्या डोळ्यांत पूर्वी जे दुःखाश्रु आले होते तेच आतां आनंदाश्रु झाले. मग तिचें अंतःकरण आनंदानें सद्गदित होऊन ती आपल्या मुलास म्हणाली, 'मुला, तूं आज चांगला शुद्धीवर बोल-लास यामुळें जो मला आनंद झाला आहे तो काय सांगूं! पण तुला एक गोष्ट सांगावयाची आहे, ती कदाचित् तुझ्या लक्षांत आली नसेल. त्या दिवशीं रात्रीं तूं ज्या पाहुण्यास जेवावयास बोलाविलें होतेंस, त्यानें सकाळीं जातांना सांगितल्याप्रमाणें दार ओढून घेतलें नाहीं; आणि याचमुळें मला वाटतें, कोणा भुताखेतास आंत यावयास सांपडलें व त्यानें तुला असें चमत्कारिक स्वप्न पाडून तुला छळलें. म्हणून,मुला, माझें आतां एवढेंच सांगणें आहे कीं, तुला या अनर्थांतून ईश्वरानें सोडाविलें यास्तव तूं त्याचे आभार मान, आणि सैतानाच्या फांसापासून आपणांस दूर राखण्याविषयीं देवाची प्रार्थना कर.' अबूलहसनानें उत्तर केलें, 'आई, तूं या सर्व अनर्थांचें मूळ चांगलें जाणलेंस. व्यापाऱ्यास ज्या रात्रीं मीं बोलावलें होतें, त्याच रात्रीं मला असलें विलक्षण स्वप्न पडलें. मीं त्या व्यापाऱ्यास जातांना दार लाव म्हणून सांगितलें होतें, पण आतां मी खचीत जाणतों कीं, तें त्यानें केलेंच नाहीं. मलाही असाच तर्क होतो कीं, दार उघडें राहिल्यामुळें कोणी पिशाच्चानें आंत शिरून मला असें वेड लाविलें. बरें, तें असूं दे; पण आतां तर मी चांगला शुद्धीवर आलों ना? आतां मला कसें तरी करून येथून काढण्याची तजवीज कर.' मग अबूलहसनाची आई लाग-लींच दवाखान्याच्या अधिकाऱ्याकडे गेली, आणि 'माझा मुलगा आतां चांगला बरा झाला. आतां यास येथून सोडा' म्हणून त्यास तिनें विनंति केली. तेव्हां त्या अधिकाऱ्यानें येऊन अबूलहसनास कांहीं सवाल केले. त्यावरून आतां त्याचें वेड गेलें असें पाहून त्यानें त्यास मोकळें केलें.

अबूलहसन आपल्या घरीं आल्यावर कित्येक दिवस दाराबाहेर पडला नाहीं. त्याचें शरीर फार क्षीण झालें होतें, यासाठीं कांहीं दिवस त्यांनीं पौष्टिक उपचार चालविले. असें होतां होतां जेव्हां तो पुनः पाहिल्यासारखा झाला, तेव्हां त्यास घरीं सदासर्वदा एकटेंच राहण्याचा त्रास येऊं लागला. म्हणून त्यानें पुनः पूर्ववत् क्रम आरंभिला आणि दररोज तो सकाळीं रात्रीच्या पाहुणचाराच्या तयारीस लागूं लागला.

हा पूर्वीचा क्रम अबूलहसनानें पुनः ज्या दिवसापासून सुरू केला, तोच नव्या महिन्याचा दिवस होता, व याच दिवशीं कालीफ हरून् अल्ररशीद व्यापाऱ्याचा वगैरे वेष घेऊन बाहेर जाऊन परत बगदाद शहरांत येत असे व आपण नेमलेले अंमलदार व रयत यथान्याय चालतात कीं नाहीं हें पाही. अबूलहसन पूर्वीप्रमाणें शहरच्या पुलावर येऊन बसला, तों कांहीं वेळानें मोसल शहरच्या व्यापाऱ्याचा वेष घेतलेला कालीफ व त्याच्या बरोबर पूर्वीचा तोच दास अशा दोघांस आपणाकडे येतांना त्यानें दुरून पाहिलें. त्या दोघांस पाहतांच अबूलहसनाच्या अंगाचा थरकांप झाला. तो आपणाशीं म्हणाला, ‘ हा द्वाड मनुष्य व्यापाऱ्यासारखा मला दिसला म्हणून मीं ते दिवशीं यास आपल्या घरीं नेलें; पण हा व्यापारी नव्हे, खचीत कोणी दुष्ट चेटक्या आहे. यानें माझें दार जातांना मोकळें ठेवून माझ्या घरांत भुतें घातलीं, व मला इतकीं दुःखें भोगावयास लावलीं. खचीत तोच हा दुष्ट येतो आहे. ईश्वरा, मला तूंच सांभाळ ! ’ असें म्हणून अबूलहसन त्याची दृष्टि चुकविण्याकरतां लागलाच पाठमोरा वळला व पुलाच्या कठड्यावर हात टेकून नदीकडे पहात उभा राहिला.

अबूलहसनाची कालिफाच्या वाड्यांत जी गम्मत उडाली, तेवढीच पाहून कालिफास पुरें वाटलें नव्हतें. त्यास घरीं नेल्यावर दुसरे दिवशीं जो वृत्तांत झाला, त्याचा सर्व त्यानें शोध ठेविला होता. जी जी गोष्ट त्याजविषयीं तो ऐके, तिची तिची त्यास अधिकच

बहार वाटे; फार काय ? पण अबूलहसनास वेडा ठरवून त्यास वेड्याच्या दवाखान्यांत नेलें, व तेथें वेड घालवण्याकरितां त्यास दररोज फटके देतात, हा वृत्तांत समजल्यावरही कालिफास फारसें वाईट न वाटतां विशेष गम्मतच वाटली. हा कालीफ उदार मनाचा होता व कोणाचें वाईट करणें त्यास आवडत नसे. अबूलहसनाचा गमती स्वभाव पाहून त्यास वाटलें कीं, यास पुनः आपल्या वाड्यांत नेल्यास आणखी बहार होईल. खेरीज कालिफास हाही धाक पडला होता कीं, एक दिवस राजसत्ता भोगून दुसऱ्या दिवसापासून तो आपल्या नित्यक्रमास सुरळीतपणें लागेल कीं नाहीं कोण जाणें. यास्तव कालिफानें असा बेत केला कीं, आज मोसलशहरच्या व्यापाऱ्याचा वेष घेऊन पूर्वींप्रमाणें त्याची गांठ घ्यावी, व पुनः त्यास पूर्वींप्रमाणें आपल्या वाड्यांत न्यावें. त्याची व अबूलहसनाची दृष्टादृष्ट एकाच वेळीं झाली व अबूलहसनानें वळून नदीकडे तोंड केलें, त्यावरून त्यानें ताडलें कीं, ' हा आपणांवर रागावला आहे व याच्या मनांत आपणास टाळावें असें आहे. ' मग अबूलहसन पुलाच्या ज्या बाजूस उभा होता त्याच बाजूनें तो मुद्दाम चालावयास लागला. मग त्याच्या अगदीं जवळ गेल्यावर वांकून त्याच्या तोंडाकडे पाहून कालीफ म्हणाला, ' हे तुम्हीच का ? अबूलहसनजी, माझ्या मनांत तुम्हांस एकदां भेटावयाचें होतें. '

अबूलहसनानें कालिफाकडे न पाहतां साफ उत्तर केलें, ' नको; तुझा सलाम नको, व तुझें भेटणेंही नको ! आपल्या रस्त्यानें चालता हो ! ' कालीफ म्हणाला, 'काय ! तुम्ही मला ओळखतसुद्धां नाहीं ? गेल्या महिन्याच्या याच दिवशीं आपल्या घरीं आपण माझें जें आदरातिथ्य केलें व आपण दोघांनीं मौजेंत जी दिवसाची रात्र घालवली, ती तुम्हांस आठवत नाहीं काय ? ' अबूलहसनानें पूर्वीं-प्रमाणेंच रागावून उत्तर दिलें, ' मला कांहींएक आठवत नाहीं व तुम्ही कशाविषयीं बोलतां हेंही मी जाणत नाहीं. तुम्हांस पुनः सांगतों, आपल्या वाटेनें जा. '

या उद्धटपणाच्या उत्तराचा कालिफास राग आला नाहीं. अबूलहसनाचा जो नियम—कीं एकदां ज्या मनुष्यास पाहुणचार दिला, त्याशीं पुढें बोलणेंचालणें बिलकूल ठेवावयाचें नाहीं, तो त्यास ठाऊक होता. पण तो नियम विसरल्याचें त्यानें बरेंच ढोंग केलें. तो म्हणाला, ‘ तुमची व माझी भेट झाल्यास नुकता एक महिना झाला, इतक्या वेळांत तुम्ही मला विसरलां असालसें मला वाटत नाहीं. खचीत तुम्हांवर कांहीं तरी संकट येऊन तुमचा जीव त्रासला असावा, म्हणूनच तुम्ही माझा कंटाळा करितां; पण हें तुम्हांस योग्य नव्हें. पहा, तुम्ही मोठ्या आदरानें जें माझें आतिथ्य केलें, त्याजबद्दल तुमचे मोठे उपकार मानून मी तुम्हांस दुवा दिला; व तुमच्या मनांत जी एक मोठी गोष्ट करावयाची होती, तीविषयीं तुमच्याकरितां उद्योग करण्याचें कामही मी पतकरीत होतों, व अजूनही तुमची इच्छा असल्यास पतकरतों. तर मजशीं तुम्ही नीट कां बोलत नाहीं ? ’ अबूलहसन म्हणाला, ‘ तुमची कालिफापाशीं किती पत असेल ती मला ठाऊक नाहीं, व तुमच्या पतीनें आपलें कार्य साधून घेण्याचीही माझी इच्छा नाहीं. पण एवढेंच मला समजतें कीं, तुम्ही मला जो दुवा दिला त्यानें इतकें मात्र झालें कीं, मला वेड लागलें;—दुसरें कांहीं झालें नाहीं. तर तुम्हांस आणखी एक वेळ सांगतों, कृपा करून आपली वाट धरा; मला आणखी त्रास देऊं नका.

अबूलहसनानें इतका झिटकारला असतांही कालीफ निघून गेला नाहीं. तो म्हणला, ‘अबूलहसनजी, मला असा तोडून टाकूं नका. आज तुमची आमची सहज सुदैवानें पुनः गांठ पडली, तर मागच्या खेपेप्रमाणेंच या वेळेसही आपण पाहुणचार दिला पाहिजे, व आपणाबरोबर भोजन करण्याचा मान आजही मला असावा. ’ अबूलहसनानें उत्तर केलें, ‘ येवढ्याकारितां तर आज मी सावधगिरी राखणार. मी काय इतका वेडा आहे, कीं ज्या मनुष्यानें मला एकदां अनर्थजालांत गुंतविलें त्याची पुनः संगत करीन ? तुम्हांस ही म्हण

ठाऊकच आहे कीं, "ज्याचें त्यानें आपलें ढोलकें घेऊन कूच करावें."
तीच म्हण आतां तुम्ही आपणाकडे लावा म्हणजे झालें. तेंच तेंच
मी तुम्हाला शंभरदा कशाला बोलून दाखवूं? ईश्वर तुम्हांस
सन्मार्ग दाखवो! तुमच्यामुळें मला पुष्कळ इजा सोसावी लागली;
आतां आणखी सोसण्याची माझी इच्छा नाहीं.'

कालीफ पुनः अबूलहसनास आलिंगन करून म्हणाला, 'अबूल-
हसनजी, तुम्ही मजशीं इतक्या निष्ठुरतेनें वागाल असें मला वाटलें
नव्हतें. मी तुम्हांला हात जोडून विनवितों कीं, अशीं कठोर भाषणें
मजशीं बोलूं नका; मी तुमचा खरा मित्र आहें असें मनांत वागवा.
मीं तुमचें वाईट कधींही चिंतलें नाहीं, हितच चिंतलें. व अजूनही
जर माझ्या हातून तुम्हांला कांहीं इजा घडली असेल, तर तीबद्दल
तुमचें कांहीं काम माझ्या हातून होत असल्यास मी तें करण्यास
अगदीं तयार आहें. तर तुम्हांवर कोणतें संकट येऊन गुदरलें तें मला
कृपा करून सांगावें.' कालिफाची विनवणी ऐकून अबूलहसनानें
आपला आग्रह सोडला, व त्यास आपल्याजवळ जागा देऊन तो
म्हणाला, 'ज्याअर्थीं तुम्ही माझा वृत्तांत ऐकण्यास इतके उत्सुक
झाला आहां, व मी सांगतों तें तुम्हांस खरेंसें वाटतच नाहीं, त्या-
अर्थीं झालेला मजकूर सगळा तुम्हांस सांगितलाच पाहिजे. तो ऐकून
घेतल्यावर, मी तुम्हांवर जो इतका तळतळतों आहें तें वाजवी आहे
कीं नाहीं हें तुम्हांस कळेलच.'

कालीफ अबूलहसनाशेजारीं बसला, व त्यानें कालिफाच्या
वाड्यांत जागें झाल्यापासून तों आपल्या खोलींत जागा होईपर्यंत
झालला सर्व मजकूर त्यास सांगितला. हें सर्व त्यानें स्वप्नांत झाल्या-
प्रमाणें सांगितलें, व सांगतांना लहानसहान गोष्टीही न वगळतां सर्व
गोष्टी इत्थंभूत झाल्या तशा सांगितल्या. त्या सर्व कालिफास माहीतच
होत्या, म्हणून त्याला फारच मौज वाटली. मग स्वप्नामुळें आपण
कालीफ असण्याची जी भ्रांति अबूलहसनाच्या मनावर राहिली,
तिचें त्यानें खूप वर्णन करून सांगितलें. तो म्हणाला, 'या द्वाड

कल्पनेनें माझ्याकडून विलक्षण अनर्थ करविले. तेव्हां शेवटीं माझ्या शेजाऱ्यांनीं मला वेड्या मनुष्याप्रमाणें बांधवून दवाखान्यांत पाठविलें. तेथल्या अधिकाऱ्यानें निर्दयपणें माझे इतके हाल केले कीं, त्यांचें स्मरण होतांच माझ्या अंगावर कांटा उभा राहतो. बरें, पण इतक्या माझ्या विपत्तीस कारणीभूत तरी कोण, तें तुम्हांस सांगितल्यास मोठा अचंबा वाटेल; हा सर्व अनर्थ तुमच्या पायीं मला भोगावा लागला. कसा म्हणून विचाराल तर सांगतों, ऐका. त्या रात्रीं निजायाच्या वेळीं मी तुम्हांस काय सांगितलें कीं, जातांना एवढें दार लावून घ्या. पण तें तुम्हीं न करतां दार तसेंच मोकळें टाकलेंत. तेव्हां सहजच सैतानाचा आंत रिघाव झाला. त्यानें मला असलें स्वप्न पाडिलें, व तें त्या वेळीं जरी मला मोठें मजेचें वाटलें, तरी वास्तविक पाहतां त्याच्यामुळेंच इतकीं दुःखें मजवर कोसळलीं. ह्या सर्वांचें कारण पाहूं जातां एक तुमची हयगय होय कीं, तिच्यामुळें एक तर मी चांडाळानें आपल्या बिचाऱ्या आईस मरे मरे तों गुरासारखें बडाविलें; व दुसरें त्या बिचारीचा प्राण घेऊन मातृहत्येचें घोर पातक कीं हो शिरीं घेण्यास प्रवृत्त होणार होतों ! आणि तिचा अपराध तरी कोणता ? तर हाच कीं, ती मला मुलगा म्हणे व मीं जो आग्रह धरिला होता, कीं मी कालीफ आहें, त्यास ती होय म्हणेना. खरोखर त्या गोष्टीची आतां मला फार शरम वाटते. याचप्रमाणें तुमच्या दार न लावण्याच्या हयगयीमुळें दुसरीही एक वाईट गोष्ट मजकडून घडली; जेव्हां माझी आई मोठ्यानें ओरडूं लागली, तेव्हां माझे शेजारी तिजकडे धांवून आले. तेव्हां मी रागानें अगदीं वेडा होऊन तिला झोडपीत आहें असें पाहून ते माझ्या आड आले; व त्या आवेशांत मी त्यांच्याशीं हाणमार केली. जर तुम्ही जातांना दार लावतां, तर हे इतके प्रकार कां होते? माझे शेजारी मला वेडा समजून हातपाय बांधून दवाखान्यांत कां पाठविते ? व त्या यमसदनीं कैद भोगून मला दररोज चामड्याचा मार कां मिळता ? '

अबूलहसनानें या सर्व दुःखाच्या गोष्टी मोठ्या आवेशांत सांगितल्या. खरें काय झालें हें कालिफास मात्र माहीत होतें. अबूलहसनास झालेला सर्व वृत्तांत स्वप्नरूप वाटतो आहे, हें पाहून आपली युक्ति चांगली साधली म्हणून त्यास मोठा आनंद झाला; तरी आपली इत्थंभूत हकीकत अबूलहसनानें इतक्या साधेभोळेपणानें सांगितली, ती ऐकून कालिफास मोठें हंसें आलें.

अबूलहसनास असें वाटलें कीं, आपली हकीकत ऐकून यास आपली करुणा येईल; पण तसें न होतां जेव्हां तो वेष घेतलेला मोसलचा व्यापारी मोठ्यानें हंसूं लागला, तेव्हां त्याचा अबूलहसनास फार राग आला. मग तो त्यास रागावून म्हणतो, ' कायहो, माझ्या तोंडावर एवढ्यानें खदखदां हंसून तुम्ही माझी थट्टा करतां काय ? कीं मी एवढा वेळ बोललों तें सर्व तुम्हांस मस्करी वाटली ? मी इतकें तुम्हांस सांगितल्यावरही आणखी तुम्हांस प्रत्यक्ष प्रमाण पाहिजे होय ? तर पहा हें. सांगा, मी थट्टेंत बोलतों कीं कसें तें ! ' इतकें म्हणून त्यानें पुढें वांकून आपली छाती व खांदे उघडे केले, व त्यावर उठलेले चामड्याचे वळ व जखमा कालिफास दाखविल्या. त्या पाहतांच कालिफाचें अंतःकरण चर्र झालें; त्यास बिचाऱ्या अबूलहसनाची दया आली, व आपण थट्टा येथवर नेली म्हणून त्यास फार वाईट वाटलें. त्याचें हंसणें अगदीं लागलीच बंद होऊन त्यानें अबूलहसनास मोठ्या प्रेमभावानें मिठी मारली, आणि तो त्यास म्हणाला, 'अबूलहसनजी, उठा आतां; चला तुमच्या घराकडे जाऊं. आज रात्रीं तुम्हांबरोबर चंगळ करावीशी माझ्या मनांत आहे. उद्यां ईश्वराच्या मनांत असल्यास सर्व गोष्टी बऱ्या होतील. '

कालिफाची सलगीचीं गोडगोड भाषणें अबूलहसनास फार आवडलीं. त्याच्यानें त्याचें मन मोडवेना, म्हणून स्वतः घेतलेली जी शपथ कीं, एकाच मनुष्यास दोनदां पाहुणचार कधींही करावयाचा नाहीं, तो आतां मोडण्याचा निश्चय अबूलहसनानें केला. तो म्हणाला, ' मी तुमच्या बोलण्यास रुकार देतों, पण तो ह्या

अटीवर देतों, कीं तुम्ही जातांना दार लावून घ्यावें; म्हणजे पिशाच आंत शिरून मला भलभलतींच स्वप्नें पाडणार नाहीं.' कालिफानें ती गोष्ट मान्य केली. मग दोघेही शहराकडे निघाले. तेव्हां कालीफ आपणच बोलणें काढून अबूलहसनास म्हणतो, 'तुम्ही मजवर खुशाल भरंवसा ठेवा.मी तुम्हांस शपथपूर्वक सांगतों कीं,मी आपल्या वचनांत यत्किंचितही अंतर करणार नाहीं. आतां तर मजवर विश्वास ठेवण्यास तुम्हांस हरकत नाहीं? तुमचें कल्याण असावें अशी माझी देवापाशीं प्रार्थना आहे; या माझ्या बोलण्याची प्रचीति तुम्हांस लवकरच येईल.'

हें कालिफाचें भाषण ऐकतांच अबूलहसन चालत असतां मध्येंच एकाएकीं थांबला, आणि कालिफास म्हणाला, 'ह्या बोलण्याची मला मुळींच गरज नाहीं. तुम्ही जो पाहुणचार मागतां तो मी तुम्हांस मोठ्या आनंदानें देतों,पण हे तुमचे आशीर्वाद मला नकोत. त्यांनींच मला इतक्यांत जेरीस आणलें.' हें अबूलहसनाचें बोलणें ऐकून कालिफास मनांत फार हसूं आलें. तो म्हणाला, 'बरें, तसें कां होईना! नाहीं तुम्हांस मी आणखी आशीर्वाद देत!' अबूलहसन म्हणाला, 'आतां ठीक बोललांत, एवढ्यानें मला फार संतोष झाला, मला तुमचें आणखी कांहीं नको. तुम्ही आपल्या वचनाप्रमाणें वागलां, म्हणजे मीही तुमचें सर्व यथास्थित करीन.'

अशा रीतीनें बोलतचालत ते दोघे व कालिफाचा दास सहज अबूलहसनाच्या घराजवळ आले. ते आंत गेले तो दिवस मावळूं लागला होता. मग अबूलहसनानें आपल्या आईस हांक मारून दिवा आणावयास सांगितलें, व कालिफास माच्यावर बसवून नंतर तो आपणही त्याजवळ बसला. थोडक्याच वेळांत ताटें वाढून पुढें आलीं. मग दोघांनींही यथेच्छ भोजन केलें. भोजन संपल्यावर अबूलहसनाच्या आईनें येऊन ताटें उचलिलीं व दोघांपुढें फळफळावळ ठेवून ती निघून गेली, ती पुनः आली नाहीं.

नंतर अबूलहसनानें लग्न करावें याविषयीं दोघांचें बोलणें पुष्कळ

वेळ चाललें; मग 'चांगली स्त्री असल्यास मी खास लग्न करीन' असें अबूलहसनापासून वचन घेतल्यावर कालीफ म्हणाला, 'ही गोष्ट मजकडे लागली. तुमच्या मनास येईल अशी सुंदर आणि सुशील स्त्री मी तुम्हांस आणून देतों, आणि शिवाय तुम्हांस खर्च किंवा खटपटही करणें नलगे.' असें म्हणून कालिफानें एक प्याला मद्यानें भरला व त्यांत पूर्वींची ती भुकटी टाकली. मग तो अबूलहसनास देऊन म्हणाला, 'हा प्याला घ्या.'

अबूलहसनानें किंचित् हंसून तो प्याला घेतला, आणि म्हटलें, 'बरें, तुम्ही म्हणतां तसेंच कां होईना? तुम्हासारख्या भल्या पाहुण्यांचा माझ्यानें एवढ्याशा गोष्टीकरतां अनादर करवत नाहीं. तर तुम्ही मला जी स्त्री देणार, तिच्या नांवानें हा मी प्याला पितों. पहा. तरी पण वास्तविक पाहतां सांप्रतच्या माझ्या स्थितींत माझा संतोष आहे; मला आणखी कशाचीही आशा नाहीं.'

तो प्याला अबूलहसनानें पितांच त्याला पूर्वींप्रमाणें एकदम गाढ झोंप लागली. मग कालिफानें लागलीच त्यास आपल्या दासाकडून आपल्या वाड्यांत नेवविलें. कालिफाचा बेत असा होता कीं, अबूलहसनाचें लग्न करून देऊन त्यास आपणाजवळ ठेवावें; म्हणून त्यानें जातांना त्याच्या घराचें दार पूर्वींप्रमाणें उघडें न टाकतां लावून घेतलें.

वाड्यांत येतांच कालिफानें अबूलहसनास चौथ्या महालांत एका पलंगावर नेऊन ठेवण्यास सांगितलें. पहिल्या वेळेस याच महालांत असतां त्यास नेऊन घरीं पोहोंचविलें होतें. मग पहिल्याप्रमाणेंच अबूलहसनाच्या अंगावर कालिफाचा पोषाख चढविला. मग पूर्वींच्या खेपेस त्या महालांत जे खोजे, ज्या दासी वगैरे होत्या त्या सर्वांस दुसरे दिवशीं सकाळीं तेथें हजर असण्यास सांगून ज्यानें त्यानें आपआपलें काम बिनचूक करावें म्हणून कालिफानें हुकूम दिला. मग मस्रूरास आपणांस सकाळीं लवकर उठवावयास सांगून कालीफ निजावयास गेला.

मश्रूरानें नेमलेल्या वेळीं येऊन कालिफास जागें केलें. मग पोषाक चढवून अबूलहसनास ज्या महालांत निजविलें होतें त्यांत तो गेला. तेथें खोजे वगैरे सर्व त्याची वाट पहात बसले होते. मग त्यांस आपल्या मनांतील हेतु थोडक्यांत सांगून कालीफ आपल्या खोलींत निघून गेला. त्या खोलीच्या दारास जाळी लाविली होती, तींतून कालिफास त्या महालांत जें काय चालें तें सर्व दिसे.

नंतर अबूलहसनानें डोळे उघडले, आणि पाहतों तों पहिल्याच दासी व पहिलेच खोजे त्याच्या पुनः दृष्टीस पडले; त्याचप्रमाणें पहिल्या स्वप्नांत पाहिला तोच महाल, तेच दिवे, तेंच सामान, व तीच नकशी त्यानें पुनः पाहिली.

मग अबूलहसन रागानें बोटें चावून मोठ्यानें ओरडून म्हणाला, 'देवा रे देवा! आला ना पुनः तो दुष्ट भास आणि तें द्वाड स्वप्न? आतां माझ्या कपाळचा तो दवाखाना, ते चामड्याचे फटके, आणि तो लोखंडी पिंजरा खास चुकत नाहीं! ईश्वरा, मी दीन तुला शरण आलों, मजवर कृपा कर. काल ज्यास मी घरीं बोलावलें, तो मोठा दुष्ट, लुच्चा मनुष्य आहे; मला या भ्रमांत घालून माझे तो पुनः हाल करणार. कायहो, त्या घातक्या मानभावानें मजजवळ शपथदेखील वाहिली कीं जातांना दार लावीन म्हणून! पण तो कशाला लावील? आतां सैतान मला पछाडून हें कालिफाचें दुष्ट स्वप्न पाडीत, व नानाप्रकारचे भास माझ्या डोळ्यापुढें दाखवीत आहे. हे सैताना, तुझ्या डोक्यावर डोंगराचे डोंगर ईश्वर कोसळून देवो!'

असें म्हणून अबूलहसनानें डोळे मिटले. त्याचें मन अगदीं गोंधळून जाऊन तो बिचारा चिंताक्रांत होऊन पुष्कळ वेळ तसाच विचारांत राहिला. मग क्षणभरानें डोळे उघडून त्यानें भोंवतालचे सर्व पदार्थ पाहिले. ते पाहून त्याचें आश्चर्य अंमळ कमी होऊन त्यास मौज वाटली. मग थोडेंसें हंसून तो म्हणाला, 'जगदीश्वरा, तुझ्याशिवाय मला कोणी त्राता नाहीं. तूं मला या सैतानाच्या भ्रांतीपासून राख.' मग पुनः डोळे मिटून तो म्हणतो. 'हो, बरी

युक्ति सुचली. हा सैतान निघून जाईपर्यंत आपलें निजावेंच म्हणजे बरें. मग तो जाईतोंपर्यंत दुपार कां होईना!'

याप्रमाणें अबूलहसनानें आपल्याशीं बेत केला खरा, पण त्याचा बेत त्या स्त्रियांनीं चालूं दिला नाहीं. मग त्या सगळ्याजणी त्याच्या त्या दासी पुनः अबूलहसनास म्हणूं लागल्या, 'राजाधिराज, दासी आपणापाशीं विनंति करताहेत कीं, दिवस उगवला, तर महाराजांनीं उठावें.'

हें भाषण ऐकून अबूलहसन चोहोंकडे पाहूं लागला, तेव्हां आपण पूर्वीं ज्या महालांत होतों तोच हा महाल असें पाहून त्यास वाटलें कीं, आपणावर कोणीं जादू तर केली नसेल ना? तरी त्याच्या मनाची खात्री होती कीं, पूर्वीं जसें मला स्वप्न पडलें तसेंच हेंही आहे. पण पूर्वींप्रमाणें आतांही दुःखें भोगण्याची पाळी येईल कीं काय कोण जाणे, असा त्यास फार धाक होता. मग जसा एखादा मनुष्य भांबावलेला असतो, त्याप्रमाणें अबूलहसनाची अवस्था झाली. त्यानें आपले हात व डोळे वर केले. तो मोठ्या दीन स्वरानें म्हणाला, 'देवा, मजवर दया कर; तुजशिवाय मला आतां कोणी नाहीं. खचीत माझी खोली उघडी राहिल्यानें पिशाच आंत शिरलें, व तें मला या सगळ्या भूतचेष्टा दाखवीत आहे.' हें अबूलहसनाचें बोलणें ऐकून कालिफास पराकाष्ठेचें हंसें आलें, तें त्यानें मोठ्या प्रयत्नानें आवरलें.

याप्रमाणें अबूलहसन मोठ्या भ्रमांत पडला असतां त्यानें जवळच्या एका राजदरबारी मनुष्यास आपणाकडे बोलावलें, आणि त्यास म्हटलें, 'ह्या माझ्या कानाचें टोंक किंचित् चाव, म्हणजे मी झोंपेंत आहे किंवा जागा आहें हें मला समजेल.' झालेल्या हुकुमाप्रमाणें त्या मनुष्यानें अबूलहसनाच्या कानाचा चावा घेतला; पण तो असा कडकडून घेतला कीं त्यानें अबूलहसनास ओरडावयासच लावलें. तों लागलींच सर्व वाद्यांचा एकदम गजर सुरू झाला. आणि त्या दासी व तेथले दरबारी लोक हेही अबूलहसनाभोंवतीं

मोठ्या स्वरानें गाऊन नाचूं लागले. तें सर्व पाहून तर अबूलहसन आपलें भान विसरून जाऊन अगदीं भ्रमिष्टासारखा झाला, व अशा नानातऱ्हेच्या चेष्टा करूं लागला, कीं कालिफास लपून राहणें नको असें झालें. अबूलहसनास एकाएकीं आलेली लहर पाहून त्यास इतकें हंसें आलें कीं तो मागें पडला, व त्याचें हंसणें सर्व वाद्यांच्या गजरावर ऐकूं आलें. हंसें आटपेनासें होऊन त्याच्या योगानें त्याचा दम कोंडण्याचा सुद्धां बेत आला होता. शेवटीं त्यानें उठून जाळी उघडली, आणि 'मोठ्यानें हंसवून मला मारावयाचें आहे होय?" असें तो बोलला.

कालिफाचा शब्द ऐकतांच सर्व स्तब्ध राहिले आणि वाद्यें बंद झालीं. अबूलहसनही उगाच राहिला, आणि शब्द जिकडून ऐकूं आला तिकडे पाहूं लागला, तों आपण ज्यास मोसलचा व्यापारी समजत होतों तोच हा कालीफ आपणाकडे येत आहे, असें त्यानें पाहिलें. तरी तो चपापला नाहीं. त्यास आतां खास समजून आलें कीं, आपण चांगले जागें आहों, व पाहतों हें खरें आहे. मग कालीफ आपणांस थट्टेनें विचारीत आहे असें जाणून, त्यानेंही थट्टेंच उत्तर केलें. तो कालिफास मोठ्या सलगीनें म्हणाला. 'हं हं, आपणच ना ते मोसलचे व्यापारी! आणि मलाच का म्हणतां हंसवून हंसवून मारतोस का म्हणून. वा, ठीक महाराज,आपल्या पायीं तर मला इतकी विपत्ति भोगावी लागली; तुम्हीं मजकडून माझ्या आईस तर इजा देववलीत, दवाखान्यांत कोंडवून मला फटके तर मारवलेत, आमच्या गल्लींतल्या मशिदीच्या इमामास व दुसऱ्या चार म्हाताऱ्यांस दंड तर भोगवलात; खचीत त्या सर्व गोष्टींस कारणीभूत तुम्हीच. त्यांत माझा कांहींएक संबंध नाहीं, आणि इतकें करूनसवरून मीच तुम्हाला मारतों अं? शाबास!' कालीफ हंसतां हंसतांच त्यास उत्तर करतो, "अबूलहसनजी, तुम्ही म्हणतां ही गोष्ट खरी आहे, तर मी आतां एवढें करणार कीं, तुम्हास जी इतकी इजा

मीं भोगावयास लावली, तीबद्दल तुम्ही मागाल ती वस्तू तुम्हांस देईन.'

असें म्हणून कालीफ आपल्या खोलींतून त्या महालांत आला आणि एक उत्कृष्ट प्रकारचा पोषाख आणून, त्यानें त्या स्त्रियांस व दरबारी लोकांस तो अबूलहसनच्या अंगावर घालावयास सांगितलें. पोषाक घातल्यावर कालीफ अबूलहसनास आलिंगन देऊन म्हणाला, 'गड्या, आजपासून तूं माझा भाऊ झालास तर तुला हवें तें माग, तें तुला लागलींच देतों.' अबूलहसन म्हणाला, 'महाराज, मला अशा भ्रांतींत तुम्ही कशानें व कशाकरितां घातलेंत, हें अगोदर समजल्याशिवाय माझें मन स्वस्थ होणार नाहीं.'

ही अबूलहसनाची विनंती ऐकून कालिफानें सर्व हकीकत सांगण्यास आरंभ केला. तो म्हणाला, अबूलहसनजी, माझे अंमलदार या बगदाद शहरांत नीट बंदोबस्त ठेवतात कीं नाहीं हें गुप्तपणें पाहण्याकरितां मी नानाप्रकारचे वेष घेऊन फार करून रात्रींचाच फिरत असतों. तसेंच या शहरच्या आसपासचीही खबरबात समजावी म्हणून दर महिन्याचे पहिल्या दिवशीं वेशीच्याबाहेर लांबपर्यंत मी चक्कर घेऊन येतों. तें कधीं या बाजूस व कधीं त्या बाजूस असें घेतल्यावर या पुलावरून नेहमीं शहरांत येतों. ज्या दिवशीं तुम्हीं मला पहिल्यानें आपल्या घरीं बोलाविलें तो हाच दिवस होता. त्या रात्रीं बोलत असतां तुम्हीं असें म्हटलें कीं, "जर कोणी मला एक दिवस कालिफाचा अधिकार देईल,तर या येथल्या मशिदींतील इमामाचें व त्याचे मसलतदार जे चार म्हातारे त्यांचें अगोदर चांगलें पारिपत्य करीन. मग एक दिवसपर्यंत कालीफ होण्याची तुमची फार इच्छा आहे असें पाहून मीं मनांत आणलें कीं या गोष्टीवरून करूं गेल्यास मोठी मौज करतां येईल. मग तुम्हांस आपला अधिकार एक दिवसपर्यंत कसा द्यावा याविषयीं युक्ति योजीत असतां एकदम मला एक बेत सुचला. मजजळ एके प्रकारची पूड होती, तिचा गुण असा कीं, ती घेतल्याबरोबर मनुष्यास गाढ

झोंप लागते, ती कांहीं नेमल्या वेळेपर्यंत जात नाहीं. तुम्हांस मी जो शेवटला प्याला त्या दिवशीं दिला, त्यांत ती पूड तुम्हांस न कळतां अगोदर टाकली होती. प्याला पितांच तुम्हांस एकदम गर्कन् झोंप आली. तेव्हां मजबरोबर जो मी दास आणला होता, त्याजकडून मीं तुम्हास राजवाड्यांत आणविलें, व येतांना तुमच्या खोलीचें दार तसेंच उघडें टाकलें. पुढें राजवाड्यांत जागें झाल्यापासून तों संध्याकाळपर्यंत जो वृत्तांत झाला तो सांगावयास नकोच. तुम्हांस तो सगळा ठाऊकच आहे. रात्रीं मद्यपान करण्याच्या वेळेस एका दासीकडून मी तुम्हांस तीच पूड पुनः देवविली. तेव्हां तुम्हांस पूर्ववत् गाढ झोंप आली, व ज्या दासानें तुम्हांस येथें आणलें त्याकडूनच तुम्हास तुमच्या घरीं पोहोंचतें केलें, व बाहेर निघतांना दार उघडेंच ठेव, म्हणून मी त्यास बजावलें होतें. त्यापुढें झालेला वृत्तांत तर तुम्हींच मला सांगितला. तुमचे इतके हाल होतीलसें मला वाटलें नव्हतें. असो. झाल्या गोष्टीस उपाय नाहीं. परंतु तुम्हास माझ्यामुळें जीं दुःखें सोसावयास लागलीं, त्यांची आठवण बुजेलसें माझ्या हातून जितकें होईल तितकें मी करण्यास तयार आहे, तर तुम्हांस काय हवें तें मन मोकळें करून खुशाल मागा म्हणजे तें मी तुम्हांस देईन.'

अबूलहसनानें उत्तर केलें, 'राजाधिराज, मला पुष्कळ विपत्ति भोगाव्या लागल्या ही गोष्ट खरीच, पण त्या सरकारच्या पायांकरितां भोगाव्या लागल्या हें आतां समजल्यानें मला त्या सर्वांचा विसर पडला. आतां आपण प्रसन्न होऊन मला हवें तें देण्यास तयार झालां आहां, तर आपला शब्द एकदां निघून गेल्यावर ही गोष्ट होण्यास कांहीं अशक्य आहे असें मुळींच नाहीं; पण इतकेंच-ईश्वरकृपेनें मला सर्व कांहीं अनुकूळ आहे. मागावेसें कांहीं उरलेंच नाहीं. तरी आपला आग्रहच असल्यास इतकेंच मला मागणें आहे कीं, या दासास सरकारच्या पायांपाशीं नेहमीं राहण्याची परवा-

नगी असावी, कीं, तेणेंकरून आपला थोरपणाचा वर्तनक्रम पाहून मला सदैव सुखसमाधान होईल.'

अशी अबूलहसनची निःस्पृहता पाहून कालिफाची त्यावर फारच मर्जी बसली. तो म्हणाला, 'ही आपली विनंति मला मान्य आहे; तर इतःपर मी वाड्यांत जेथें जेथें असेन, तेथें तेथें हव्या त्या वेळीं तुम्ही मजकडे आल्यास तुम्हांस कोणी आडकाठी करणार नाहीं.' असें म्हणून कालिफानें अबूलहसनास राहण्यास लागलींच एक महाल नेमून दिला; व त्यास कांहीं सरकारी हुद्दा न देतां आपल्याजवळच त्याची नेमणूक केली. मग तत्क्षणीं अबूलहसनास हजार मोहोरा देवविल्या, त्या त्यानें घेऊन कालिफास लवून मुजरा केला. मग कालीफही दरबारास निघून गेला.

नंतर अबूलहसन आपल्या आईकडे गेला, व झालेला मजकूर सांगून कालिफानें केलेली मेहेरबानी त्यानें तीस कळविली. मग तो तिला सांगूं लागला, 'आई, जें स्वप्न म्हणून तुला वाटलें होतें, तें स्वप्न नव्हतें; मी खरोखरच एक दिवसभर कालीफ होतों, व तितक्या वेळांत कालिफाचा अधिकार मी चालविला. तुला कदाचित् खोटें वाटेत असेल, पण हा वृत्तांत खुद्द कालिफानेंच मला सांगितला. तेव्हां आतां संशय उरलाच नाहीं.'

याप्रमाणें घडलेली अबूलहसनाची चमत्कारिक गोष्ट थोडक्या वेळांत सर्व बगदादशहरभर पसरली. मग तेथून जवळच्या प्रांतांत व त्यांतून जातां जातां दूरदूरच्या देशांच्या लोकांसही ती सर्व गोष्ट इत्थंभूत माहीत झाली.

हा नवा अधिकार मिळाल्यावर अबूलहसन कालिफास कधींही विसंबला नाहीं. त्याचा स्वभाव फार चांगला असे, व जेथें जाई तेथें आपल्या गमतीदार भाषणानें तो सर्वांस रंजवी. कालिफास तर त्यावांचून चैन पडेनासें झालें, व एखादी मजेची गोष्ट करावयाची असल्यास ती त्यावांचून होत नसे. जुबैदीराणीकडे देखील कालीफ कधीं कधीं त्यास नेई. तीस त्यानें त्याची सर्व गोष्ट आधींच सांगि-

तली व ती ऐकून घेऊन तिला फार मौज वाटली. जुबैदीही अबूल-हसनास चाहूं लागली.

मग कालीफ आणि जुबैदी यांच्या विचारानें अबूलहसनचें नूझातूल औदात नामक दासीशीं लग्न झालें. लग्नानंतर अबूलहसन व नूझातूल औदात यांनीं पुष्कळ दिवस मजा मारण्यांत घालविले. पण त्यांच्या खर्चाची रक्कम किती वाढली हें त्यांच्या ध्यानीं देखील आलें नाहीं. त्यांस जें जें लागे तें तें त्यांच्या वांकनिसानें त्यांस मुकाट्यानें पुरवावें. पण त्यास इतके दिवसांत मुळींच पैसा न मिळाल्यानें त्यानें झालेल्या खर्चाचा हिशेब अबूलहसनास दिला, तों खर्चाची रक्कम फार जास्त होऊन गेली असें त्यानें पाहिलें. खेरीज अबूलहसनानें आपणाकरितां व आपल्या बायकोकरितां उंची कापड आणावयास सांगितलें होतें. तेव्हां एकंदर होणारा खर्च पाहूं जातां रक्कम इतकी वाढली कीं, कालिफानें जुबैदीनें लग्नाचे वेळेस जें द्रव्य त्यांस दिलें होतें, तें नुसतें खाण्याविषयींच्या झालेल्या खर्चासच पुरें इतकें झालें. या गोष्टीबद्दल त्यांस फार चिंता लागली पण आलेला प्रसंग पार पडावा कसा ?अबूलहसनाच्या मनांत वांकनिसाचा पैसा चुकवून जाण्याचें होतें, व तें नूझातूल औदात हीसही पसंत झालें.मग त्यांस बोलावून आणून त्यांनीं त्याचे सर्व पैसे चुकते केले, पण त्या वेळेस आपलें संकट यत्किंचितही समजूं दिलें नाहीं.

आपला पैसा रोख परत मिळाला म्हणून वांकनिसास फार आनंद झाला. मग तो निघून गेल्यावर हीं दोघें मोठ्या विवंचनेंत पडलीं. त्यांस अगोदर असें वाटलें होतें कीं, आपणांस खर्चाची तूट कधींही पडणार नाहीं.पण लग्न होऊन एक वर्ष लोटतें न लोटतें तोंच सर्व पैसा संपून गेला, असें पाहून त्यांस मोठी काळजी लागली. कालिफानें अबूलहसनास वचन दिलें होतें खरें, कीं मी तुला कोणत्याही गोष्टीची कमताई पडूं देणार नाहीं; पण कालिफापाशीं पुनः पैसा मागण्याचा त्यास धीर होईना. त्यानें नुकताच इतका पैसा दिला असून तो आपण इतक्या लवकर उधळून टाकला या गोष्टीची

त्यास फार शरम वाटली. बरें, आईकडे जाऊन तिजपाशीं ठेवलेला पैसा खर्चास मागावा, तर तीही पंचाईत. कारण त्यामुळें तिला लागलींच समजून येईल कीं, दैवयोगानें पुनः पैसा मिळाला असूनही मुलानें तो पहिल्यासारखाच आणखी उधळून टाकला. अशी त्यास दोहों-कडून मोठी अडचण झाली.

नूझातूल औदात हिलाही तसाच संकोच वाटला. तिनें विचार केला कीं, आपण राणीची दासी असतां तिनें येवढी कृपा केली व लग्न करण्यासही परवानगी दिली, तेव्हां आतां ह्याहून अधिक आणखी मागणें ठीक दिसत नाहीं. याप्रमाणें दोघेही कांहीं वेळ खालीं माना घालून स्वस्थ बसलीं, शेवटीं अबूलहसन नूझातूल औदात हिजकडे पाहून मोठ्या आनंदयुक्त मुद्रेनें तीस म्हणाला, ‘ तुझ्या तोंडाकडे पाहतांच मला स्पष्ट दिसतें कीं, मजप्रमाणेंच गोंधळांत पडून उपाय काय करावा याविषयीं तूंही काळजी करीत आहेस. पण मीं केलेला स्वतःचा बेत तुला सांगतों ऐक. आपण आतां अशी एक युक्ति लढवूं कीं कालीफ व जुबैदी यांच्याकडे न जातां आपणांस पैसा मिळावा. मला तर एक युक्ति सुचली आहेच, पण ती साधायास तुझें साह्य पाहिजे. ’

हें बोलणें ऐकून नूझातूल औदात हिला समाधान वाटलें, व कांहींसा धीर आला. ती म्हणाली, ‘खरोखर, या गोष्टीची मला मोठी काळजी पडली होती; आणि मी बोललें नाहीं याचें कारण एवढेंच कीं काय करावें हें मला कांहींच सुचेना. तुमचा बेत ऐकून तर खचीत मला पुष्कळ धीर आला. आतां तो काय तेवढा मला कळवा, म्हणजे त्याकरतां मी मनापासून झटेन. ’ अबूलहसन म्हणाला, ‘ ठीक आहे तर. मीं काढलेला बेत काय तो हाच कीं आपण दोघें कालिफास व जुबैदीस फसवूं. मला खचीत वाटतें कीं, या आपल्या हिकमतीनें खूष होऊन दोघेंही आपणांस बक्षीस देतील ? तर ती हिकमत ही कीं, आपण दोघें मरूं. ’

हें ऐकतांच नूझातूल औदात म्हणाली, ‘ काय ! दोघें मरूं !

तुम्हांस हवें तर तुम्ही मरा; मला नाहीं अजून माझा जीव नकोसा झाला. खरोखर, जर तुम्हांस हा बेत करणें असेल, तर तो तुम्ही स्वतः खुशाल करा; मी कधीं अशास कबूल होणार नाहीं. ' अबूल-हसन म्हणाला, ' अग, थांब. अगोदर ऐकून तर घेशील ? मी म्हणतों काय हें तूं समजलीच नाहींस. दोघें मरूं म्हणजे खरोखर मरायचें नाहीं, उगीच सोंग करावयाचें ! ' ती म्हणते, ' हं ! असें का ! हें कोणीं समजावें ! माझ्या मनांत भलतीच कल्पना आली. बरें, असो. तसें असल्यास मी तुमच्या वचनाबाहेर नाहीं; जसें म्हणून सांगाल तसें करीन. ' अबूलहसन म्हणाला, बरें तर, आतां ऐक सगळा बेत कसा तो. आपला बेत साधण्याकरतां मेल्याचें सोंग अगोदर मी घेईन. मग तूं लागलींच जाऊन एक ताटी आण. व तिजवर मला प्रेताप्रमाणें निजव, मग रिवाजाप्रमाणें मला या खोलीच्या मध्यें ठेवून माझ्या डोक्यावर एक पागोटें ठेव आणि माझे पाय मक्केकडे करून स्मशानांत नेण्याची सर्व तयारी करून ठेव. हें सर्व आटोपल्यावर मोठ्यानें रडावयास लाग व वस्त्रें फाडीत, केश तोडीत, एकच कल्होळ करीत जुबैदीराणीकडे जा. तिनें काय झालें म्हणून विचारल्यास पुष्कळ स्फुंदून अडखळत सर्व हकीगत सांग. मग तुझी दया येऊन ती तुला माझ्या उत्तरकार्या-करितां पैसा व माझ्यावर घालण्याकरितां कांहीं उंची कापड वगैरे देईल. तें सर्व घेऊन तूं आलीस कीं लागलींच मी उठेन, व तुला माझ्या ठिकाणीं निजवीन; मग मीही कालिफाकडे जाऊन तुझ्या-प्रमाणेंच सर्व बतावणी करीन, व मलाही तुझ्याप्रमाणेंच कालिफा-पासून पैसा, कपडे वगैरे मिळतील. '

याप्रमाणें अबूलहसनानें आपला सर्व बेत कळविल्यावर नूझातूल औदात म्हणाली, ' मला खचीत वाटतें कीं, अशी युक्ति केली असतां मोठी मजा होईल, आणि कालिफ व जुबैदी यांस ती सम-जल्यावर दोघेंही आपणांस शाबास म्हणतील. तर चला, गमतां कामा नये. सोंगाची बतावणी पुरी झाली पाहिजे. मी जाऊन

ताटी आणतें, तों तुम्ही आपल्याकडची सर्व तयारी करून ठेवा. या कामाची माहिती माझ्यापेक्षां कोणासही चांगली नाहीं; कारण मागें राणीच्या जवळची कोणी दासी मेल्यास या कामाकडे माझी योजना असे.'

मग अबूलहसनानें बायकोनें सांगितल्याप्रमाणें सर्व तयारी केली. खोलीच्या मध्यें जी सतरंजी आंथरली होती तिच्यावर तो उताणा पडला, आणि हात उरावर आडवे धरून तसाच राहिला. मग नूझातूल औदात हिनें त्याला चहूंकडून आंवळला तो असा कीं, आतां यास ताटीवर उचलून ठेवून स्मशानांत न्यावयाचाच काय असें एखाद्यास वाटावें. मग त्याचे पाय मक्केकडे करून तिनें एक छानदार कापड त्याच्या तोंडावर टाकलें, आणि त्यावर पागोटें अशा बेतानें ठेवलें कीं श्वासोच्छ्वास करण्यास त्यास अडचण न पडावी. इतकें झाल्यावर तिनें आपले केंस सोडले आणि आरडूनओरडून मोठा आकांत मांडला. मग चिरगुटें फाडीत, केंस तोडीत व गाल आणि ऊर बडवीत, ती बाहेर पडली, व जुबैदीच्या महालाकडे निघाली. जुबैदीराणी आपल्या महालांत बसली होती, तेथून तिला नूझातूल औदात हिच्या किंकाळ्या ऐकूं आल्या. मग एवढ्यानें कोण रडतें आहे म्हणून शोध करण्याकरितां तिनें आपल्या दासींस पाठविलें. त्या खिडकींत येतांच त्यांच्या दृष्टीस ही पडली; मग त्यांनीं परत जाऊन राणीस कळविलें कीं, अशा किंकाळ्या फोडीत आपली दासी नूझातूल औदात ही येत आहे.' हें ऐकतांच जुबैदी तिला पाहण्याकरितां बाहेरच्या खोलीच्या दारापर्यंत घाबऱ्या घाबऱ्या धांवत आली.

या वेळेस नूझातूल औदात हिनें शोक दाखविण्याची आपली शिकस्त केली. खोलीचें दार अर्धें उघडून व पडदा आपल्या हातानें एकीकडे सारून आणि राणी आपणांकरितां दारापाशीं आली आहे असें पाहतांच ती आणखी मोठ्यानें ओरडूं लागली, व ऊर अधिकच बडवून घेऊं लागली, मग जवळ जातांच तिनें जुबैदीच्या पायांवर लोळण घेतली व ओक्साबोक्शीं रडण्यास आरंभ केला.

तिची अशी अवस्था झालेली राणीनें कधींच पाहिली नव्हती. तिला हा प्रकार कांहींच उमगेना; मग तीस विचारूं लागली, ' अग, पण तुला झालें तरी काय ? ' नूझातूल औदात कांहींच उत्तर न देतां तशीच पुष्कळ वेळ स्फुंदत उभी राहिली. तेणेंकरून तिनें असें दाखविलें कीं, रडें आवरतां आवरत नाहीं. शेवटीं मोठा गहिंवर आणून ती म्हणाली ' बाईसाहेब, मजवर दुसरें कसलेंही संकट आलें असतें तरी मी जुमानलें असतें, पण आजतर आकाशाची कुऱ्हाड माझ्या डोईवर पडली ! आज मी अनाथ झालें. बाईसाहेबांशिवाय मला सांभाळणारें आतां कोणी उरलें नाहीं ! देवा, आमच्या बाईसाहेबांस पुष्कळ आयुष्य दे, व सुखांत नांदूं दे ! माझें तर कपाळ फुटकेंच ! महाराजांनीं व बाईसाहेबांनीं एवढी कृपा करून अबूलहसनजीसारखें रत्न संसारांत माझी सोबत करून दिलें होतें; पण, नशीब माझें, तें मला पचावें कोठून ? '

असें म्हणून नूझातूल औदात ही फारच मोठ्यानें रडूं लागली, व जुबैदीच्या पायांशीं तिनें पुनः लोळण घेतली. हें वर्तमान ऐकून तिला फारच चमत्कार वाटला, आणि ती गहिंवरून म्हणाली,'काय! अबूलहसन मेला ? झालें तरी काय ? अंगानें कसा निरोगी आणि धट्टाकट्टा होता ! तसाच स्वभावानें मनमिळाऊ असून कसा गमती होता ! तो इतक्या लवकर मरेल असें कोणास वाटलें नव्हतें ! ' असें म्हणतांना तिच्या डोळ्यांस पाणी आलें; मग तिच्या दासीस फार अवघड वाटून त्याही रडायला लागल्या, कारण जुबैदी व कालीफ यांच्यांशीं भाषण करीत असतां अबूलहसनाची खुबीदार बोलणीं ऐकून त्यांस फार मजा वाटे.

याप्रमाणें तीं सर्व अबूलहसनाचें मरण खरें मानून दुःख करूं लागलीं. मग कांहीं वेळ गेल्यावर जुबैदीराणी नूझातूल औदात हिला म्हणाली, ' कृत्ये, मला वाटतें तुझ्याच पायीं तो मेला असेल, तूं अशी कजाग बायको, त्या बिचाऱ्याला कधीं चैनही पडूं दिलें नसशील झालें. शेवटीं मेला तेव्हां सुटला. ' हें भाषण ऐकून

नूझातूल औदात हिनें फार कष्टी झाल्यासारखें दाखविलें आणि म्हटलें, ‘ बाईसाहेब, या दासीनें आपणापाशींही चाकरी केलीच आहे, तेव्हां माझी वर्तणूक कशी आहे हें स्वतः आपणांस ठाऊक आहेच. असें असूनही जर बाईसाहेब मला अशी चांडाळीण समजत असतील, तर मग तोंड लपविण्यास मला कोठेंही जागा राहणार नाहीं. मी तर त्यांची बरदास्त जीवापलीकडे करीत असे, व त्यांनींही कोणत्या गोष्टीबद्दल मला नाहीं म्हटलें नाहीं. याप्रमाणें आम्हां दोघांची परस्पर फार प्रीति होती. पण मीं कितीही सांगितलें तरी उपयोग काय ? खरोखर, जर ते या वेळेस असते, तर या गोष्टी-विषयीं आपली खात्री करून देते; पण बाईसाहेब काय सांगूं ? काळानें ही उडी घेतली ! एऱ्हवीं अशा वयांत मरावयास त्यांस काय झालें होतें ! ’

असें बोलत असतां तिचे डोळे पाण्यानें भरून आले. तेव्हां तिची दया येऊन जुबैदीस हें सर्व खरेंच वाटलें. कारण नूझातूल औदात मागें तिच्या जवळ होतीच, तेव्हां सर्वांशीं प्रेमभावानें वागावयाचें, सांगितलेलें काम मोठ्या आस्थेनें करावयाचें, वगैरे तिचे गुण तिच्या नजरेस आले होते. यास्तव तिनें आपल्या खाजि-न्यांतून शंभर मोहरांची एक पिशवी, व एक उंची कापडाचा तुकडा तिला देण्याकरितां आणावयास सांगितलें. मग ती पिशवी व तो तुकडा तिला देवविला. तेव्हां नूझातूल औदात हिनें राणीच्या पायांवर डोकें ठेविलें,आणि तिचे फार उपकार मानिले.जुबैदी म्हणाली, ‘ जा आतां. हें कापड नवऱ्याच्या प्रेतावर घाल, व पैसा दिला आहे तो त्याच्या उत्तरकार्याकडे लाव. त्यांत कांहीं कमी होऊं देऊं नको; आणि हें सर्व आटोपलें म्हणजे स्वस्थ मनानें रहा, उगीच शोकानें वेडी होऊं नको. याउपर तुझा सांभाळ करणारी मी आहे.’

आपली हिकमत अशी पुरतेपणीं साधली म्हणून नूझातूल औदात हिला फार आनंद वाटला. मग जुबैदीच्या महालाबाहेर पडतांच तिनें आपले डोळे पुसले, आणि झालेला वृत्तांत सांगण्या-

करितां ती अबूलहसनाकडे परत आली. ती आंत आली तों अबूलहसन खोलीच्या मध्यें प्रेताचीं वस्त्रें अंगावर घातलेला जशाचा तसा पाहून नूझातुल औदात हिला मोठें हंसू आलें आणि ती त्यास हंसतच म्हणाली, ‘ उठा, हें पहा राणीला फसवून तिजपासून काय काय आणलें ! आतां आजची ददात मिटली. ’ अबूलहसन लागलीच उठला आणि ती पिशवी व उंची कापड पाहून त्याला मोठा आनंद झाला.

मग आनंदाच्या भरांत येऊन नूझातूल औदात हंसून त्यास म्हणूं लागली, ‘ चला, माझें काम तर फत्ते झालें; आतां तुम्ही कालिफाकडे जाऊन काय मिळवून आणतां तें मला पाहूं द्या. ’ अबूलहसन म्हणाला, ‘ ही तर तुम्हां बायकांची चालच, कीं आपण पुरुषांहून वरचढ असा डौल मिरवायाचा; पण कोणतीही गोष्ट करूं म्हटलें तर त्यांच्या मसलतीशिवाय होत नाहीं. हा बेत तर मुळीं मींच काढला, मग तो मला साधत नाहीं म्हणजे काय ? पण इतकें बोलण्याची गरजच नाहीं. तूं आतां मेल्याचें सोंग घे, म्हणजे माझा बेत कसा साधतो हें तूंच पाहशील. ’

नंतर अबूलहसनानें आपल्या बायकोस निजविलें; आणि तिचे पाय मक्केकडे करून सर्व आपल्यासारखीच तयारी केली. मग सगळा पोषाख अस्ताव्यस्त झाला आहे, पागोटें गळ्यांत आलें आहे. असा तो धावऱ्या धावऱ्या खोलीच्या बाहेर पडला. त्या वेळेस मुख्य वजीर जाफर व दुसरे मोठ्या विश्वासाचे कांहीं वजीर यांस घेऊन कालीफ कांहीं मसलत करीत होता. हा दरवाज्याशीं जातांच तो उघडून त्यास आंत घेतलें. मग एका हातानें रुमाल डोळ्यांशीं धरून व दुसऱ्यानें मोठ्यानें ऊर बडवीत आणि मोठ्यानें ओरडत तो कालिफाजवळ गेला.

कालिफानें त्याची अशी अवस्था झालेली कधीं पाहिली नव्हती. अबूलहसन आला म्हणजे नेहमीं आनंदांत असायाचा, व दुसऱ्यांस आनंदित करायाचा, पण त्या दिवशीं सर्वच निराळें दिसलें. तेव्हां

कालिफास फार वाईट वाटून त्यानें चाललेलें काम एकीकडे ठेवलें; व त्यास शोकाचें कारण विचारलें. तेव्हां अबूलहसन मोठ्यानें स्फुंदत स्फुंदत म्हणाला, 'राजाधिराज, आज जो मजवर दुःखाचा प्रसंग आला त्यासारखा कधींही आला नव्हता. ईश्वराच्या कृपेनें आपलें यशस्वी राज्य चिरकाळ राहो! आपण माझें लग्न नूझातूल औदात हिच्याशीं लावून दिलें होतें, कीं तेणेंकरून मीं सुखांत दिवस घालवावे. पण महाराज, काय सांगूं? ती—!' इतकें बोलून त्यानें असा गहिंवर आणला कीं आतां त्याच्यानें बोलवत नाहीं असें कालिफास वाटलें.

या त्याच्या बोलण्यावरून कालिफास समजलें कीं अबूलहसनाची बायको मेली. मग तो फार हळहळून म्हणाला, 'अरेरे, वाईट झालें. ईश्वरा, तिजवर दया ठेव! स्वभावानें कशी सज्जन होती! व म्हणूनच मीं व जुबैदीनें ती तुम्हास दिली, कीं तुम्ही सुखांत नांदावें, पण घडतें कोठून?' असें बोलतांना त्याच्या डोळ्यांतून ढळंढळां आंसवें आलीं. तीं त्यानें रुमालानें पुसलीं.

अबूलहसनास व कालिफास रडतांना पाहून जाफर व दुसरे वजीर ह्यांसही फार दुःख वाटलें, व ते सर्वजण नूझातूल औदात हिच्याकरितां शोक करूं लागले. शेवटीं जुबैदीस नूझातूल औदात हिच्या विषयीं जसा संशय आला तसाच संशय घेऊन कालीफ अबूलहसनास म्हणाला, 'दुष्टा, तूं जाच करून करून हिला मारून टाकलीस, यांत तिळमात्र संदेह नाहीं. अरे, येवढें तरी मनांत आणावयाचें होतेंस कीं, ही जुबैदीची अत्यंत आवडती असतांही केवळ मजकरतां तिनें हिला आपणावेगळी केली, तर हिला अंतर देतां कामा नये! काय रे, हाच का तुझा कृतज्ञपणा?'

कालीफ आपणावर रागावला असें पाहून तर अबूलहसन अधिकच रडूं लागला, आणि मोठा खेद झालासें दाखवून म्हणतो, 'महाराज, माझी योग्यता नसतां मला आपण मानमान्यतेस चढविलें, व मजवर येवढे उपकार केले, ते सर्व विसरून जाऊन इतका कृतघ्न-

पणा या दासाकडून होईल असें वाटतें का? नूझातूल औदात राणीच्या प्रीतींतली होती हेंचसें काय, पण तिच्या अंगीं जे अमोलिक गुण होते, त्यावरूनही माझा सगळा जीव तिजवर असे, व माझ्याही कपाळीं सरकारच्या व राणीसाहेबांच्या सेवेचें जें सुख लागावयाचें होतें तेंही इतकेंच; त्यास कोणाचा उपाय आहे?'

याप्रमाणें अबूलहसनानें आपलें दुःख कालिफाच्या मनांत असें भरवून दिलें, कीं तें सर्व त्यास खरें वाटलें. मग येथें खजीनदार होता त्यास त्यानें शंभर मोहोरांची पिशवी व एक उंची कापडाचा तुकडा अबूलहसनास द्यावयास सांगितला, तेव्हां अबूलहसनानें कालिफाच्या पायांवर डोकें ठेवलें. त्यास कालीफ म्हणाला, 'जा याच्या बरोबर, आणि हा जें देईल तें आपल्या बायकोच्या प्रेतावर घाल, आणि हा ज्या मोहोरा देईल त्यांनीं तिच्या योग्यतेसारखें तिचें उत्तराकार्य कर.'

अबूलहसनानें कांहीं उत्तर न देतां कालिफास फारलवून सलाम केला. मग खजीनदाराकडून ती पिशवी व कापड घेऊन निघाला, तो लागलाच घरीं आला.

नूझातूल औदात हिला तसें निजून राहण्याचा अगोदरच कंटाळा आला होता; तिनें हा आंत येण्याची वाटच पाहिली नाहीं. दार उघडलें तों तशीच उठून त्याकडे धांवली, व त्यास विचारूं लागली, 'का, कालीफ देखील जुबैदीसारखाच का फसला? पाहूं काय आणलेंत?' अबूलहसनानें पिशवी व कापडाचा तुकडा तिला दाखविला आणि म्हणतो, 'का, आतां तर खात्री झालीना? तुला वाटत होतें कीं, हें काम मलाच साधायाचें, दुसऱ्या कोणास साधायाचें नाहीं.'

याप्रमाणें त्या दोघांनीं कालिफास व जुबैदीस फसाविलें, व अबूलहसनानें यापासून पुढें काय होणार त्याची अटकळ बांधली. मग ती सर्व आपल्या बायकोस कळवून म्हणाला, 'अशा प्रकारच्या ... आपण त्यांस जितकें गुंतवून टाकूं तितकी त्यांस अधिक

मौज वाटेल, व आपणावर त्यांची अधिक मर्जी होईल.' असा बेत करून तीं दोघें पुढें काय होतें याची वाट पहात बसलीं.

इकडे कालिफानें अबूलहसन निघून जातांच कचेरी बरखास्त केली. त्या दिवशीं दरबारांत मोठ्या जरूरीच्या कामाचा विचार करावयाचा होता; तरी तो दुसरे दिवसावर टाकून नूझातूल औदात हिच्या मरणानें आपणास झालेलें दुःख राणीस कळविण्याकरितां कालीफ तिजकडे जाण्यास निघाला. मश्रूर हा नेहमीं जवळच असे, व कालिफाच्या मर्जींतला होता यास्तव त्यास त्यानें आपणाबरोबर नेलें.

मग ते दोघे जुबैदीच्या महालाकडे गेले! दाराशीं जातांच कालिफानें जाळीचा पडदा एकीकडे केला, आणि पाहतों तों जुबैदी फार कष्टी होऊन आपल्या पलंगावर रडत बसली आहे! मग तिच्या जवळ जाऊन कालीफ म्हणाला, 'तुझी अशी व्यवस्था पाहून मला जें दुःख होत आहे तें काय सांगू! पण तूंच पहा बरें, ज्या गोष्टीस उपाय नाहीं तिचा कितीही शोक केला तरी काय उपयोग? मरण कोणास चुकलें आहे? जो प्राणी जन्मास येतो त्यास मरणसमयीं आपलें आयुष्य ईश्वराच्या स्वाधीन परत केलेंच पाहिजे, त्यास इलाज नाहीं. आतां, तुझी दासी नूझातूल औदात ही मोठी गुणाची होती, यास्तव आरंभीं तुला फार खेद वाटला हें योग्यच झालें. परंतु अजूनही जर तूं आणखी शोक करीत बसलीस तर ती काय जिवंत होणार आहे? कांहीं नाहीं! तर असा शोक टाकून दे, आणि आपल्या शरिराला जप; एवढेंच माझें सांगणें आहे.'

कालिफाचें असें ममतेचें भाषण ऐकून जुबैदीस आनंद तर वाटला खरा, पण नूझातूल औदात मेली असें कालिफास बोलतांना ऐकून तिला फारच आश्चर्य वाटलें व उत्तर काय करावें हें सुचेना. त्यांतूनही कालिफानें अगदीं निराळाच वृत्तांत सांगितला, तेव्हां तर ती फारच गोंधळून गेली. मग कांहीं वेळानें ती आश्चर्याच्या मुद्रेनें कालिफास म्हणाली, 'महाराज, तुमचें ममतेचें भाषण मला

रुचलें खरें, पण तुम्ही नूझातूल औदात हिच्या मरणाची जी खबर मला सांगितली, ती बरीक मला नीटशी समजली नाहीं. जी मेली म्हणून तुम्हीं मला सांगितलें ती तर चांगली खुशाल आहे. मी शोक करतें आहे तो तर अबूलहसनाबद्दल. तो तुमच्या मर्जींतला होता, व तुम्ही त्याची माझ्याशीं ओळख करून दिलीत, व तो आपणाला मोठी करमणूक असे म्हणून मला त्याच्याकरितां फार दुःख वाटलें. पण महाराज, तो मेला असतांही आपणांस त्याच्याविषयीं कांहींच वाईट वाटत नाहीं. अबूलहसन चांगला आहे, मजेचा मनुष्य आहे, अशी मजजवळ त्याची वारंवार वाखाणणी करूनही इतक्यांत तुम्ही त्यास विसरून गेलां, हें पाहून मला फारच अचंबा वाटतो. तसेंच, अबूलहसन खरोखर मेला असून नूझातूल औदात मेली असें भलतेंच बोलतां याचेंही मला नवल वाटतें.'

कालिफानें स्वतः अबूलहसनाच्या तोंडून त्याच्या बायकोच्या मरणाचें वर्तमान ऐकिलें होतें. तेव्हां जुबैदीचें असें बोलणें ऐकतांच तो मोठ्यानें हंसूं लागला व मश्रूरास म्हणतो, 'मश्रूर, ऐकलेंस ना राणीचें बोलणें? ताळ ना मेळ. अशीं बोलणीं बायका कधीं कधीं बोलतात तें खरें कीं नव्हे?' मग राणीकडे वळून कालीफ म्हणाला, 'अग, अबूलहसनाबद्दल म्हणून जर शोक करीत असशील, तर तो टाकून दे. कारण अबूलहसन कांहीं मेला नाहीं; त्याची बायको मेली. अबूलहसन तर नुकता ओरडत ओरडत दरबारीं आला होता; व त्यानें बायको मेल्याचें वर्तमान सांगितलें. तेव्हां मीं त्यास कांहीं कापड व एक मोहोरांची पिशवी तिच्या उत्तरकार्याकरितां देवविली. हवें तर मश्रूरास विचारून पहा. तो देखील असेंच सांगेल.'

हें कालिफाचें बोलणें जुबैदीस खरें वाटेना; तिला वाटलें ही सर्व थट्टा आहे. मग ती कालिफास म्हणते, 'महाराज, [illegible] मश्रूर करण्याच्या वेळा आहेत. मी तुम्हांस खचीत सांगतें कीं [illegible] तयारी

थट्टा मला अगदीं रुचली नाहीं. अबूलहसन मेला म्हणून जें मी तुम्हांस सांगितलें, तें कांहीं थट्टेनें सांगितलें नाहीं. तो खराखुराच मरण पावला. तर नूझातूल औदात मेली अशी भलतीच थट्टा न करतां मी सांगतें हें खरें माना.' कालीफ म्हणाला, 'असें आहे तर मीहीं पण तुला खचीतच सांगतों कीं, ही सर्व तुझी भ्रांति आहे. अबूलहसन कांहीं मेला नाहीं, नूझातूल औदात मेली; तो तर चांगला खुशाल आहे.'

कालीफ इतकें टाकून बोलला म्हणून जुबैदीस जरा राग आला. ती म्हणाली, 'महाराज, आज आपली चित्तवृत्ति कांहीं ठीक नाहीं असें मला वाटतें. मी आपणांस पुनः एकवार खास सांगतें, कीं अबूलहसन मृत्यु पावला, व नूझातूल औदात ही अजून जिवंत आहे. ती येथें येऊन गेल्याला दोन घटका देखील लोटल्या नाहींत. त्या वेळेस तिची अशी अवस्था झाली होती कीं, तिनें आपल्या दुःखाचें कारण सांगितलें नसतें तरीही माझ्या डोळ्यांत आसवें आलीं असतीं. माझ्या सर्व दासीही मजबरोबर रडूं लागल्या, व पाहिजे असल्यास त्यादेखील तुमची खात्री करून देतील. मग तिला एक मोहोरांची पिशवी व कापडाचा तुकडा असें देऊन मीं जावयास सांगितलें. तेव्हांपासून मी मोठ्या दुःखांत आहे; व ही दुखाची वार्ता कळविण्यास मी तुम्हाकडे कोणास पाठविणारही होतें, पण इतक्यांत तुम्हीच स्वतः आला.'

हें सर्व ऐकून कालिफास मोठें हंसूं आलें. पण लागलीच हंसूं आवरून तो म्हणाला, 'हा कोण विलक्षण हट्ट! मी तुला खात्रीनें सांगतों कीं, अबूलहसन जिवंत आहे, नूझातूल औदातच मेली.' जुबैदी म्हणाली, 'तें कांहीं नाहीं. अबूलहसनच मेला. मी भल-[illegible] कसें ऐकेन?'

[illegible] बोलणें ऐकून कालीफ रागानें लाल झाला. तो जुबैदीपासून [illegible] मंचकावर बसला होताच. मग मश्रूरास म्हणाला, 'जा रे, जा; आणि कोण मेलें तें मला येऊन सांग. नूझातूल

औदात मेली हें जरी मला खचीत ठाऊक आहे, तरी आतां याशिवाय मला दुसरा उपाय दिसत नाहीं.'

असें कालिफ बोलत आहे तोंच मश्रूर निघून गेला. मग जुबैदीस कालिफ म्हणाला, 'बघ आतां अंमळशानें समजेल तुझें खरें का माझें तें.' जुबैदी म्हणाली, 'मी आधीं कशाला बोलूं? तो आला म्हणजे आपलीच खात्री होईल.' कालिफ म्हणाला, 'इतकी तुझी खात्री असेल तर चल, लाव पैज. सांग काय हरशील तें!' जुबैदी म्हणाली, 'हं! कां होईना! माझ्या अतिशय आवडीचें जें जें आहे तें तें तुम्हांस माहीत आहेच. तर सांगा त्यांतून तुम्हांस काय हवें तें.' कालीफ म्हणतो, 'बरें तर, ऐक, जर मी हरलों तर मीं आपली मजेची बाग तुला द्यावी, व तूं हरलीस तर तूं आपला आरसेमहाल मला द्यावा.' जुबैदीनें उत्तर केलें, 'ठीक आहे, माझ्याकडून कसलीही हरकत नाहीं; आणि मी शपथ वाहून सांगतें कीं, या पैजेंत मी तर कधीं माघार घ्यावयाची नाहीं.' कालिफानेंही तशीच शपथ केली व दोघेंही मश्रूर केव्हां येतो याची वाट पाहत बसलीं.

याप्रमाणें कालीफ व जुबैदी यांच्यामध्यें अबूलहसन मेला कीं नूझातूल औदात मेली याविषयीं वाद पडला असतां, इकडे अबूल-हसनानें हा सर्व होणारा वृत्तांत जाणून त्याविषयीं सर्व तजवीज नीट करून ठेविली. इतक्यांत त्यानें खिडकींतून मश्रूरास येतांना पाहिलें. मग त्याच्या येण्याचा मतलब काय असावा हें समजून त्यानें आपल्या बायकोस पुनः मेल्याचें सोंग घ्यावयास सांगितलें. मग मोठ्या जलदीनें अबूलहसनानें पुनः पूर्वींप्रमाणें तीस खोलीच्या मध्यें निजविलें व तिजवर कालिफानें दिलेलें कापड घातलें. मग खोलीचें दार उघडें ठेवून आपण फार खिन्न होत्साता आक्रोश करीत तिच्या उशागतीं बसला.

इतकी सर्व तयारी अबूलहसन करीत आहे, इतक्यांत मश्रूर खोलींत आला. ती नूझातूल औदात हिच्या प्रेताची सर्व तयारी

केलेली पाहून त्यास मनांत आनंद वाटला कीं, आपला धनी म्हणतो तशीच खरोखर गोष्ट झाली. त्यास पाहतांच अबूलहसनानें उठून त्याच्या हाताचें चुंबन केलें, आणि मोठा गहिंवर आणून म्हटलें, 'महाराज, आजच्या माझ्या दुःखास पारावार नाहीं. जीवर तुम्ही येवढी माया करीत होतां ती नूझातूल औदात आज मला नाहींशी झाली!'

हें दुःखाचें भाषण ऐकून मश्रूरास फार वाईट वाटलें, व त्याच्या डोळ्यांवाटें आसवें आलीं. मग तिच्या तोंडावरून जरा वस्त्र उचलून त्यानें पाहिलें, व पुनः पहिल्यासारखें ठेविलें. मग उसासा टाकून तो म्हणाला, 'ईश्वरेच्छेस उपाय नाहीं! सर्वांचीही गति हीच आहे! होती बिचारी चांगली, पण सरली तिची मर्यादा! असो, ईश्वर तिजवर दया करो!' असें म्हणून मश्रूर अबूलहसनास म्हणाला, 'लोक म्हणतात तें कांहीं खोटें नव्हे, कीं बायका कधीं कधीं भलत्याच गोष्टी समजून चालतात. आपल्या जुबैदी राणीसाहेब तर मोठ्या शहाण्या खऱ्या ना? पण त्या एवढा वेळ महाराजांपाशीं असा वाद घालीत होत्या कीं, तुम्ही मेला, नूझातूल औदात मेली नाहीं. सरकारांनीं ती भ्रांति दूर करण्याविषयीं आपणाकडून शिकस्त केली; हवें तर मश्रूरास देखील विचार असेंही म्हटलें; मीं तर तुम्हांस स्वतः पाहिलें होतें ना? पण तें कांहीं नाहीं. त्यांची कांहीं केल्या समजूत पटेना. तेव्हां शेवटीं महाराजांनीं खरी हकीकत आणण्याकरितां मला इकडे पाठविलें. पण अजूनही त्यांची खात्री व्हावयाचें मला कठिणच दिसतें. तुम्ही हवे तितके उपाय करा, बायकांच्या डोक्यांत एकदां एखादें वेड शिरलें, म्हणजे तें निघणें फार कठिण आहे.'

अबूलहसन अजून रडतच होता. तो बोलावयास लागला तेव्हां स्फुंदण्यामुळें त्याचे शब्द तुटक तुटक आले. तो म्हणाला, 'ईश्वराच्या कृपेनें महाराजांची बुद्धि अशीच राहो, तीस कधींच फेर न पडो! ती हकीकत तुम्ही पाहतांच आहां. मी कांहीं महाराजांस

खोटें सांगितलें नाहीं. माझ्या कपाळींच तसें लिहिलेलें, कीं असली दुःखाची गोष्ट महाराजास कळविण्याचा मजवर प्रसंग यावा ! तें चुकतें कोठून ? आज मजवर जें दुःख कोसळलें तें जितकें सांगावें तितकें थोडेंच आहे.' मश्रूर म्हणाला, 'मलाही याबद्दल फारच वाईट वाटतें. पण असो, असा शोक तुम्ही कोठवर करीत बसणार? आतां अंमळ हा शोक टाकून देऊन जिवास थोडी स्वस्थता धरा. मलादेखील या वेळेस तुम्हांस अशा अवस्थेंत टाकून जाण्याचें मोठें जिवावर आलें आहे. पण हें खालिफाचेंच काम म्हणून मला गेलेंच पाहिजे. परंतु जावयाच्या अगोदर मला तुम्हापाशीं येवढेंच मागणें आहे कीं, मी जाऊन परत येईपर्यंत प्रेत स्मशानांत नेऊं नका. मूठमाती द्यावयास तुम्हाबरोबर माझ्याही मनांत यावयाचें आहे.'

अबूलहसनानें मश्रूराचे या गोष्टीबद्दल फार उपकार मानले. मग त्यास पोहोंचवायास दारापर्यंत गेला; व तो बराच लांब जाईपर्यंत माघारा खोलींत आला नाहीं. त्यास भय होतें कीं, कांहीं निमित्तानें हा पुनः परत आल्यास आपली हिकमत त्यास उमगेल. मग खोलींत आल्यावर त्यानें नूझातूल औदात हिच्या अंगावरचे कपडे काढले, आणि तो म्हणाला, 'हा कांहीं निराळाच मासला झाला. मघांचें सोंग तर काय ! विलक्षणच; पण अजूनही हें आपलें नाटक संपलेंसें वाटत नाहीं. मश्रूरानें सांगितलेली हकीकत जुबैदी कधींही खरी मानावयाची नाहीं. हा मजकूर ऐकून तिला हंसें मात्र येईल ती आपल्या दासींसहवर्तमान असतां तिनें तुला पाहिलें आहे व तुझा आक्रोश ऐकला आहे. असें असतां मश्रूरानें सांगितलेला वृत्तांत तीं कधीं ऐकायाची नाहीं.' असें अबूलहसन बोलत असतां नूझातूल औदात हिनें आपला पोषाख पहिल्यासारखा घातला. मग तीं दोघें खिडकीजवळ एका माच्यावर बसलीं, व पुढें काय होतें याची वाट पहात राहिलीं.

इकडे मश्रूरही जुबैदीच्या महालांत जाऊन पोहोंचला. तो आंत येतांनाच अगोदर असा मोठ्यानें हंसत व टाळ्या पिटीत आला कीं, एखाद्याला वाटलें असतें, आतां हा कोणती आनंदाची बातमी सांगतो आहे कोण जाणे. कालिफाचा स्वभाव तापट होता त्यास हें अगदीं आवडलें नाहीं. त्याच्या मनांत होतें कीं, काय मजकूर असेल तो यानें लवकर सांगून टाकावा. म्हणून तो मश्रूरास रागावून म्हणाला, 'काय रे,एवढ्यानें हंसण्याचें काय काम आहे ? सांग लवकर काय असेल तें. कोण मेलें ? सांग, अबूलहसन कीं त्याची बायको ? '

मश्रूरानें लागलीच हंसें आवरलें व गंभीर मुद्रेनें उत्तर केलें, ' महाराज, नूझातूल औदातच मेली, अबूलहसन तर येथें जसा कष्टी होऊन आला होता तसाच अजून दुःखांत आहे. ' इतकें मश्रूर म्हणतो आहे मात्र, तों कालिफ मोठ्यानें हंसूं लागला, व मश्रूरास म्हणाला, ' हां, खाशी बातमी सांगितलीस; नुकता या क्षणाच्या आधीं जुबैदीकडे आरसेमहाल होता; पण आतां तिची सत्ता सरली, तो माझा झाला. तूं येथून निघून गेलास आणि आमची पैज पडली कीं, जुबैदी हरली तर तिनें आपला आरसे-महाल द्यावा व मी हरलों तर आपली बाग द्यावी. असो. तूं सध्यां मोठें काम केलेंस खरें, तुला अगोदर बक्षीस दिलें पाहिजे. पण हें राहूं दे एकीकडे. आधीं सर्व मजकूर काय काय काय झाला तो सांग. '

मग मश्रूरानें सर्व हकीकत सांगण्यास आरंभ केला. तो म्हणाला, ' महाराज, मी गेलों तेव्हां अबूलहसनाची खोली उघडीच होती, मी आंत गेलों तों अबूलहसन आपल्या बायकोच्या मरणानें कष्टी झालेला पूर्वीसारखाच माझ्या दृष्टीस पडला. बायकोचें प्रेत खोलीच्या मध्यभागीं ठेवून तो तिच्या उशाशीं रडत बसला होता. तिचे पाय मक्केकडे केले होते, व आपण नुकता जो कापडाचा तुकडा त्यास दिला, तो तिच्या अंगावर घातला होता. त्याचें दुःख

पाहून मलाही फार वाईट वाटलें व मी नूझातूल औदात हिच्या जवळ जाऊन तिच्या तोंडावरचें वस्त्र जरा एकीकडे करून पाहिलें, तों तिचें तोंड सुजेमुळें पुष्कळच बदलून गेलें होतें. मग मी त्याचें पुष्कळ प्रकारें सांत्वन करून येतांना त्यांस बोललों कीं, कृपा करून मी परत येईपर्यंत हें प्रेत बाहेर काढूं नका. हाच काय तो सगळा झालेला वृत्तांत.'

हा सर्व मजकूर ऐकून कालिफास फार समाधान झालें कीं, आपल्या म्हणण्याप्रमाणें सर्व पटलें. मग तो हंसत हंसत मश्रूरास म्हणाला, 'तूं सर्व ठीक सांगितलेंस, तुला आणखी विचारण्याची कांहीं गरज नाहीं.' मग जुबैदीकडे वळून तो म्हणतो, 'कां ? अजून तरी मनाची खात्री झाली कीं नाहीं ? यावर आतां काय बोलणें राहिलें आहे ? कोण मेलें ? अबूलहसन कीं त्याची बायको ? का, पैज हरलीस कीं नाहीं.'

मश्रूरानें सांगितलेल्या गोष्टी जुबैदीस मुळींच खऱ्या वाटल्या नाहींत. ती म्हणाली, 'महाराज, याच्या बोलण्याचें मी कधींही प्रमाण धरणार नाहीं, हा लबाड मनुष्य आहे. हा मेला केव्हां काय म्हणेल याचा अगदीं नेम नाहीं. मी आंधळी नाहीं किंवा बेशुद्धही नाहीं. मीं स्वतः ह्या डोळ्यांनीं नूझातूल औदात हिला मोठा आक्रोश करीत येथें आलेली पाहिली आहे, मी स्वतः तिच्याशीं बोललें आहें व नवरा मेल्याचें वर्तमान तिनें जें मला सांगितलें तें चांगलें पुरतेपणीं ऐकिलें आहे.'

मश्रूर म्हणाला, 'बाईसाहेब, मी आपल्या व सरकारांच्या पायांची शपथ वाहून सांगतों कीं, अबूलहसन जिवंत आहे. त्याची बायको मेली.' हें बोलणें ऐकून जुबैदी फारच रागावली आणि म्हणाली, 'लुच्च्या बटकुड्या, ही सर्व तुझी लबाडी आहे; ती बाहेर काढण्यास कांहीं उशीर नको.' असें म्हणून तिनें टाळी वाजवून आपल्या दासीस बोलाविलें. तों त्यांचा एक घोळकाचा घोळकाच आंत आला. त्यांस जुबैदी म्हणाली, 'इकडे या ग खरेंच सांगा; येथें

महाराज येण्याच्या अगोदर थोडा वेळ कोण आलें होतें ?' दासींनीं एकदम उत्तर दिलें, 'नूझातूल औदात ही येऊन गेली.' मग जुबैदी आपल्या खजीनदारणीस म्हणाली, ' काय ग, मीं तुला नूझातूल औदात हिला काय द्यावयास सांगितलें ? ' तिनें उत्तर केलें,' बाई-साहेब, आपल्या हुकुमावरून मीं तिला एक मोहोरांची पिशवी व एक कापडाचा तुकडा असा दिला, ते दोन्ही जिन्नस तिनें जातांना बरोबर नेले.' मग मश्रूरास जुबैदी मोठ्या रागानें म्हणाली, ' काय रे, कसें काय ? आतां कोणाचें खरें मानावयाचें ? तुझें कीं जें मीं व या सर्व दासींनीं पाहिलें तें ? '

जुबैदीच्या या बोलण्यावर मश्रूरास कांहींच उत्तर द्यावयास नव्हतें असें नाहीं, पण आपण जितकें बोलावें तितक्यानें हिला अधिक रागच मात्र येणार असें पाहून आतां उगीच बसावें हेंच बरें असें त्यास वाटलें. तरी त्यानें जें पाहिलें होतें त्यावरून त्याची खात्री होती कीं, नूझातूल औदात हीच मेली, अबूलहसन नाहीं.

याप्रमाणें जुबैदी व मश्रूर या दोघांचा वाद चालला असतां कालीफ उगाच बसला होता. दोघांनींही स्वतः पाहिलेल्या व ऐकिलेल्या गोष्टी सांगितल्या व कोणाचें कोणी ऐकेना. कालिफास वाटलें कीं, मीं स्वतः अबूलहसनास पाहिलें आहे व शिवाय मश्रूरानें जाऊनही तोच वृत्तांत आणला, तेव्हां जुबैदीचीच ही सर्व भ्रांत आहे, यांत संशय नाहीं. यास्तव त्यास दोघांचा वाद पाहून मोठ्यानें हंसायास मात्र आलें. मग तो जुबैदीस म्हणाला, ' जुबैदी, स्त्रियांच्या बुद्धींत कधीं कधीं फेर होतो म्हणून जें म्हणतात तें खरें किंवा खोटें असें माझ्यानें सांगवत नाहीं. पण तुझ्यावरून तर या गोष्टीचा प्रत्यय आलासा वाटतो. पहा, मश्रूर तर आतां तिकडून जाऊन आला, व तो म्हणतो कीं, नूझातूल औदात हिचें प्रेत खोलीच्या मध्यभागीं ठेवलेलें होतें तें मीं डोळ्यांनीं पाहिलें. व तसेंच अबूलहसन तिच्या उशाशीं बसला होता हेंही पाहिलें. तर असें असून त्यानें धडधडीत

डोळ्यांनीं पाहिलेल्या गोष्टी तूं खोट्या म्हणतेस, तेव्हां तुला काय म्हणावें.'

कालिफानें इतकें सांगितलें, पण तें जुबैदीनें ऐकिलें नाहीं. ती म्हणाली, 'महाराज, दासीस बोलण्याची क्षमा असावी. या सर्व गोष्टींवरून आपला मतलब मी समजलें. कांहीं तरी करून मला खोटें पाडावें असा आपला व मश्रूराचा संकेत झालासा मला वाटतो. यास्तव मश्रूरानें जो मजकूर आणला आहे, तो मी कधींही खरा मानणार नाहीं. खरें काय तें समजण्याकरितां माझ्या तर्फें मी मनुष्य पाठवितें, त्यास आपली हरकत नसावी.'

कालिफानें ती गोष्ट मान्य केल्यावर जुबैदीनें आपली दाई बोलावून आणली. ती फार म्हातारी होती, म्हणून तिजवर ममता जडून जुबैदीनें तीस आपणाजवळ ठेविलें होतें. तिला जुबैदी म्हणाली, 'अगे, मी काय सांगतें तें नीट ऐकून घे. हा येथें जो वाद पडला आहे तो तूं ऐकलासच. तर अबूलहसनाच्या–पण अबूलहसनाच्या कसलें! तो आहे कोठें? त्याच्या बायकोच्या–घरीं जाऊन काय मजकूर आहे तो मला येऊन कळव. आणि इकडे बघ, जर मला हवा तसा मजकूर आणलास, तर तुला चांगलें बक्षीस देईन. जा, लवकर जाऊन ये.' मग ती तिकडे निघून गेली. जुबैदीस त्या गोष्टीची येवढी चटपट लागलीसें पाहून कालिफास मोठा आनंद झाला. पण जुबैदी राणीस आपण इतका राग आणला म्हणून मश्रूरास फार वाईट वाटलें, व तो तिचा राग घालविण्यास काय उपाय करावा या काळजींत होता. पण आतां दाईस तिकडे धाडल्यावरून त्याचा जीव खालीं पडला. त्याच्या मनाची अशी खात्री होती कीं, ह्या दाईच्या तोंडानें आपण सांगितलेलें खरें ठरल्यावर राणीचा आपणावरचा राग जाऊन पुनः मर्जी होईल.

इकडे अबूलहसनानें दाईस येतांना दुरून पाहतांच जाणलें कीं, ही राणीकडून शोध करावयास येत आहे. मग आपल्या बायकोस बोलावून त्यानें तीस ती दाई दाखविली, आणि म्हटलें, 'चल

आतां. माझी सोंग घेण्याची पाळी आली.' असें म्हणून तो खोलीच्या मध्यभागीं उताणा पडला. मग नूझातूल औदात हिनें राणीनें दिलेलें कापड त्याच्या अंगावर घातलें व तोंडावर पागोटें ठेवलें. इतक्यांत ती दाई घाईघाईनें येऊन पोहोंचली. खोलींत येते तों नूझातूल औदात ही केंस अस्ताव्यस्त झालेली, गाल व ऊर बडवीत मोठ्यानें रडत आहे असें तिच्या दृष्टीस पडलें. मग तिच्याजवळ जाऊन ती मोठ्या दुःखाच्या स्वरानें म्हणाली, 'बाई, तूं आपल्या नवऱ्याबद्दल शोक करीत असतां त्यास आडकाठी करण्याकरितां कांहीं मी आलें नाहीं.' हें ऐकून नूझातूल औदात मोठ्या करुणस्वरानें म्हणाली, 'बाई, माझी पहा काय अवस्था ही! आपल्या बाईसाहेबांनीं व महाराजांनीं मेहरबानी करून ज्यांच्याशीं माझा संबंध करून दिला होता, त्या अबूलहसनजींस आज मीं मुकलें.'

मश्रूरानें जें कालिफास येऊन सांगितलें, तसें कांहींच नसून सर्वच विपरीत आहे असें पाहून त्या दाईस फारच आचंबा वाटला. मग ती रागाच्या आवेशानें म्हणाली, 'जळलें मेल्याचें तोंड तें! काय मेल्यानें धडधडीत लबाडी सांगितलीन्! उगाच कीं कलागत लावून दिलीन्! मेला तेथें सांगतों काय, कीं अबूलहसन जिवंत आहे, आणखी तूं मेलीस म्हणून!' हें ऐकून नूझातूल औदात हिनें बळेंच गहिंवर आणला, आणि म्हटलें, 'बाई, तो बोलला तसेंच झालें असतें तर फार बरें होतें; हें दुःख तरी मला भोगावें लागतें ना!' असें म्हणून मोठमोठ्यानें ओरडून ती अधिकच शोक करूं लागली.

ती तिची अवस्था पाहून दाईस फार वाईट वाटलें. मग तिच्याजवळ बसून तीही रडूं लागली. इतक्यांत तिनें सहज अबूलहसनाच्या डोक्यावरचें पागोटें अंमळ एकीकडे केलें व आपणास अजून ओळखतां येतो कीं नाहीं म्हणून पाहूं लागली. मग लागलीच पागोटें जसेंचें तसें करून ती दुःखानें म्हणाली, 'असो, झालें त्यास

इलाज काय ? ईश्वर त्यास चांगल्या गतीला नेवो ! असें बोलून ती नूझातूल आदात हिला म्हणाली, ' मुली, तुला अशा दुःखांत टाकून जाणें माझें मन घेत नाहीं. पण नाइलाजाची गोष्ट. त्या मेल्या काळ्यानें लबाडी सांगून बाईसाहेबांस ज्या अडचणींत घातलें आहे, तींतून लवकर जाऊन मला त्यांस सोडविलें पाहिजे. तर मी जातें. ' असें म्हणून दाई निघून गेली, व आतां ही माघारीं येणार नाहीं अशी खात्री झाल्यावर नूझातूल औदात ही परत आली. मग डोळे पुसून तिनें अबूलहसनास मोकळें केलें, आणि तीं दोघेंही जाळीशीं पलंगावर पुढें काय होतें त्याची वाट पाहात बसलीं.

इकडे ती दाई मोठ्या घाईघाईनें तो निरोप राणीस सांगण्यास राजवाड्यांत आली. ती म्हातारपणामुळें अशक्त झाली होती, तरी आपला मजकूर ऐकून राणीस फार संतोष होईल, व ती आपल्यास मोठें बक्षीस देईल. या आशेनें तिनें येतांना फार जलदी केली. ती राणीपाशीं आली ती दम टाकीतच आली. व सर्व वृत्तांत तिनें पाहिल्याप्रमाणें अगदीं साध्या रीतीनें सांगितला.

दाईनें आणलेली खबर ऐकून जुबैदीच्या मनास फार समाधान वाटलें. मग ती आवेशांत येऊन म्हणाली, 'अग, सांग पुनः तोच मजकूर, महाराजांस ऐकूं दे तो. त्यांच्या मतें आपण सगळ्या वेड्या, आपणांस धर्म कळत नाहीं, देवाचें भय नाहीं, कांहीं नाहीं. तसेंच या काळ्यालाही तें नीट ऐकूं दे. आपणास कांहीं ठाऊक नसतांही हा मेला दुसऱ्यास खोटें करावयास पहातो ! '

दाईनें खबर आणल्यावर आपण सांगितलेली हकीगत खरी ठरेल अशी मश्रूरास फार आशा होती. ती एकाएकीं निष्फळ झाली असें पाहून त्यास फार वाईट वाटलें. शिवाय, अबूलहसन मेला नाहीं, ही गोष्ट त्यास पक्केपणीं माहीत असतांही तीवरूनच राणीची आपणावर गैरमर्जी झाली म्हणून तो मनांत फार चरफडला. त्यानें राणीलाही उत्तर केलें असतें, पण तिचा अपमान होईल या भयानें

तो तिला कांहीं बोलला नाहीं; पण दाईनें सर्व मजकूर बनवू सांगितला अशी त्याची खात्री होऊन तो तिला रागानें म्हणाला, ' म्हातारडे, तूं सांगितलीस ही सर्व लबाडी आहे, तींतला एक शब्दही खरा नाहीं. मीं आपल्या डोळ्यांनीं नूझातूल औदात हिला मेलेली खोलीच्या मध्यें ठेवलेली पाहिली. ' दाईनेंही त्यास लागण्यासारखें रागानें उत्तर दिलें, 'अरे, तूं ह्या लबाडया मला सांगतोस काय? मी तर आतांच अबूलहसनास मेलेला पाहिला व त्याच्या बायकोसही जिवंत पाहिली. ' मश्रूर म्हणाला, 'मी लबाड नव्हे, तूंच मात्र भलभलतें सांगून आम्हांस ठकवूं पाहत आहेस. ' दाईनें उत्तर दिलें, ' काय बेशरमपणा हा ! मीं आपल्या डोळ्यांनीं पाहिलेल्या गोष्टी सांगत असतांही महाराजांसमक्ष अशीं उद्धटपणाचीं उत्तरें करतोस!' मश्रूर म्हणाला, ' अग, पुरे तुझें बोलणें. तुला चळ लागला आहे म्हणून अशी बडबड करितेस. दुसरें कांहीं नाहीं. '

मश्रूरानें आपणासमक्ष दाईची इतकी बेअदबी केली म्हणून जुबैदीस फार राग आला. तिनें दाईस उत्तर देण्यास मुळींच अवकाश ठेवला नाहीं. ती कालिफास एकदम म्हणाली, ' महाराज, हा उर्मटपणा तुम्हांपुढें केला काय, आणि मजपुढें केला काय, सारखाच. तर त्याचा बंदोबस्त आपण अवश्य केला पाहिजे. ' असें शब्द बोलतांना तिला इतका संताप आला कीं, तिच्यानें पुढें बोलवेनासें होऊन ती रडावयास लागली.

हा सर्व वाद ऐकून कालीफ फार गोंधळून गेला. त्यानें सर्व गोष्टींचा विचार केला, पण कशास कांहींच जमत नाहीं असें पाहून पुढें काय करावें हें त्यास सुचेना. राणी, मश्रूर, दायी व इतर दासी या सर्वांसही अशीच पंचाईत पडून सर्व आपआपल्या ठिकाणीं उगींच राहिलीं. शेवटीं कालीफ म्हणाला, ' जुबैदी, मला आतां स्पष्ट दिसतें कीं, आपण सर्वच लबाड आहों. मी, तूं, मश्रूर व ही दाई यांपैकीं कोणाच्याही बोलण्याचें प्रमाण लागत नाहीं. तर हा आपण सर्वच तिकडे जाऊन खरें कोणतें याचा निवाडा करून

याखेरीज आपले संशय फिटण्याचा मला दुसरा उपाय दिसत नाहीं.'

असें म्हणून कालीफ उठला, व त्यामागून राणीही जावयास निघाली. मग दरवाजा उघडण्यास मश्रूर पुढें गेला, व कालिफास म्हणाला, ' महाराज, आपण ही तोड काढलीत याचा मला फार आनंद वाटतो; आतां तेथें गेल्यावर मी या दायीची खात्री करून देईन कीं तिनें अगदीं लबाडी सांगितली. मघां मी हिला चळ लागला असें बोललों यास्तव राणीसाहेबांस माझा फार राग आला, म्हणून आतां तसें न म्हणतां इतकेंच सांगतों कीं, हिची लबाडी हिच्या पदरांत घालीन.' दाईनें उत्तर केलें, ' मेल्या काळ्या, फार तोंड करूं नको. चळ भरला असला तर एक तुला भरला असेल. दुसऱ्या कोणास नाहीं.'

मश्रूरानें दाईची पुनः निर्भर्त्सना केलेली पाहून राणीस फारच राग आला. ती म्हणाली, ' मेल्या गुलामड्या, तूं आणखी कितीही बोललास तरी तुझ्यावर मी कधींही विश्वास ठेवणार नाहीं. माझ्या दाईनें सांगितलें तेंच खरें आहे.' मश्रूर म्हणाला, ' बाईसाहेब, नूझातूल औदात जिवंत आहे व अबूलहसनच मेला अशी जर हिच्या मनाची पक्की खात्री आहे, तर हिनें माझ्याशीं पैज लावावी.' हें ऐकून दाईनेंही लागलीच उत्तर केलें, ' हें, कां होईना, सांग कसली पैज लावतोस ती.' असें म्हणून कालीफ व राणी या दोघांच्या समक्ष त्यांनीं बुट्टेदार सोनेरी कापडाची आपणांत पैज ठरविली.

अबूलहसन व नूझातूल औदात यांचा महाल जुबैदीच्या महालासमोर होता त्यांतून निघून कालीफ, जुबैदी, मश्रूर, दाई, व दुसऱ्या दासी अशी सर्व मंडळी आपणांकडे येताहेत असें अबूलहसनानें पाहिलें; मग ती गोष्ट त्यानें आपल्या बायकोस कळविली. तेव्हां ती जाळींतून पाहूं लागली, तों तीं खरोखरच इकडे येताहेत असें तिनें पाहिलें. तेव्हां तिला प्रथम फार आश्चर्य वाटलें.

पण मग भयभीत होऊन ती म्हणाली, ' अहो, आतां कसें करावयाचें ? आपला खचीत घात होतो. ' अबूलहसनानें न घाबरतां स्वस्थपणेंच उत्तर केलें, ' अगे, घाबरण्याचें मुळींच कारण नाहीं. आपला पहिला झालेला बेत इतक्यांत विसरलीस का ? याच्या अगोदर ज्याप्रमाणें पाळीपाळीनें आपण मेल्याचें सोंग घेतलें, त्याप्रमाणेंच आतां दोघांनीं एकदम तसें करावयाचें. तीं सर्व येथें येऊन पोहोंचतात तोंपर्यंत आपणां दोघांचीही तयारी होईल. '

याप्रमाणें बेत करून दोघांनींही आपआपल्या अंगावर राजवाड्यांतून आणलेलीं कापडें घेतलीं, व खोलीच्या मध्यभागीं एका शेजारीं एक अशीं दोघें आपलीं शरीरें गुंडाळून निजलीं. अशा प्रकारें तीं दोघें मंडळी येण्याची वाट पहात होतीं.

शेवटीं कालिफाची स्वारी व इतर मंडळी दाराशीं येऊन पोहोंचली. मग मश्रूरानें दार उघडलें, व कालीफ आणि जुबैदी आंत गेल्यावर त्यांच्या मागून बाकीची सर्व मंडळी आंत शिरली. पण दोघेंही प्रेत होऊन पडलीं आहेत, असें पाहून सर्वांस फार आश्चर्य वाटलें व स्तब्ध होऊन तीं जशींच्या तशीं उभीं राहिलीं. हा प्रकार कसा घडला असावा हा तर्क कोणासही होईना. शेवटीं जुबैदी कालिफास म्हणाली, ' हाय हाय ! दोघेही बिचारीं मरून गेलीं ! पाहिलेंना, हें तुमच्या आग्रहाचें फळ ! नूझातूल औदात मेली असें मला भलतेंच सांगितलें, व शेवटीं ती बिचारी नवऱ्याच्या दुःखानें खरोखरच मेली ! ' कालीफ म्हणाला, ' छेः , असें नव्हे, नूझातूल औदातच अगोदर मेली व तिच्या मरणाच्या दुःखानें मागून अबूलहसन मेला, हें तूं पक्कें समज. तुझी पैज फसली, आरसेमहाल तुझा होता तो आतां माझा झाला. ' जुबैदीस हें बोलणें लागून ती मोठ्या आवेशानें म्हणाली, ' असें कधींही होणार नाहीं, तुम्हीच पैज गमावलीत, तुमची बाग आतां मजकडे आली; अबूलहसनच खचीत अगोदर मेला; माझ्या दाईनें नूझातूल औदात हिला आपल्या नवऱ्याबद्दल शोक करतांना प्रत्यक्ष पाहिलें, व तें आपण

दोघांनींही तिच्या तोंडचें ऐकलें तें कसें खोटें होईल?' कालि-फाच्या व जुबैदीच्या या वादाबरोबर दुसरा एक वाद उत्पन्न झाला; मस्रूर व जुबैदीची दाई या दोघांनींही आपापसांत पैज लावली होती. तेव्हां आतां दोघेंही पैज मीं जिंकलीं म्हणन भांडूं लागलीं. हा त्यांचा वाद होतां होतां एथवर आला कीं, दोघेंही अगदीं शिवीगाळ करण्याच्या बेतांत आलीं.

शेवटीं दोन्ही पक्षांचा विचार करतां कालिफास दिसून आलें कीं, पैज आपण जिंकली कीं जुबैदीनें जिंकली याचा निश्चय करणें अशक्य आहे. खरें काय तें समजण्याकरितां हा शेवटचा उपाय करूनही कांहींच समजलें नाहीं, या गोष्टींचा कालिफास फार खेद वाटला. मग तो त्या प्रेतांच्या उशाशीं जाऊन बसला, व आपली पैज साधण्याची कांहीं युक्ति सांपडली तर पहावी म्हणून विचार करूं लागला. शेवटीं आपणास तर कांहीं दिसत नाहीं असें पाहून तो म्हणाला, 'या दोघांतून अगोदर कोण मेलें याचा जर कोणी मला छडा लावून देईल, तर मी त्यास हजार मोहोरा देईन.'

हे शब्द कालिफाच्या तोंडून निघताहेत तोंच अबूलहसनाच्या अंगावर जें वस्त्र होतें त्याखालून शब्द निघाला, 'राजाधिराज, मी अगोदर मेलों. द्या मला हजार मोहोरा.' मग लागलाच अबूलहसन त्या वस्त्रांतून बाहेर निघाला व त्यानें कालिफाचे पाय धरले. त्याची बायकोही तसेंच करून जुबैदीच्या पायां पडली, पण मर्यादे-स्तव तिनें आपलें वस्त्र पांघरलें. जुबैदीला हा चमत्कार पाहून फार भय वाटलें, व तिनें मोठयानें किंकाळी फोडली, तेणेंकरून सर्वांस अधिकच भीति वाटली. शेवटीं जुबैदीचें भय नाहींसें झालें, व आपली आवडती दासी जिवंत आहे असें पाहून तिला हर्ष झाला. मग ती नूझातूल औदात हिला म्हणाली, 'अगे दुष्टे, आपल्या पायीं मला किती दुःख भोगविलेंस! पण तें असो, तूं जिवंत आहेस येवढ्यास्तव तुला सर्व माफ करतें.'

कालिफास जुबैदीसारखें मुळींच भय वाटलें नाहीं. दोघेही

आपआपलीं वस्त्रें टाकून मोकळीं झालीं, व अबूलहसन तर आपणा-पाशीं घेणेकऱ्याप्रमाणें सक्तीनें हजार मोहोरा मागत आहे, या दोन्ही गोष्टींची त्यास फार मौज वाटली, व तो मोठथानें हसूं लागला. मग हंसतच तो अबूलहसनास म्हणाला 'अबूलहसनजी, तुम्ही आज पराकाष्ठा केलीत, हंसवून हंसवून तुम्ही मला मारून टाकलें असतें, ठेवलें नसतें. अहो, जुबैदीस व मला अशा घोटा-ळ्यांत घालण्याची युक्ति ही तुम्हांस सुचली तरी कशी ? '

अबूलहसनानें उत्तर केलें, ' राजाधिराज, कांहींएक न छप-वितां सर्व मजकूर आपणांस सांगतों; ऐकून घ्यावा. महाराज, आप-णास माहीतच आहे कीं, पूर्वींपासूनही ऐषआरामानें राह-ण्याची मला मोठी आवड आहे. बरें, लग्न झाल्यावर तरी बाय-कोच्या मसलतीनें ती कमी व्हावी; पण तसें कांहींच झालें नाहीं. उलटी तिलाही तशीच हौस असल्यामुळें ती अधिकच वाढली. मग काय विचारावें! महाराज, आपली सर्व संपत्ति आमच्या जवळ असती, आणखी समुद्राइतके गच्च भरलेले खजिनेही असते, तरी देखील आम्ही तितक्यांचा फडशा उडविला असता. असो. याप्रमाणें आमची अवस्था झाली. आपण दिलेला सर्व पैसा अशा हौसेखालीं उडाला. आज सकाळीं सैंपाक्याचा पैसा चुकवून देऊन आणखीही कोणाचा सर्व पैसा द्यावयाचा होता तो दिल्यावर आमच्या नजरेस एकाएकीं आलें कीं तो सर्व खलास झाला. तेव्हां आम्हांस झाल्या गोष्टीचा फार खेद होऊन यापुढें फार जपून वागावयाचें असा आम्हीं निश्चय केला. परंतु सध्यां येऊन पडलेलें संकट कसें वारावें याविषयीं आम्हीं शेंकडों तडजोडी काढल्या, पण त्या कांहीं उप-योगीं नाहींत असें आम्हांस लागलीच वाटलें. शेवटीं या गोष्टीची आम्हांस फार लाज वाटली, व महाराजांपाशीं बोलण्यासही तोंड नाहीं; तेव्हां ही तरी युक्ति करून महाराजांस रंजवावें असा आम्हीं बेत केला. तर सरकारांची आम्हांस ह्या गोष्टीबद्दल माफी असावी. '

अबूलहसनानें सर्व हकीकत मोकळ्या मनानें सांगितलेली ऐकून कालिफास व जुबैदीस फार समाधान वाटलें. झालेल्या गोष्टीविषयीं कोणीही मनांत राग आणला नाहीं. जुबैदीला एवढा वेळपर्यंत मोठा खेद वाटला होता; पण हें अबूलहसनाचें भाषण ऐकिल्यावर त्यानें आपला बेत सिद्धीस जाण्याकारितां कशा हिकमती केल्या हें मनांत येतांच तिला फार हंसू आलें. कालीफास तर सर्वच गोष्ट मोठी चमत्कारिक वाटून हंसें आवरेना. मग त्यानें उठून अबूलहसन व व नूझातूल औदात ह्या दोघांस म्हटलें, ' चला मजबरोबर, तुम्ही दोघेंही जिवंत आहां म्हणून मला फार आनंद वाटतो; तर मीं म्हटल्याप्रमाणें तुम्हांस हजार मोहोरा देतों. ' जुबैदी म्हणाली, ' महाराज, हजार मोहोरा देण्याचें तुम्ही अबूलहसनास मात्र कबूल केलें आहे, तर त्यासच तुम्ही द्या. नूझातूल औदात हिची काळजी तुम्हांस नको, तें काम माझें आहे.' असें म्हणून तिनें आपल्या खजीनदारणीकडून नूझातूल औदात हीसही हजार मोहोरा देवविल्या.

याप्रमाणें अबूलहसन व नूझातूल औदात या दोघांनीं, कालीफ हरून् अल्‌रशीद व जुबैदीराणी यांची मर्जी नेहमीं खूष ठेवून, तीं दोघें जो पैसा देत त्यावर आपले दिवस सुखांत व आनंदांत घालविले.

---

# कालीफ हरून् अल्‌रशीद ह्याची गोष्ट.

केव्हां केव्हां मनुष्य इतका कांहीं आनंदाच्या भरांत येऊन जातो कीं, तो आनंद दुसऱ्यांस दाखविल्यावचून, अगर दुसरे जर तशा स्थितींत असले तर त्यांच्याशीं सलगी केल्यावांचून त्यास रहावत नाहीं; आणि केव्हां केव्हां त्याचें मन इतकें उदास होतें कीं त्याला आपला जीवही नकोसा होतो; आणि त्याचें कारण विचारल्यास तें सांगतां येण्याची तर गोष्ट दूरच राहिली, पण तें त्याचें त्यासच कळत नाहीं !

एके दिवशीं कालीफ हरून् अल्रशीद ह्याच्या मनाची आतां सांगितल्यापैकीं दुसऱ्या प्रकारची स्थिति झाली असतां त्याचा परम-विश्वासू व अत्यंत प्रीतींतला मुख्य वजीर जाफर हा त्याजकडे आला. कालीफ कधीं एकटा बसावयाचा नाहीं, असें असतां तो तसा त्याच्या दृष्टीस पडला; व तो जवळ जाऊन पाहतो तों त्याची मुद्राही उदास दिसत असून तो आपल्याकडे नजरसुद्धां वळवीत नाहीं असें त्याच्या दृष्टीस पडलें; यामुळें आपणाकडे पाहण्याची त्याची तबियत लागेपर्यंत तो कांहींएक न बोलतां तसाच स्तब्ध राहिला.

कालिफाच्या मनांत आपल्या स्वतःविषयीं कांहींएक आलेलें नाहीं असें जाफर ह्यास त्याच्या मुद्रेवरून दिसून आलें. सबब त्याच्याशीं बोलण्याविषयीं त्यानें आपल्या मनाचा हिय्या केला, आणि तो त्यास म्हणाला, ' सद्धर्मप्रतिपालक महाराज, आपलें चित्त उदास असें बहुतकरून कधीं आढळत नाहीं; असें असतां आज तें तसें होण्यास कारण काय झालें असावें तें समजण्याविषयीं दासाची विनंति आहे. ' हें वजिराचें भाषण ऐकून कालीफ त्याज-कडे पाहून म्हणाला, ' खरोखरच, अशी माझ्या मनाची स्थिति फारकरून नसते; व या वेळेस तरी ती तशी आहे हें तुम्ही येथें आला नसतां तर मला कळलेंही नसतें. ती मला नकोशी झाली आहे, ह्यासाठीं, जर तुम्ही कांहीं विशेष कामाकरितां आला नसलां तर ही माझ्या मनाची उदासीनता घालविण्याकरितां एखादी युक्ति काढाल तर फार बरें होईल. '

वजिरानें उत्तर केलें, ' राजाधिराज, मी आपलें कर्तव्यकर्म बजा-वण्याकरितांच या चरणापाशीं हजर झालों आहें; तें कोणतें तर आपल्या राजधानींत व आसपासच्या प्रदेशांत बंदोबस्त यथास्थित आहे कीं नाहीं हें स्वतः पाहण्याकरितां जाण्याचा आजचा दिवस आपण नेमिला आहे, त्याचें आपणास स्मरण देण्याकरितां मी आलों आहें; तर आपल्या सर्वकाळ आनंदित असणाऱ्या मनावर जे हे उदासीन-

तचे तरंग आले आहेत, ते नाहींतसे होण्यास ह्या कामाची ही संधि आयतीच चांगली आली आहे.'

कालीफ म्हणाला, 'हो बरें, मला तुम्हीं स्मरण दिलें. ती गोष्ट माझ्या अगदींच ध्यानांत नव्हती. जा तर, तुम्ही आपला पोषाख बदलून या; तोंपर्यंत मीही आपला बदलून तयार होतों.'

त्या दोघांनीं परदेशी व्यापाऱ्यांचा पोषाख केला, व त्या वेषानें ते राजवाड्याशेजारच्या बागेच्या अगदीं एकीकडच्या फाटकानें बाहेर पडले. ते शहराबाहेर फिरत फिरत वेशीपासून कांहीं अंतरावर युफ्रेतीस नदीच्या तीरापर्यंत गेले. तितक्या वेळांत कोणत्याही प्रकारची अव्यवस्था त्याच्या नजरेस पडली नाहीं. नंतर ते होडींत बसून पलीकडच्या तीरावर गेले, आणि तेथें कांहीं वेळ फेरफटका केल्यानंतर शहरचे दोन भाग ज्या पुलानें एकमेकांशीं जोडले आहेत, त्या पुलापाशीं आले.

ह्या पुलावरून ते शहराच्या अलीकडच्या भागांत येऊं लागले, तों त्यांना एक म्हातारा आंधळा मनुष्य भेटला. तो त्यांजपाशीं खैरात मागूं लागला. कालिफानें त्या मनुष्याजवळ जाऊन त्याच्या हातावर एक मोहोर टाकिली. आंधळ्यानें लागलीच त्याचा हात धरून त्यास म्हणाला, 'अन्नदाते महाराज, तुम्ही कोणीही असा, पण तुम्हांला ज्याअर्थीं मला खैरात करण्याची परमेश्वरानें बुद्धि दिली, त्याअर्थीं माझी आणखी एक तुम्हांपाशीं विनंति आहे, तेवढी तुम्ही कसेंही करून मान्य करा. ती ही कीं, तुम्ही माझ्या कानशिलांत एक चापट मारा. एवढीचशी काय, पण ह्याहूनही जास्त शिक्षा भोगण्यास मी पात्र आहे.' असें बोलून कालिफास आपल्या कानशिलांत चापट मारतां यावी म्हणून त्या आंधळ्या मनुष्यानें त्याचा हात सोडिला. पण कदाचित् तो तसाच निघून जाईल या शंकेनें त्यानें त्याच्या अंगरख्याचा झोळ गच्च धरून ठेविला.

कालिफास त्या मनुष्याची गळ ऐकून व त्याचें तें चमत्कारिक वर्तन पाहून मोठा चमत्कार वाटला. तो त्यास म्हणाला, 'भल्या

मनुष्या, मला तुझें म्हणणें कबूल करवत नाहीं. तूं म्हणतोस त्याप्रमाणें करून, मीं केलेल्या धर्माचें श्रेय कमी करून घेऊं कीं काय?' असें म्हणून तो त्या आंधळ्या मनुष्याचे हातून सुटून जाण्याचा यत्न करूं लागला.

त्या आंधळ्याला बहुत दिवसांच्या अनुभवावरून माहीतच होतें कीं, हा मनुष्य आपल्या म्हणण्याला एकाएकी रुकार देणार नाहीं. म्हणून त्यानें त्याचा अंगरखा अधिकच गच्च धरिला. तो म्हणाला, 'महाराज, माझ्या ह्या सलगीबद्दल व दुराग्रहाबद्दल मी तुम्हांपाशीं क्षमा मागतों. पण माझें पदर पसरून तुम्हांपाशीं मागणें आहे कीं, तुम्ही एक तर माझ्या कानशिलांत चापट मारा, नाहींपेक्षां आपली ही खैरात परत घ्या; कारण ह्या अटीवांचून मला ती घेतांच येत नाहीं! घेतली तर मी परमेश्वरापाशीं शपथ घेतली आहे ती मोडली असें होईल! ह्या गोष्टीचें कारण जर तुम्हांला समजेल, तर तुम्ही देखील म्हणाल कीं, ही शिक्षा ह्याला फारच हलकी आहे!'

कालिफाला त्या मनुष्याशीं हुजत घेत बसण्याचा कंटाळा येऊन त्यानें त्याचें म्हणणें मान्य केलें, आणि त्याच्या कानशिलांत अगदीं हलूंच एक चापट मारली. तेव्हां लागलीच त्यानें त्याच्या अंगरख्याचा पदर सोडिला, आणि त्याचे मोठे आभार मानून त्यास आशिर्वाद दिला. कालीफ व वजीर हे त्या आंधळ्या मनुष्यापासून कांहीं पावलें दूर गेल्यावर कालीफ वजिरास म्हणाला, 'ह्या आंधळ्या मनुष्याला जे जे लोक खैरात करतात, त्या सर्वांना हा असें करावयास लावितो ह्याचें कांहीं तरी विशेष कारण असलें पाहिजे. तें मला समजण्याची इच्छा आहे; व त्याकरितां त्याचें माझें बोलणें झालें पाहिजे. तर तुम्ही त्याजकडे परत जाऊन मी कोण हें कळवा, आणि उद्यां तिसरे प्रहरीं निमाज पढण्याचे वेळीं त्यास वाडयांत जरूर यावयास सांगा.'

वजीर परत त्या आंधळ्या मनुष्याकडे गेला, आणि यानें त्याच्या हातावर एक होन ठेवून त्याच्या नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें त्याच्या

कानशिलांत त्यानें एक चापट मारिली, आणि कालिफाचा हुकूम त्यास सांगून तो परत कालिफाकडे आला.

मग ते दोघेजण शहरांत आले, तों तेथील चौकांत कोणी एक तरुण व देखणा पुरुष घोडीवर बसून तिला इकडून तिकडे व तिकडून इकडे दामटीत होता, त्याजकडे पहात हजारों तमासगीर उभे असलेले त्यांच्या दृष्टीस पडले. तो इतक्या निर्दयपणानें त्या घोडीला टांचा मारीत होता कीं, ती अगदीं बेदम होऊन जाऊन तिचें सर्व अंग रक्तबंबाळ होऊन गेलें होतें!

त्या मनुष्याचा तो निर्दयपणा पाहून कालिफाला मोठें आश्चर्य वाटलें; व याला असें करण्याचें कारण काय याची चौकशी करण्याकरितां तो मुद्दाम तेथें थांबला. पण तें त्यास कांहींएक समजलें नाहीं; फक्त, 'बरेच दिवसापासून दररोज ह्या वेळीं हा असें करीत असतो,' एवढें मात्र लोकांनीं त्यास सांगितलें.

नंतर कालीफ व वजीर हे दोघे पुढें चालले असतां कालीफ वजिरास म्हणाला, 'हा चौक ध्यानांत ठेवा, आणि उद्यां त्या आंधळ्या मनुष्याला ज्या वेळेस वाड्यांत बोलाविलें आहे, त्याच वेळेस ह्यालाही तेथें हजर होण्याविषयीं हुकूम करा.'

हें झाल्यावर कालीफ वाड्यांत जावयास निघाला तो ज्या रस्त्यानें गेला तिकडून बरेच दिवसांत तो गेलेला नव्हता. तो चालला असतां एक उत्कृष्ट तऱ्हेची भव्य इमारत नवीनच बांधलेली त्याच्या दृष्टीस पडली. तिच्या डामडौलावरून ती मोठ्या उमरावाची असावी असें त्यास वाटलें. त्यावरून, 'ही हवेली कोणाची आहे हें तुम्हांस ठाऊक आहे काय?' असें त्यानें वजिरास विचारलें. त्यानें उत्तर केलें, 'नाहीं, पण मी त्याविषयीं चौकशी करितों,' असें म्हणून त्यानें तेथील एका मनुष्यास त्यासंबंधानें माहिती विचारिली. त्यानें त्यास सांगितलें कीं, ही हवेली खोजा हसन अल्हाबल ह्या नांवाच्या मनुष्याची आहे. ह्या मनुष्याचा धंदा दोर तयार करण्याचा आहे. त्यानें इतकी संपत्ति मिळ-

विली आहे कीं, ही इमारत बांधण्यास जितका पैसा लागला तितका सर्व त्यानें पदरचा खर्च केला. छदामदेखील कोणापासून कर्जाऊ किंवा उसना घेतला नाहीं. हा गरिबींत असतां स्वतः दोर वळतांना आम्हीं यास पाहिलें आहे. असें असतां ह्याला ही एवढी संपत्ति कशी प्राप्त झाली हें कांहीं समजत नाहीं !'

याप्रमाणें माहिती मिळवून वजीर परत कालिफाकडे आला, आणि ती त्यानें जशी ऐकिली होती तशी त्यास सांगितली. त्यावरून कालीफ त्यास म्हणाला, 'तर मग हा ख्वोजा हसन अल्हाबल कोण आहे तो मला पाहिला पाहिजे. यास्तव तुम्ही त्या दोघांप्रमाणेंच ह्यालाही उद्यां दुपारीं वाड्यांत येण्याविषयीं सांगा.' त्याप्रमाणें वजिरानें त्यास सांगितलें.

दुसरे दिवशीं तिसरे प्रहरचा निमाज पढून झाल्यावर कालीफ आपल्या खाजगी बैठकीच्या दिवाणखान्यांत गेला. त्या वेळीं त्या तीन असामींस वजिरानें त्याजपुढें नेऊन हजर केलें.

त्या तिघांनीं कालिफापुढें साष्टांग नमस्कार घातले. ते उठून बसल्यावर कालिफानें त्या आंधळ्या मनुष्यास, 'तुझें नांव काय ?' म्हणून विचारलें. तो म्हणाला, 'माझें नांव बाबा अबदल्ला.'

कालीफ म्हणाला, 'बाबा अबदल्ला, तुझी ती खैरात मागण्याची रीत मला काल इतकी विलक्षण वाटली कीं, त्या वेळीं माझ्या मनांत कांहींएक विचार आला म्हणूनच मीं तुझें म्हणणें मान्य केलें; नाहींतर कधींही केलें नसतें; इतकेंच नव्हे, तर कोणाही मनुष्यास इतःपर असा त्रास देण्याची तुला तत्काळ सक्त मनाई केली असती; असो. तर आज मीं तुला एवढ्याचकरितां येथें बोलाविलें कीं, तूं ती खुळ्यासारखी शपथ कां घेतलीस हें तुझ्या तोंडानें ऐकावें, तुझी हकीकत मीं ऐकल्यावर, तुझें करणें बरोबर आहे कीं नाहीं, व तुला ह्यापुढें असें करण्यास परवानगी द्यावी कीं नाहीं, ह्याचा मी निर्णय करीन; कारण कीं, तुझ्या ह्या वर्तनापासून पुढें कदाचित् वाईट परिणाम होण्याचा संभव आहे. तर असला हा

वेडेपणाचा विचार तुझ्या मनांत कोणत्या कारणावरून आला हें सविस्तर मला सांग. मजपाशीं कांहींएक छपवितां कामा नये; कारण मीं तुजपासून सर्व गोष्टी काढून घेतल्यावांचून तुला सोडणार नाहीं.'

कालिफाच्या अंमळ कडक भाषणामुळें बाबा अबदल्ला भिऊन गेला. त्यानें फिरून त्याजपुढें साष्टांग नमस्कार घातला. नंतर तो उठून बसला, आणि म्हणाला, 'सद्धर्मप्रतिपालक राजाधिराज, मीं ह्या पायांजवळ एवढी सलगी केली, व जें कृत्य वास्तविक विचार करून पाहतां अगदीं अयोग्य, तें दुराग्रहानें आपणांस करावयास लाविलें, याबद्दल मी पदर पसरून आपणांपाशीं क्षमा मागतों. मजकडून प्रमाद खचीत घडला आहे. पण त्या वेळीं मीं आपणांस ओळखिलें नाहीं, ही गोष्ट ध्यानीं आणून आपण मला क्षमा कराल अशी मी आशा करितों. मीं जें वर्तन केलें तें केवळ मूर्खपणाचें होतें असें आपणांस जसें वाटलें तसेंच मलाही वाटतें; आणि कोणाही मनुष्यास तें तसेंच वाटेल ह्यांत कांहीं भ्रांत नाहीं. पण माझ्या हातून जो एक महान् अपराध घडला आहे, त्यास ईश्वराच्या दृष्टीनेंही शिक्षा अगदीं अल्प आहे; इतकेंच नव्हे, तर जगांतील प्रत्येक मनुष्यानें जरी माझ्या कानशिलांत चापट मारिली, तरी त्या अपराधास योग्य शासन झालें असें होणार नाहीं. आतां आपल्या आज्ञेवरून जी मी आपली हकीकत आपणांस निवेदन करणार आहें, तीवरून माझ्या त्या अपराधाचें स्वरूप आपल्या पूर्णपणें ध्यानांत येईल.' असें म्हणून तो आपली गोष्ट सांगूं लागला.

---

## बाबा अबदल्ला ह्या नांवाच्या आंधळ्या मनुष्याची गोष्ट.

बाबा अबदल्ला म्हणतो—'सद्धर्मप्रतिपालक महाराज, माझा जन्म बगदाद शहरीं झाला. माझा बाप व आई हीं थोड्याच दिवसांच्या अंतरानें मरण पावलीं. त्यांनीं बरेंच द्रव्य मजकरितां ठेविलें होतें.

जरी मी त्या वेळीं तारुण्याच्या ऐन भरांत होतों, तरी इतर तरुण लोकांप्रमाणें मीं आपलें द्रव्य विनाकारण खर्च करण्यांत व दुर्व्यसनांत उधळून टाकिलें नाहीं; एवढेंच नव्हें, तर मोठ्या काळजीनें, दक्षतेनें व मेहनतीनें तें दिवसेंदिवस वृद्धिंगतच केलें. शेवटीं मजपाशीं इतका पैसा जमला कीं, त्याच्या योगानें मला ऐशीं उंट खरेदी करण्याचें सामर्थ्य आलें. ते मी तांडेवाले व्यापाऱ्यांस भाड्यानें देऊन त्यांजबरोबर सरकारच्या राज्याच्या हद्दींतील मुलखांत चोहोंकडे फिरत असे. त्यापासून मला दरएक खेपेस पुष्कळ पैसा मिळे.

याप्रमाणें माझी चलती असतां, मला पैसा मिळविण्याविषयीं अधिकाधिकच हांव सुटत चालली. एके दिवशीं कांहीं व्यापारी लोकांचा माल हिंदुस्थानांत जावयाचा होता, तो बसोरा शहरीं पोहोंचवून देण्याकरितां मी आपले उंट घेऊन तेथें गेलों होतों. तो माल मी तेथें उतरून परत येत असता आडरानांत एके ठिकाणीं पुष्कळ छानदार हिरवा चारा दृष्टीस पडला, म्हणून मीं आपले उंट तेथें चरावयास सोडिले, आणि विश्रांति घेत बसलों, इतक्यांत एक फकीर बसोरा येथें चालला होता तो तेथें आला, आणि माझ्या शेजारीं येऊन बसला. ‘ तुम्ही कोठून आलां ? कोठें चाललां ? ’ वगैरे हकीकत मीं त्यास विचारिली, व त्यानें त्याचप्रमाणें मलाही विचारिली. आम्हीं एकमेकांच्या प्रश्नांचा जबाब दिल्यावर उभयतांनीं आपापल्या बरोबरचें फराळाचें काढिलें, आणि दोघे एकत्र बसून फराळ करूं लागलों.

फराळ चालला असतां आमच्या इकडच्या तिकडच्या पुष्कळ गोष्टी झाल्यावर तो फकीर म्हणाला, ‘ येथून जवळच एके ठिकाणीं द्रव्याचा मोठा खाजिना असलेला मला माहीत आहे. तें द्रव्य इतकें पुष्कळ आहे कीं, तुमचे हे ऐशीं उंट जरी सोनें व जवाहीर ह्यांनीं भरले, तरी त्यांतून कांहीं कमी झालें असें दृष्टोत्पत्तीस येणार नाहीं ! ’

ही त्या फकिराच्या तोंडची गोष्ट ऐकून मला फारच आश्चर्य

वाटलें व अतिशय हर्ष झाला. तो हर्ष माझ्या पोटांत मावेना;कारण हा फकीर कालत्रयीं खोटें बोलणार नाहीं असें मला वाटलें. मीं लागलीच मोठ्या प्रेमानें त्याच्या गळ्यास मिठी घातली. आणि म्हटलें, 'फकीरबावा, तुम्हांला इहलोकचें वैभव अगदीं तुच्छ आहे हें तर स्पष्टच आहे, तर हें द्रव्य तुम्हांस माहीत असल्यापासून काय उपयोग आहे बरें? त्यांतून तुम्ही पडला एकटे, तुमच्यानें तें फारसें नेववणारही नाहीं; तर तें कोठें आहे तें मला दाखवा. मी तें आपल्या सर्व उंटांवर भरतों आणि तुमच्या मेहरबानीबद्दल तुम्हांस त्यांतील एक उंट देतों.'

त्या फकीराला एक उंट देण्याचें कबूल केलें हें अगदींच थोडें होतें ह्यांत कांहीं संशय नाहीं. पण मला तें पुष्कळच वाटलें; कारण त्या फकीरानें मला ती गोष्ट सांगितल्या वेळेपासून मला त्या द्रव्याचा इतका लोभ सुटला कीं, त्याला कांहीं सीमाच नाहीं! मला वाटलें कीं, ह्या फकीराला एक उंट मी देणार तो जाऊन बाकीचे एकुणऐशीं मला राहतील, त्यांत मला म्हणजे कांहीं म्हणण्यासारखें मिळालें असें मुळींच नाहीं!

माझा हा हावरेपणा त्या फकीराच्या लक्षांत आला; मग त्याबद्दल यत्किंचितही राग मनांत न आणतां तो शांतपणें मला म्हणाला, 'भाईसाहेब, माझ्यापासून तुमचा जो कांहीं फायदा होणार, त्याच्या मानानें मला जें तुम्ही देऊं केलें तें कांहींच नाहीं, हें तुमच्याही सहज लक्षांत येईल. समजा कीं, मीं ह्या द्रव्याची वार्ता तुम्हाला मुळींच सांगितली नसती, आणि तें सगळें एकट्यानेंच घेतलें असतें, तर तुम्हाला काय मिळालें असतें बरें! पण मीं तुमच्याशीं कांहींएक प्रतारणा न करितां मोकळ्या मनानें सर्व गोष्ट तुम्हांला सांगितली, ह्यावरून माझें मन कसें आहे तें तुम्ही जाणलेंच असेल; असो. मी इतकेंच सांगतों कीं, आपलें दोघांचेंही कल्याण व्हावें व तुम्ही जन्मभर माझी आठवण काढावी असें माझ्या मनांत फार असून तें करण्याचें सामर्थ्य मला आहे; तर

यासंबंधानें आपणां उभयतांसही जास्त फायदेशीर व रास्त अशी एक गोष्ट मला सुचली आहे, ती मी तुम्हाला सांगतों. ती मान्य करणें अगर नाकारणें हें तुमच्या मर्जीवर आहे. तुमच्यापाशीं जें ऐशीं उंट आहेत म्हणून तुम्ही म्हणाला, ते घेऊन, ज्या ठिकाणीं तें द्रव्य आहे त्या ठिकाणीं आपण जाऊं; आणि प्रत्येक उंटाच्यानें जितकें सोनें व जवाहीर नेववेल तितकें आपण त्यावर भरूं. याप्रमाणें सर्व उंट भरून झाले म्हणजे त्यांतून निम्मे तुम्हीं माझ्या स्वाधीन करावे व निम्मे तुम्ही ठेवावे, आणि मग ज्याला जिकडे वाटेल तिकडे त्यानें ते घेऊन जावें; हें करणें मला रास्त दिसतें. त्यापासून दोघां-नाही कुरकूर करण्याला जागा राहणार नाहीं. आतां तुम्हांला आपले चाळीस उंट मला द्यावे लागणार हें खरें. पण त्यांत तुमचा मुळींच तोटा नाहीं; कारण, माझ्या योगानें जें हें द्रव्य तुम्हाला मिळेल, त्या द्रव्यानें तुम्हाला आणखी हजारों उंट विकत घेतां येतील !'

फकीराचें हें म्हणणें अगदीं वाजवी होतें; सबब त्यावर मला बोलण्याला मुळींच जागा राहिली नाहीं. तथापि फकीराचें म्हणणें कबूल केल्यापासून आपला केवढा फायदा होणार हें लक्षांत न आणितां, मी आपले चाळीस उंट जाणार म्हणून मनांत मोठें दुःख करूं लागलों ! त्यांतही विशेषेंकरून, जेव्हां हा फकीर आपणाप्रमाणें श्रीमंत होणार हें माझ्या लक्षांत आलें तेव्हां तर मला फारच दुःख वाटलें ! तो बिचारा अत्यंत उदार बुद्धीनें माझें कल्याण करण्यास तयार झाला, त्याबद्दल त्याचे उपकार मीं अगोदरच अशा प्रकारें फेडलें ! असो, याप्रमाणें माझें मन द्विधा झालें; तथापि त्या वेळीं विचार करण्यास अवकाश नव्हता. एक तर फकीराचें म्हणणें मुकाट्यानें कबूल करावें, नाहींपेक्षां एवढी अपार संपत्ति मिळण्याची संधि अनायासें आली असतां ती आपण होऊन फुकट घालविली म्हणून सर्व जन्मभर पश्चात्ताप करीत बसावें, याखेरीज दुसरी वाटच नव्हती !

मग लागलीच मीं आपले सर्व उंट एकत्र केले, आणि ते घेऊन

यासंबंधानें आपणां उभयतांसही जास्त फायदेशीर व रास्त अशी एक गोष्ट मला सुचली आहे, ती मी तुम्हाला सांगतों. ती मान्य करणें अगर नाकारणें हें तुमच्या मर्जीवर आहे. तुमच्यापाशीं जें ऐशीं उंट आहेत म्हणून तुम्ही म्हणाला, ते घेऊन, ज्या ठिकाणीं तें द्रव्य आहे त्या ठिकाणीं आपण जाऊं; आणि प्रत्येक उंटाच्यानें जितकें सोनें व जवाहीर नेववेल तितकें आपण त्यावर भरूं. याप्रमाणें सर्व उंट भरून झाले म्हणजे त्यांतून निम्मे तुम्हीं माझ्या स्वाधीन करावे व निम्मे तुम्ही ठेवावे, आणि मग ज्याला जिकडे वाटेल तिकडे त्यानें ते घेऊन जावें; हें करणें मला रास्त दिसतें. त्यापासून दोघां-नाही कुरकूर करण्याला जागा राहणार नाहीं. आतां तुम्हांला आपले चाळीस उंट मला द्यावे लागणार हें खरें. पण त्यांत तुमचा मुळींच तोटा नाहीं; कारण, माझ्या योगानें जें हें द्रव्य तुम्हाला मिळेल, त्या द्रव्यानें तुम्हाला आणखी हजारों उंट विकत घेतां येतील !'

फकीराचें हें म्हणणें अगदीं वाजवी होतें; सबब त्यावर मला बोलण्याला मुळींच जागा राहिली नाहीं. तथापि फकीराचें म्हणणें कबूल केल्यापासून आपला केवढा फायदा होणार हें लक्षांत न आणितां, मी आपले चाळीस उंट जाणार म्हणून मनांत मोठें दुःख करूं लागलों ! त्यांतही विशेषेंकरून, जेव्हां हा फकीर आपणाप्रमाणें श्रीमंत होणार हें माझ्या लक्षांत आलें तेव्हां तर मला फारच दुःख वाटलें ! तो बिचारा अत्यंत उदार बुद्धीनें माझें कल्याण करण्यास तयार झाला, त्याबद्दल त्याचे उपकार मीं अगोदरच अशा प्रकारें फेडलें ! असो, याप्रमाणें माझें मन द्विधा झालें; तथापि त्या वेळीं विचार करण्यास अवकाश नव्हता. एक तर फकीराचें म्हणणें मुकाट्यानें कबूल करावें, नाहींपेक्षां एवढी अपार संपत्ति मिळण्याची संधि अनायासें आली असतां ती आपण होऊन फुकट घालविली म्हणून सर्व जन्मभर पश्चात्ताप करीत बसावें, याखेरीज दुसरी वाटच नव्हती !

मग लागलीच मीं आपले सर्व उंट एकत्र केले, आणि ते घेऊन



अत्यंत सुशोभित व भव्य असा, वाडा दिसूं लागला. [ पान ३५१

तो फकीर व मी असे उभयतां निघालों. आम्हीं थोडे पुढें गेलों तों आम्हांला एक मोठी थोरली दरी लागली. तींत जाण्याची वाट अगदीं अरुंद होती. म्हणून तींतून फक्त एकेकच उंट आंत नेतां आला. ज्या दोन पर्वतांच्या योगानें ही दरी झाली होती, ते जेथें एकमेकांस मिळाले होते तेथें अर्धवर्तुळ झालें होतें. तें अतिशय उंच व नीट सुळासारखें गेलें असून त्याजवर इतकी किर्र झाडी होती कीं, कोणी मनुष्य येऊन आम्हांला पाहील याची तिळप्रायही भीति आम्हांला नव्हती.

ह्या दोन पर्वतांच्या मध्यें आम्ही आल्यावर फकीर मला म्हणाला, 'आतां ह्या उंटांना तुम्ही खालीं बसवा. म्हणजे आपणांला त्यांजवर ओझीं लादायाला बरें पडेल. तुम्ही त्यांना बसवतां आहांत तोंच मी इकडे द्रव्य काढण्याच्या तजविजीस लागतों.'

फकीरानें सांगितल्याप्रमाणें मीं उंटांना खालीं बसविलें आणि लागलाच त्याच्याकडे गेलों. त्यानें हातांत सनकाडी व चकमक घेतली होती व विस्तव पेटाविण्याकरितां तो काटक्याकुटक्या जमा करीत होता. त्यानें विस्तव पेटाविला, आणि त्यावर थोडासा ऊद टाकिला. नंतर त्यानें कांहीं मंत्राचा उच्चार करितांच तेथें धुरांचा मोठा काळा कुळकुळीत ढग बनून तो आकाशांत खूप उंच गेला. तो ढग त्यानें दुभागला, तों तत्काळ असा चमत्कार झाला कीं, एवढा मोठा सुळासारखा नीट गेलेला तो पर्वत, जसा एखादा दरवाजा फट्दिशीं उघडतो, त्याप्रमाणें दुभंग झाला, आणि त्याच्या आंतल्या बाजूस एक अत्यंत सुशोभित व भव्य असा वाडा दिसूं लागला. हें कृत्य खरोखर मानवांचें नसून यक्षादिकांचेंच असलें पाहिजे; कारण असला अचाट उद्योग मानवांच्या बुद्धीच्या व शक्तीच्या आवाक्या बाहेरचा होय!

हें त्या वाड्याच्या संबंधानें जें मीं म्हटलें, तें पुढें पुष्कळ वेळानें माझ्या मनांत आलें; कारण, त्या वेळीं इकडचा तिकडचा कांहीं विचार माझ्या मनांत आलाच नाहीं. फार काय सांगूं! त्या वाड्यांत

चोहोंकडे जी अपार संपत्ति मोठ्या व्यवस्थेशीर रीतीनें ठेविलेली होती, ती पाहून मी क्षणभर देखील आश्चर्य करीत राहिलों नाहीं! तर ज्याप्रमाणें गिधाड आपलें भक्ष्य नजरेस पडतांच त्याजवर तत्काळ झडप घालतें त्याप्रमाणें, मला तेथें प्रथमच जी एक मोहोरांची रास दिसली तींतील मोहोरा एकेका पोत्यांत मी भराभर भरूं लागलों! पोतीं चांगलीं मोठमोठीं व मजबूत होतीं. तीं मीं मोठ्या आनंदानें तोंडोतोंड भरलीं असतीं, पण तीं तितकीं भरलीं तर उंटाच्यानें नेववणार नाहींत असें जाणून निरुपायास्तव मला त्यांच्या शक्तीच्या मानानें तीं भरावीं लागलीं. फकीरानेंही माझ्याप्रमाणेंच केलें, पण सोन्यापेक्षां हिरे, माणकें इत्यादि रत्नेंच त्यानें पुष्कळ भरलीं. त्यानें तसें करण्याचें कारण मला सांगितलें, त्यावरून मींही मग त्याच्याप्रमाणेंच केलें. एकंदरीनें आम्हीं उभयतांनींही सोन्यापेक्षां रत्नेंच जास्त भरलीं. आम्हीं सर्व पोतीं भरून उंटांवर चढविल्यावर त्या वाड्याचा दरवाजा बंद करून आपला रस्ता धरण्याखेरीज आम्हांला दुसरें कांहींएक करावयाचें राहिलें नाहीं. आतां परत येण्याकरितां निघावयाचें, इतक्यांत तो फकीर पुनः आंत गेला, आणि एके ठिकाणीं लहानमोठ्या व तऱ्हतऱ्हेच्या सोन्याच्या बरण्या पडल्या होत्या, त्यांपैकीं एकींतून त्यानें एक लहानशी लांकडी डबी काढून घेतली. तींत फक्त कांहीं एक प्रकारचें मलम होतें. तें त्यानें मला पुनः उघडून दाखविलें आणि ती डबी खिशांत घातली.

हें झाल्यावर, पूर्वीं दरवाजा उघडण्याकरितां जो विधि त्यानें केला होता तोच फिरून केला. नंतर कांहीं मंत्राचा उच्चार करितांच तो दरवाजा खट्‌दिशीं बंद होऊन गेला. आणि डोंगर पूर्ववत्‌ जशाचा तसा दिसूं लागला.

नंतर आम्हीं ते उंट निमेनिम वांटून घेतले, आणि दरींतून आल्या वाटेनें बाहेर पडलों. नंतर मोठ्या सडकेला लागेतोंपर्यंत आम्ही एकत्र चाललों. तेथून आमचा रस्ता फुटत होता—त्याचा बसोऱ्या-

कडे व माझा बगदादेकडे—सबब मीं त्याचा निरोप घेतलोत्या वेळीं, त्यानें मजवर केलेल्या ह्या महदुपकारांबद्दल मी त्याचे फार फार आभार मानिले. मग आम्हीं एकमेकांस मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें आणि आपल्या रस्त्यानें चालते झालों.

इतकें होत आहे तों, मीं आपल्या उंटांना रस्त्याला लावून दिलें होतें, ते शेंपन्नास पावलें दूर गेले. त्यांना मी जाऊन गांठतों आहें, इतक्यांत कृतघ्नता आणि मत्सर ह्या पिशाचांनीं माझ्या अंतकरणांत संचार केला. माझे ते चाळीस उंट गेले, याबद्दल मला मोठें वाईट वाटलें. त्यांत विशेषेंकरून, त्यांजवर असलेलें द्रव्य मला मिळालें नाहीं, याबद्दल मला फारच वाईट वाटलें. मीं मनांत म्हटलें, 'त्या फकीराला हें द्रव्य नेऊन काय करावयाचें आहे? तो त्या एकंदर भांडारांचा मालकच आहे, त्याअर्थीं आणखी हवें तेवढें त्यांतून त्याला नेतां येईल.' असें म्हणून ते चाळीस उंट व त्यांजवरील सर्व ऐवज त्या फकीरापासून घेण्याचा अत्यंत दुष्ट विचार मनांत आणिला.

मग हा बेत सिद्धीस नेण्याच्या कामास मी लागलों. प्रथमतः मीं आपले उंट उभे केले, आणि नंतर त्या फकीराला खूप मोठ्यानें हांका मारीत, व 'तुम्ही आपले उंट उभे करा' असें हातानें खुणवीत, त्याच्या मागें धांवत चाललों. माझी हांक ऐकतांच तो आपले उंट उभे करून माझी वाट पाहात राहिला.

मी त्याच्याजवळ जाऊन त्यास म्हणालों, 'फकीरबाबा, मीं मघाशीं तुमचा निरोप घेतला न घेतला इतक्यांत माझ्या मनांत एक गोष्ट आली. तिचा आपण पूर्वी दोघांनींही विचार केला नव्हता ती गोष्ट अशीः—तुम्ही पडला साधु; तुम्हांला इहलोकींचे सर्व व्यवसाय सोडून देऊन सर्व काळ ईश्वरभजन करीत एकांतीं राहण्याची संवय, तेव्हां हे इतके उंट संभाळण्यास किती त्रास पडेल याची कल्पना तुमच्या मनांत आली नसेल. म्हणून माझें ऐकाल तर, तुम्ही यांपैकीं तीस उंट ठेवा आणि बाकीचे माझ्या स्वाधीन करा. हे तीसच संभाळतां संभाळतां पुरेसें होईल. माझी गोष्ट निराळी, मी

ह्या कामांत घटावलेला असल्यामुळें मला तें कांहीं कठिण नाहीं ! '

हें माझें बोलणें ऐकून फकीर बिचारा अगदीं निरुत्तर झाला. व त्याला माझें म्हणणें कबूल करावें लागलें. तो मला म्हणाला, 'तुम्ही म्हणतां तें कांहीं खोटें नाहीं असें मलाही वाटतें. ह्यापूर्वी ही गोष्ट माझ्या मनांत मुळीं आली नाहीं. तुम्हीं हें सांगितल्यापासून मला मोठी काळजी लागून राहिली आहे, तर आतां ह्यांतले जे दहा उंट तुमच्या पसंतीस येतील ते तुम्ही घेऊन जा कसे ! '

मी त्यांतून दहा उंट निवडून घेतले, आणि बाकीच्या उंटांमागें त्यांनाही लावून दिलें. फकीर हे दहा उंट देण्याचें इतकें लौकर कबूल करील असें मला वाटलें नव्हतें; परंतु त्यानें ते देण्यास मुळींच आढेवेढे घेतले नाहींत, ह्यामुळें मला ज्यास्तच लोभ सुटला. मीं मनांत म्हटलें, आणखी ह्याच्यापासून दहा उंट उपटण्यास कांहीं कठिण नाहीं. म्हणून हे जे त्यानें दहा दिले, त्याबद्दल त्याचे आभार मानण्याचें सोडून मीं त्यास म्हटलें, ' बाबाजी, तुम्ही जे हे तीस उंट आपणांकरितां ठेविले आहेत ते तरी त्यांच्यावरच्या ऐवजासुद्धां संभाळणें हें तुमच्यासारख्या अनभ्यस्तास किती कठिण आहे. ह्याचा तुम्ही आणखी एकवार विचार करावा. असें माझें म्हणणें आहे; कारण तुम्हांस यत्किंचितही त्रास होईल तर त्यापासून मला अपरिमित दुःख होणार आहे; व म्हणूनच मीं हें तुम्हांस म्हणतों. तेव्हां माझें ऐकाल तर, तुम्ही आणखी ह्यांतले दहा उंट माझ्या स्वाधीन करा. मी आपल्या फायद्याकरितां हें तुम्हांला सांगत नाहीं, तर तुमचा त्रास चुकवावा म्हणून सांगतों. तर मग करा कसें आणखी दहा माझ्या स्वाधीन आणि व्हा मोकळे ! मला म्हणाल तर त्यांचा कांहीं त्रास नाहीं—एक संभाळणें काय आणि शंभर संभाळणें काय, सारखेंच ! '

माझें बोलणें त्या फकीराला रुचलें, व त्यानें लागलीच आणखी दहा उंट माझ्या स्वाधीन केले. याप्रमाणें त्याच्यापाशीं फक्त वीसच उंट राहिले, आणि माझे एकंदर साठ झाले. तेव्हां मोठमोठ्या

राजांपेक्षांही आपण श्रीमंत झालों असा मला अभिमान वाटूं लागला. आतां तरी माझ्या मनाची तृप्ति व्हावी कीं नाहीं ? पण तसें कोठून होणार ? उलट असें झालें कीं, ज्याप्रमाणें एखादा जलोदर झालेला मनुष्य जों जों पाणी पितो, तों तों त्याला अधिकाधिकच तहान लागते, त्याप्रमाणें, हे उंट मिळाल्यावर तर मला अधिकच हावरेपणा सुटला, व फकिराजवळचे बाकी राहिलेले वीसही उंट आपल्याला मिळावे अशी मला इच्छा उत्पन्न झाली.

मग मीं त्या फकीराची आणखी पुष्कळ प्रकारें मनधरणी करून, त्याजपाशीं राहिलेल्या वीस उंटांपैकीं दहा उंट तर घेतले. आतां बाकी दहा राहिले, त्याजकरितां मी त्याच्या पायां पडलों, त्याची दाढी धरली, आणि कसें तरी करून एवढी मला भिक्षा घालाच, म्हणजे, तुमचे मजवर अनंत उपकार होतील, अशी त्याला गळ घातली. त्या बिचाऱ्यानें तेंही जेव्हां कबूल केलें, तेव्हां माझा आनंद त्रिभुवनांतही मावेना ! तो म्हणाला, 'भाई, याचा नीट सांभाळ करा, आणि सदोदित ही एक गोष्ट ध्यानांत ठेवा कीं, आपण आपल्या संपत्तीचा अनाथांस साह्य करण्याकडे उपयोग न केल्यास परमेश्वर ती आपणांपाशीं कधींही राहूं देणार नाहीं. कारण ती देणें आणि हरण करणें हीं दोन्ही त्याच्यांत हातांत आहेत. जे संपन्न असतील त्यांनीं दरिद्र्यांस धर्म करून परलोकीं त्याच्या शेंकडोंपट सुख प्राप्त होण्याचें साधन करून ठेवावें, एवढ्याचकरितां परमेश्वरानें जगांत दारिद्र्य ठेविलें आहे ! ,

मला लोभ अमर्याद सुटला होता, तेव्हां असल्या परमार्थाच्या गोष्टी मला कोठून रूचणार ? माझे सर्व उंट मला मिळाले, आणि शिवाय एवढी अपार संपत्ति मिळाली तरी माझ्या मनाची तृप्ति झाली नाहीं ! माझ्या मनांत आलें कीं, ही एवढी संपत्ति जी ह्या फकीराच्या योगानें आपल्याला मिळाली तिजपेक्षांही, त्याच्याजवळ जी मलमाची डबी आहे तिचें महत्त्व अधिक आहे. ती डबी संभाळून ठेवण्याविषयीं त्याची तत्परता, व जेथून त्यानें ती काढिली तें स्थळ

ह्याचा विचार करितां मला असें दिसून आलें कीं, तिच्यांत कांहीं तरी लोकविलक्षण गुण असावा ह्यांत संशय नाहीं. म्हणून तीही हरयुक्ति करून हस्तगत करण्याचा मीं निश्चय केला. मीं त्याला आलिंगन दिलें, व सलाम करून निघालों; पण लागलीच कांहीं आठवण झाल्यासारखें करून पुनः परतलों, आणि त्यास म्हणालों, 'बाबाजी, तुमच्याजवळ जी लहानशी डबी आहे, ती तुम्हांला काय करावयाची आहे बरें? तेवढी मला देऊन टाका ना परती! मला वाटतें, ती जवळ बाळगण्यापासून तुम्हांला यत्किंचित् देखील उपयोग नाहीं; कारण तुमच्यासारख्या सर्वसंगपरित्याग केलेल्या मनुष्याला मलमाचें कधीं कारण पडणार!'

ती डबी त्यानें मला दिली नसती तर फार चांगलें झालें असतें! पण उपयोग काय? तो नाहीं म्हणता तर मीं जबरदस्ती करून ती घेतली असती; कारण मी त्याच्यापेक्षां बळकट होतों!

परंतु फकीरानें मला डबी देण्याचें नाकारिलें नाहीं; एवढेंच नव्हे तर ती त्यानें तत्क्षणीं आपल्या खिशांतून काढून मोठ्या आनंदानें माझ्या स्वाधीन केली; आणि तो म्हणाला, 'भाई, घ्या ही. आतां तुमची इच्छा पूर्ण झाली ना? आणखी कांहीं हवें असेल तर सांगा. संकोच धरूं नका. माझ्या हातचें असेल तें देण्यास मी अगदीं सिद्ध आहें. तुमच्या तोंडांतून शब्द निघण्याचा मात्र अवकाश!'

मीं डबी उघडली, आणि तिच्यांतील मलमाकडे पाहून त्यास म्हटलें, 'ज्याअर्थीं तुम्हीं मजवर एवढे मोठे उपकार केले व आणखीही करूं इच्छितां, त्याअर्थीं ह्या मलमाच्या अंगीं काय गुण आहे तेवढा कृपा करून मला सांगा!'

फकीरानें उत्तर केलें, 'ह्याच्या अंगचा गुण फारच चमत्कारिक व अद्भुत आहे. ह्याचा थोडासा अंश जर तुम्हीं आपल्या डाव्या डोळ्याच्या भोंवतीं व त्याच्या पापणीला लावाल, तर पृथ्वीच्या पोटांतील रत्नादिकांचीं सर्व भांडारें तुमच्या नजरेस पडतील; पण

तेंच जर किंचित् उजव्या डोळ्याला लावाल, तर त्यापासून तुम्हांला अंधत्व येईल.'

मीं फकीराला म्हटलें, 'बरें तर, मी त्याची प्रचीति घेऊन पाहतोंच.' असें म्हणून मीं ती डबी त्याच्या हातांत दिली आणि म्हटलें, 'ह्यांतलें थोडेंसें मलम माझ्या डाव्या डोळ्याला लावा. माझ्यापेक्षां तें तुम्हांला चांगलें लावितां येईल. हं, लावा लौकर. हा अलौकिक प्रकार कसा घडतो तो पाहण्याची मला फारच उतावळी झाली आहे!'

मग मीं आपला डावा डोळा मिटला आणि फकीरानें तें मलम त्याजवर चोळलें. हें त्यानें चोळतांच मीं डोळा उघडला, आणि पाहतों तों फकीरानें सांगितलेली गोष्ट खरीच! रत्नादिकांचीं अपरंपार भांडारें व हजारों प्रकारच्या नाण्यांच्या पर्वतप्राय राशि मला दिसूं लागल्या! त्या अत्यंत भव्य व सुंदर देखाव्याचें यथातथ्य वर्णन करणें केवळ अशक्य आहे! असो. पण उजवा डोळा मिटून धरावा लागल्यामुळें मला फार त्रास होऊं लागला. सबब थोडेंसें मलम त्याही डोळ्यास लावण्याविषयीं मीं फकीरास विनंति केली.

त्यानें उत्तर केलें, 'मजकडून कांहीं हरकत नाहीं, पण मीं पूर्वीं काय सांगितलें आहे त्याचा फिरून विचार करा. जर तें तुम्हीं उजव्या डोळ्याला लावाल, तर तुमच्या दोन्हीं डोळ्यांच्या ताबडतोब खांचा झाल्यावांचून कधींही राहणार नाहींत, असा त्याचा विपरीत गुण आहे.'

फकीराचें हें बोलणें मला खरें वाटलें नाहीं; इतकेंच नव्हे, तर माझ्या मनांत उलटें असें पाप आलें कीं, त्या मलमांत आणखी कांहीं अद्भुत गुण असून तो आपल्याला सांगूं नये असें त्याच्या मनांत आहे. यास्तव मीं त्यास हंसून म्हटलें, 'बाबाजी, तुम्हीं मला फसवूं पाहतां असें मला स्पष्ट दिसतें! एकमेकांस अत्यंत विरुद्ध असे दोन गुण ह्या एकाच मलमाच्या अंगीं असतील हें मुळींच संभवत नाहीं!'

फकीरानें उत्तर केलें, 'तें कांहीं असो; पण मी ईश्वरास स्मरून सांगतों कीं, मीं जें तुम्हांस सांगितलें तें अगदीं खरें आहे. तुम्ही कांहींएक अंदेशा मनांत आणूं नका. मी प्राण गेला तरी खोटें बोलणार नाहीं!'

अशा प्रकारें तो बिचारा फकीर जीव तोडतोडून जरी सांगूं लागला, तरी त्याचा मला भरंवसा वाटेना! पृथ्वीच्या पोटांतील अपार संपत्ति यथेच्छ पाहण्याविषयीं व लागेल तेव्हां तिचा उपयोग घेण्याविषयीं मला जी अनिवार इच्छा झालेली होती, तिचा माझ्या मनावर इतका पुरा अंमल बसला होता कीं, त्याच्या कानउघाडणीकडे माझें बिलकुल लक्ष जाईना, व त्याचें बोलणें खरें असावें असें माझ्या मनांत भरेना. शेवटीं त्याच्या बोलण्याची प्रतीति दुर्दैवेंकरून मला लौकरच आली!'

माझ्या डोक्यांत असें वेड भरलें कीं, ज्या अर्थीं तें मलम डाव्या डोळ्याला लावल्यानें मला पृथ्वीच्या पोटांतील सर्व संपत्ति दिसली, त्या अर्थीं तें उजव्या डोळ्याला लाविलें असतां ती माझ्या हातीं लागावी असा कदाचित् त्याच्यांत गुण नसेल कशावरून? तेव्हां तें मलम आपल्या उजव्या डोळ्याला त्यानें लावावें असा मीं दुराग्रह धरिला. पण तो कांहीं केल्या ऐकेना. तो मला म्हणाला, 'भाई, मीं तुमचें इतकें चांगलें केलें असून आतां तुमचा असा घात करण्याला माझा हात कसा वाहील बरें? सर्व इंद्रियांत श्रेष्ठ जें नेत्रेंद्रिय, त्याच्या सुखास दुर्दैवेंकरून जे मुकतात, त्यांना किती दुःख होत असेल याचा आपल्या मनाशीं तुम्हीं पुरता विचार करा; आणि ज्या कृत्याच्या योगानें तुमच्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत तुम्हांला दारुण पश्चात्ताप होणार आहे, तें करावयास मला लावूं नका!'

इतकें त्यानें सांगितलें तरी मीं आपला दुराग्रह सोडिला नाहीं. मीं त्यास म्हटलें, 'बाबाजी, मी तुम्हांला हात जोडतों, तुम्ही आतां ह्या अडचणी मला सांगूं नका. आतांपर्यंत जें जें तुम्हांस मीं म्हटलें, तें तें तुम्हीं परम उदार बुद्धीनें मान्य केलें, आणि आतां शेवटीं ह्या असल्या क्षुल्लक गोष्टीसाठीं तुम्ही माझें मन खट्टू करणार? तुम्हांला देवाची

शपथ आहे, तुम्ही कसेंही करून एवढी माझी शेवटची विनंति मान्य केलीच पाहिजे. ह्यापासून कसाही परिणाम होवो, त्याचा दोष माझ्या माथीं आहे; तुमच्याकडे त्याचें कांहीं नाहीं !'

मीं आपला दुराग्रह सोडावा म्हणून फकीरानें आपली पराकाष्ठा करून पाहिली. शेवटीं आपण ह्याचें ऐकिलें नाहीं तर हा आपणावर जबरदस्ती केल्यावांचून राहणार नाहीं, असें त्यास दिसून आल्यावरून तो म्हणाला, 'ज्याअर्थीं तुम्ही आपला हेका सोडीतच नाहीं त्याअर्थीं तुमचें मला ऐकणें भाग आहे !' असें म्हणून मीं आपला उजवा डोळा मिटला होता त्याजवर त्यानें थोडेंसें मलम चोळलें. मग काय उशीर ? मी डोळा उघडून पाहतों तों सर्व अंधार ! दोन्ही डोळ्यांच्या पार खांचा होऊन गेल्या ! त्या ह्या वेळेपर्यंत तशाच आहेत !

मीं हंबरडा फोडून म्हटलें, 'फकीरबुवा, तुम्हीं सांगितलेली गोष्ट अगदीं अक्षरशः खरी झाली. कोणीकडून हो मला ही दुष्ट बुद्धि सुचली ! हाय ! हाय ! ह्या अनिवार द्रव्यलोभानें कसें मला दुःखसमुद्रांत लोटून दिलें ! मीं आपण होऊन आपल्या पायांवर धोंडा पाडून घेतला. हें मला आतां समजून आलें ! पण आतां उपयोग काय ? बाबा, तुम्ही उदार व धार्मिक आहां, व तुम्हांला अद्भुत गुणकारी अशा हजारों चिजा माहीत आहेत, त्यांत जिच्या योगानें माझी दृष्टि फिरून येईल अशी एखादी नाहीं काय !'

फकीर म्हणाला, 'चांडाळा, कपाळकरंट्या, माझें जर ऐकतास तर कशाला ही दशा प्राप्त झाली असती ! तूं विचारांध झालास, म्हणून तुझ्या कपाळीं हें अंधत्व आलें आहे, समजलास ? संपत्तीचा उपभोग घेण्याची तुझी योग्यताच नाहीं; तूं अरण्यवासच करून रहावेंस. अद्भुत गुणकारी अशा अनेक चिजा मला माहीत आहेत म्हणून जें तूं म्हणालास, तें खरें आहे; व तुझा माझा जो अल्पकाल समागम झाला, तितक्यांत ह्या गोष्टीचा अनुवभही तुला आला आहे. पण जिच्या योगानें तुझी दृष्टि तुला फिरून प्राप्त होईल, अशी एकही चीज त्यांत नाहीं ! आतां यास एकच उपाय आहे, तो हा कीं, जर

ईश्वर म्हणून कोणी आहे, असें तुला वाटत असेल, तर त्याचा धांवा कर. त्याच्याशिवाय कोणाच्या हातांत ती गोष्ट आतां राहिली नाहीं! त्यानें तुला संपत्ति दिली, पण तिच्या उपभोगास पात्र नव्हतास, यास्तव जे तिच्या उपभोगास पात्र असतील त्यांस ती माझ्या द्वारें देण्याकरितां त्यानें तुजपासून परत घेतली ! '

फकीर पुढें चकार शब्द बोलला नाहीं; व मलाही त्यास उत्तर देण्यास जागा राहिली नाहीं. त्यानें मला तसेंच एकटें पडूं दिलें व सर्व उंट गोळा करून त्यानें बसोऱ्याचा रस्ता धरिला. ' व्यापारी लोकांचा एखादा काफिला चालला असेल तेथपर्यंत तरीं मला नेऊन पोहोंचवा, ' अशाविषयीं मीं पुष्कळ त्याच्या हातांपायां पडून त्याला सांगितलें. पण त्यानें तिकडे बिलकूल लक्ष दिलें नाहीं. तेव्हां मला जें दुःख झालें तें सांगतां पुरवत नाहीं. आतां पुढें काय करावें तें मला कांहींच सुचेना! पैशापरी पैसा गेला, आणखी डोळेही गेले ! याप्रमाणें माझें सर्व कांहीं जाऊन मला कोणाचाही आश्रय राहिला नाहीं. अशा स्थितींत दुःखामुळें व अन्नपाणी न मिळाल्यामुळें मी मरावयाचाच, पण दुःखांत सुख एवढेंच समजावयाचें कीं, दुसरे दिवशीं बसोऱ्याहून कांहीं व्यापारी लोक परत येत होते, त्यांनीं कृपा करून मला उंटावर बसवून बगदाद येथें आणून सोडिलें.

अशा प्रकारें, सामर्थ्यानें नव्हे तरी संपत्तीनें, मोठमोठ्या राजांची बरोबरी करण्यासारखें वैभव मला प्राप्त झालें असतां तें एकाएकीं सर्व नष्ट झालें व फिरून तें प्राप्त होण्याचीही आशा समूळ नाहींशीं झाली; आणि मला शेवटीं भिक्षा मागण्याखेरीज दुसरी तोडच राहिली नाहीं! ती स्थिति मी हा वेळपर्यंत भोगीत आहें. सारांश, याप्रमाणें मीं परमेश्वराचा मोठा अपराध केला आहे. सबब जो जो धार्मिक गृहस्थ मजवर दया करील, त्याजकडून मीं आपल्या अपराधाचें प्रायश्चित्त म्हणून कानशिलांत चापट मारून घेण्याचा नियम केला आहे.

सद्धर्मप्रतिपालक राजाधिराज, काल आपल्याला जी माझी कृति इतकी विलक्षण वाटली, व जिच्याबद्दल आपली मजवर इतराजी होणें अगदीं साहजिक आहे, ती करण्यांत माझा हेतु कोणता तो मीं ह्या चरणापाशीं निवेदन केला. मी आपला दास आहे, व आपण महासमर्थ प्रभु, क्षमेचें केवळ माहेरघर आहां; तर मला खचीत वाटतें कीं, मीं आपल्याला जी ही शिक्षा लावून घेतली आहे, ती माझ्या अपराधाच्या मानानें फारच कमी आहे, असें आपल्या ध्यानीं आल्यावांचून राहणार नाहीं.

याप्रमाणें बाबा अबदल्ला ह्यानें आपली हकीकत सांगितली. ती ऐकून कालीफ म्हणाला,'बाबा अबदल्ला, तुझ्या हातून फार मोठें पाप घडलें ह्यांत संशय नाहीं. पण त्याबद्दल तुला पश्चात्ताप होऊन तूं आपल्याला शासन करून घेत आहेस हें फार चांगलें आहे. तुला अशी बुद्धि झाली याबद्दल तुला परमेश्वराचे आभार मानले पाहिजेत. तथापि आजपर्यंत तूं आपल्याला जें शासन करून घेतलेंस तेवढें पुरें आहे. मात्र तूं निमाज पढण्याचे वेळीं दररोज परमेश्वरापाशीं आपल्या सर्व अपराधांची क्षमा मागत जा. तुला निर्वाहाकरितां भिक्षा मागावी लागल्यामुळें कदाचित् ह्या तुझ्या नियमांत अंतर पडेल, म्हणून आजपासून तुझ्या जिवांत जीव आहे, तोंपर्यंत दररोज तुला एक होन देण्याविषयीं मी वजिरास हुकूम करितों. तर तूं आतां इतक्यांत जाऊं नको, वजीर तुला आजची खैरात आणून देईपर्यंत थांब.'

हें ऐकून बाबा अबदल्ला ह्यानें फिरून कालिफास साष्टांग नमस्कार घातला, आणि त्याचे मोठे उपकार मानून त्यास दुवा दिला.

बाबा अबदल्ला व फकीर ह्यांची गोष्ट ऐकून कालीफ हरून अल्रशीद फार खूष झाला नंतर ज्या तरुण मनुष्यानें आपल्या घोडीला निर्दयपणानें वागविलें होतें त्यास त्यानें 'तुझें नांव काय?' म्हणून विचारलें. त्यानें सांगितलें, 'मला शिदी नूमान म्हणतात.'

कालीफ म्हणाला,'शिदी नूमान, हजारों लोकांना घोडे वापर-

तांना मीं पाहिलें आहें, पण काल तूं शहरच्या भरचौकांत आपल्या घोडीस जसा क्रूरपणानें वागवीत होतास, तसा क्रूरपणा कोणी केलेला मीं हा कालपर्यंत पाहिला नाहीं. त्याच्या योगानें आसपासच्या लोकांस फार वाईट वाटलें व त्यांचा त्याबद्दल फार बोभाटा ऐकूं आला. मला स्वतःलाही तो प्रकार पाहून कमी वाईट वाटलें असें नाहीं, व आपण कोण हें तेथल्या तेथेंच प्रगट करून या गोष्टीचा ताबडतोब बंदोबस्त करावा असेंही त्या वेळीं माझ्या मनांत आलें होतें. तथापि तुझ्या मुद्रेवरून तुझें अंतःकरण निष्ठुर असावें असें मला वाटलें नाहीं. सबब तुला तें कृत्य करण्यास कांहीं कारण झालें असावें अशी माझ्या मनांत कल्पना आली; कारण एकच दिवस नव्हे, तर बरेच दिवसपर्यंत तुझा दररोज असा क्रम चाललेला आहे असें माझ्या कानीं आलें आहे. तर ह्या गोष्टीचें कारण काय तें तुझ्या तोंडून ऐकावें म्हणून मी तुला बोलाविलें आहे. काय हकीकत असेल ती मला खरी खरी सांगितली पाहिजे, कांहींएक छपवितां कामा नये.'

कालिफाचा हा हुकूम ऐकून शिदी नूमान अगदीं गांगरून गेला. त्याला त्या गोष्टीचें महत्संकट पडलें. त्याचा चेहरा अगदीं उतरून गेला, आणि त्याला कांहीं सुचेनासें झालें. तथापि कालिफाचा हुकूम ऐकल्यावांचून गत्यंतर नाहीं असें समजून त्यानें त्याजपुढें साष्टांग नमस्कार घातला आणि बोलण्यास आरंभ करणार, तों फिरून तो पूर्ववत् घाबरून गेला—इतका कीं त्याच्या तोंडांतून एक शब्दही निघेना! याचें कारण, त्याला कालिफासमोर बोलण्याचें भय वाटलें हें नव्हे, तर त्याच्या त्या गोष्टींतच तसा कांहीं विलक्षण प्रकार होता.

आपली आज्ञा मान्य करण्यास यत्किंचित्ही विलंब लागतां उपयोगीं नाहीं अशी जरी कालिफाची तबियत होती, तरी शिदी नूमान याच्या तोंडांतून शब्द निघत नाहीं असें पाहून त्याला बिलकूल राग झाला नाहीं. त्याला वाटलें कीं, आपल्यासमोर बोलण्याला

धैर्य याला होत नसेल, अगर आपल्या धमकीला हा भिऊन गेला असेल, अथवा याला जी हकीकत सांगावयाची आहे तींत एखादी गोष्ट न सांगण्यासारखी असल्यामुळें ती कशी छपवावी याच्या तो विचारांत पडला असेल; म्हणून त्याला धैर्य येण्याकरितां तो बोलला, 'शिदी नुमान, तूं कांहीं घाबरूं नको; चित्त थाऱ्यावर ठेव आणि जें कांहीं बोलावयाचें तें एखाद्या अगदीं सलगींतल्या मनुष्यापाशीं बोलत आहेस असें समजून बोल. तुझ्या हकीकतींतल्या एखाद्या गोष्टीनें मला राग येईल अशी जर शंका तुला येत असेल तर ती तूं मनांतून काढून टाक; मजकडून तुला अभय आहे. हं, चालूं दे तर आतां.'

कालिफाच्या तोंडचे हे शेवटचे शब्द ऐकून शिदी नूमान ह्याला धैर्य आलें, आणि त्यानें बोलण्यास सुरवात केली. तो म्हणाला, 'सद्धर्मप्रतिपालक राजाधिराज, आपल्यासमोर जे कोणी येतात त्यांना आपली कितीहि भीति वाटो; पण माझ्याविषयीं म्हटलें तर ज्या गोष्टीविषयीं मला आपण हकीकत विचारिली, तेवढी शिवायकरून बाकी कोणत्याही गोष्टीच्या संबंधानें आपणांसमोर बोलण्यास मला भीति वाटणार नाहीं. मी आपल्या स्वतःला म्हणजे सर्वथा निर्दोषी समजतों असें नाहीं; पण मी कायद्याला फार भिऊन वागणारा मनुष्य आहे. यास्तव याच्याविरुद्ध मी एखादें कृत्य करीन, अथवा तें करण्याचा नुसता विचारही मनांत आणीन, असें कदापि होणार नाहीं. तथापि अज्ञानामुळें माझ्या हातून कदाचित् पाप घडलें असेल, नसेल असें मला म्हणवत नाहीं. यास्तव माझी हकीकत आपण ऐकिली नाहीं तोंपर्यंत, कृपा करून आपण मला जें अभयवचन दिलें आहे त्यावर मला भरंवसा ठेवितां येत नाहीं. हें तर असो, पण उलटें मी असें म्हणतों कीं, माझी हकीकत आपण ऐकून घेतल्यावर मी अपराधी आहें असें जर आपल्या ध्यानीं येईल तर आपण जी शिक्षा फरमावाल ती भोगण्यास मी तयार आहें. मी कबूल करितों कीं, मी आपल्या घोडीला कांहीं दिवसांपासून

क्रूरपणानें वागवीत आहें, व तें आपणही समक्ष पाहिलें आहे; पण तसें करण्यास मला सबळ कारण होतें अशी आपली खात्री होईल; व मी शिक्षेपेक्षां दयेसच विशेष पात्र आहें असें आपल्या लक्षांत येईल, अशी मला उमेद आहे. अस्तु; आतां जास्त प्रस्ताव करून आपणांला तिष्ठत न बसवितां मी आपल्या हकीकतीसच आरंभ करितों.' असें म्हणून त्यानें आपली गोष्ट सांगण्याला आरंभ केला.

---

## शिद्दी नूमान ह्याची गोष्ट.

शिद्दी नूमान म्हणतो—राजाधिराज, माझा जन्म कोठें झाला, कोणत्या कुळांत झाला वगैरे हकीकत ऐकण्याची मी आपणांस तसदी देत नाहीं, कारण, ती मुळींच महत्त्वाची नाहीं. माझ्या मालमत्तेविषयीं इतकेंच सांगतों कीं, माझ्या आईबापांनीं काटकसरीनें खर्च करून, मला चार प्रतिष्ठित लोकांप्रमाणें राहतां येईल इतकी ती मिळवून ठेविली होती. तिच्या योगानें मला डामडौल मिरवितां येण्यासारखा नव्हता, तरी कोणापाशीं तोंड पसरण्याचेंही कारण पडण्यासारखें नव्हतें.

याप्रमाणें मी चांगला सुखांत होतों, पण फक्त मला एखादी चांगली सुशील बायको मिळून आम्ही दोघें आनंदानें राहिलों असतों, म्हणजे माझ्यासारखा सुखी कोणी नव्हता. परंतु माझ्या नशिबीं स्त्रीसुख मुळींच नव्हतें; इतकेंच नव्हे, तर जी एक स्त्री मला मिळाली. तिची अशी कथा झाली कीं, माझें तिच्याशीं लग्न लागलें त्याच्या दुसरे दिवसापासूनच मला ती पराकाष्ठेचा त्रास देऊं लागली, तो इतका कीं, तशा राक्षशिणीशीं ज्याला प्रसंग पडला असेल त्यालाच त्याची कल्पना करितां येईल. इतरांना कधींही येणार नाहीं!

ज्या स्त्रीशीं कोणा मनुष्याचें लग्न व्हावयाचें असतें तिला लग्ना

पूर्वी त्यानें पाहूं नये, अगर ती कोण, कोठची याचा विचारपूसही करूं नये, अशी आपल्या लोकांत चाल असल्यामुळें, बायको केवळ हेडंबा नसली, अगर नकटीओकटी, एकडोळी अथवा लंगडी वगैरे असूनही तिची चालचलणूक व हुषारी हीं तरी निदान बऱ्या प्रकारचीं असलीं, म्हणजे नवऱ्यानें मोठी मिळविली, असें समजलें पाहिजे. तथापि मला जी बायको मिळाली ती रूपानें चांगली होती; व आमचा विवाह यथाविधि होऊन ती माझ्या घरीं आल्यावर प्रथमतःच जेव्हां तोंडावरचा बुरखा काढलेली अशी माझ्या नजरेस पडली; तेव्हां तिच्या स्वरूपाविषयीं जें मला पूर्वीं लोकांनीं सांगितलें होतें, तें कांहीं खोटें नाहीं असें पाहून मला फार आनंद झाला.

लग्नाच्या दुसरे दिवशीं मी भोजनाचा पंचपक्वान्नी बेत करविला. भोजनाची तयारी झाली व मी जाऊन पानावर बसलों तरी माझी बायको आली नाहीं, सबब मीं तिला बोलावून आणण्यास चाकरास सांगितलें. मला बराच वेळ तिष्ठत बसविल्यावर ती एकदांची आली. तिनें उशीर केल्याबद्दल मला राग आला होता, पण तो मीं तिला दाखविला नाहीं. आम्हीं जेवावयास बसलों, व प्रथम भातापासून आरंभ केला. मी नेहमींप्रमाणें तो चमच्यानें खाऊं लागलों, पण माझ्या बायकोनें तसें न करितां आपल्या कप्प्यांतून एक डबी काढिली, आणि तिच्यांतून कानकोरण्यासारखें कांहीं काढून त्यानें ती एक एक शीत तोंडांत टाकूं लागली.

ही तिची जेवणाची तऱ्हा पाहून मला मोठें आश्चर्य वाटलें ! मीं तिला म्हटलें, ‘ अमीने, ( हें तिचें नांव होतें. ) तुझ्या माहेरीं भात खाण्याची अशीच रीत आहे काय ? का तुझा आहार फार नाजूक आहे म्हणून तूं असें करितेस ? अथवा एक वेळ जास्त आणि एक वेळ कमी जेवण होऊं नये म्हणून तूं शितें मोजून खातेस ? कदाचित् जर काटकसर करण्याच्या हेतूनें, अगर उधळेपणा करूं नये हें मला शिकविण्याच्या हेतूनें तूं असें करीत असलीस, तर तुला मी खचीत सांगतों कीं, तूं त्या संबंधानें किलकुल काळजी करूं

नको ! देवाच्या दयेनें आज आपली स्थिति अशी आहे कीं, आपण खुशाल हवें तसें जरी खाल्लें प्यालें, तरी आपल्याला कधींही अन्नवस्त्रांचा म्हणून तोटा पडणार नाहीं. तर अमीने, तूं मनांत कांहीं संकोच न धरितां मी जसा जेवीत आहें तशीच जेव.' मीं अशा प्रकारें तिच्याशीं मनधरणीचें भाषण केलें. तेव्हां तीही आपणाला चांगलें गौरवाचें उत्तर देईल असें मला वाटलें. पण तें कांहीं नाहीं ! तिनें तोंडांतून एक चकारशब्दही काढिला नाहीं ! एकेक शीत खाण्याचा आपला क्रम पूर्ववत् तसाच चालविला ! आणि मला जास्त संताप आणण्याकरितां ती आणखी असें करूं लागली कीं, तें एकेक शीतही एकसारखें न खातां फक्त मधूनमधून तोंडांत टाकूं लागली ! हा एक भाताचा प्रकार झाला. पण बाकीच्या पदार्थांस तर ती शिवलीदेखील नाहीं ! तिनें केव्हां केव्हां फक्त पोळीचा एखादा लहानसा तुकडा मात्र खावा. तीही तिनें इतकी थोडी खाल्लीं कीं, तेवढ्यानें चिमणीचें सुद्धां पोट भरणार नाहीं !

तिचा हा हट्ट पाहून मला फारच संताप आला, पण तिच्याही तर्फेनें मीं थोडासा विचार केला. तो हा कीं, तिला कदाचित् पुरुषाबरोबर जेवण्याची संवय नसेल; त्यांतूनही नवऱ्याबरोबर जेवण्याचा तिला हा पहिलाच प्रसंग आहे, व त्याला लाजत जावें असें तिला शिकवून ठेविलेलें असेल. अशा कारणामुळें हा प्रकार घडला असावा असें मला वाटलें. पण असेंही असलें तरी तिनें खुळेपणानें हें वाजवीपेक्षां जास्त केलें असेंही पण मीं आपल्या मनांत म्हटलें. माझ्या मनांत दुसरें असें आलें कीं, 'न जाणो, हिनें नुकताच फराळ केला असल्यामुळें हिला भूक नसेल, अथवा ही एकटी अघळपघळ बसून मग जेवणार असेल' असे विचार माझ्या मनांत आल्यामुळें, ज्यामुळें हिला वाईट वाटेल अगर आपण नाखूप झालों असें हिला दिसून येईल, असें तूर्त कांहींच आपण बोलूं नये हें मला ठीक दिसलें. जेवण झाल्यानंतर तिच्या त्या विलक्षण वर्तनाबद्दल आपण किंचितही नाखूष झालों असें तिला न दाखवितां मी उठून चालता झालों.

संध्याकाळींही जेवतांना तिनें असाच प्रकार केला. त्याचप्रमाणें दुसरे दिवशींही झालें, व पुढें ज्या ज्या वेळीं ती व मी एकत्र जेवलों त्या त्या वेळीं तिनें सदहूप्रमाणेंच केलें. मला वाटलें कीं, ह्या एवढ्या बायकोला इतक्याशा आहारावर राहतां येणें अशक्य आहे; तेव्हां यांत कांहीं तरी गूढ प्रकार असावा. तथापि त्याचा मीं फारसा विचार केला नाहीं. येतां येतां ती आपोआप ताळ्यावर येईल असें मला वाटून तिच्या कृतीकडे आपण लक्षच देत नाहीं असें मीं तिला दर्शविलें. पण सर्व व्यर्थ! तिनें लौकरच माझी ही आशा रसातळास नेली!

एके दिवशीं मला झोंप लागली आहे असें अमीना हिला वाटून ती हळूच बिछान्यावरून उठली, व मी जागा होईन ह्या भीतीनें किंचित्‌ही खडबड न होऊं देतां तिनें आपले कपडे घातले. ही आतां काय करणार ह्याची कल्पना मला होईना. सबब तें समजण्यासाठीं मीं मुद्दाम चांगलेंच झोंपेचें सोंग केलें. असो; कपडे घातल्यावर ती अगदीं आवाज न करितां खोलीच्या बाहेर पडली. ती बाहेर पडतांच मी उठलों, आणि आपला झगा अंगावर टाकून पुढील दाराच्या आंगणाकडे एक खिडकी होती तींतून पाहूं लागलों, तों रस्त्याकडील दरवाजा उघडून ती चालती झाली, असें माझ्या दृष्टीस पडलें; तेव्हां मी ताबडतोब दरवाज्यापाशीं गेलों. दरवाज्याची एक फळी तिनें आयतीच उघडी टाकिलेली होती, ह्यामुळें तसेंच तडक तिच्या मागोमाग मला जाण्यास सांपडलें. त्या वेळीं चांदणें पडलें असल्यामुळें ती कोणीकडे चालली आहे हें मला स्पष्ट दिसत होतें. शेवटीं जातां जातां, नजीकच एक स्मशानभूमि होती तेथें ती गेली. मी त्या स्मशानभूमीच्या एका भिंतीच्या आड लपून राहिलों, आणि पाहतों तों अमीना ही एका [1]घुलीपाशीं बसलेली माझ्या दृष्टीस पडली!

घूल व घुली या जातींच्या भुतांची वस्ती पडक्या घरांतून असते.

---

१ ही एक कल्पित भुतांची जात आहे, ह्यांच्यापैकीं पुरुषजातीस 'घूल' व स्त्रीजातीस 'घुली' असें म्हणतात.

ह्यांना रानावनांत हिंडण्याचा छंद फार असतो. कोणी रस्त्यानें जाणारीं येणारीं माणसें त्यांना आढळलीं कीं त्यांवर तीं अकस्मात् हल्ला करतात,व त्यांना मारून त्यांचें मांस खातात.अशी शिकार जर त्यांना न साधली, तर तीं रात्रीचीं स्मशानांत जातात, आणि तेथलीं प्रेतें उकरून त्यांचें मांस खातात.

असो; अमीना ही त्या घुलीपाशीं बसलेली पाहून मला पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें, व भीतीनें माझ्या अंगाचा थरकांप झाला. त्या दोघींनीं, त्याच दिवशीं पुरलेलें एक प्रेत उकरिलें. घुलीनें तें प्रेत फाडलें, व त्याच्या मांसाचे तुकडे केले. मग त्या दोघीजणींनीं त्या खड्ड्याशेजारींच बसून त्याचा फन्ना उडविला. हा अघोरी प्रकार चालला असतां त्या दोघी आनंदानें खुशाल गप्पा मारीत बसल्या होत्या. त्यांच्या कसल्या गप्पा चालल्या होत्या तें मी दूर असल्यामुळें मला समजलें नाहीं. तथापि त्यांच्या खाण्याचा जसा तो राक्षसी प्रकार होता, त्याच मासल्याच्या त्यांच्या संभाषणाचाही विषय असेल यांत संशय नाहीं! त्यांच्या त्या खाण्याची मला आठवण झाली म्हणजे अद्यापि माझ्या अंगावर रोमांच उभे राहतात!

त्यांचें तें आसुरी खाणें संपल्यावर त्यांनीं त्या प्रेताचा बाकी राहिलेला भाग खड्ड्यांत टाकून दिला, आणि त्या त्यांत माती लोटूं लागल्या. हें त्यांचें काम चाललें असतां मी तसाच तेथून निघालों व झटकन् घरीं आलों. आणि दरवाज्याची एक फळी पूर्ववत् उघडी ठेवून आपल्या खोलींत जाऊन निजलों; व गाढ झोंप लागल्याचें मिष केलें.

माझ्या पाठीमागून लौकरच अमीनाही आली, तिनें पूर्वीप्रमाणेंच आवाज होऊं न देतां आपले कपडे उतरले, आणि ती बिछान्यावर येऊन निजली. आपल्या कृत्याचा याला ( मला ) बिलकुल मागमूस लागला नाहीं असें वाटून तिला मोठा आनंद झालासें दिसलें.

तो दुष्ट व मनास अत्यंत तिटकारा आणणारा प्रकार पाहिल्यापासून अमीना हिजविषयीं माझें मन इतकें विटून गेलें होतें कीं, ती

माझ्या शेजारीं निजलेली मला सहन होईना; व त्यामुळें पुष्कळ वेळपर्यंत मला झोंपही आली नाहीं. नंतर माझा किंचित् डोळा लागला, इतक्यांत पहांटचा निमाज पडण्याची वेळ झाली म्हणून पुकारा झाला. त्यासरसा मी जागा होऊन लागलाच बिछान्यावरून उठलों, आणि कपडे घालून माशिदींत गेलों.

निमाज पढून झाल्यावर मी लागलाच गांवाबाहेर गेलों आणि अमीना ही असली दुष्ट खोड टाकून देऊन चांगल्या रीतीनें राहूं लागण्यास काय उपाय करावा याविषयीं बराच वेळ विचार करीत एका बागेमध्यें फिरत राहिलों. अमीना हिला ताळ्यावर आणण्यास कडक उपाय योजावे असें कित्येक वेळां माझ्या मनांत आलें, पण फिरून मीं असा विचार केला कीं, तसें करण्यापासून कांहींएक उपयोग होणार नाहीं. या प्रकरणीं सौम्योपचारच योजणें उत्तम. यासाठीं त्याप्रमाणें करण्याचा मीं निश्चय केला व हे विचार माझ्या मनांत घोळत असतां तसाच त्या नादांत मी जेवणाची वेळ होत आहे तों घरीं आलों.

अमीना हिनें मला पाहतांच ताटें वाढण्यास सांगितलें व लागलीच आम्ही जेवावयास बसलों. तिचा एकेक शीत खाण्याचा क्रम पूर्ववत् चालू झाला असें पाहून मी तिला शांतपणें म्हणालों, अमीने, तुला ठाऊकच आहे कीं, आपल्या लग्नाचा सोहळा झाल्याचे दुसरे दिवशीं आपण जेवावयास बसलों, तेव्हां तुला भाताचें एकेक शीत खातांना पाहून मला फारच नवल वाटलें. खरोखर तुझी ती कृति पाहून, दुसरा एखादा असता तर त्याला संताप आल्यावांचून कधींही राहता ना. पण मी त्याबद्दल कांहींएक मनांत न आणितां, हें आपल्याला कांहीं बरोबर वाटत नाहीं, एवढेंच तुला दर्शविलें. तुला मीं दुसरीं पक्वान्नें खाण्याविषयीं म्हटलें, पण तूं तिकडेही लक्ष दिलें नाहींस. तुला एक गोड लागत नाहीं तर दुसरें खाशील, तें न आवडलें तर आणखी एखादें खाशील, असें समजून मीं नानातऱ्हेचीं पक्वान्नें करविलीं, व इतर चार माणसांप्रमाणें तूं

जेवावेंस म्हणून तुला परोपरीनें सांगितलें, पण माझ्या सांगण्याचें कांहींच चीज झालें नाहीं. तुझा आपला पहिला दिवस आहे तो आहे! तुला उगाच वाईट वाटेल म्हणून आजपर्यंत मी कांहींएक बोललों नाहीं व आतांच्याही माझ्या बोलण्यानें तुला तसें वाटेल कीं काय म्हणून मी मोठा दिलगीर आहें. पण काय ग अमीने, खरेंच सांग मेलेल्या माणसांच्या मांसापेक्षां आपल्या येथले हे पदार्थ चांगले नाहींत का?'

हे शेवटचे शब्द माझ्या तोंडांतून निघतांच अमीना हिनें ताडलें कीं आपलें काल रात्रींचें सर्व कृत्य यानें पाहिलें. त्यावरून ती इतकी क्रोधायमान झाली कीं, त्याची कल्पना देखील करतां येणार नाहीं! तिची मुद्रा अतिशय उग्र दिसूं लागली, डोळे गुंजेप्रमाणें लाल झाले; व रागामुळें तिच्या तोंडांतून फेंस येऊं लागला!

असें तिचें तें भयंकर रूप पाहून माझी पांचावर धारण बसली, व मी अगदीं निश्चेष्ट होऊन गेलों; आणि मजवर जो दुष्ट प्रयोग करण्याची योजना ती करीत होती, त्यापासून आपलें संरक्षण करण्याइतकें देखील प्रसंगावधान माझ्या अंगीं राहिलें नाहीं! तिनें रागाच्या भरांत जवळच्या एका पाण्यानें भरलेल्या भांड्यांत हात बुचकळला, आणि तोंडांतल्या तोंडांत कायसें पुटपुटली. त्याचा अर्थ मला मुळींच समजला नाहीं. मग माझ्या तोंडावर थोडेंसें पाणी शिंपडून मोठ्या आवेशानें ती म्हणाली, 'दुष्टा, तुला लोकांच्या कामाची रिकामी उठाठेव करायाला पाहिजे नाहीं का? तर आतां हो कुत्रा, आणि भोग आपल्या कर्माचें फळ!'

अमीना ही चेटकी आहे हें मला ह्या वेळेपर्यंत माहीत नव्हतें. तिनें ते दुष्ट शब्द उच्चारितांच ताबडतोब मी कुत्रा झालों! असा एकाएकीं माझ्या रूपांत पालट झाल्यामुळें मला पराकाष्ठेचा विस्मय वाटला, व माझा सर्व घोंटाळा होऊन गेला—इतका कीं, मला आपल्या बचावाकरितां पळून जाण्याचें देखील सुचलें नाहीं! तेव्हां तिला आपला राग आणखी मजवर काढण्यास चांगलें

फावलें ! तिनें एक काठी घेतली, आणि मला धोपट धोपट इतकें धोपटलें कीं, मला आतां त्याची आठवण झाली म्हणजे, त्या वेळेस मी वांचलों तरी कसा याचेंच मला मोठें नवल वाटतें ! तिच्या हातून सुटण्याकरितां मी अंगणांत पळून गेलों, पण तीही तशीच मोठ्या संतापानें माझ्या मागोमाग धांवत आली. तिचा मार चुकविण्याकरितां मी जरी इकडून तिकडे व तिकडून इकडे जलद पळण्याचा प्रयत्न करी, तरी त्याचा कांहींएक उपयोग न होऊन तिनें मला यथास्थित बडवून काढिलें ! शेवटीं माझ्या मागें धांवतां धांवतां व मला मारतां मारतां ती अगदीं थकून गेली. तिच्या मनांत माझा जीव घ्यावयाचा होता, पण तो तिचा हेतु सिद्धीस गेला नाहीं; यामुळें तिला फार वाईट वाटलें. मग तिनें तो हेतु साधण्याकरितां अशी योजना केली कीं, रस्त्याच्या बाजूच्या दरवाज्याची एक फळी उघडावी, आणि मी त्यांतून पळून जाऊं लागलों म्हणजे चटदिशीं ती लावून घ्यावी—म्हणजे दोन्ही फळ्यांमध्यें मी सांपडून चेंगरून जावें ! असें मनांत आणून तिनें दरवाज्याची एक फळी उघडली. पण मी कुत्रा झालों होतों तरी तिचा इष्ट हेतु माझ्या तेव्हांच लक्षांत आला, आणि म्हणतातना, जीवावर येऊन बेतलीच म्हणजे तो बचावण्याची कांहीं तरी युक्ति सुचतेच, त्याप्रमाणें मलाही एक युक्ति सुचली. मीं असें केलें कीं, तिची नजर व हालचाल ह्यांकडे एकसारखें लक्ष देत राहिलों व मजकडे तिचें किंचित् दुर्लक्ष झालेलें पाहून मी सपाट्यासरसा तिच्या हातावर तुरी देऊन दरवाज्यांतून पार पडलों. तरी तिनें तितक्यांत जलदी करून दरवाज्याची फळी लावलीच ! पण तेणेंकरून माझें शेंपूट मात्र जरा चेंगरलें, दुसरें कांहींएक झालें नाहीं.

माझें अंग पराकाष्ठेचें दुखत असल्यामुळें मला फार यातना होत होत्या, त्यामुळें रस्त्यानें मी मोठमोठ्यानें रडतभोंकत चाललों, तें ऐकून चोहोंकडचे कुत्रे माझ्या अंगावर धांवून आले; आणि कित्येक मला डसले. त्यांच्या त्रासांतून सुटण्याकरितां मी एका

खाटकाच्या दुकानांत शिरलों. ते कुत्रेही माझ्या मागून दुकानांत येऊं लागले. पण खाटकाला माझी दया येऊन त्यानें लागलीच त्यांस पिटाळून लाविलें. त्या कुत्र्यांच्या नजरेआड होण्याकरितां एखादा कोपरा बसावयास मिळाला म्हणजे झालें, एवढेंच मी प्रथमतः पहात होतों. तो तर मला मिळाला, पण त्या मनुष्याकडून मला जितका आश्रय मिळेल म्हणून वाटलें होतें तितका मिळाला नाहीं. कारण, कुत्रा हा अपवित्र आहे, त्याचा विटाळ झाला असतां शंभर आंघोळी केल्या तरी मनुष्य शुद्ध होत नाहीं असें जे कित्येक धर्मवेडे लोक मानतात, त्यांपैकींच तो एक होता. त्यामुळें माझ्यामागें जे कुत्रे लागले होते, त्यांना हाकून लाविल्यावर त्यानें मला घरांतून बाहेर घालविण्याविषयीं होता तितका प्रयत्न केला, पण मी तसाच कोडगेपणा करून तो दिवस व रात्र त्याच्या येथें घालविली. अमीना हिनें माझें हाडन्हाड मोकळें केल्यामुळें मी अर्धामेला झालों होतों, यामुळें मला विश्रांति घेण्यास कसें तरी स्थळ मिळालें, हें फार चांगलें झालें.

दुसरे दिवशीं सकाळीं तो खाटीक दुकान मांडूं लागला. त्या वेळीं त्याच्या दुकानापुढें पुष्कळ कुत्रे आपल्याला कांहीं मिळेल अशा आशेनें जमले. मीही त्यांच्यामध्यें जाऊन दीनवाण्यासारखा उभा राहिलों. मी त्या दुकानांत गेल्यापासून कांहीं खाल्लें प्यालें नव्हतें, हें त्या खाटकाच्या लक्षांत येऊन त्यानें इतर कुत्र्यांपेक्षां मला जास्त व मोठमोठे मांसाचे तुकडे टाकले. हें झाल्यावर मी त्या खाटकाकडे दीन मुद्रेनें पाहिलें. आणि शेंपूट हालवून, पुनः त्यानें आपणांला दुकानांत येऊं द्यावें असें दर्शविलें. पण त्याच्या हृदयाला पाझर फुटेना! त्यानें मजकडे पाहून कपाळाला आठया घातल्या, आणि तो काठी घेऊन दारांत उभा राहिला. तेव्हां मला तेथून निघून जाणें भाग पडलें!

मी तसाच कांहीं घरें टाकून पुढें गेलों, व एका रोटीवाल्याचे दुकानापाशीं जाऊन उभा राहिलों. हा मनुष्य त्या खाटकासारखा

तिरसट व सदा दुर्मुखलेला नसून मोठा आनंदी व रंगेल होता. तो त्या वेळीं न्याहारी करीत बसला होता, व त्यानें आपणाला कांहीं टाकावें असें जरी मीं त्याला दर्शविलें नाहीं, तरी त्यानें मजकडे एक तुकडा फेंकला. तो मीं इतर खादाड कुत्र्यांप्रमाणें चटकन् खाऊन न टाकतां आपलें शेंपूट व डोकें हालवून त्याच्या कृपेबद्दल त्याला आभार प्रदर्शित केले. तें पाहून तो फार खूष झाला, आणि त्यानें हास्यवदन केलें. मला जरी भूक नव्हती तरी त्याच्या मर्जीकरितां मीं तो तुकडा खाल्ला. व आपल्याविषयीं त्याच्या मनांत चांगला भाव उत्पन्न व्हावा म्हणून तो मी आधाशासारखा पटकन् न खातां सावकाश खाल्ला. हें सर्व त्या रोटीवाल्यानें लक्षपूर्वक पाहिलें व मला आपल्या दुकानापाशीं राहण्याची परवानगी आहे असें दर्शविलें; त्यावरून मी त्या ठिकाणीं दुकानाकडे तोंड करून बसलों, व तुम्हीं मला आपल्या छायेखालीं राहूं दिलें म्हणजे पुरें आहे असें दर्शविलें. त्याप्रमाणें तर त्यानें केलेंच, पण माझ्या अंगावरून आणखी हात वगैरे फिरवून, मला दुकानांतही येण्यास कांहीं हरकत नाहीं असें समजाविलें. पण मी परवानगीवांचून येत नाहीं असें पाहून त्यानें मला आंत येण्याविषयीं हातानें खुणाविलें; आणि एके कोपऱ्यांत मला निवांत अशी जागा दिली. मी त्याच्या घरीं होतों तोंपर्यंत हीच माझी नेहमींची जागा होती.

हा गृहस्थ मला फारच ममतेनें वागवीत असे. न्याहरी करण्याचे वेळीं व दुपारीं आणि संध्याकाळीं जेवणाचे वेळीं मला खायाला घातल्यावांचून तो कधींही राहिला नाहीं. मीही त्याचे उपकार पूर्णपणें जाणत असे हें सांगावयास नकोच. माझें लक्ष सदोदित त्याच्याकडे असे. तो दुकानांतून जरा कोठें इकडे तिकडे गेला, अगर शहरांत कांहीं कामाकरितां फिरावयास गेला, तरी मी आपला त्याच्या पाठीमागें असावयाचाच. माझी अशी आपल्या ठिकाणीं निष्ठा पाहून त्याला फार आनंद होई, व तेणेंकरून मलाही आपल्या कामांत जास्त तत्पर राहण्यास उत्तेजन येई.

याप्रमाणें कांहीं दिवस मी त्या दुकानदारापाशीं राहिल्यावर असें झालें कीं, कोणी एक बाई रोट्या विकत घेण्याकरितां तेथें आली. तिनें त्यास जे पैसे दिले त्यांत एक खोटा होता. तो त्यानें तिला परत देऊन त्याजबद्दल दुसरा मागितला. त्या बाईनें फिरून तो त्याच्यापुढें टाकिला, आणि ती म्हणाली, 'ह्याला काय झालें आहे? हा पाहिजे तेथें चालण्यासारखा आहे!' परंतु दुकानदार तें ऐकेना. तेव्हां कांहीं वेळ त्या दोघांची बाचाबाची होऊन तो त्या बाईस म्हणाला, 'अहो बाई, हा पैसा धडधडीत खोटा दिसत असून तुम्ही उगीच आपला हट्ट घेऊन बसतां, तेव्हां तुम्हांला काय म्हणावें बरें?' मग मजकडे हात करून तो म्हणाला, 'फार काय, पण हें मुकें जनावरसुद्धां हा खोटा आहे कीं नाहीं हें दाखवून देईल!' असें म्हणून त्यानें मला 'मोत्या इकडे ये' म्हणून हांक मारिली. मी लागलाच त्याच्यापुढें धांवत गेलों. तेव्हां त्यानें सगळे पैसे माझ्यापुढें टाकून मला म्हटलें, 'मोत्या, तूंच सांग आतां यांत कोणता पैसा खोटा आहे तो.' मीं ते सर्व पैसे पाहिले आणि खोटा होता त्यावर पाय ठेवून बाकीचे एकीकडे केले, आणि त्याच्या तोंडाकडे पहात राहिलों.

दुकानदारानें मला खोटा पैसा निवडून काढावयास सांगितलें तें कांहीं विशेष अर्थ मनांत आणून सांगितलें असें नाहीं; तर केवळ गमतीखातर सांगितलें. पण तो मी पटकन् निवडून काढिला हें पाहून त्याला फारच आश्चर्य वाटलें. त्या बाईला आतां बोलायाला कांहीं तोंड राहिलें नाहीं. तेव्हां तिला तो पैसा परत घेऊन त्याजबद्दल दुसरा देणें भाग पडलें. ती निघून गेल्यावर दुकानदारानें कित्येक शेजाऱ्यापाजाऱ्यांना बोलावून ती गोष्ट सांगितली, आणि माझ्या शहाणपणाबद्दल माझी फार वाखाणणी केली. तेव्हां त्यांनीं त्याचा प्रत्यक्ष अनुभव पाहण्याकरितां माझ्यापुढें पुष्कळ खरे व खोटे पैसे एकत्र मिसळून टाकले. त्यांपैकीं जे जे वाईट होते त्या प्रत्येकावर मीं पाय ठेवून ते व खरे असे निरनिराळे काढिले.

पूर्वी सांगितलेल्या त्या बाईला घरीं जातांना जे जे कोणी भेटले त्या प्रत्येकास तिनें ती गोष्ट सांगितली. त्यामुळें पैसे खरे खोटे निवडण्याविषयींच्या माझ्या अंगच्या गुणाची प्रसिद्धि फक्त आसपासच्या लोकांतच झाली असें नाहीं, तर सर्व शहरभर झाली. यामुळें मला पुढें नेहमीं तो एक उद्योगच लागला. कारण, त्या दुकानदाराकडे जे जे लोक रोटथा विकत घेण्याकरितां येत, त्या सर्वांना माझी परीक्षा पाहण्याची हौस असे; व ती अर्थात् मला पुरी करावी लागे. या गोष्टीमुळें असें झालें कीं दूरदूरच्या पेठांतील गिऱ्हाइकें माझ्या धन्याच्या दुकानीं येऊं लागलीं, व त्याचा धंदा इतका जारीनें चालूं लागला कीं, त्याला सगळ्या दिवसांत विसावा म्हणून कसला तो मुळींच सांपडत नसे! असें कित्येक दिवस चाललें. त्यामुळें माझ्या धन्याचा पुष्कळ फायदा होऊन तो आपले इष्टमित्र व शेजारीपाजारी यांजपाशीं म्हणे कीं, ‘ हा मोत्या मला एक परीसच मिळाला आहे! ’

माझ्या अंगच्या ह्या गुणामुळें माझ्या धन्याची म्हणजे त्या दुकानदाराची भरभराट झालेली पाहून लोक त्याचा हेवा करूं लागले; व हरयुक्ति करून मला त्याच्यापासून काढून नेण्याविषयीं ते यत्न करूं लागले. या कारणामुळें त्याला मजवर नेहमीं नजर ठेवावी लागे. एके दिवशीं एक बाई इतर लोकांप्रमाणेंच माझी परीक्षा पाहण्याच्या इराद्यानें कांहीं रोटथा विकत घेण्याकरितां माझ्या धन्याच्या दुकानीं आली. मी दुकानावर बसलेला होतों. तिनें माझ्यापुढें सहा पैसे टाकिले. त्यांपैकीं एक खोटा होता. मीं लागलीच तो एकीकडे करून त्यावर पाय ठेविला, आणि हा खोटा आहे असें तिला दर्शविण्याकरितां तिच्या तोंडाकडे पहात राहिलों. ती बाई म्हणाली, ‘ तूं बरोबर परीक्षा केलीस. तो पैसा खोटाच आहे. ’ नंतर ती मजकडे लक्षपूर्वक पाहून आश्चर्य करीत क्षणभर उभी राहिली, आणि रोटथांबद्दल माझ्या धन्याचे पैसे चुकते करून चालती झाली. जातांना

तिनें त्याची नजर चुकवून मला आपल्या पाठीमागें येण्याविषयीं खूण केली.

असल्या ह्या विलक्षण रूपांतराच्या स्थितीपासून आपली सुटका करून घेण्याचा कांहीं उपाय सांपडेल तर पहावा म्हणून माझा नेहमीं विचार चाललेलाच असे. तेव्हां त्या बाईनें मजकडे जें इतकें लक्षपूर्वक पाहिलें, त्यांत कांहीं तरी विशेष अर्थ असून माझ्या दुःखप्रद स्थितीविषयीं ती कांहीं जाणत असेल असें मला वाटलें. तथापि, मीं कांहींएक न करितां फक्त तिच्या तोंडाकडेच पाहून समाधान मानून घेतलें. ती कांहीं पावलें पुढें गेली व मागें वळून पाहते तों मी आपल्या जागेवरून न हालतां तसाच तिच्याकडे पहात बसलों आहे असें तिच्या दृष्टीस पडलें. तेव्हां आपल्यामागें येण्याविषयीं तिनें फिरून मला खुणाविलें. त्या वेळीं माझा धनी रोट्या भरण्याकरितां परळ साफ करण्यास गुंतलेला असल्यामुळें मजकडे त्याचें लक्ष नव्हतें; हें पाहून मीं जास्त विचार न करितां खालीं उडी टाकिली. आणि त्या बाईच्या मागोमाग चाललों. तें पाहून तिला मोठा हर्ष झाला असें दिसलें.

ती बाई बरीच पुढें गेल्यावर एका घराचें दार उघडून आंत शिरली. आणि मलाही आंत येण्याविषयीं तिनें हातानें खुणाविलें; आणि म्हटलें, ‘ बाबा रे, यांत तुझें कल्याण आहे.’ मी आंत गेल्यावर तिनें दरवाजा लावून घेतला, आणि आपल्या बसावयाच्या खोलींत मला नेलें. तेथें एक स्त्री कशिदा काढीत होती. ही स्त्री त्या बाईची मुलगी असून जादूविद्येंत मोठी प्रवीण होती असें मला पुढें आढळून आलें.

ती बाई आपल्या मुलीला म्हणाली, ‘ ‘मुली, त्या रोटीवाल्याचा खरेखोटे पैसे निवडून काढणारा हुशार कुत्रा तो हाच. याच्याविषयींची वार्ता प्रथम जेव्हां आपल्या कानीं पडली तेव्हां कोणी दुष्टानें जादूच्या योगानें याला मनुष्याचा कुत्रा केलें असावें असें मला वाटत, असें जें मीं तुला म्हटलें, तें तुला आठवतच असेल.

आज त्याच रोटीवाल्याच्या दुकानीं रोट्या विकत घेण्याकरितां मी गेलें होतें; तेव्हां त्याच्या शहाणपणाचा चमत्कार मीं स्वतः डोळ्यांनीं पाहिला. मी खचीत सांगतें कीं, सगळ्या बगदादभर आज इतके दिवस जी ह्याची सर्वतोमुखीं वाखाणणी चालली आहे, ती कांहीं उगीच नाहीं. मुली, तूंच आतां सांग माझा तर्क खरा कीं खोटा तो.' मुलीनें उत्तर केलें, 'आई, तुझा तर्क अगदीं खरा आहे. त्याची प्रतीति आतांच मी तुला दाखवितें.'

असें म्हणून ती तरुण स्त्री उठली, व तिनें पाण्यानें भरलेल्या एका भांड्यांत हात बुचकाळिला आणि थोडेसें पाणी माझ्या अंगावर शिंपडून ती म्हणाली, 'जर तूं मूळचाच कुत्रा असशील, तर तसाच रहा; पण जर मनुष्याचा कुत्रा झालेला असशील, तर ह्या उदकाच्या सामर्थ्यानें आपला मूळ देह धारण कर.' असें तिनें म्हणतांक्षणींच अमीना हिनें मजवर टाकिलेला मंत्र उलटला, आणि पूर्ववत् माझा मनुष्यदेह मला प्राप्त झाला!

त्या तरुण स्त्रीच्या महदुपकारांबद्दल तिचें आपण कसें उतराई व्हावें हें मला समजेना! मीं तिच्या पायांवर लोटांगण घातलें. आणि म्हटलें, 'बाई, तुमच्या अद्वितीय कृपेच्याच योगानें आज मी पशूची काया टाकून मनुष्यांत आलों. मजसारख्या अशा अनाथ व अपरिचित मनुष्यावर केवळ निरपेक्षबुद्धीनें तुम्हीं दया केली, हे तुमचे उपकार मला शब्दांनीं व्यक्त देखील करून दाखवितां येत नाहींत! ह्या तुमच्या उपकारांची फेड करण्याकरितां मी काय करावें हें मला सुचत नाहीं; तर तें तुम्हीच कृपा करून मला सांगा. अथवा तसें कशाला? वास्तविक पाहतां माझ्या ह्या देहावर माझा मुळींच हक्क नाहीं. मी सर्व प्रकारें तुमचा बंदा आहें. तर तुम्हाला वाटेल तशी माझी व्यवस्था करा. मी कोण आहें हें तुम्हांला समजण्याकरितां मी आपली हकीकत थोडक्यांत सांगतों.' असें बोलून, प्रथमतः मीं तिला आपलें नांव-गांव सांगितलें आणि नंतर अमीना हिशीं माझें लग्न झालें तो वृत्तांत सांगून, पुढें

तिच्याशीं मी किती सौम्यपणानें वागलों, व तिचा नादिष्ट-पणा किती सहन केला हें सर्व सांगितलें. त्याचप्रमाणें, अमीना हिनें त्या घुलीबरोबर स्मशानांत जो अघोरी प्रकार केला त्याचा मी अमीना हिला इशारा करितांच ती मजवर खवळून तिनें मला कसें त्राहित्राहि करून सोडिलें, व नंतर कुत्रा करून टाकिलें; हेंही सर्व मी त्या तरुण स्त्रीला सांगितलें; आणि तिच्या आईनें मला आपल्याबरोबर आणून जो आनंदाचा दिवस दाखविला, त्याबद्दल तिचे फार फार आभार मानून मीं एकंदर हकीकत पुरी केली.

माझा हा वृत्तांत ऐकून ती तरुण स्त्री म्हणाली, ' शिदी नूमान, तुजवर माझे जे उपकार झाले आहेत म्हणून तूं म्हणतोस, त्याबद्दल तूं माझा ऋणी आहेस असें मुळींच समजूं नको. तुजसारख्या सज्जन व निरपराधी मनुष्याच्या उपयोगीं पडण्याचें श्रेय मला मिळालें यांत मला सर्व कांहीं पावलें. असो; आतां तुझी बायको अमीना हिची थोडीशी हकिकत तुला सांगतें. तुमच्या लग्नाच्या पूर्वींपासून माझी तिची ओळख आहे. तिला जादूविद्या अवगत आहे हें जसें मला माहीत आहे, तसेंच मलाही ती विद्या येत आहे हें तिलाही ठाऊक आहे. कारण, आम्ही दोघी एकाच वस्तादणीपाशीं ती विद्या शिकलों; आमची एकमेकींची हमामखान्यांत पुष्कळ वेळां गांठ पडते, पण आमचे उभयतांचे स्वभाव अगदींच भिन्नभिन्न प्रकारचे असल्यामुळें मी तिच्यापाशीं कोणत्याही प्रकारचा संबंध ठेवीत नाहीं; व तीही तसेंच करिते; यामुळें मी आपली सुखी आहे. तिनें असें हें दुष्ट कृत्य केलें यांत कांहीं नवल नाहीं; कारण तिचा तो जन्मस्वभावच पडला ! असो, पण तुझ्याकारितां जें कांहीं मीं केलें, तें अजून अपुरें राहिलें आहे, तें मला शेवटास नेलें पाहिजे. त्या अवदसेनें दुष्ट मंत्राच्या योगानें तुला कुत्रा करून लोकांच्या दारोदार फिराव-यास लाविलें, तो मंत्र नुसता उलटवून उपयोग नाहीं. तर तूं आतां घरीं जा, आणि तुझें घरदार जें ती बळकावून बसली आहे तें

आपल्या ताब्यांत घेऊन तिच्या अधमपणाच्या कृत्याबद्दल तिला योग्य शासन कर. त्याचें सर्व साहित्य मी तुला देतें. तूं येथें माझ्या आईशीं अंमळ बोलत बैस, इतक्यांत मी उभ्या उभ्या आंतून जाऊन येतें.'

याप्रमाणें बोलून ती परोपकारी स्त्री आपल्या खोलींत गेली. इकडे तिच्या आईबरोबर मी बोलत असतां त्या दोघींच्या उपकाराबद्दल तिच्यापाशीं मीं फार फार आभार प्रदर्शित केले. तेव्हां ती मला म्हणाली, 'अमीनेपेक्षां माझी मुलगी जादूविद्येंत कांहीं कमी प्रवीण आहे असें नाहीं. पण ही त्या विद्येचा उपयोग चांगला करिते, हा त्या दोघींत मोठा फरक आहे. हिनें आजपर्यंत अनेक लोकांवर असे उपकार केले आहेत. ते सर्व जर तूं ऐकलेस तर तोंडांत बोटच घालशील! ज्या दिवशीं तिच्या हातून असलें एखादें सत्कृत्य घडलें नाहीं असा दिवस विरळा. असें आहे म्हणूनच मी तिला ह्या फंदांत पडूं देतें. जर का तिच्या हातून केंसाइतकें वावगें कृत्य घडलें असें माझ्या नजरेस आलें, तर मी लागलीच तिला याबद्दल सक्त मनाई करीन.'

नंतर तिच्या मुलीनें केलेले जे कित्येक अद्भुत चमत्कार तिनें पाहिले होते ते तिनें मला सांगितले. इतक्यांत ती मुलगी हातांत एक लहानशी कुपी घेऊन खोलींतून आली व म्हणाली, 'शिदी नूमान, मीं आपलीं पुस्तकें एवढा वेळ चाळून पाहिलीं, त्यावरून मला असें दिसून आलें कीं, अमीना ही हल्लीं घरीं नसून कोठें बाहेर गेली आहे. तथापि ती लौकरच घरीं येईल. खेरीज मला आणखी असेंही दिसून आलें कीं, तिनें तुला कुत्रा करून टाकिलें, हें आपलें दुष्ट कृत्य छपाविण्याकरितां त्या दिवशीं चाकरमाणसांस तिनें अशी थाप दिली कीं, त्यांचें ( तुझें ) कांहीं जरूरीचें काम राहून गेलें होतें, त्याची त्यांना एकाएकीं आठवण झाली, आणि तसेंच ते ताबडतोब बाहेर निघून गेले. ते अजून येत नाहींत यामुळें मला काळजी लागली आहे. त्यांनीं त्या वेळेस घाईमध्यें दार उघडें

टाकल्यामुळें, मी जेवीत असतां आंत एक कुत्रा शिरला, त्याला पाहून मला संताप आला, आणि मी त्याला काठीनें धोपटून हांकून लाविलें. अशी तिनें हिकमत केली आहे. तर तूं आतां ही कुपी घेऊन घरीं जा, आणि आपल्या खोलींत बैस. इतक्यांत ती घरीं येईल. ती दरवाज्याच्या आंत अंगणामध्यें पाऊल ठेवते न ठेवते तों तूं तिच्यापुढें जाऊन उभा रहा; तुझी फिरून येण्याची आतां वार्ताच नको, असें ती मनांत समजत असल्यामुळें, तुला एकाएकीं समोर उभा पाहून तिला मोठें आश्चर्य वाटेल; आणि ती पळून जाण्यास पाहील. पण तूं लागलीच त्वरा करून ह्या कुपींतलें पाणी तिच्या अंगावर शिंपडून मोठ्यानें म्हण कीं, “ चांडाळणी भोग आतां आपल्या दुष्ट कृत्याचें फळ ! ” मी आतां जास्त कांहीं तुला सांगत नाहीं. यापासून काय होतें तें त्या वेळेस तुझ्या दृष्टीस पडेल ! ’

याप्रमाणें तिनें सांगितल्यावर त्या उभयतां मायलेकींचा मीं निरोप घेतला. त्या वेळीं त्यांचे मीं फिरून आभार मानिले, व माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत तुमचें मला विस्मरण पडणार नाहीं ’ असें त्यांस सांगितलें.

नंतर मी घरीं आलों व त्या स्त्रीनें सांगितल्याप्रमाणें लागलीच अमीनाही आली. ती अंगणांत पाऊल टाकतांच मी तें पाणी घेऊन तिच्यापुढें झालों. तिनें मला पाहून मोठ्यानें किंकाळी फोडली, आणि पळून जाण्याकरितां ती दरवाज्याकडे धांवली. तों मी तिच्या अंगावर तें पाणी शिंपडलें, आणि त्या स्त्रीनें सांगितलेले शब्द उच्चारिले; मग काय उशीर ? ती तत्क्षणीं घोडी बनली !

त्या वेळीं तिला पराकाष्ठेचें आश्चर्य वाटून ती अगदीं गोंधळांत पडून गेली. मीं लागलीच तिच्या आयाळाला हात घातला. तिनें पुष्कळ गमजा केल्या; पण मी तिला कसचा ऐकतों ? मीं तिला खेंचून तबेल्यांत नेली, आणि तिला काढणी देऊन गव्हाणीला बांधून टाकिली. तिच्या अधमपणाबद्दल मीं तिची पुष्कळ निंदा

केली, आणि तिला चाबकानें बेदम मार दिला. शेवटीं माझे हात दमून गेले, तेव्हां तें मीं बंद केलें. त्या वेळेपासून तिला मी दररोज असा मार देत असतों.

याप्रमाणें शिद्दी नूमान हा आपली गोष्ट संपवून कालिफास म्हणाला, ' राजाधिराज, मला अशी उमेद आहे कीं, या माझ्या हकीकतीवरून माझी वर्तणूक कोणत्याही प्रकारें अयोग्य नाहीं असें आपल्या ध्यानीं येईल; तसेंच, त्या दुष्ट स्त्रीस तिच्या अपराधाच्या मानानें जितकी शिक्षा असावी त्याहून पुष्कळ कमी शिक्षा मीं तिला दिली, हेंही आपल्या लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. '

शिद्दी नूमान ह्याला आतां कांहीं बोलावयाचें नाहीं असें कालिफास दिसून आल्यावर तो त्यास म्हणाला, ' शिद्दी नूमान, तुझी गोष्ट फारच विलक्षण खरी, व तुझ्या बायकोचा अपराध क्षमेस पात्र नाहीं, यांत कांहीं संशय नाहीं. म्हणून तिला तूं आजपर्यंत जी शिक्षा दिलीस तिजबद्दल तुला मी दोष देत नाहीं. पण मनुष्यास पशूची स्थिति प्राप्त होणें हीच अगोदर केवढी दुःखाची गोष्ट आहे याचा तूं आपल्या मनाशीं विचार करून पहा, म्हणजे तिला तूं आजपर्यंत जी शिक्षा दिलीस तेवढी बस्स आहे असें तुला दिसून येईल. आतां, ज्या तरुण स्त्रीनें तिला मंत्राच्या योगानें घोडी करून टाकिली आहे, तिजकडे जाऊन तो मंत्र उलटविण्याविषयीं तूं तिला विनंति कर, असेंही मीं तुला म्हटलें असतें; पण मांत्रिक लोक किती हट्टी, कोडगे, व निर्दय असतात हें मला पक्कें ठाऊक आहे; म्हणूनच कदाचित् तुझ्या बायकोनें फिरून तुझा सूड उगविण्याचें मनांत आणल्यास त्याचा परिणाम पाहिल्यापेक्षांही जास्त भयंकर होईल कीं काय, अशी मला भीति वाटते; यास्तव तूं तसें कर असें माझ्यानें म्हणवत नाहीं. '

कालीफ हा स्वभावतः फारच दयाळू असल्यामुळें कोणीही दुःखी पाहिल्याबरोबर त्याला त्याची कींव येई. त्यानें याप्रमाणें आपल्या मनांतली गोष्ट शिद्दी नूमान यास कळविल्यावर मुख्य वजीर जाफर

त्यानें बोलावून आणिलेला तिसरा मनुष्य खोजा हसन यांस उद्देशून तो म्हणाला, ' खोजा हसन, काल मी तुझ्या वाड्यावरून येत असतां त्याचें कळाकुसरीचें काम आणि त्याची शोभा व भव्यपणा ह्यांकडे माझें चित्त इतकें वेधलें कीं, ही एवढी सुंदर इमारत आहे तरी कोणाची हें समजण्याविषयीं मला इच्छा उत्पन्न झाली. शोधा-अंतीं मला असें समजलें कीं, ती तुझी आहे; व तुझा धंदा अगदीं हलक्या प्रतीचा—इतका कीं, त्यावर तुझी पोट भरण्याची देखील मारामार—असें असतां तोच कांहीं दिवस चालवून तूं ही इमारत बांधलीस; तसेंच, तुला आपल्या पूर्वींच्या स्थितीचा विसर पडला नसून परमेश्वरकृपेनें जी संपात्ति तुला प्राप्त झाली आहे, तिचा तूं योग्य उपयोग करतोस, व तुझ्या चांगुलपणाविषयीं तुझे शेजारी-पाजारी लोक तुझी फार वाखाणणी करितात, असेंही मला कळलें. ह्या सर्व गोष्टींचा मला मोठा संतोष वाटतो. पण परमेश्वरानें कृपा करून ज्या साधनांच्या योगानें तुला ही संपात्ति प्राप्त करून दिली, ती फार चमत्कारिक असावी असें मला वाटतें. तीं साधनें कोणतीं तें तुझ्याच तोंडानें कळावें म्हणून मीं तुला येथें बोलाविलें आहे. तर काय खरी खरी हकीकत असेल ती मला सांग. कारण, ती ऐकून तुझ्या दैवशालीपणाच्या संबंधानें मला मोठें समाधान वाटणार आहे. तुझी हकीकत ऐकण्यांत माझा दुसरा कोणताही उद्देश नाहीं; व याबद्दल तुझी खात्री होण्याकरितां मी तुला स्पष्ट सांगतों कीं, माझा ह्यांत दुसरा हेतु असण्याची तर गोष्ट दूरच राहिली, पण उलटें मी तुला असें अभय देतों कीं, तुला जी संपात्ति प्राप्त झाली आहे, तिचा उपभोग घेण्यांत तुला कोणाकडूनही काडीइतका देखील अडथळा होणार नाहीं.

हें खालिफाचें भाषण ऐकून खोजा हसन यास धीर आला, आणि त्यानें त्याजपुढें साष्टांग नमस्कार घातला. नंतर तो उठून म्हणाला, ' सद्धर्मप्रतिपालक महाराज, ज्या कोणास स्वतःच्या वर्तनाच्या चोखपणाविषयीं खात्री नसेल, त्यास आपल्यापुढें हजर

होण्याचा हुकूम झाल्यास मोठी धास्ती पडून जाईल; पण माझी गोष्ट तशी नाहीं; कारण माझ्या सचोटीबद्दल मला पूर्ण खात्री असून मीं सरकारच्या स्वतःच्या विरुद्ध अगर कायदेकानूंच्या विरुद्ध कोणतीही गोष्ट केलेली नाहीं; इतकेंच नव्हे, तर सरकारच्या विषयीं माझ्या मनांत पराकाष्टेची निष्ठा व पूज्यभाव हीं वसत आहेत. आतां फक्त सरकारच्या वैभवाचें तेज सहन होईल किंवा नाहीं एवढीच काय ती भीति मला पडली होती; पण एखादा अगदीं हलक्या प्रतीचा व कंगाल मनुष्य असला तरी, त्याचीसुद्धां दाद घेण्याविषयीं व त्याची काय हकीकत असेल ती ऐकण्याविषयीं सरकारच्या तत्परतेची जी चोहोंकडे कीर्ति गाजत आहे, तीवरून मला धीर आला; व मला झालेल्या प्रश्नाचें यथास्थित उत्तर देण्यास मी डगमगणार नाहीं अशी मला खात्री वाटली. शिवाय मी अभय देण्यास पात्र आहे किंवा नाहीं हें समजण्याचें अगोदरच मला तें आपण दिलें, त्यावरून आपल्या सौजन्याचा मला प्रत्यक्ष अनुभव आला. तथापि, आपल्या हुकुमाप्रमाणें मी आपली हकीकत जी आपणांस निवेदन करणार आहे, ती ऐकल्यावरही आपल्या मनाचा ग्रह मजविषयीं चांगलाच राहील अशी मला उमेद आहे.

याप्रमाणें कालिफाची मर्जी सुप्रसन्न करण्याकरितां व त्यांचें आपल्या गोष्टीकडे लक्ष लागण्याकरितां खोजा हसन ह्यानें मोठ्या आदराचें व चटकदार भाषण केलें; व जी गोष्ट सांगावयाची ती नीट ध्यानांत आणण्याकरितां क्षणभर थांबून, नंतर ती सांगण्यास आरंभ केला.

---

# खोजा हसन अल्हाबल ह्याची गोष्ट.

खोजा हसन म्हणतो—राजाधिराज, ज्या वैभवाचा मी उपभोग घेत आहे, तें मला कोणत्या साधनांनीं प्राप्त झालें हें चांगलें आपल्या लक्षांत येण्याकरितां, मजखेरीज दुसऱ्या दोघां गृहस्थांची

हकीकत मला सांगितली पाहिजे. हे दोघे एकमेकांचे अत्यंत जिवलग मित्र आहेत; व ते ह्या बगदाद शहरचेच रहिवासी असून हल्लीं हयात आहेत; सबब मी जें कांहीं सांगणार आहें, त्याच्या खरेपणाविषयीं पाहिजे असल्यास तेही पुरावा सादर करतील. सर्व सुखास आदिकारण एक परमेश्वर आहे हें तर खरेंच, पण केवळ मानवांच्याच संबंधानें म्हटलें तर, ह्या पृथ्वीवर ते दोघेच माझ्या उत्कर्षास सर्वथैव कारणीभूत झाले आहेत.

ह्या दोघां गृहस्थांचीं नांवें सादी व साद अशीं आहेत. सादी हा अतिशय श्रीमंत आहे. त्याचें मत असें आहे कीं, ज्या मनुष्याला दुसऱ्यावर अवलंबून राहण्याची बिलकूल गरज नसते, तोच खरा सुखी होय; व ती स्थिति त्यास प्राप्त होण्याकरितां त्याजपाशीं पैसा पुष्कळ असला पाहिजे. साद ह्याचें मत अगदीं निराळें आहे. त्याचें म्हणणें असें कीं, पैसा हा ह्या संसारांत मनुष्याला आवश्यक आहे खरा, पण मनुष्याला सुख प्राप्त होण्यास त्याच्या अंगीं सदाचरण व नीति हीं पाहिजेत. पैसा हा त्याची स्वतःची गरज भागण्यापुरता, व गरीबगुरिबांस दानधर्म करण्यापुरता असला म्हणजे बस्स आहे. साद हा स्वतः असल्या प्रकारचा मनुष्य असून; तो त्याच्या असलेल्या स्थितींत मोठा आनंद मानून आहे. सादी हा जरी श्रीमंत आहे तरी त्या दोघांचें मित्रत्व अकृत्रिम असून सादी हा साद ह्याला स्वतःपेक्षां कमी मानतो असें बिलकुल नाहीं. त्या दोघांचा मतभेद फक्त ह्या आतां सांगितलेल्या गोष्टींतच काय तो दृष्टीस पडतो. इतर गोष्टींत त्यांचें पराकाष्ठेचें ऐक्य आहे.

एके दिवशीं ते ह्या विषयावर बोलत असतां सादी म्हणाला, ' लोक दरिद्री असतात ह्याचें कारण, एक तर ते जन्माचेच तसे असतात अथवा जन्मतः श्रीमंत असून ऐषआरामांत व दुर्व्यसनांत पैसा उधळल्याकारणानें, अथवा कांहीं आगापिछा नसतां एकाएकीं एखादा घात होऊन त्याच्या योगानें ते दारिद्र्यदशेस येतात. ' आणखी तो म्हणाला, 'बहुतेक लोकांच्या दारिद्र्याचें कारण हें दिसतें

कीं, त्यांना आपला निर्वाह होऊन शिल्लक राहण्यापुरता पैसाच अगोदर मिळत नाहीं, व तो न मिळाल्यामुळें त्यांना कांहीं एखादा उद्योग करून आपली स्थिति सुधारण्यास मार्ग होत नाहीं. तोच जर एकदां त्यांना हवा तेवढा पैसा मिळाला व त्यांनीं त्याचा चांगला उपयोग केला, तर त्यांना जवळ थोडी पुंजी बाळगून राहतां येईल; इतकेंच केवळ नव्हे, तर कालेंकरून ते चांगले श्रीमंतही होतील. '

साद ह्याला हें म्हणणें रुचलें नाहीं. तो म्हणाला, ' गरीब मनुष्य श्रीमंत होण्यास जो उपाय तुम्हीं सांगतां, तो निःसंशय फलद्रूप होईलच असें म्हणतां येत नाहीं. तो उपाय करणें म्हटलें म्हणजे मोठें जोखमीचें काम आहे. तुमचें मत खोडून टाकण्यास मीं शेंकडों प्रमाणें दाखवीन, पण त्या योगानें हा वाद फार वाढेल. तथापि एकंदरीनें मला खचीत वाटतें कीं, गरीब मनुष्यास पैसा दिला असतां जसा तो श्रीमंतही होईल, तसाच अन्य उपायांनींही होईल. केवळ नशीबानेंच कित्येक लोक रंकाचे राव बनून गेले आहेत कीं नाहीं ? मला वाटतें, तुम्ही म्हणतां तितका कोणा एखाद्या गरीबाला पैसा देऊन त्यानें जरी मोठ्या दक्षतेनें व्यापारधंदा चालविला व हवा तितका व्यवस्थितपणा राखून काटकसर केली तरी याची व त्याची कधींही बरोबरी होणार नाहीं. '

सादीनें उत्तर केलें, ' मला वाटतें, मीं जरी तुमच्या मताविरुद्ध आणखी शेंकडों कोट्या लढविल्या तरी तुमचें समाधान होणार नाहीं. सबब मी असें करितों कीं ज्याच्या घरीं सातां पिढ्यांपासून सारखें दारिद्र्याचें ठाणें बसलेलें आहे, व आजचा दिवस गेला उद्यांचा कसा जाईल, अशी ज्याला पंचाईत आहे, असा एखादा कारागीर पाहून त्याला कांहीं पैसा देतों आणि मी आपल्या म्हणण्याची प्रतीति तुम्हांला दाखवितों. कदाचित् माझ्या म्हणण्याप्रमाणें नच झालें, तर मग तुम्ही म्हणतां तसें करून पाहूं ! '

याप्रमाणें त्या दोघांचें बोलणें झाल्यावर कित्येक दिवसांनीं ते शहरांत फिरावयास निघाले. ते फिरतां फिरतां माझ्या घरावरून चालले. तेव्हां मी आपल्या पडवींत दोऱ्या वळीत बसलों होतों, तो त्यांच्या दृष्टीस पडलों. आम्ही पिढ्यान्‌पिढ्या ह्या दोऱ्या वळण्याच्या धंद्यावर पोट भरीत असल्यामुळें, आमचें घरदार वगैरे कोणत्या थाटाचें असेल ह्याची कल्पना सहजच होईल. माझ्या अंगावरचे कपडेही सदरहूप्रमाणेंच होते, म्हणजे त्यांना शंभर ठिकाणीं ठिगळें दिलेलीं होतीं. हा सर्व प्रकार पाहून माझी गरीबी कितपत असेल हें त्या दोघांच्या सहज लक्षांत आलें.

सादी पूर्वी काय बोलला होता त्याचें साद ह्याला ह्या वेळीं स्मरण होऊन तो त्यास म्हणाला, ' अहो, तुमचें माझें त्या दिवशीं बोलणें झालें तें तुम्हांला आठवतच असेल, तर आतां हाच मनुष्य पहा, मी आज बहुत दिवस ह्याला हें दोऱ्या वळण्याचें काम करतांना पहात असून ह्याच्या पदरीं सदा अठराविश्वें दारिद्र्य आहे. तेव्हां तुम्ही आपलें औदार्य ह्याच्याठायीं प्रकट करण्यास हा पात्र असून तुम्हाला जो अनुभव पहावयाचा आहे तो पाहण्यास हें योग्य स्थळ आहे. ' सादीनें उत्तर केलें, ' हो, माझ्या ती गोष्ट रात्रंदिवस मनांत घोळतच आहे; व त्याकरितां मीं आपल्याजवळ नेहमीं एक मोहोरांची थैली बाळगून ठेविलेली आहे. आतां ती ह्याच मनुष्याला देऊन मी आपल्या म्हणण्याची प्रतीति तुम्हांला दाखवितों. आजपर्यंत मी थांबलों ह्याचें कारण हेंच कीं, तुमच्या समक्ष तें झालें म्हणजे बरें. चला तर आपण त्याच्याकडे जाऊं, आणि तो दिसतो तसा खरोखरच कंगाल आहे कीं काय तें पाहूं. '

मग ते दोघेजण मजकडे आले; तेव्हां त्यांना मजपाशीं कांहीं बोलावयाचें आहे असें मला दिसून आल्यावरून मीं आपलें काम बंद केलें. रीतीप्रमाणें आमचे सलाम झाल्यावर सादी यानें,' तुमचें नांव काय ? ' असा मला प्रश्न केला. मीं उत्तर केलें, 'माझें नांव हसन, पण माझ्या धंद्यावरून मला हसन अल्‌हाबल असें म्हणतात.'

सादी म्हणाला, 'हसनभाई, कोणताही धंदा असा नाहीं, कीं ज्यावर मनुष्याला आपला चरितार्थ चालवितां येणार नाहीं. तेव्हां तुमचा जो हा धंदा आहे, त्यावर तुमचा चरितार्थ चांगला चालत असेल यांत कांहीं संशय नाहीं; पण तुम्ही इतके दिवस हा धंदा चालवीत असतां जास्त लोक ठेवून आपला कारखाना व त्याचें उत्पन्न वाढविण्याकरितां चांगला पुष्कळ ताग विकत घेण्यापुरताही पैसा तुमचेपाशीं शिल्लक नसावा, हें मोठें आश्चर्य आहे !'

मीं उत्तर केलें,' महाराज, काय सांगूं माझी स्थिति फार चमत्कारिक आहे. मी दिवस उगवल्यापासून मावळेपर्यंत, एकसारखा खपत असतों, तरी मला आपल्या कुटुंबास जाडीभरडी भाकर घालण्यापुरतें मिळविण्यास पंचाईत पडते. तेव्हां मला पैसा गांठी बांधून तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें उत्पन्न वाढवितां आलें नाहीं यांत कांहीं आश्चर्य नाहीं. घरांत माझी बायको व पांच मुलें आहेत. त्या मुलांपैकीं एकही मला हातोसा देण्यासारखें नाहीं. मला त्यांना अन्नवस्त्र पुरविलें पाहिजे व आमच्या अगदीं गरीबीच्या रीतीप्रमाणें म्हटलें, तरी अन्नवस्त्राखेरीज त्यांना आणखी शेंकडों वस्तु लागतात.त्यांवांचून त्यांचें चालावयाचेंच नाहीं. आतां ताग जरी फार महाग नाहीं, तरी पण तो जास्त विकत घेण्याला पैसा पाहिजे कीं नाहीं ? दोऱ्या विकून मला जे पैसे मिळतात त्यांपैकीं जे थोडेबहुत शिल्लक राहतात, त्यांचा मला एकट्याला पुरेइतका ताग सरासरी येतो; व तेवढ्यांत मी " कुच रोटी, कुच लंगोटी " अशा प्रकारें कसे तरी दिवस काढीत आहें. तर याप्रमाणें माझी स्थिति असतां मला आपली व आपल्या कुटुंबाची स्थिति सुधारण्यास चार पैसे गांठीस ठेवावयाला सवड सांपडेल किंवा काय याचा तुम्हीच विचार करा. परमेश्वर कृपा करून आम्हांला जी मीठभाकर देतो, तिजवर आम्ही संतुष्ट असतों. आम्हांला जें मिळण्यासारखें नाहीं, आणि जन्मापासून ज्याप्रमाणें आम्हीं दिवस ढकलले, तसेंच पुढेंही ढकलतां येतील

अशी आमची स्थिति आहे, व आम्हांला लोकांच्या दारोदार भिक्षा मागण्याची पाळी आली नाहीं हेंच आम्ही मोठें भाग्य समजतों.'

याप्रमाणें मीं सादी यास आपली हकीकत सांगितल्यावर तो मला म्हणाला, 'हसनभाई,' तुमच्या स्थितीच्या संबंधानें मला पहिल्यानें जसें आश्चर्य वाटत होतें तसें आतां वाटत नाहीं; व तुम्हांला ह्या स्थितींत संतोष मानून राहणें भाग कां पडतें याचेंही कारण माझ्या लक्षांत आलें. पण मी जर तुम्हांला दोनशें मोहोरा बक्षीस दिल्या, तर त्याचा तुम्हाला चांगला उपयोग होऊन,तुमच्या धंद्यांत जो कोणी प्रमुख असेल त्याची बरोबरी तुम्हांला करतां येईल कीं नाहीं ?'

मीं उत्तर केलें, 'महाराज, तुम्ही मोठे सज्जन दिसतां, व त्यामुळें तुम्ही ही माझी थट्टा करीत नसून खरोखरच तुमच्या मनांत मला दोनशें मोहोरा देण्याचें आहे असें मीं समजतों. तर महाराज, फार काय सांगूं? दोनशें मोहोरांची गोष्ट तर राहूंच द्या,पण दीडशें किंवा शंभर जरी मला मिळाल्या, तरी तितक्यांच्याच योगानें मला आमच्या नायकाची बरोबरी करण्याचें सामर्थ्य येईल; एवढेंच नव्हे तर हें बगदाद जरी येवढें मोठें भरवस्तीचें शहर आहे, तरी येथले आमचे सर्व धंदेवाले एकीकडे आणि मीं एकीकडे इतका मीं पैसेवाला होईन!'

हें माझें भाषण ऐकून त्या थोर व उदार पुरुषानें लागलीच आपल्या म्हणण्याची प्रतीति मला आणून दिली. त्यानें आपल्या खिशांतून थैली काढिली,आणि ती माझे हातावर ठेवून तो म्हणाला, 'हिच्यांत बरोबर दोनशें मोहोरा आहेत, ह्या तुम्हांला लखलाभ होवोत व माझ्या इच्छेप्रमाणें ह्यांचा चांगला उपयोग करण्याची ईश्वर तुम्हांला बुद्धि देवो! यांच्या योगानें तुम्हांला हल्लींच्याहून चांगले दिवस आले म्हणजे त्यापासून मला व ह्या आमच्या स्नेह्यांना मोठा आनंद होणार आहे.'

माझ्या हातांत ती थैली पडून ती मी खिशांत घातल्याबरोबर

मला इतका कांहीं हर्ष झाला, व त्या गृहस्थाच्या उपकारांचें एवढें मला ओझें वाटूं लागलें, कीं माझ्या तोंडांतून एक शब्दही निघेना. मग मीं आपल्या कल्याणकर्त्याला आपले आभार प्रदर्शित करण्याकरितां त्याच्या झग्याचें चुंबन घेण्याच्या इराद्यानें त्याच्या झोळाला हात घातला, पण त्यानें लागलीच तो माझ्या हातून ओढून घेतला, आणि तो व त्याचा स्नेही हे चालते झाले.

ते निघून गेल्यावर प्रथमतः मला आपली थैली सुरक्षित ठेवण्यास जागा कोणती पहावी याचा विचार पडला. आमच्या त्या भिकार झोंपडयांत पेटी किंवा फडताळ ह्याचें तर नांवच घ्यावयाला नको, व दुसऱ्या एखाद्या ठिकाणीं ठेवावी तर ती कोणाच्या दृष्टीस पडल्यावांचून राहण्यासारखी नव्हती. तेव्हां आतां पुढें करावें कसें हें मला कांहीं सुचेना. शेवटीं माझ्यासारख्या गरीब लोकांची नेहमींची जी चाल असते—कीं जे थोडेसे पैसे जवळ असतील ते पागोटयाच्या पदरीं बांधून ठेवावयाचे—त्याप्रमाणेंच व्यवस्था करावी हें मला बरें वाटलें. मग मी पागोटयाच्या पट्टया घेण्याच्या निमित्तानें घरांत गेलों, आणि आपलें काम इतक्या शिताफीनें केलें कीं, मी काय करितों हें माझी बायको व मुलें ह्यांच्या लक्षांत बिलकुल आलें नाहीं. मीं त्या थैलींतून दहा मोहोरा जरूरीच्या खर्चाकरितां ठेविल्या,आणि ती पागोटयाच्या अगदीं आंतल्या बाजूस, कोणाच्या समजण्यांत न येईल अशा रीतीनें बांधून टाकिली. त्या दिवशीं मला दोन प्रकारचा खर्च करावयाचा होता—एक,बराचसा ताग विकत घ्यावयाचा होता; व दुसरा, पोराबाळांना बरेच दिवसांपासून कांहीं गोडगोड खायाला मिळालेलें नव्हतें, सबब संध्याकाळीं तें करण्याकरितां कांहीं सामान आणावयाचें होतें.

मी बाजारांतून हे जिन्नस विकत घेऊन घरीं येत असतां, माझ्या हातांत पानावर लोणी होतें त्याकडे एका घारीची दृष्टि जाऊन तिनें तत्काळ त्यावर झडप घातली. पण तितक्यांत मीं तें झांकून इतकें गच्च धरिलें कीं, त्या घारीनें पुष्कळ झटपट केली तरी मी तिची

बिलकुल डाळ शिजूं दिली नाहीं! पण काय सांगूं, मीं तें लोणी सोडून दिलें असतें तर फार बरें झालें असतें! कारण, तसें केलें असतें म्हणजे माझे पैसे वांचले असते! मी जितकें जितकें तें लोणी बळकट धरायला जाई, तितकी तितकी ती घार त्यावर ज्यास्त झटून पडे; व ती फडाफड पंख झाडीत असे. त्यामुळें मला इकडून तिकडे व तिकडून इकडे अंग चोरावें लागें. असें होतां होतां शेवटीं माझ्या डोक्याचें पागोटें खालीं पडलें; तें मी उचलून घेणार तों घारीनें लोण्याचा नाद सोडून देऊन तें पागोटेंच उचललें, आणि ती झटदिशीं निघून गेली! त्यासरशीं मीं इतकी मोठ्यानें किंकाळी फोडिली कीं तेणेंकरून जवळपासचे लोक घाबरून, झालें तरी काय म्हणून चौकशी करण्याकरितां धावून आले. त्यांनींही घारीनें पागोटें टाकावें म्हणून माझ्याबरोबर मोठ्यानें आरोळ्या मारण्याचा सपाटा लाविला; कारण तशानें घार तोंडांत धरलेली वस्तु सोडून देते असें अनेक वेळां घडलेलें आहे. पण आमचा सर्वांचा यत्न व्यर्थ गेला. पागोटें घेऊन तिनें जी एकदम भरारी मारिली, ती आम्हांस दिसेनाशी होईपर्यंत तिनें पागोटें टाकिलें नाहीं. शेवटीं, आतां तिच्या मागें जाऊन तरी काय उपयोग? व्यर्थ श्रम मात्र होणार; असें जाणून मीं मोठ्या दुःखानें घराचा रस्ता धरिला.

याप्रमाणें, पैशापरी पैसा गेला, आणि डोक्याचें पागोटेंही गेलें, यामुळें मला फारच दुःख झालें. मला आणखी दुसरें पागोटें घ्यावें लागलें. यामुळें दहा मोहोरा ज्या मीं शिल्लक ठेविल्या होत्या त्यांतून आणखी कमी झाल्या; व बाकी ज्या राहिल्या, त्यांच्या योगानें म्हणजे मला आपला भाग्योदय करून घेतां येईल ही आशा मुळींच राहिली नाहीं!

तथापि, इतक्याही गोष्टींचें मला विशेष वाईट वाटलें नाहीं. मला मुख्यत्वेंकरून अतिशय वाईट वाटलें तें एवढ्याचकरितां कीं, आपल्या औदार्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं असें जेव्हां त्या थोर गृहस्थाला दिसून येईल, तेव्हां त्याचें मन फार खट्टू होईल; व

माझा पैसा जाण्याला जी गोष्ट कारणीभूत झाली, ती त्याला खरी न वाटून, हा आपला उगीच कांहीं तरी सबब सांगत आहे असें तो मनांत म्हणेल !

असो. त्या दहा मोहोरांपैकीं ज्या कांहीं शिल्लक राहिल्या होत्या त्या संपत तोंपर्यंत मला व माझ्या कुटुंबाला खाण्यापिण्याची ददात पडली नाहीं, पण लौकरच आम्हांस पूर्ववत् निकृष्ट दशा प्राप्त होऊन तीपासून वर डोकें काढण्याची आशा बिलकुल राहिली नाहीं. इतकें झालें तरी मीं त्या गोष्टीची बिलकुल खंत केली नाहीं. मीं म्हटलें, ' मला द्रव्य मिळण्याची कोणत्याही प्रकारें आशा अगर संभव नसतां तें मला ईश्वरानें दिलें; बरें, तें लागलीच त्याला मजपासून घ्यावेंसें वाटलें ! मर्जी त्याची ! तो करील तें प्रमाण आहे; कारण सर्व सत्ता त्याची आहे. तथापि त्यानें जे मजवर उपकार केले ते मी कधींही विसरणार नाहीं; आणि पुढेंही जें कांहीं त्याच्या इच्छेस येईल, त्यालाही मी सादर आहे. ' सारांश, मीं अशाप्रकारें आपल्या मनाचें सांत्वन केलें.

माझी जी ही हानि झाली, तिची हकीकत मला आपल्या बायकोस सांगितल्यावांचून राहवेना. तिला जेव्हां ती कळली, तेव्हां तिला अमर्याद दुःख झालें. मी त्या विवंचनेंत असतां सहज बोलतां बोलतां कित्येक शेजाऱ्यापाजाऱ्यांशींही बोलून गेलों कीं, माझें पागोटें गेलें त्याबरोबर माझ्या एकशें नव्वद मोहोरा गेल्या. पण त्यांना माझी स्थिति पूर्णपणें माहीत होती, व माझ्या धंद्यावर मला इतका पैसा मिळणें हें अशक्य आहे अशी त्यांची खात्री होती, यामुळें माझें बोलणें ऐकून त्यांना हंसू मात्र पुष्कळ आलें, दुसरें कांहीं नाहीं !

या गोष्टीस सहा महिने झाल्यावर एके दिवशीं साद व सादी हे उभयतां मी रहात होतों त्या मोहल्यांतून चालले. ते माझ्या घरापासून कांहीं अंतरावर येतांच साद ह्याला माझें स्मरण होऊन तो सादी यास म्हणाला, ' कांहो, हसन अल्हाबल ज्या आळींत राहतो

ती आळी येथून जवळच आहे, नाहीं बरें ? तर चला आतां आपण त्याजकडे जाऊं आणि तुम्हीं त्याला ज्या दोनशें मोहोरा दिल्या त्यांच्या योगानें त्याची स्थिति कितपत सुधारली आहे तें पाहूं.'

सादीनें उत्तर केलें, 'खरें पुसाल तर ही गोष्ट माझ्या मनांत आज बरेच दिवस घोळत होती. तेव्हां आज अनायासें आपण दोघेही इकडे आलों हें फार चांगलें झालें. आतां माझी इच्छा सफळ झालेली तुम्हीच आपल्या डोळ्यांनीं पहाल. मला खचीत वाटतें कीं, त्याच्या पूर्वींच्या व हल्लींच्या स्थितींत जमीनअस्मानाचें अंतर पडलें असेल. तो आपल्याला आतां ओळखूं तरी येईल कीं नाहीं याचीच मला पंचाईत दिसते !'

इतकें बोलणें होत आहे तों ते दोघेजण माझ्या घराकडे जो रस्ता वळत होता त्यांत येऊन ठेपले. ते माझ्या घरापासून कांहीं अंतरावर आले. तेव्हां साद ह्यानें प्रथम मला पाहिलें. त्यावरून तो सादी त्यास म्हणाला, 'मला वाटतें कीं, "बाजारांत तुरी आणि भट भटणीला मारी" ह्या म्हणीप्रमाणें तुम्ही करूं पाहतां ! तो पहा हसन अल्हाबल त्याच्या स्थितींत कांहींच तफावत मला दिसत नाहीं ! कारण, प्रथम आपण त्यास पाहिलें तेव्हां त्याच्या अंगावर ज्या लकतऱ्या होत्या त्याच अजून कायम आहेत ! नाहीं म्हणायाला त्याचें पागोटें तेवढें जरा बरें दिसत आहे. मी म्हणतों, हें खरें किंवा खोटें तें तुम्हीच आतां प्रत्यक्ष पाहून मला सांगा.'

ते माझ्या घराच्या अंमळ जवळ आले तों सादी यानें मला पाहिलें, व साद म्हणतो तें अगदीं खरें आहे असें त्याच्या सुद्धां लक्षांत आलें. पण असें कां व्हावें हें त्यास समजेना. त्याची अक्कल अगदीं गुंग होऊन गेली, व मजपाशीं आल्यावर काय बोलावें हें त्यास सुचेना. मग साद मला म्हणाला, हसनभाई, 'तुमची आमची गांठ पडल्या दिवसापासून तुमची स्थिति काय आहे हें कांहीं आम्ही तुम्हांला विचारीत नाहीं. कारण, ती पुष्कळच सुधारली असेल यांत कांहीं संशय नाहीं.' मीं त्या उभयतांस उद्देशून

उत्तर दिलें, ' महाराज, मला सांगायाला फार शरम वाटते कीं, तुम्हीं मनांत जी उमेद बाळगिली होती, व मला जी एवढी मोठी आशा होती, ती अगदीं व्यर्थ झाली ! मजवर असा कांहीं विलक्षण प्रसंग गुजरला कीं, त्याची हकीकत तुम्हांला खरी देखील वाटणार नाहीं ! तथापि, मी शपथपूर्वक सांगतों कीं, मी जें कांहीं आतां तुम्हांला सांगणार त्यांत असत्याचा लेशही नाहीं; व त्यावर तुम्ही बेलाशक विश्वास ठेवा. ' यानंतर, घारीनें माझें पागोटें कसें नेलें वगैरे सर्व वृत्तांत जसा घडला होता तसा इत्थंभूत मीं त्यास सांगितला.

सादीला माझें बोलणें अगदीं खोटें वाटलें. तो म्हणाला, 'हसनभाई, तुम्ही आम्हांला ही निव्वळ लोणकढी बात सांगितली यांत कांहीं संशय नाहीं ! तुमच्या मनांत मला फसवावयाचें आहे असें दिसतें. अहो, तुम्ही म्हणतां हें संभवेल तरी कसें ? घारींना पागोट्याचें काय करावयाचें असतें ? त्यांना फक्त भक्ष्य मिळण्याशीं गरज. तें कांहीं नाहीं. ही निवळ लुच्चेगिरी आहे ! तुमच्यासारख्या लोकांची कर्मेंच हीं ! तुम्हांला कांहीं आशा नसतां एकाएकीं कोठें लग्गा सांपडला कीं लागलीच तुमच्या डोळ्यांवर धूर येतो, आणि तुम्ही आपला उद्योगधंदा सोडून देऊन जवळचा पैसा संपेपर्यंत खुशाल हवी तशी चैन कारितां. मग पैसा नाहींसा झाला म्हणजे फिरून आपले " बाबू के भाई दरवेशी " बनले ! तुम्हांला मी खचीत सांगतों कीं, तुम्हांला सुख प्राप्त होण्यास व तुम्हांवर लोकांनीं उपकार करण्यास तुम्ही मुळीं पात्रच नाहीं ! '

मीं उत्तर केलें, ' महाराज, तुम्ही मला हवें तें का म्हणाना ! माझी त्याबद्दल कांहीं तक्रार नाहीं; इतकेंच नव्हे, तर तुम्हीं मला आणखी शंभर शिव्या जरी दिल्या तरी त्याचें मला कांहींच वाटणार नाहीं, कारण माझ्या हातून यत्किंचित् देखील अपराध घडलेला नाहीं. याविषयीं माझी मला पूर्ण खात्री आहे ! ती गोष्ट या मोहल्यांतील सर्व लोकांस माहीत आहे. तुम्ही कोणाला वाटेल

त्याला विचारा, आणि मी म्हणतों असेंच तो सांगतो कीं नाहीं तें पहा. घारीनें पागोटें नेलेलें मींही कधीं कोणाच्या तोंडून ऐकिलेलें नाहीं; पण माझें पागोटें घारीनें नेलें ही गोष्ट मात्र अगदीं खरी आहे! कित्येक गोष्टी अशा आहेत कीं, त्या नेहमीं जरी घडत नाहींत, तरी क्वचित् प्रसंगीं घडून येतात,हें तुम्हीही कबूल कराल.'

साद यानें माझा पक्ष उचलला.तो म्हणाला,'घार पागोटें नेणार नाहीं असें नाहीं. घारींच्या मी पुष्कळ विलक्षण गोष्टी ऐकिल्या आहेत व कित्येक स्वतःही पाहिल्या आहेत; त्यांवरून हसनभाई म्हणतात यांत खोटेपणा असावा असें माझें मन घेत नाहीं.' हें त्याचें बोलणें ऐकून सादी यालाही माझी गोष्ट खरी वाटली; आणि त्यानें लागलीच खिशांतून मोहोरांची एक थैली काढली आणि दोनशें मोहोरा माझ्या हातावर टाकिल्या. मजपाशीं कसा वगैरे नसल्यामुळें मीं त्या तशाच आपल्या बंडीच्या खिशांत भरल्या. नंतर सादी मला म्हणाला,"हसनभाई,आणखी मीं ह्या दोनशें मोहोरा तुम्हांला बक्षीस दिल्या आहेत. आतां तरी ह्या नीट जपून ठेवा, आणि पूर्वींप्रमाणें गैदीपणा न करितां त्यापासून चांगला फायदा होईल अशी तजवीज करा.'

मीं त्यास उत्तर केलें, ' महाराज, माझ्या हातून एकवार गचाळ-पणा झाला असतांही फिरून तुम्ही कृपा करून मला ही देणगी दिली, तिजबद्दल मी तुमचे किती म्हणून आभार मानूं? खरोखर पाहिलें असतां आतां पुनः तुम्ही मजवर दया करण्यास मी मुळींच पात्र नाहीं. तथापि, ज्याअर्थीं पूर्वींचें कांहीं एक मनांत न आणतां आपला उदार हस्त पुढें सरसाविला, त्याअर्थीं मी तुम्हांला खात्री-पूर्वक सांगतों कीं, आतां मजकडून किंचितूही दुर्लक्ष होण्याची वार्ता नको! तुम्ही जो मला बोध केला तो रात्रंदिवस माझ्या हृदयांत जागृत राहील.' मी आणखीही पुष्कळ बोलणार होतों. पण मला फुरसतच सांपडली नाहीं; कारण तो लागलीच उठला आणि आपल्या मित्रासह चालता झाला.

ते दोघे निघून गेल्यावर मी घरांत गेलों. घरांत माझी बायको किंवा मुलें कोणीं नव्हतीं, हें पाहून मीं त्या मोहोरा खिशांतून काढल्या. त्यांतून दहा मीं एकीकडे काढून ठेविल्या, आणि बाकीच्या एका रुमालांत बांधून टाकल्या. ही पुरचुंडी कोणत्या ठिकाणीं ठेविली असतां सुरक्षित राहील याचा मी आपल्या मनांत विचार करूं लागलों. जरासा विचार केल्यावर मला सुचलें कीं कोपऱ्यांत कोंड्यानें भरलेला डेरा आहे, त्यांत ही ठेविली असतां कोणाच्याही नजरेस पडण्याचा संभव नाहीं. तेव्हां लागलीच मीं त्याप्रमाणें केलें. नंतर लौकरच माझी बायको घरीं आली. तिला मी ते दोघे गृहस्थ आले होते वगैरे कांहींएक न सांगतां ' ताग संपला आहे तो घेऊन येतों ' असें म्हणून तो आणण्याकरितां निघून गेलों.

मी बाजारांत गेलों असतां इकडे असें झालें कीं, कपडे धुण्याचें साबण विकणारा एक मनुष्य, 'साबण, कोणाला पाहिजे साबण ! ' असें ओरडत माझ्या दारावरून चालला. माझ्या बायकोला तें घ्यावयाचें होतें, म्हणून तिनें त्यास हांक मारिली; परंतु तिजजवळ पैसे नव्हते, सबब तिनें, ' कोंडा घेऊन देतोस का ? ' म्हणून त्याला विचारलें. त्यानें ' कोंडा मला पाहूं द्या, ' असें म्हटल्यावरून तिनें त्यास तो डेरा दाखविला. त्याला कोंडा पसंत पडल्यावरून त्यानें साबण तिला दिलें, आणि कोंडा डेऱ्यासुद्धां घेऊन गेला.

नंतर थोडयाच वेळानें मी व पांच हेलकरी असे सहाजण तागाचीं ओझीं घेऊन घरीं आलों. मी त्या हेलकऱ्यांची मजूरी चुकती करून त्यांना वाटेस लाविलें, आणि विसावा घेण्याकरितां जरा अंग टाकिलें. नंतर क्षणभरानें डेऱ्याच्या जागेकडे पाहिलें तों डेरा कोठें दिसेना ! तेव्हां माझ्या मनाची जी स्थिति झाली, तिचें मला शब्दांनीं वर्णन करितां येत नाहीं ! मीं लागलीच ' डेरा कोठें आहे ? ' म्हणून बायकोला विचारलें. तेव्हां त्या साबणवाल्याशीं जो सौदा केला होता तो तिनें मला सांगितला आणि ' यांत आपल्याला चांगला फायदा झाला ' असें वरतीं म्हटलें !

मीं तिला म्हटलें, ' अग चांडाळणी, तूं हें काय केलेंस ? आग लागो त्या तुझ्या फायद्याला ! त्याच्या योगानें आपला आज सर्वस्वीं घात झाला ! तुला वाटलें असेल कीं, आपण त्या साबणवाल्याला फक्त कोंडा दिला; पण त्या कोंड्याबरोबर, सादी ह्यानें आपल्या मित्रासह येऊन मला नुकत्याच दोनशें मोहोरा दिल्या होता, त्यांपैकीं एकशें नव्वद मोहोरा तूं त्याच्या घरांत भरल्यास ! '

आपल्या चुकीमुळें ही आपली केवढी हानि झाली हें जेव्हां माझ्या बायकोला समजलें, तेव्हां ती दुःखानें अगदीं वेडी होऊन गेली ! तिनें मोठ्यानें हंबरडा फोडिला, कपाळ फोडून घेतलें, डोकींचे केंस ओरबाडले, आणि लुगड्याच्या फाडून चिंध्या केल्या, ! ती म्हणाली, ' माझ्या हातून एवढें मोठें नुकसान झालें असतां मी आता जिवंत तरी कशी राहूं ? अरे देवा ! आतां त्या साबण-वाल्याला मी पाहूं तरी कोठें ! तो माझ्या ओळखीचा नाहीं, आणि यापूर्वीं कधीं या आळींत आलेलाही नाहीं ! ' नंतर ती मला म्हणाली, ' अहो, ही गोष्ट एवढी महत्वाची असतां तुम्ही मला कळविली नाहीं, तेव्हां तुम्हांला काय म्हणावें बरें; तुम्ही जर मला अगोदर सांगतां तर इतकें कशाला झालें असतें ? ' सारांश, ती त्या दुःखांत काय काय म्हणाली तें सर्व जर मी सांगूं लागलों, तर माझी गोष्ट कधींच संपणार नाहीं ! कारण, बायकांना दुःखाच्या आवेशांत बोलणें फार सुचतें, याचा सगळ्यांना अनुभव आहेच !

मीं आपल्या बायकोस म्हटलें, ' अग, तूं हें मांडलें आहेस तरी काय ? जरा शांत हो; उगीच रडण्यांत आणि ओरडण्यांत कांहीं-एक अर्थ नाहीं ! तें ऐकून शेजारीपाजारी लोक मात्र विनाकारण येथें जमतील, आणि काय झालें, काय झालें, म्हणून विचारावयाला लागतील. त्यांत आपला तोटा आणि जनांचें हंसूं मात्र होणार आहे. दुसरें कांहीं नाहीं ! आपण या गोष्टीचा बोभाट न करितां देवाची मर्जी म्हणून स्वस्थ रहावें, हाच उत्तम मार्ग आहे ! त्यानें आपणाला

दहा मोहोरा दिल्या हे तरी आपणांवर त्याचे मोठेच उपकार नव्हेत काय ? त्यांबद्दल आपण त्याची स्तुति केली पाहिजे; कारण, त्या मोहोरांच्या योगानें आपणाला पुष्कळ साह्य होणार आहे ! '

पहिल्यानें माझ्या बायकोला माझें बोलणें अगदीं रुचलें नाहीं. पण कांहीं वेळ गेल्यावर ती जरा शांत झाली, आणि बराच वेळ गेल्यावर तिला त्या गोष्टीचा बहुतेक विसरच पडला. जसजशी वेळ निघून जाते तसतसें दुःख कमी होतें असें जें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. असो. मीं तिला म्हटलें, ' अग आपल्या पदरीं गरीबी आहे हें तर खरेंच, पण तूं असा विचार करून पहा कीं श्रीमंत लोकांना तरी आपल्यापेक्षां काय जास्ती मिळतें ? हवा, उजेड व ऊन ह्यांचा त्यांच्याप्रमाणेंच आपणांलाही उपयोग घ्यावयास सांपडतो. आतां त्यांना आपल्यापेक्षां कांहीं सुख जास्ती आहे हें खरें; पण त्याबद्दल आपण त्यांचा हेवा करूं नये; व तें आपणांला मिळत नाहीं म्हणून खेदही मानूं नये. कारण, वास्तविक विचार करून पाहिलें असतां तें अगदीं क्षुल्लक आहे; कसें तर तें कांहीं चिरस्थायी आहे असें नाहीं—क्षणभंगुर आहे. मरणाबरोबर त्याचा अंत होणार आहे, आणि मरण केव्हां येईल याचा आपणाला जसा भरंवसा नाहीं, तसाच श्रीमंतांनाही नाहीं. तर तात्पर्य काय कीं, आपण परमेश्वराचें भय धरून व सर्वस्वीं त्याजवर हवाला टाकून रहावें यांतच हित आहे. '

आतां हें नीतिविचाराचें भारूड मी जास्त लांबवीत नाहीं. इतकेंच सांगतों कीं, याप्रमाणें आम्हीं उभयतांनीं आपलें समाधान करून घेतलें, आणि थोडक्याच वेळांत एकामागून एक असे जरी मला दोन मोठमोठे धक्के बसले, तरी त्यांच्या योगानें मीं आपलें मन दिलगीर होऊं न देतां पूर्वींप्रमाणें हुशारीनें आपला उद्योग चालविला. एक गोष्ट मात्र माझ्या मनाला अतिशय खात असे. ती ही कीं, सादी येऊन जेव्हां मला विचारील ' कीं, मीं ज्या तुला दोनशें मोहोरा दिल्या त्यांचा तूं कसा काय उपयोग केलास व

त्यांच्या योगानें तुझी स्थिति कितपत सुधारली आहे ? ' तेव्हां मी त्याला काय उत्तर देऊं ? तथापि या दुःखकारक गोष्टींच्या संबंधानें पहिल्या वेळप्रमाणेंच ह्या वेळेसही मजकडे कोणत्याही प्रकारचा दोष नव्हता, यामुळें सादीसमोर आतां कोणत्या तोंडानें बोलूं अशीच केवळ माझ्या मनाची स्थिति होण्यास कारण नव्हतें. मीं विचार केला कीं, होणारापुढें कोणाचाही उपाय नाहीं. यास्तव जी काय खरी खरी हकीकत घडली आहे, ती सादी यास सांगून स्वस्थ बसणें भाग आहे. आतां यांत तरी आपल्याला खालीं पहावें लागणार आहेच, पण आपण ज्याअर्थीं सर्व प्रकारें दुर्दैवीच आहों, त्याअर्थीं जें जें येईल तें तें भोगण्यास आपण सादर झालें पाहिजे !

इकडे त्या दोघां गृहस्थांनीं मजकडे येण्यास पूर्वींपेक्षां जास्त दिवस लाविले. साद यानें सादी ह्यास पुष्कळ वेळां त्याबद्दल आठवण केली, पण त्यानें बुद्धया तें लांबणीवर टाकलें. तो म्हणाला, ' आपण जितके जास्त दिवस लावूं, तितका हसन जास्त श्रीमंत होईल आणि तेणेंकरून माझ्या चित्ताचें अधिक समाधान होईल. '

सादी याला आपल्या औदार्याचा उपयोग होण्याविषयीं पूर्ण खात्री होती, पण साद याला ती नव्हती. तो सादी यास म्हणाला, ' तर मग काय तुम्हांला वाटतें कीं तुमच्या दोनशें मोहोरांचा या वेळीं पहिल्यापेक्षां जास्त उपयोग झाला असेल ? माझें ऐकाल तर तुम्ही या गोष्टीवर फारसा भरंवसा ठेवूं नका; कारण, तुमच्या अदमासाच्या उलट प्रकार घडून आल्यास तुम्हांला जास्त वाईट मात्र वाटेल ! ' सादीनें उत्तर केलें, ' जाऊं द्या हो ! घारी कांहीं नेहमींच पागोटीं घेऊन जातात असें नाहीं ! हसन खचीत पूर्वींपेक्षां जास्त सावधगिरीनें वागला असेल. '

साद म्हणाला, ' तुम्ही म्हणतां तें खरें; पण आपल्याला जिची कल्पनासुद्धां करितां येणार नाहीं अशीच एखादी गोष्ट घडून तुमचा मनोरथ व्यर्थ होणार नाहीं म्हणून कशावरून ? म्हणून मी फिरून तुम्हांला सांगतों, हसन हा श्रीमंत झाला असेल असें केवळ गृहीत

धरूनच तुम्ही आनंदाच्या भरांत फारसें राहूं एका ! आतां माझें बोलणें तुम्हाला रूचणार नाहीं हें मी पक्कें जाणतों; पण खरें विचाराल तर तुमचा हा यत्न कांहीं सिद्धीस जाणार नाहीं व गरीब मनुष्य पैशाखेरीज इतर साधनानेंच लवकर श्रीमंत होईल हें सिद्ध करून दाखविण्यांत मलाच निःसंशय यश येईल अशी माझी मनोदेवता मला सांगते. '

एके दिवशीं याप्रमाणें साद व सादी यांचा वाद चालला असतां साद म्हणाला, ' आतां या गोष्टीची चर्चा बस्स झाली. आज मीं या गोष्टीची शहानिशा करण्याचा निश्चय केला आहे. चला आतां, फिरायाला जाण्याचीही वेळ झालीच आहे, तर कोण हरतो आतांच पाहूं. ' यानंतर ते उभयतां माझ्या घराकडे आले. त्यांना पाहून, पाण्यांत ढेकूळ टाकलें असतां जसें विरघळतें तद्वत् माझ्या मनाची स्थिति झाली ! तेव्हां त्यांच्या दृष्टीसच न पडावें म्हणून मी आपलें काम टाकून घरांत जाऊन लपून बसण्याच्या बेतांत होतों; पण इतक्यांत तो माझा विचार फिरला व मी आपल्या कामांत अगदीं गढून गेल्यामुळें माझें लक्ष त्यांच्याकडे गेलें नाहीं असें मीं भिष केलें. शेवटीं जेव्हां ते माझ्या अगदीं समोर येऊन त्यांनीं मला सलाम केला, तेव्हां मला त्यांच्याकडे पाहण्यावांचून गत्यंतरच नाहींसें झालें ! अर्थात् मग मीं मान खालीं घालून आपल्या दुर्दैवाची कथा त्यांस सविस्तर सांगितली.

नंतर मीं त्यांस म्हटलें, ' आतां तुम्ही म्हणाल कीं, मीं त्या मोहोरा कोंड्याच्या डेऱ्यांत न टेवितां दुसऱ्या एखाद्या ठिकाणीं ठेविल्या असत्या तर असा परिणाम झाला नसता. पण वास्तविक म्हणाल तर त्यांत माझी बिलकुल चूक नाहीं, कारण तो डेरा कित्येक वर्षें त्याच ठिकाणीं होता, व माझ्या बायकोनें शेंकडों वेळां त्यांतला कोंडा विकला, पण तिनें डेरा कधींही दिला नाहीं. असें असतां त्याच दिवशीं मी घरीं नसतां तो साबणवाला येईल, आणि माझ्या बायकोजवळ पैसे नसल्याकारणानें ती डेऱ्यासुद्धां कोंडा

त्याला देईल असें कांहीं मला स्वप्न पडलें होतें ? तुम्ही कदाचित् म्हणाल कीं, मीं आपल्या बायकोला त्यांत मोहोरांची पुरचुंडी ठेविली आहे म्हणून सांगायला पाहिजे होतें. पण मला खचीत वाटतें कीं, तुम्हांसारख्या सुज्ञ गृहस्थांनीं अशी मसलत मला कधींही दिली नसती. आतां दुसऱ्या ठिकाणीं जरी मी त्या मोहोरा ठेविल्या असत्या, तरी पण त्या सुरक्षित रहात्याच याचा काय भरंवसा होता ? '

नंतर सादीला उद्देशून मीं म्हटलें, 'महाराज, परमेश्वराची लीला अगाध आहे. तिचा कोणालाही अंत लागावयाचा नाहीं. त्याचाच संकल्प असा दिसतो कीं, तुमच्या औदार्याचा मला उपयोग होऊं नये, व मी जन्मभर असेंच दारिद्य भोगीत रहावें. पण यद्यापि तुमच्या कृपेचें फळ जरी मला प्राप्त झालें नाहीं, तथापि तें झालें असतें तर जे तुमचे उपकार मजवर झाले असते, त्यांहून हल्लीं म्हणजे कांहीं कमी झाले आहेत असें मी मुळींच समजत नाहीं ! '

इतकें बोलून मी उगाच राहिलों. तेव्हां सादी मला म्हणाला, 'हसनभाई, तुम्ही जें कांहीं म्हणतां तें सर्व खरें असून, तुम्ही अव्यवस्थितपणानें वागून किंवा दुर्व्यसनाच्या नादीं लागून आपला पैसा खर्चून टाकिला नाहीं असें जरी मला वाटतें, तरी पण मला कांहीं मागचा पुढचा विचार पाहिला पाहिजे. केवळ अनुभव पाहण्याकरितां मी अशा दोनदोनशें मोहोरा जर तुम्हांला नेहमीं देत गेलों, तर मला भिकेची पाळी येणार आहे ! आतां तुम्हांला तुमच्या कल्याणाकरतां म्हणून ज्या चारशें मोहोरा मीं दिल्या, त्याबद्दल मला यत्किंचितही वाईट वाटत नाहीं. त्या मीं तुम्हांला केवळ धर्मार्थ दिल्या. त्यापासून मला स्वतःला म्हणजे कांहीं फायदा व्हावा अशी मला मुळींच इच्छा नव्हती. माझी इच्छा तुमचें कल्याण व्हावें एवढीच काय ती होती. मीं हा पैसा तुम्हाला न देतां दुसऱ्या एखाद्याला दिला नाहीं एवढ्याचेंच मला अंमळ वाईट वाटतें; कारण त्याला कदाचित् तुमच्याहून जास्त चांगला याचा उपयोग करितां आला असता ! ' नंतर तो

आपल्या मित्राकडे वळून म्हणाला,' भाई, मी जें कांहीं आतां बोललों यावरून तुमच्या लक्षांत आलेंच असेल कीं, मीं म्हणजे आपला पक्ष अजीबात सोडून दिला असें नाहीं. पण आतां तुम्ही एकदां आपल्या म्हणण्याप्रमाणें करा आणि गरीब मनुष्याला पैसा न देतां अन्य मार्गानें श्रीमंत करितां येईल हें माझ्या प्रतीतीस आणून द्या. हे हसनभाईच कां घ्याना ? यांना तुम्ही पैशाखेरीज वाटेल तें द्या. त्याचा उपयोग त्या चारशें मोहोरांपेक्षां जर अधिक होईल तर माझें नांव बदलून ठेवा !' साद ह्यानें ऐकून घेतलें, आणि तेथेंच एक शिशाचा तुकडा पडलेला होता तो त्यानें घेऊन सादी ह्यास दाखविला, आणि म्हटलें, ' हा शिशाचा तुकडा मी जमिनीवरचा उचललेला तुम्हीं पाहिलाच आहे. हाच पहा मी हसनभाईस देतों; आणि त्यापासून काय चमत्कार होतो तो तुमच्या दृष्टीस पडेल.

हें ऐकून सादी पोट धरधरून हंसला आणि त्यानें साद ह्याची फार थट्टा केली. तो म्हणाला, ' या शिशाच्या तुकड्याची काय बरें किंमत असेल ? एक पैसा तरी असेल काय ? हा घेऊन हसनभाई काय करणार कोण जाणे ! '

नंतर साद ह्यानें तो शिशाचा तुकडा मला दिला; आणि तो म्हणाला, ' हसनभाई, ह्यांना हंसूं द्या पोटभर; तुम्ही हा आपला घ्याच. याच्या योगानेंच कधीं तरी तुमचें दैव उघडून तुम्ही आम्हाला ती आनंदाची खबर कळवाल अशी मला पक्की खात्री आहे.' मला वाटलें कीं, साद हा केवळ हें गमतीखातर बोलत आहे, व माझी थट्टा करीत आहे. तथापि, मीं तो शिशाचा तुकडा घेतला आणि त्याबद्दल सादीचे आभार मानले. हें झाल्यावर ते दोघे निघून चालते झाले. आणि मीं इकडे आपल्या कामाला लागलों.

रात्रीं निजावयाचे वेळीं जेव्हां मीं आपल्या अंगांतली बंडी काढिली तेव्हां तिच्या खिशांत तो शिशाचा तुकडा मीं ठेविला होता तो पडला. तो साद ह्यानें मला दिल्यापासून हा वेळपर्यंत त्याची मला मुळींच आठवण देखील नव्हती. असो; तो मीं उच-

लला, आणि सहज जागा सांपडली तेथें ठेवून दिला. त्याच रात्रीं असें झालें कीं, आमच्या आळींत एक कोळी रहात होता. तो आपलें जाळें नीट करीत असतां त्याला शिशाच्या तुकड्याची गरज लागली. त्या वेळीं रात्र बरीच झाली असल्याकारणानें सर्व दुकानें वगैरे बंद झालेलीं होतीं, यामुळें तो विकत घेण्याला मार्ग नव्हता; आणि त्याला तर पहांटेच्या प्रहररात्रीं मासे धरावयाला जावयाचें होतें; कारण, तसें न झाल्यास त्याच्या पोराबाळांना दुसरे दिवशीं उपाशी मरायाची पाळी येणार होती ! तेव्हां आतां पुढें कसें करावें अशी त्याला मोठी चिंता पडली. मग ‘ आसपास कोठें शोध करून पहा ’ असें त्यानें आपल्या बायकोस सांगितलें. ती आळीं-तील बहुतेक सर्व घरें हिंडली, पण तिला शिशाचा तुकडा कोठेंही मिळाला नाहीं. ती र र करीत तशीच परत आली. तिच्या नव-ऱ्यानें आळींतल्या प्रत्येक घराचें नांव घेऊन तिला विचारतां विचा-रतां, ‘ हसन अल्हाबल याच्या घरीं गेली होतीस का ? ’ म्हणून विचारलें. त्यावर तिनें उत्तर केलें, ‘ त्याच्या येथें मी कांहीं गेलें नाहीं. त्याचें घर पडलें लांब; इतक्या उपर मी गेलेंही असतें, पण तेथें जाऊन उपयोग काय ? त्याच्या घरीं कधीं कांहीं मागावयाला गेलें आणि तें मिळालें आहे असें मला मुळींच आठवत नाहीं. ’ कोळ्यानें उत्तर केलें, ‘ तुला काय ! त्याच्या घरीं तूं जा तर खरी ! मग नाहीं काम झालें तर नाहीं ! तुला बोलायाला मात्र पाहिजे पुष्कळ, अंगाला झीज द्यावयाला नको ! तुझें शंभर वेळां काम झालेलें नसलें म्हणून या वेळेस होणार नाहीं असें कशावरून ? जा तर आतां, उगीच वेळ घालवूं नको. ’

कोळ्याची बायको रागानें चरफडत व बडबड करीत निघाली, ती माझ्या दारापाशीं आली. त्या वेळीं मला गाढ झोंप लागली होती. तिला ओरडवलें तितकें मोठ्यानें ओरडून ती म्हणाली, ‘ हसनभाई, एक शिशाचा तुकडा पाहिजे आहे; तुमच्यापाशीं असला तर आमच्या घरधन्यांनीं मागितला आहे. ’

साद ह्यानें दिलेल्या शिशाच्या तुकड्याचा मला अर्थातच विसर पडला नव्हता; कारण, तो माझ्या खिशांतून पडला व मीं एकीकडे ठेवून दिला, या गोष्टीस फारसा वेळ होऊन गेलेला नव्हता. तेव्हां मीं त्या कोळ्याच्या बायकोस उत्तर दिलें, ' बाई, मजपाशीं एक तुकडा आहे. तूं अंमळ उभी रहा. इतक्यांत ती ( माझी बायको ) तुला आणून देईल. ' इकडे, माझी बायकोही त्या बाईच्या हांकेसरशी जागी झाली होती. ती उठली, आणि मीं तिला खूण सांगितली. तेथें तिनें चांचपून पाहतांच तो तुकडा तिच्या हातास लागला. तिनें दार उघडलें, आणि तो त्या बाईच्या हवालीं केला.

तो शिशाचा तुकडा पाहतांच कोळ्याच्या बायकोला फारच आनंद झाला. ती माझ्या बायकोस म्हणाली, ' तुम्ही आज आमचें फार मोठें काम केलें, याकरितां आमच्या घरधन्यांना उद्यां पहिल्या खेपेस जाळ्यांत जेवढे मासे सांपडतील तेवढे सगळे तुमचे बरें. '

कोळ्याला तरी शिशाचा तुकडा मिळण्याचा बहुतेक वानवाच दिसत होता. पण त्याच्या बायकोनें तो आणलासें पाहून त्याला मोठा हर्ष झाला; व तिनें माझ्या बायकोस जें वचन दिलें होतें तें त्याला फार मानवलें. त्यानें आपलें जाळें नीट केलें, आणि आपल्या नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें तो पहांटेच्या प्रहररात्रीं मासे धरायास निघून गेला. पहिल्या खेपेस त्याला एकच मासा सांपडला, पण तो दोनअडीच हात लांब असून त्याचप्रमाणें जाड होता. नंतर त्याला पुष्कळ मासे सांपडत गेले. पण त्यांत पहिल्यासारखा एकही नव्हता.

त्या कोळ्याचें मासे धरणें आटोपल्यावर तो घरीं गेला. घरीं गेल्याबरोबर प्रथम त्यानें माझा हिस्सा एकीकडे काढिला आणि लागलीच तो मजकडे घेऊन आला. त्या वेळीं मी आपलें काम करीत बसलों होतों. तो येवढा थोरला मासा घेऊन आला हें पाहून मला मोठें आश्चर्य वाटलें. तो मला म्हणाला, ' हसनभाई, काल

आमच्या कारभारणीनें तुम्हांला वचन दिलें होतें कीं, पहिल्या खेपेस माझ्या जाळ्यांत आज जेवढे मासे येतील तेवढे सगळे तुमचे. ती तिची गोष्ट मला फार मानवली. पण काय करूं ? ईश्वराच्या मनांत तुम्हांला एकच मासा मिळावा असें होतें ! कारण, पहिल्या खेपेस मला हा एवढा एकच सांपडला; तो हा आणिला आहे. तुम्ही घ्यावा अशी माझी विनंती आहे. तुमच्या नशिबानें सगळें जाळ्याचें जाळें भरून आलें असतें तरी मीं तितके मासे मोठ्या खुषीनें तुम्हांला दिले असते ! '

मीं उत्तर केलें, ' अहो, शिशाचा तुकडा तो काय ? दीड दमडीचा जिन्नस ! आणि त्याच्याबद्दल तुम्ही मला एवढा मासा देणार ! छिः तो घेणें मला प्रशस्त दिसत नाहीं. अहो, शेजाऱ्याशेजाऱ्यांनीं एकमेकांचें इतकेसें काम केलें म्हणून लागलाच त्याचा मोबदला घ्यावा कीं काय ? मला कांहीं एखाद्या वस्तूची गरज लागली असती तर तुम्हीं ज्याप्रमाणें माझें काम केलें असतें त्याप्रमाणेंच मींही तुमचें केलें ! त्यांत अधिक तें काय केलें ! आतां, तुम्ही हा मासा बुद्ध्या एवढा आणलाच आहे त्या अर्थी मी तो घेतों, नाहीं म्हणत नाहीं; पण तो तुम्ही मला केवळ मेहेरबानगीखातर देतां असें समजून मी घेतों. शिवाय, न घेतला तर तुम्हांला राग येईल, म्हणून मला नाहीं म्हणवत नाहीं. ' इतकें झाल्यावर तो कोळी मजपुढें मासा ठेवून आपल्या घरीं चालता झाला.

नंतर मीं तो मासा घरांत घेऊन गेलों, आणि आपल्या बायकोजवळ दिला. मीं तिला म्हटलें,'काल रात्रीं आपण त्या कोळ्याला जो शिशाचा तुकडा दिला, त्याबद्दल त्यानें आपणांला हा मासा आणून दिला आहे. काल साद यानें तो तुकडा मला देतेवेळीं म्हटलें होतें कीं, यापासूनच कधीं तरी तुझें नशीब उघडेल, त्यांतला अर्थ हा एवढाच घ्यावयाचा, आणखी काय ? ' नंतर साद व सादी या उभयतांमध्यें त्या प्रसंगीं जें भाषण झालें होतें, तें सर्व मीं तिला सांगितलें.

तो एवढा मोठा मासा पाहून माझी बायको घोंटाळ्यांत पडून गेली. ती मला म्हणाली, ‘ मी याला करूं काय ? हा शिजविण्या-जोगें मोठें भांडें तर आपल्या घरीं मुळींच नाहीं.’ मीं तिला म्हटलें, ‘ तूं आपलें हवें तसें कर. आपल्याला तें समजत नाहीं. आपण आपले खायाचे धनी. ’ असें म्हणून मी आपल्या कामास लागलें.

माझी बायको तो मासा कापीत असतां, तिला त्याच्या पोटांत एक मोठा हिरा सांपडला. तो तिनें धुतला, तेव्हां हा कांचेचा तुकडा आहे असें ती समजली. तिला हिरा कसा असतो हें फक्त ऐकूनच माहीत होतें; व यदाकदाचित् तिनें एखादा हिरा प्रत्यक्ष पाहिलेला अगर हातांत घेतलेला असला तरी हा हिरा आहे अशी परीक्षा करण्याइतकी तिला त्यासंबंधाची माहिती असण्याचा संभव नव्हता. तिनें तो तान्ह्या मुलाला खेळायाला दिला. त्याच्या हातून तो दुसऱ्या मुलांनीं पाळीपाळीनें पहावयास घेतला; आणि त्याची विलक्षण चकाकी व तेज पाहून त्यांना मोठें कौतुक वाटलें.

रात्रीं घरांत दिवा लागल्यावरही मुलांचा तो खेळ चाललाच होता. इतक्यांत माझी बायको पानें वाढायाला लागली असतां ती दिव्याच्या आड झाल्यामुळें मुलें खेळत होतीं तेथें अंधेर पडला, त्यामुळें त्या हिऱ्याचें तेज अधिक फांकलें; त्यावरून प्रत्येक मूल तो स्वतः हाता-वर घेऊन त्याची गम्मत पाहण्याकरितां हिसकाहिसक करूं लागलें व लहान मुलांना मोठीं मुलें तो फार वेळ हातांत घेऊं देईनात, म्हणून तीं रडूं लागलीं. अशा प्रकारें त्यांनीं एकच गोंगाट करून सोडला. पण मुलांना गम्मत वाटायाला व भांडाभांडी करायाला अगदीं क्षुल्लक गोष्टही पुरते असें आपण नेहमीं पाहतों. त्यावरून ह्यांनीं हा एवढा गलगा कशाकरितां मांडिला आहे ह्याकडे आम्हीं लक्ष दिलें नाहीं. पुढें माझ्या बायकोनें लहान मुलांना जेवूं घातलें, व मोठीं मुलें आमच्याबरोबर जेवायाला बसलीं, तेव्हां ती गडबड बंद झाली.

जेवण झाल्यावर फिरून सगळीं मुलें एकत्र जमलीं आणि पूर्वीप्रमाणें त्यांनीं गोंगाट मांडिला. तेव्हां सर्वांत वडील मुलाला मी बोलाविलें, आणि त्याचें कारण त्यास विचारलें. तो म्हणाला, 'बाबा, एक कांचेचा तुकडा आहे, त्याकरितां हें सर्व चाललें आहे. आपण दिव्याकडे पाठ करून उभें राहिलों, आणि तो समोर धरला म्हणजे त्यांतून उजेड नजरेस पडतो.' मी तो त्याजकडून आणविला, आणि त्या गोष्टीचा स्वतः अनुभव घेऊन पाहिला. त्यावरून मला मोठें आश्चर्य वाटलें. तेव्हां 'हें काय ?' म्हणून मीं वायकोस विचारिलें. ती म्हणाली, 'हा कांचेचा तुकडा आहे. मीं मासा कापला त्या वेळीं त्याच्या पोटांतून हा निघाला.'

माझ्या बायकोप्रमाणेंच मलाही वाटलें कीं हा कांचेचाच तुकडा असावा, दुसरें कांहीं नाहीं. तथापि मीं त्याची जरा आणखी चिकित्सा करून पाहिली. मी बायकोला सांगितलें कीं, 'तूं दिवा कोनाड्यांत ठेव, आणि त्याला कांहीं आड लाव.' तिनें त्याप्रमाणें केलें, तों त्या कांचेच्या तुकड्याचा म्हणजे हिऱ्याचा एवढा मोठा उजेड पडला कीं, आतां निजायाच्या वेळेपर्यंत दिवा मालवून टाकला तरी चालणार आहे असें मला वाटलें. त्यावरून मीं बायकोला दिवा मालविण्यास सांगितलें, आणि त्याच्या जागीं तो हिरा नेऊन ठेविला. मग मी तिला म्हटलें, 'पहा, साद यानें दिलेल्या शिशाच्या तुकड्यापासून आणखी एक फायदा झाला. तो कसा तर, यापुढें आपणाला दिव्याकरितां तेल विकत घ्यावयास नको !'

मुलांनीं जेव्हां पाहिलें कीं, दिवा मालविला असून त्याच्या जागीं कांचेचा तुकडा ठेविला आहे, व त्याचा हा उजेड पडला आहे, तेव्हां त्यांना तो मोठा विलक्षण चमत्कार वाटला; आणि त्यांनीं त्या आनंदाच्या भरांत ओरडण्याचा इतका सपाटा लावला कीं, त्याच्या योगानें आळी दणाणून गेली. त्याला गप्प करण्याकारितां आम्ही दोघे रागें भरूं लागलों. त्याच्या योगानें आणखी जास्तच गलबला झाला. शेवटीं जेव्हां त्यांना

आम्हीं थापटूनथोपटून आंथरुणावर निजविलें, तेव्हां तीं एकदांचीं गप्प झालीं; व कांचेच्या तुकड्याचा उजेड पडला ह्या चमत्काराविषयीं त्यांच्याच रीतीनें त्यांच्याशीं मी बोलत बसलों, तेव्हां हळूंहळूं त्यांना झोंप लागली. त्यांना झोंप लागल्यावर आम्ही दोघे त्यांच्या शेजारीं जाऊन पडलों. सकाळीं उठल्यावर मी त्या गोष्टीचा जास्त कांहीं विचार न करितां नेहमींप्रमाणें आपल्या कामाला लागलों. याचें कांहीं आश्चर्य वाटायाला नको; कारण, मीं हिरा कधीं पाहिलेला नव्हता, व कदाचित् कधीं काळीं पाहिलेलाही असला तरी हा हिराच आहे अशी परीक्षा करण्याचें ज्ञान मला कोठून असणार ?

आतां पुढील हकीकतीला सुरवात करण्यापूर्वीं मला प्रथम हें सांगितलें पाहिजे कीं, माझ्या घराला लागूनच एका यहुदी व्यापाऱ्याचें घर होतें. तो मोठा श्रीमंत असून त्याचा जवाहिराचा व्यापार होता. त्याच्या व माझ्या घराच्यामध्यें एक भिंत मात्र होती. त्याची निजावयाची खोली होती ती ह्या भिंतीच्या पलीकडेच होती; म्हणजे ही भिंत आणि त्याच्या खोलीची भिंत एकच होती. आदले दिवशीं रात्रीं आमच्या पोरांनीं जेव्हां मोठा कलकलाट केला, तेव्हां तीं नवराबायको निजलीं होतीं, त्यांची झोंप त्या कलकलाटामुळें मोडली व त्यांना मग पुष्कळ वेळपर्यंत झोंप आली नाहीं.

तेव्हां सकाळीं त्या व्यापाऱ्याची बायको माझ्या घरीं आली, आणि माझ्या बायकोला म्हणूं लागली, ‘ अग बाई, रात्रीं तुमच्या येथें कसला तरी एवढा मोठा गलबला चालला होता ? त्याच्या योगानें आमची झोंप मोडून आम्हांला फार त्रास झाला. ’ माझ्या बायकोनें उत्तर केलें, ‘ बाई, तुम्ही म्हणतां तसें झालें खरें. पण कृपा करून रागें भरूं नका. हें सगळें या पोरांचें काम. यांनीं काल असा कांहीं उच्छेद मांडला होता कीं आमचा दोघांचाही त्यांच्यापुढें अगदीं उपाय हरला ! त्यांना रडायला आणि हंसायला

जेवण झाल्यावर फिरून सगळीं मुलें एकत्र जमलीं आणि पूर्वीप्रमाणें त्यांनीं गोंगाट मांडिला. तेव्हां सर्वांत वडील मुलाला मीं बोलाविलें, आणि त्याचें कारण त्यास विचारलें. तो म्हणाला, 'बाबा, एक कांचेचा तुकडा आहे, त्याकरितां हें सर्व चाललें आहे. आपण दिव्याकडे पाठ करून उभें राहिलों, आणि तो समोर धरला म्हणजे त्यांतून उजेड नजरेस पडतो.' मी तो त्याजकडून आणविला, आणि त्या गोष्टीचा स्वत: अनुभव घेऊन पाहिला. त्यावरून मला मोठें आश्चर्य वाटलें. तेव्हां 'हें काय ?' म्हणून मीं बायकोस विचारिलें. ती म्हणाली, 'हा कांचेचा तुकडा आहे. मीं मासा कापला त्या वेळीं त्याच्या पोटांतून हा निघाला.'

माझ्या बायकोप्रमाणेंच मलाही वाटलें कीं हा कांचेचाच तुकडा असावा, दुसरें कांहीं नाहीं. तथापि मीं त्याची जरा आणखी चिकित्सा करून पाहिली. मी बायकोला सांगितलें कीं, 'तूं दिवा कोनाड्यांत ठेव, आणि त्याला कांहीं आड लाव.' तिनें त्याप्रमाणें केलें, तों त्या कांचेच्या तुकड्याचा म्हणजे हिऱ्याचा एवढा मोठा उजेड पडला कीं, आतां निजायाच्या वेळेपर्यंत दिवा मालवून टाकला तरी चालणार आहे असें मला वाटलें. त्यावरून मीं बायकोला दिवा मालविण्यास सांगितलें, आणि त्याच्या जागीं तो हिरा नेऊन ठेविला. मग मी तिला म्हटलें, 'पहा, साद यानें दिलेल्या शिशाच्या तुकड्यापासून आणखी एक फायदा झाला. तो कसा तर, यापुढें आपणाला दिव्याकरितां तेल विकत घ्यावयास नको !'

मुलांनीं जेव्हां पाहिलें कीं, दिवा मालविला असून त्याच्या जागीं कांचेचा तुकडा ठेविला आहे, व त्याचा हा उजेड पडला आहे, तेव्हां त्यांना तो मोठा विलक्षण चमत्कार वाटला; आणि त्यांनीं त्या आनंदाच्या भरांत ओरडण्याचा इतका सपाटा लावला कीं, त्याच्या योगानें आळी दणाणून गेली. त्याला गप्प करण्याकारितां आम्ही दोघे रागें भरूं लागलों. त्याच्या योगानें आणखी जास्तच गलबला झाला. शेवटीं जेव्हां त्यांना

आम्हीं थापटूनथोपटून आंथरुणावर निजविलें, तेव्हां तीं एकदांचीं गप्प झालीं; व कांचेच्या तुकड्याचा उजेड पडला ह्या चमत्काराविषयीं त्यांच्याच रीतीनें त्यांच्याशीं मी बोलत बसलों, तेव्हां हळूंहळूं त्यांना झोंप लागली. त्यांना झोंप लागल्यावर आम्ही दोघे त्यांच्या शेजारीं जाऊन पडलों. सकाळीं उठल्यावर मी त्या गोष्टीचा जास्त कांहीं विचार न करितां नेहमींप्रमाणें आपल्या कामाला लागलों. याचें कांहीं आश्चर्य वाटायाला नको; कारण, मीं हिरा कधीं पाहिलेला नव्हता, व कदाचित् कधीं काळीं पाहिलेलाही असला तरी हा हिराच आहे अशी परीक्षा करण्याचें ज्ञान मला कोठून असणार ?

आतां पुढील हकीकतीला सुरवात करण्यापूर्वीं मला प्रथम हें सांगितलें पाहिजे कीं, माझ्या घराला लागूनच एका यहुदी व्यापाऱ्याचें घर होतें. तो मोठा श्रीमंत असून त्याचा जवाहिराचा व्यापार होता. त्याच्या व माझ्या घराच्यामध्यें एक भिंत मात्र होती.त्याची निजावयाची खोली होती ती ह्या भिंतीच्या पलीकडेच होती;म्हणजे ही भिंत आणि त्याच्या खोलीची भिंत एकच होती. आदले दिवशीं रात्रीं आमच्या पोरांनीं जेव्हां मोठा कलकलाट केला, तेव्हां तीं नवराबायको निजलीं होतीं, त्यांची झोंप त्या कलकलाटामुळें मोडली व त्यांना मग पुष्कळ वेळपर्यंत झोंप आली नाहीं.

तेव्हां सकाळीं त्या व्यापाऱ्याची बायको माझ्या घरीं आली, आणि माझ्या बायकोला म्हणूं लागली, ‘ अग बाई, रात्रीं तुमच्या येथें कसला तरी एवढा मोठा गलबला चालला होता ? त्याच्या योगानें आमची झोंप मोडून आम्हांला फार त्रास झाला. ’ माझ्या बायकोनें उत्तर केलें, ‘ बाई, तुम्ही म्हणतां तसें झालें खरें. पण कृपा करून रागें भरूं नका. हें सगळें या पोरांचें काम. यांनीं काल असा कांहीं उच्छेद मांडला होता कीं आमचा दोघांचाही त्याच्यापुढें अगदीं उपाय हरला ! त्यांना रडायला आणि हंसायला

कांहीं मोठेंसें कारण लागत नाहीं! चला आंत, त्यांनीं कशाकरितां घर एवढें डोक्यावर घेतलें होतें तें मी तुम्हांला सांगतें.'

त्या यहुदिणीला माझ्या बायकोनें घरांत नेलें, आणि तो हिरा तिच्या हातांत दिला. ती तिला म्हणाली, 'पाहिलेंत ना? ह्या कांचेच्या तुकडयाकरितांच ह्या पोरांनीं काल एवढें अगदीं नकोनकोसें करून सोडिलें होतें!' त्या यहुदिणीस हिरे, माणकें वगैरेंची परीक्षा चांगली होती. तिनें तत्काळ तो हिरा म्हणून ओळखिला, व त्याचें तें विलक्षण तेज पाहून तिला मोठें आश्चर्य वाटलें. ती तो वरखालीं करून असतां माझ्या बायकोनें तो कसा, कोठें सांपडला वगैरे सर्व हकीकत तिला सांगितली.

त्या यहुदिणीनें तो हिरा परत माझ्या बायकोच्या हातांत दिला, आणि ती म्हणाली, 'खरेंच गडे, तुझ्याप्रमाणें मलाही वाटतें कीं, कांचेचाच तुकडा आहे; दुसरें कांहीं नाहीं; पण साधारण कांचेपेक्षां याच्यांत तेज अधिक आहे. माझ्या येथें अगदीं ह्याच्यासारखा दुसरा एक कांचेचा तुकडा आहे, त्याची आणि ह्याची जोडी छान दिसेल. तर तूं हा विकीत असलीस तर मी घेतें.'

आपली खेळाची जिन्नस विकण्याचें बोलणें चाललें आहे असें ऐकून, माझ्या मुलांनीं लागलाच रडून गोंधळ केला, व 'आई, तूं विकूं नको; आम्हांला खेळायाला असूं दे.' अशी ती माझ्या बायकोची विनवणी करूं लागलीं. तिनें त्यांची समजूत करण्याकरितां, 'मी नाहीं विकीत' असें त्यांना सांगितलें.

ह्याप्रमाणें त्या मुलांच्या योगानें त्या यहुदिणीचा सवदा त्या वेळीं जमला नाहीं; व ती तशीच चालती झाली. माझी बायको तिला दारापर्यंत पोहोंचवावयास गेली. तिला यहुदिणीनें जातांना हळूंच सांगितलें कीं, 'तुला जर तो विकावयाचा असला तर मला कळविल्याखेरीज कोणाला दाखवूं नको.'

त्या यहुदिणीचा नवरा सकाळींच उठून जवाहिराच्या बाजारांत त्याचें दुकान होतें तेथें गेला होता. त्याची बायको माझ्या येथून

गेल्यावर लागलीच दुकानीं गेली, आणि तिनें हिऱ्याचा सर्व वृत्तांत नवऱ्यास सांगितला. त्याचा आकार व वजन किती असावें हें तिनें अजमासानें त्यास सांगितलें; व त्याचें सौंदर्य, पाणी आणि तेज यांची तिनें मोठी तारीफ केली. मग ती त्यास म्हणाली, 'पण रात्रीं त्याचा प्रकाश पडला होता हा त्याच्या अंगचा गुण सर्वांत विशेष तारीफ करण्यासारखा आहे, व या गोष्टीच्या खरेपणाविषयीं कांहीं शंकाच नको; कां कीं,हसन याच्या बायकोला त्याची परीक्षाच झाली नाहीं, तेव्हां ती खोटें कशाला सांगेल ?'

यहुदिणीच्या नवऱ्यानें हें सर्व ऐकून घेऊन बायकोस सांगितलें कीं, 'तूं आतांच्या आतां जा आणि तो हिरा हस्तगत करण्याच्या कामास लाग. पाहिल्यानें हसन याच्या बायकोला दहावीस मोहोरां-पर्यंत म्हणून पहा;मग तिचा रागरंग दिसेल त्याप्रमाणें आणखी जास्त वाढीव; पण कसेंही करून तो हातचा जाऊं देऊं नको; मग त्याबद्दल जें काय पडेल तें पडो.' हें नवऱ्याचें भाषण ऐकून ती बाई परत माझ्या घरीं आली, आणि हिरा विकण्याविषयीं माझ्या बायकोचा निश्चय झाला आहे कीं नाहीं याविषयीं तिनें तिला विचारपूस न करितां एकदम म्हटलें, 'काय बाई, मघांचा तो कांचेचा तुकडा वीस मोहोरांना तूं देतेस का ?'

माझ्या बायकोला वाटलें कीं, एवढ्याशा ह्या कांचेची वीस मोहोरा किंमत म्हणजे थोडीथोडकी नाहीं.तथापि तिनें तिला सांगि-तलें कीं, 'मी तुम्हांला इतक्यांत कांहींच सांगत नाहीं; घरधन्यांना विचारीन आणि मग काय तें सांगेन.' इतक्यांत जेवणाची वेळ झाली, सबब मी आपलें काम बंद करून जेवायाला घरांत जाऊं लागलों. त्या दोघीजणी दारामध्यें बोलत उभ्या होत्या. माझ्या बायकोनें मला म्हटलें, 'ऐकलें कां, त्या माशाच्या पोटांत सांपड-लेल्या कांचेच्या तुकड्याबद्दल ह्या बाई वीस मोहोरा देत आहेत, तुमची द्यावयाची खुषी आहे कां ?' मीं तिला कांहींच उत्तर केलें नाहीं. मी मनांत विचार केला कीं, 'हा कांहीं खचीत कांचेचा

तुकडा नाहीं. हा हिरा आहे. कांचेच्या तुकड्याला ही वीस मोहोरा कशाला द्यायला जाईल ? ' नंतर साद हा तो शिशाचा तुकडा मला देतांना जें म्हणाला होता कीं, यापासून तुझें नशीब कधीं तरी उघडेल त्या गोष्टीची मला आठवण होऊन मीं मनांत म्हटलें, 'खचीत; साद याचा बोल खरा करण्याकरितां ईश्वरानें मला हा हिरा पाठवून दिला असावा. ' असो; मीं कांहींच उत्तर देत नाहीं असें पाहून त्या यहुदिणीला वाटलें कीं, आपण किंमत थोडी म्हटली म्हणून याला राग येऊन हा उत्तर देत नाहीं. त्यावरून तिनें मला म्हटलें, ' पन्नास देतें, मग तर झालें ना ? '

तिनें एकदम विसांच्या पन्नास मोहोरा केल्या असें पाहून मीं तिला म्हटलें, ' बाई, तुम्हांला का वेड लागलें आहे ? वीस आणि पन्नास मोहोरा तुम्ही कशाला घेऊन बसलां ? ह्याची किंमत ह्याहून फार जास्ती आहे. ' तिनें उत्तर केलें, ' बरें, शंभर द्या. यापरतें तर तुमचें म्हणणें नाहीं ना ? पण अबब ! शंभर मोहोरा म्हणजे फारच झाल्या ! इतक्या कबूल केल्याबद्दल मला घरधनी काय म्हणतील कोण जाणें ! ' तिनें शंभर मोहोरांपर्यंत किंमत चढविली असें पाहून मीं तिला सांगितलें, ' अहो, तें कांहीं नाहीं, तुम्हांला मी एकच सांगतों कीं, ह्या हिऱ्याची किंमत तुम्हांला एक लक्ष मोहोरांहून कमी पडणार नाहीं. ह्याची वास्तविक किंमत ह्याहून पुष्कळच अधिक आहे. पण तुमचा आमचा घरोबा, याकरितां तुमचें मन न मोडावें म्हणून मी इतकी कमी घेणार; ह्यांत कमी होणार नाहीं; पहा, तुमची मर्जी नसेल तर तसें सांगा, म्हणजे दुसऱ्या व्यापाऱ्यांना मी तो देईन. त्यांत माझा पुष्कळ फायदा आहे. '

हा सवदा कसा तरी जमवावाच अशी त्या यहुदिणीची मोठी उत्सुकता दिसली, व तिनें त्या हिऱ्याची किंमत चढवितां चढवितां पन्नास हजार मोहोरांपर्यंत चढविली. त्यावरून एक लक्ष मोहोरा घेण्याचा माझा निश्चय कायम झाला, आणि मीं तिला

सांगितलें कीं, ‘ तुम्ही आतां कांहींएक बोलूं नका. एक लक्ष मोहोरांहून कमी किंमत पडण्याची वार्ता देखील मनांत आणूं नका!’ तिनें उत्तर केलें, ‘ आतां ह्याहून जास्त किंमत घरधन्यांच्या विचारावांचून मला चढवितां येत नाहीं. ते रात्रीं घरीं येतील, व तुमच्यापाशीं बोलतील, तेथपर्यंत कृपा करून थांबा. ’ तें मीं कबूल केलें.

रात्रीं तो यहुदी व्यापारी घरीं आला, तेव्हां त्याच्या बायकोनें झालेलें सर्व वर्तमान त्यास सांगितलें. ती म्हणाली, ‘ पन्नास हजार मोहोरांपर्यंत मीं बोलून पाहिलें, पण तो ऐकेना. तेव्हां रात्र होईपर्यंत कसेंही करून थांब, असें मीं त्याला सांगून आलें आहें. ’ त्यानें तें ऐकून घेतलें, आणि माझी आटपण्याची वेळ झाली असें पाहून तो मजकडे आला. तो म्हणाला, ‘ हसनभाई, तुमच्या बायकोनें आमच्या कुटुंबाला जो हिरा दाखविला, तेवढा मला एकदां दाखवा बरें ? ’ ते ऐकून मीं त्याला घरांत नेलें आणि हिरा दाखविला. त्या वेळीं अंधार पडला असून माझे घरांत दिवा लावलेला नव्हता, तेव्हां त्या हिऱ्याचा चोहोंकडे पडलेला लखलखीत उजेड, व माझ्या हातावर फांकत असलेलें त्याचें विलक्षण तेज हीं पाहून, त्याच्या बायकोनें त्याविषयीं जी वाखाणणी त्याजपाशीं केली होती, तीप्रमाणेंच खरोखरीच तो आहे अशी त्याची खात्री झाली. तो पुष्कळ वेळपर्यंत त्याजकडे एकसारखा तटस्थ पहात व आश्चर्य करीत राहिला.

नंतर तो मला म्हणाला, ‘ हसनभाई, ह्या हिऱ्याची किंमत तुम्हाला पन्नास हजार मोहोरांपर्यंत देण्याचें आमच्या कुटुंबानें कबूल केलेंच आहे. मी तुम्हाला आणखी वीस हजार मोहोरा देतों; मग तर तुमची कांहीं तक्रार नाहींना ? ’ मीं म्हटलें, ‘ शेठजी, मी ह्या हिऱ्याची किंमत एक लक्ष मोहोरांहून कमी येणार नाहीं असें तुमच्या कुटुंबापाशीं बोलला आहे, तें त्यांनीं तुम्हाला सांगितलेंच असेल; तर तेवढी रक्कम देण्याचें तुम्हाला पत्करत असेल, तर ठीक आहे; नाहींपेक्षां माझा हिरा आपला पडून राहील ! ”

मीं कांहीं तरी कमी किंमत करावी म्हणून त्यानें पुष्कळ चिकटपणा केला. पण मी बधत नाहीं असें पाहून, सवदा हातचा जाऊं नये म्हणून शेवटीं त्यानें माझें म्हणणें कबूल केलें. तो म्हणाला, ' आज सगळी रक्कम माझ्यापाशीं नाहीं. पण उद्यां ह्या वेळेपर्यंत कशी तरी मी तुम्हांला ती पुरी करून देईन. ' असें म्हणन त्यानें तत्क्षणीं हजार हजार मोहोरांचीं एकेक अशा दोन थैल्या विसार म्हणून मला आणून दिल्या. दुसरे दिवशीं त्यानें आपल्या इष्टमित्रांपासन पैसा उसना आणिला, किंवा हिरा विकत घेण्याच्या कामांत कोणाला भागीदार केलें, हें कांहीं मला माहीत नाहीं, पण त्या दिवशीं नेमलेल्या वेळीं त्यानें सर्व रकमेची मला भरती करून दिली. तेव्हां मीं तो हिरा त्याच्या स्वाधीन केला.

अशा प्रकारें तो हिरा विकून मी चांगला गबर झालों. मला कांहीं एक आशा नसतां एकाएकीं परमेश्वरानें मला एवढी लक्ष्मी प्राप्त करून दिली. ह्या त्याच्या कृपेबद्दल व औदार्याबद्दल मीं त्याची मनोभावेंकरून स्तुति केली. साद ह्याचें घर जर मला माहीत असतें, तर मीं तत्क्षणीं त्याजकडे जाऊन त्याच्या पायावर लोटांगण घातलें असतें, व त्याचप्रमाणें सादीच्याही घातलें असतें; कारण त्याच्या हेतूप्रमाणें माझें कार्य जरी झालें नाहीं तरी माझें कल्याण होण्यास मूळ कारण तोच झाला होता.

नंतर, आपणाला हें एवढें द्रव्य मिळालें आहे ह्याचा चांगला उपयोग कसा करावा याविषयीं मीं विचार करूं लागलों. बायकांच्या जातीला म्हटलें म्हणजे थाटमाट फार आवडतो, तेव्हां माझ्या बायकोलाही त्याची इच्छा होणें स्वाभाविकच होतें. तिनें लागलीच मुलांना व आपल्याला उंची उंची कपडे व दागिने करण्याविषयीं मला म्हटलें. मीं तिला सांगितलें, ' अग, अशा गोष्टींत प्रथम पैसा खर्च करतां उपयोगी नाहीं, समजलीस, तूं जें काय म्हणतेस, तें सर्व धीरेधीरे होईल. पैसा हा खर्चण्याकरितां केलेला आहे खरा, पण तो अशा प्रकारें खर्चिला पाहिजे कीं, त्यापासून आणखी पैसा

उत्पन्न होऊन त्या उत्पन्नांतून आपला खर्च भागावा. असें केलें म्हणजे मूळ पुंजीला हात न लागून मनुष्याला आपली स्थिति कायम राखण्याला अडचण कधींही पडत नाहीं. तर अशा रीतीनें उद्यांपासून उद्योगास सुरवात करण्याचा माझा बेत आहे.'

नंतर दुसरे दिवशीं मीं आपल्या धंद्याच्या सर्व लोकांकडे गेलों. ते माझ्याप्रमाणेंच अहोरात्र मेहनत करून पोटाला मिळविणारे होते. त्यांना मी आगाऊ पैसे देऊन, ज्याला ज्या प्रकारचे दोर वळण्याचें काम येत होतें त्याला तें करण्याकरितां आपल्या चाकरीस ठेविलें. त्यांना मीं सांगितलें कीं, 'तुम्हांला तुमच्या पैशाकरितां कधीं किरकिर करावी लागणार नाहीं. तुमचें काम झाल्याबरोबर तुम्हांस ते वेळचे वेळीं मी चुकते करीत जाईन.' याप्रमाणें थोडक्याच वेळांत सगळ्या बगदाद् शहरांतला दोरांचा कारखाना माझ्या हातांत आला आणि जो तो माझ्या व्यवस्थितपणाबद्दल व नियमितपणाबद्दल माझी तारीफ करूं लागला.

माझ्या कारखान्यांत पुष्कळ काम करणारे झाल्याकारणानें माझ्या येथें माल अर्थात् पुष्कळ तयार होऊं लागला. तो ठेवण्याकरितां शहरांत ठिकठिकाणीं मीं वखारी विकत घेतल्या. त्यांत माल किती आला, किती गेला वगैरेंचा हिशेब ठेवण्याकरितां मीं प्रत्येक वखारीवर एक एक कारकून ठेविला. अशा व्यवस्थेनें मला पुष्कळ फायदा होऊं लागला, आणि माझें उत्पन्न पुष्कळ वाढलें.

नंतर ह्या सर्व वखारी एकाच ठिकाणीं असल्या तर जास्त सोईचें होईल असा विचार करून, मी एक चांगली ऐसपैस जागा विकत घेतली. त्या जागेवर इमारत होती. पण तिची पडझड झालेली असल्यामुळें ती असूननसून सारखीच होती; सबब मीं ती पाडून टाकून त्या जागीं नवीन इमारत बांधिली. तीच ही माझी हल्लींची हवेली होय. तिचा बाहेरून एवढा डामडौल दिसतो खरा; तथापि तिच्यांत बहुतेक वखारीच असून, आमच्या कुटुंबाच्या सोईकरितां मात्र कोठड्या वगैरे आहेत.

मी आपलें जुनें झोंपडें सोडून देऊन ह्या नव्या हवेलींत राहण्याकरितां आल्यावर, कांहीं दिवसांनीं साद व सादी हे दोघे एके दिवशीं सहज फिरतां फिरतां आमच्या मोहल्ल्यांत आले. त्यांची माझी शेवटीं गांठ पडली, तेव्हांपासून ह्या वेळेपर्यंत त्यांना माझी आठवणही झाली नव्हती. ते आमच्या आळींत आल्याकारणानें एकाएकीं त्यांना माझें स्मरण झालें. आणि माझी खबर घेऊन जावें असा त्यांनीं विचार केला. पण पूर्वी ज्या ज्या वेळीं ते आले त्या त्या वेळीं मी आपला त्यांना काम करीत असलेला दृष्टीस पडावयाचा असें असतां, या वेळीं जेव्हां मी त्यांच्या दृष्टीस पडलों नाहीं, तेव्हां त्यांना मोठें आश्चर्य वाटलें. मग 'हसन याची काय खबर आहे ? तो जिवंत आहे कां मेला ?' अशी त्यांनीं चौकशी केली; तेव्हां लोकांनीं त्यांना सांगितलें कीं, तो हल्लीं मोठा व्यापारी बनला असून त्याला 'हसन' असें नुसतें म्हणत नाहींत, तर "ख्वाजा हसन अल्हाबल" म्हणजे "हसनशेट दोरबंदवाले" असें म्हणतात; व त्यानें ह्या आळींत एक मोठी उमरावाच्या थाटाची हवेली बांधिली आहे. हें ऐकून तर त्यांना जें कांहीं आश्चर्य वाटलें तें सांगतां पुरवत नाहीं !

लोकांनीं माझ्या नव्या घराचा रस्ता त्यांना दाखवून दिल्यावर ते तिकडे यावयास निघाले. ते वाटेनें चालले असतां सादी मनांत म्हणतो, 'साद ह्यानें दिलेल्या त्या शिशाच्या तुकड्याच्या योगानें हसन हा इतका श्रीमंत झाला असावा ही गोष्ट संभवत नाहीं.' मग तो उघडपणें साद ह्यास म्हणाला, 'हसन ह्याचें माझ्या हातून कल्याण झालें हें पाहून मला अत्यानंद झाला आहे. पण माझ्यापासून दोनशेंच्या ठिकाणीं चारशें मोहोरा काढण्याकरितां तो दोन वेळां जें खोटें बोलला तें त्यानें चांगलें केलें नाहीं. कारण, तुम्ही त्याला दिलेल्या शिशाच्या तुकड्याच्या योगानें म्हणजे तो इतका श्रीमंत झाला असेल ही गोष्ट मनांत देखील आणावयास नको. असें मी केवळ म्हणतों असें नाहीं; तुम्ही कोणासही विचारलें तरी तो असेंच सांगेल !'

साद म्हणाला, ' तुम्ही असें म्हणतां, पण माझें मत तुमच्याहून अगदीं निराळें आहे. तुम्ही हसन ह्यावर खोटें बोलण्याचा आरोप कां ठेवितां हें मला समजत नाहीं ! मला तर खचीत वाटतें कीं, त्यानें आपणापाशीं कांहींएक खोटें सांगितलें नसून, त्याची जी एवढी भरभराट झाली आहे त्यास कारण तो शिशाचा तुकडाच आहे, दुसरें कांहीं नाहीं ! पण आतां याबद्दल जास्त वाद करण्याचें कारणच नाहीं, घोडामैदान जवळच आलें आहे ! हसन ह्याच्याच तोंडून ह्याचा काय तो आतां निर्णय लागेल ! '

याप्रमाणें बोलत बोलत ते दोघेजण मी राहतों त्या आळींत आले आणि त्यांनीं माझ्या घराचा शोध केला. तें लोकांनीं त्यांना दाखाविलें, पण तें पाहून हें माझेंच घर असावें अशी त्यांची कांहीं खात्री होईना. त्यांनीं दरवाज्याला थाप दिली, त्यावरून माझ्या देवडीवाल्यानें तो उघडला. सादीनें विचार केला कीं, दरवाज्याच्या आंत शिरण्यापूर्वीं हें घर खरोखर हसन ह्याचेंच आहे अशाबद्दल आणखी चांगली खात्री करून घ्यावी हें बरें; कारण न जाणों, हें त्याचें नसून दुसऱ्या कोणा बड्या गृहस्थाचें असल्यास आपल्यावर असभ्यपणाचा दोष येणार आहे. त्यावरून सादीनें त्या देवडीवाल्यास विचारलें कीं, ' हें घर खोजा हसन अल्हाबल ह्या नांवाच्या गृहस्थाचें आहे असें आम्हांला लोकांनीं सांगितलें, तर हें घर खरेंच त्याचें आहे काय ?' देवडीवाल्यानें उत्तर केलें, 'अहो, हसनभाईचेंच हें घर, आपण कांहींएक शंका मनांत आणूं नका, आंत या. ते दिवाणखान्यांत बसले आहेत, कोणी नौकर तेथें असेल तो आपणांला त्यांजकडे घेऊन जाईल. '

साद व सादी हे दोघे माझ्या दृष्टीस पडतांच तत्काळ मीं त्यांस ओळखिलें; मी लागलाच उठलों, आणि धांवतच त्यांजकडे गेलों. मी त्यांच्या अंगरख्यांच्या पदरांचें चुंबन करणार होतों, पण त्यांनीं मला तसें न करूं देतां मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें. त्या ठिकाणीं चार पुरुषांना बसण्याजोगें एक कोच ठेविलेलें होतें व तेथून माझ्या

बाग दिसत होता. त्या कोचाकडे बोट करून त्यावर वरचे बाजूस बसण्याविषयीं परवानगी असावी, अशी त्यास विनंति केली. पण ते त्याप्रमाणें करीनात. तेव्हां मीं त्यांस म्हटलें, 'महाराज, मीं अगदीं यःकश्चित् गरीब मनुष्य होतों, व आपण मजवर महदुपकार केले हें मी विसरलों नाहीं ! व ती गोष्ट घटकाभर एकीकडे ठेविली तरी, आपली योग्यता किती आहे हें मी समजून आहें; तर माझा आतां अंत पाहूं नये, एवढीच माझी विनंति आहे,' हें ऐकून ते दोघेजण कोचावर वरचे बाजूस बसले, व मीं त्यांच्यासमोर बसलों.

नंतर सादी मला उद्देशून म्हणाला, 'हसनभाई, मी तुम्हाला दोन वेळां दोनदोनशें मोहोरा दिल्या, त्या त्या वेळीं तुमची स्थिति ज्या प्रकारची असावी अशी माझी इच्छा होती, त्याच स्थितींत तुम्हांला आज पाहून मला जो आनंद झाला आहे, त्याचें मला वर्णन देखील करवत नाहीं. त्या पैशाबद्दल मी तुम्हाला हिणवितों असें नाहीं, पण त्या चारशें मोहोरांच्याच योगानें तुमच्या स्थितींत हा एवढा फरक पडला असावा असें मला वाटतें; व त्याबद्दल मला फार संतोष झाला आहे. पण कायहो हसनभाई, तुम्ही दोन वेळां माझ्यापाशीं खरी गोष्ट चोरून आपला पैसा गेला म्हणून जो कांहीं बहाणा सांगितला, त्याचें कारण काय ? वास्तविक विचाराल तर ती गोष्ट मला त्या वेळीं बिलकुल खरी वाटली नाहीं; व अजूनही वाटत नाहीं. खरोखर, ह्या तुमच्या वर्तनाबद्दल मला फार वाईट वाटतें. आम्ही दोघे गेल्या खेपेस तुमच्याकडे आलों होतों, त्या वेळेपर्यंत त्या चारशें मोहोरांच्या योगानें तुम्हाला कांहींच फायदा करून घेतां आला नाहीं म्हणून का तुम्ही आम्हांला कांहीं तरी आपली थाप दिलीत ? मला तर बोवा याखेरीज दुसरें कांहीं दिसत नाहीं ! व मी म्हणतों हें खरें आहे असें तुम्ही कबूल कराल अशी मला खात्री आहे.'

सादी ह्याच्या ह्या बोलण्याचा साद ह्याला राग आला असें जरी म्हणतां येत नाहीं, तरी त्याचें बोलणें चाललें असतां त्याचे कपाळाला

आठ्या होत्या व तो मान हालवीत होता, त्यावरून त्याला तें आवडलें नाहीं हें अगदीं स्पष्ट दिसत होतें;तथापि त्याचें बोलणें संपेपर्यंत त्यानें एक चकार शब्दही तोंडावाटें काढिला नाहीं.त्याचें बोलणें संपल्यानंतर तो त्यास म्हणाला, ' अहो हसनभाई, तुम्हांला उत्तर देण्यापूर्वी मी थोडेंसें बोलतों याबद्दल मला क्षमा करा. ते अप्रामाणिक आहेत असा जो तुमचा समज झाला आहे याबद्दल, व त्यांनीं तुम्हांला आजपर्यंत जें इतकें जीव तोडून सांगितलें तरी त्यावर तुमचा भरं-वसा बसत नाहीं याबद्दल, मला मोठें आश्चर्य वाटतें. मीं तुम्हांला पूर्वीं सांगितलेंच आहे व अजूनही सांगतों कीं, तुम्ही काय वाटेल तें म्हणा; पण त्यांचा पैसा गेल्याबद्दल त्यांनीं जी हकीकत सांगि-तली तिच्या खरेपणाविषयीं मला तिळमात्रही संशय नाहीं. पण इतकें कशाला ? तुमची समजूत खरी का माझी खरी, हें आतां यांच्याच बोलण्यावरून समजेल ! '

याप्रमाणें त्या उभयतांचें बोलणें संपल्यावर मीं त्यांस म्हटलें, ' सद्गृहस्थहो, तुम्हीं जें कांहीं मला विचारितां त्यावर उत्तर करण्याचें माझ्या मनांत नव्हतें; पण मीं तसें केलें तर माझ्या संबं-धानें तुमचा जो वाद चालला आहे, तो जास्त वाढून तुमच्या मित्रत्वांत उगीच बिघाड येणार आहे; म्हणून, ज्या अर्थी तुम्ही मला विचारतांच, त्याअर्थीं जी काय हकीगत आहे ती पूर्वींप्रमाणेंच सत्य स्मरून मी तुम्हांला सांगतों. ' असें म्हणून मीं तें हिऱ्याचें इत्थंभूत वर्तमान त्यांस सांगितलें.

मी एवढें बोललों तरी सादीच्या मनावर त्याचा यत्किंचितूही परिणाम झाला नाहीं.तो म्हणाला, 'हसनभाई, घारीनें पागोटें नेणें, व साबण आणि कोंडा यांची अदलाबदल होणें, ह्या गोष्टी जशा असंभाव्य दिसतात, तशीच ही माशाच्या पोटांत हिरा सांपडल्याची गोष्ट मला दिसते. तें कांहीं असो, पण इतकें खरें कीं, माझ्या योगानें तुम्हीं श्रीमंत व्हावें असा जो माझा उद्देश होता तो सिद्धीस गेला, याबद्दल मला मोठें समाधान वाटत आहे. '

मग संध्याकाळ होत आली म्हणून ते घरीं जाण्याकरितां निघाले. तेव्हां मीं त्यांना थांबवून म्हटलें, 'सद्गृहस्थहो, तुम्हांला माझी एक विनंति आहे; तिचा तुम्ही अव्हेर करणार नाहीं अशी मला आशा आहे. विनंति एवढीच कीं, तुम्ही आज माझ्या पंक्तीस भाजी-भाकर खाऊन आजची रात्र येथेंच रहावें; व उदईक नदीपलीकडे एक हवाशिर बंगला मीं घेतला आहे, तो दाखविण्याकरितां तुम्हांला होडींत बसवून घेऊन जावें असें माझ्या मनांत आहे. तेथून आपण घोड्यांवर बसून खुष्कीच्या मार्गानें संध्याकाळीं परत येऊं.'

सादीनें उत्तर केलें, 'ह्यांना ( साद ह्याला ) जर दुसरीकडे कांहीं काम नसलें, तर मजकडून कांहीं हरकत नाहीं.' साद म्हणाला, 'हसनभाईच्या समागमाचा मला येवढा आनंद वाटतो कीं, त्या-करितां मी शंभर कामें एकीकडे टेवीन. ठीक आहे, तर मग आपण आज येत नाहीं हें कळविण्याकरितां येथून एक मनुष्य तुमच्या व माझ्या घरीं धाडूं म्हणजे झालें.' त्यावरून मी एका नौकरास हांक मारून आणिलें, आणि ते दोघे त्याला निरोप सांगताहेत तों मीं इकडे घरांत भोजनाची तयारी करण्यास सांगितलें.

भोजनाची तयारी चालली असतां माझे कल्याणकर्ते जे हे दोघे गृहस्थ, त्यांना मीं आपलें सर्व घर दाखविलें. तें चांगलें ऐसपैस असून त्यांत सोयी असाव्या तशा आहेत, असें त्यांस दिसून आल्यावरून त्यांनीं तें बांधण्याच्या योजनेची मोठी तारीफ केली. मी त्या दोघांनाही माझे कल्याणकर्ते म्हणतों; कारण, सादीचें मत खोडण्याकरितांच साद यानें मला तो शिशाचा तुकडा दिला व साद याला आपलें म्हणणें खरें करून दाखविण्याकरितांच सादी यानें मला चारशें मोहोरा दिल्या; आणि त्यांत माझ्या कल्याणाचा मूळ पाया होता असें मी समजतों. असो; नंतर मी त्यांस फिरून दिवाणखान्यांत आणिलें. तेव्हां त्यांनीं माझ्या धंद्याच्या संबंधानें मला पुष्कळ हकीगत विचारली. ती मीं त्यांस सांगितली, व ती ऐकून त्यांना मोठें समाधान वाटलें.

हें आमचें बोलणें चाललें आहे तों घरांतून 'जेवणाची तयारी झाली आहे' म्हणून वर्दी आली. त्यावरून, ज्या दिवाणखान्यांत भोजनाचीं ताटें वाढलीं होतीं तेथें मी त्या दोघांना घेऊन गेलों. तेथील रोषणाई व इतर व्यवस्था आणि भोजनाचा बेत यांची त्यांनीं फारच तारीफ केली. भोजन चाललें असतां, मी त्यांची करमणूक करविली. भोजन आटोपल्यावर मीं नाच उभा केला; व तो झाल्यानंतर दुसरे कांहीं करमणुकीचे खेळ करविले. सारांश, त्यांना आपली कृतज्ञता दर्शविण्याकरितां मजकडून झालें तेवढें सर्व मीं केलें.

दुसरे दिवशीं सकाळीं आम्ही संकेताप्रमाणें नदीतीरीं गेलों. तेथें उत्तम प्रकारची होडी तयार ठेवलेली असून तिच्यांत बसण्याकरितां गालिचा पसरलेला होता. तींत आम्ही बसलों, व वल्हेकरी लोक चांगले हुषार असल्यामुळें तीनचार घटकांत पलीकडच्या तीरावर जाऊन पोहोंचलों. साद व सादी यांचें लक्ष तेथील बंगल्याच्या शोभेपेक्षां त्याच्या सभोंवतालची वनशोभा पहाण्याकडे विशेष वेधलें. कारण, तो प्रदेश फार अफाट किंवा फार संकोचित नसून मोठा रमणीय आहे. असो; नंतर मीं त्यांस बंगल्यांत नेलें व तेथील दालनें वगैरे दाखविलीं. त्याची एकंदर रचना पाहून त्यांनीं माना डोलविल्या.

नंतर आम्ही बागेंत हिंडलों, त्या ठिकाणीं अननसाच्या व लिंबाच्या झाडांची एक राई आहे. तिच्यांतील झाडें सारख्या अंतरावर लावलेलीं असून, जवळच्या नदीचा पाट आणून तिचें जिवंत पाणी त्या झाडांत खेळविलें आहे. अशी ती राई मोठ्या खुबीदार व मजेदार रीतीनें बनविलेली असून, त्या वेळीं त्या झाडांना फुलांचा व फळांचा बहर आला असल्यामुळें ती फारच मनोहर दिसत होती. ती पाहून त्या उभयतांना कांहीं पराकाष्ठेचा आनंद झाला. तिची ती गर्द छाया, फुलें व फळें यांचा चोहोंकडे सुटलेला घमघमाट, झुळझुळ वाहणाऱ्या पाण्याचा मंद आवाज, नानाप्रकारच्या पक्ष्यांचे मधुर शब्द इत्यादिकांच्या योगानें त्यांचें मन

इतकें तल्लीन झालें कीं, त्यांना तेथून पायच काढावासें वाटेना ! त्या रमणीय स्थळीं त्यांस नेल्याबद्दल त्यांनीं माझे फार आभार मानिले; व हें विकत घेण्यांत तुमचें मोठें चातुर्य दिसून येतें अशी व ह्याच प्रकारची आणखी माझी त्यांनीं पुष्कळ वाखाणणी केली. राई पहाणें संपल्यावर बगिच्याच्या शेवटीं कित्येक मोठमोठीं झाडें आहेत तीं मीं त्यांना दाखविलीं. नंतर उन्हाळ्यांत हवा घेण्याकरितां एक छानदार जागा केलेली आहे तेथें त्यांना नेलें.त्या जागेला भोंवतालीं भिंत वगैरे नसून तिच्या चौफेर ताडवृक्ष लावलेले आहेत. त्याची तिजवर छाया पडत असून ती फार दाट नसल्यामुळें चोहोंकडचा देखावा नजरेस पडण्यास प्रतिबंध होत नाहीं. ह्या जागीं मीं त्यांना आणून, ज्यावर गालिचे पसरले होते व टेंकावयास तक्के ठेविले होते, अशा एका कोचावर बसविलें.

मीं आपल्या दोन मुलांना हवा पालटण्याकरितां पूर्वींच ह्या ठिकाणीं त्यांच्या शिक्षकांसह पाठवून दिलें होतें. आम्हीं इकडे राईपाशीं आलों तेव्हां ते मुलगे पक्ष्यांचीं घरटीं शोधण्याकरितां पुढें निघून गेले होते. त्यांना एका मोठ्या झाडाच्या फांदीवर एक घरटें आढळलें, तें त्या झाडावर चढून काढण्याचें त्यांचें मनांत होतें; पण आपल्याच्यानें तें होईलसें त्यांना वाटेना, सबब त्यांनीं आपल्याबरोबरच्या एका नौकरास तें दाखविलें; आणि तें काढून आणण्यास त्यास सांगितलें. तो नौकर झाडावर चढून पाहतो तों तें घरटें पागोटयांत बांधलेलें आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें ! तें पाहून त्याला मोठा चमत्कार वाटला. मग त्यानें तें तसेंच खालीं आणून मुलांना दाखविलें. त्या नोकराला वाटलें कीं, हा चमत्कार आपल्या धन्याला दाखवण्यासारखा आहे; म्हणून तें घरटें मजकडे आणण्याकरितां त्यानें माझ्या वडील मुलापाशीं दिलें.

मुलांना घरटें सांपडल्याचा मोठा आनंद होऊन ते धांवत धांवतच मजकडे आले. वडील मुलगा म्हणाला, 'बाबा, हें घरटें आम्हांला पागोटयांत सांपडलें !' तें ऐकून आम्हांला मोठें आश्चर्य

वाटलें. पण मी तें पागोटें हातांत घेऊन पाहिल्यावर मला असें दिसून आलें कीं घारीनें पूर्वी जें माझें पागोटें नेलें होतें तेंच हें होय. त्यावरून मीं साद व सादी यांस म्हटलें कीं, ' पागोटें माझ्या डोकीला होतें तें तुम्हांला आठवतें काय ? ' साद म्हणाला, 'माझ्या कांहीं लक्षांत तें चांगलेंसें नाहीं; आणि भाईच्याही लक्षांत असेंलसें मला वाटत नाहीं; पण त्यांत जर त्या एकशें नव्वद मोहोरा सांपडल्या, तर मग तेंच हें पागोटें होतें याबद्दल आम्हांला मुळींच शंका राहणार नाहीं. '

मी म्हटलें, ' गृहस्थहो, पागोटें तर हें तेंच आहे, याविषयीं शंका नको. मी तें तेव्हांच ओळखलें व त्याच्या वजनावरून तर माझी पक्की खात्री होते कीं, तें कांहीं दुसऱ्या कोणाचें नाहीं. तुम्ही स्वतः हातांत घेऊन पहा पाहिजे तर म्हणजे तुमचीही खात्री होईल. ' नंतर त्यांतील पिलें काढून तीं मीं मुलाच्या स्वाधीन केलीं आणि पागोटें सादीच्या हातांत दिलें. तेव्हां सादी म्हणाला, ' हें तुमचेंच पागोटें असावें असें मला वाटतें, तथापि आमचे भाई म्हणतात त्याप्रमाणें, ह्यांत जर त्या एकशें नव्वद मोहोरा सांपडल्या, तर त्याबद्दल आमची जास्त खात्री होईल. ' तेव्हां मीं तें पागोटें फिरून आपल्या हातांत घेतलें, आणि म्हटलें, ' ह्याच्यांत जें घरटें आहे; तें तुम्ही नीट लक्षपूर्वक पहा. तें आजकालचें नसून त्याला बांधून पुष्कळ दिवस झाले असावें असें स्पष्ट दिसत आहे, यावरून हें पागोटें त्या घारीनें माझ्या डोक्यावरून उचलून नेऊन तें ह्या झाडावर टाकिलें, अथवा ठेविलें म्हणा, तें तसेंच त्या दिवसापासूनच तेथें आहे असें तुमच्या लक्षांत येईल. मी ही इतकी चिकित्सा करतों याबद्दल तुम्हांला राग येऊं देऊं नका; कारण, मीं लबाडी खचीत केली नाहीं अशी तुमची खात्री करणें मला जरूर आहे. ' साद म्हणाला, ' तुमचें म्हणणें रास्त आहे. ' मग तो सादीला म्हणाला, ' अहो, हें सगळें तुमचा संशय फिटण्या-

करितां आहे! मजविषयीं म्हणाल तर, हसनभाईच्या खरेपणाविषयीं माझी पूर्वींच खात्री झाली आहे!'

साद याचें बोलणें चाललें असतां मीं पागोटें उकललें, तों मोहोरांची थैली जशीची तशी त्यांत सांपडली. ती मीं बाहेर काढिली तेव्हां सादीनें लागलीच ती ओळखली. मीं त्या उभयतांपुढें ती ओतली आणि म्हटलें, 'हूं, मोजा ह्या मोहोरा आणि बरोबर भरतात कीं नाहीं तें पहा.' साद यानें त्या मोजल्या, व त्याबरोबर एकशें नव्वद भरल्या. सादीला ही प्रत्यक्षप्रमाणासिद्ध गोष्ट खोटी म्हणवेना. तेव्हां तो म्हणाला, 'हसनभाई, तुम्हांला संपत्तिमान होण्यास ह्या एकशें नव्वद मोहोरा उपयोगी पडल्या नाहींत हें मी कबूल करतों; पण कोंडयाच्या डेऱ्यांत ठेविल्या असून ज्या गेल्या असें तुम्ही म्हणतां, त्या कदाचित् उपयोगी पडल्या असतील!' मीं उत्तर केलें, 'महाराज, दोन्ही रकमांच्या संबंधानें जो कांहीं खरा खरा प्रकार घडला होता, तो मीं तुम्हांस सांगितला. आतां तुमची खात्री होत नाहीं त्याला माझा काय इलाज आहे? त्याकरितां मी का खोटें सांगून पापांत पडूं?'

साद म्हणाला, 'हसनभाई, आमचे भाई म्हणतात तसेंच कां होईना? तुम्हाला जी संपत्ति मिळाली आहे, ती मिळण्याचें कारण यांनीं तुम्हाला दुसऱ्या वेळीं ज्या दोनशें मोहरा दिल्या त्या कांहीं अंशीं आहेत असें मी मोठ्या आनंदानें कबूल करतों; पण मीं तुम्हाला जो शिशाचा तुकडा दिला, तोही ती मिळण्यास कांहीं अंशीं कारण आहे असें यांनीं कबूल करावें, व माशाच्या पोटांत हिरा सांपडला ही गोष्ट खोटी आहे असें म्हणूं नये, म्हणजे झालें!' सादी म्हणाला, 'कबूल! पण पैशाखेरीज पैसा मिळणार नाहीं हें जें मीं म्हणतों, तें तुम्हाला मान्य केलेंच पाहिजे!' साद यानें उत्तर केलें, 'घटकाभर समजा कीं माझ्या नशिबानें मला एखादा पन्नास हजार मोहोरांच्या किंमतीचा हिरा रस्त्यावर सांपडून त्याची तेवढी किंमत

मला मिळाली तर तो पैसा मला पैशाच्याच योगानें मिळाला असें म्हणतां येईल काय ?'

हा वाद ह्या वेळीं इतकाच राहिला. नंतर जेवण्याची तयारी झाली होती म्हणून आम्ही उठून जेवावयास गेलों. जेवण झाल्या-नंतर मी आपल्या दोघां पाहुण्यांना अंमळ अंग टाकण्यास सांगून आपल्या कारकुनाला व बागवानाला कांहीं व्यवस्था करावयाला सांगावयाची होती ती सांगण्याकरितां निघून गेलों, नंतर फिरून मी त्याजकडे आलों, आणि ऊन खालीं होईपर्यंत सर्वजण इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत बसलें. पुढें आम्ही बागेंत हवा खाण्यास गेलों. तेथें दिवस मावळेपर्यंत होतों. नंतर बरोबर एक गडी घेऊन घोड्यांवर बसून चांदण्यांत मौजेनें बगदादेस आलों. आम्हांला यावयाला दोन तास लागले.

त्या दिवशीं रात्रीं गुरांना चूण पाहिजे होती ती घरांत शिल्लक नव्हती. हें काम ज्या नोकराकडे होतें त्याच्या हें कसें लक्षांत राहिलें नाहीं कोण जाणे. असो; तो चूण विकत आणण्याकारितां बाजारांत गेला. पण त्या वेळीं दुकानें बंद झालेलीं होतीं; म्हणून त्यानें शेजारीं दोनचार घरीं शोध केला. तों एका घरीं डेराभर कोंडा होता तो त्यानें दुसरे दिवशीं परत करण्याच्या बोलीनें डेऱ्यासकटच आणिला; तो कोंडा त्यानें पाटींत ओतिला आणि ओंजळीनें गुरांपुढें तो थोडथोडा टाकूं लागला. तेव्हां कापडांत बांधलेलें कांहीं जडसें त्याच्या हातास लागलें, तें त्यानें तसेंच माझ्याकडे आणिलें, आणि माझ्या हातांत देऊन म्हटलें, 'आपण ज्या पुरचुंडीविषयीं वारंवार म्हणत असतां तीच ही आहे का, पहा बरें !'

या गोष्टीमुळें मला जो हर्ष झाला तो किती म्हणून सांगावा ! मी साद व सादी यांस म्हटलें, 'सद्गृहस्थहो, मीं तुमची खातर-जमा करून जें कांहीं तुम्हांला सांगितलें त्याचा तुम्हांला प्रत्यय आल्यावांचून तुम्हीं तेथून जाऊं नये अशी ईश्वरानें कृपा करून योग घडवून आणला ही फारच उत्तम गोष्ट झाली. नंतर मीं

सादी यास उद्देशून म्हटलें, ' तुम्ही मला दुसऱ्या वेळेस ज्या दोनशें मोहरा दिल्या त्यांपैकीं एकशें नव्वद ज्या गेल्या म्हणून मीं म्हटलें, त्या ह्या पाहिल्यात ? ह्याच फडक्यांत मीं त्या बांधिल्या हें मला पक्कें आठवतें. ' असें म्हणून मी त्या उभयतांसमक्ष त्या मोहोरा मोजल्या. नंतर मीं तो डेरा आणविला, व तोही आमचाच असें ओळखलें. तो मी तसाच गड्यांच्या हातीं घरांत बायकोकडे पाठविला आणि त्याला सांगितलें कीं, ' इकडे काय झालें हें तिला न सांगतां, हा तूं ओळखतेस काय, असें तिला विचार. ' तिनें तो पाहतांक्षणींच ओळखला आणि मला सांगून पाठविलें कीं, ' मीं साबण घेऊन त्याच्याबद्दल कोंड्यानें भरलेला जो डेरा दिला तो हाच. '

हा सर्व प्रकार पाहून सादीनें ताबडतोब चूक कबूल केली. तो साद यास म्हणाला, ' पैसा मिळण्याला सदोदित पैसाच कारण असतो असें नाहीं ' याविषयीं माझी आतां खात्री झाली.

सादीचें बोलणें संपल्यावर मीं त्यास म्हटलें, ' आतां ईश्वर-सत्तेनें ज्या ह्या तीनशें ऐशीं मोहोरा सांपडल्या आहेत, त्या तुम्हांला परत देणें मला बरोबर दिसत नाहीं; कारण माझी खात्री आहे कीं, त्या परत घेण्याच्या उद्देशानें तुम्हीं मला मुळींच दिल्या नव्हत्या. आतां माझ्याविषयीं म्हणाल तर मला परमेश्वरानें जें अन्यमार्गानें दिलें आहे तेवढें मला पुरें आहे व त्यावर मीं संतुष्ट आहे; यास्तव हा पैसा स्वतःकरितां ठेवण्याची माझी इच्छा नाहीं. म्हणून तुमच्या विचारास येईल तर उद्यां गरिबांना मी या मोहोरा वांटून टाकितों, म्हणजे ते तुम्हांला व मलाही दुवा देतील. ' मग त्या दिवशीं रात्रींही ते दोघे माझ्या घरीं राहिले. दुसरे दिवशीं मला मोठ्या प्रेमानें त्यांनीं आलिंगिलें, आणि ते आपल्या घरीं गेले. जातांना ते म्हणाले, ' तुम्ही जो आमचा आदरसत्कार केला तो पाहून, व परमेश्वरकृपेनें तुम्हाला जी संपत्ति मिळाली तिचा तुम्हीं सदुपयोग केला हें पाहून, आम्हांला फारच आनंद झाला.

पुढें मी त्या प्रत्येकाचे घरीं जाऊन त्यांच्या परतभेटी घेतल्या,

तेव्हां त्यांनीं मला वारंवार भेटण्याविषयीं व आपल्याशीं मित्रत्व ठेवण्याविषयीं सांगितलें. हा त्यांनीं मला मोठाच मान दिला असें मी समजतों.

खोजा हसन ह्याच्या गोष्टीकडे कालीफ हरून अल्‌रशीद याचें लक्ष इतकें लागून गेलें होतें कीं, त्याचें तोंड खळेपर्यंत ती त्याला संपली असें समजलें देखील नाहीं ! मग तो म्हणाला,'खोजा हसन, तुझ्या गोष्टीइतकी मनोरंजक गोष्ट बहुत दिवसांत माझ्या ऐकण्यांत आली नव्हती. तुला या जगांत सुखी करण्याकारितां परमेश्वरानें ज्या रीतीनें संपत्ति दिली, ती रीत फारच आश्चर्यकारक होय. त्यानें तुला दिलेल्या संपत्तीचा तूं असाच चांगल्या रीतीनें उपयोग कर, म्हणजे त्यानें तुजवर केलेल्या कृपेबद्दल तूं आपली कृतज्ञता दर्शविलिसि असें होईल. ज्या हिऱ्याच्या योगानें तुला एवढें वैभव प्राप्त झालें, तो हिरा माझ्या जामदारखान्यांतच आहे. त्याची सर्व हकीकत आज कळून आली म्हणून मला मोठा आनंद झाला आहे. माझ्यापाशीं ज्या कांहीं अत्यंत मौल्यवान, दुर्मिळ व सुंदर वस्तु आहेत त्या सर्वांत हा हिरा अग्रेसर आहे. असो; आतां मी तुला इतकेंच सांगतों कीं, अजूनही कदाचित् सादी याच्या मनांत त्या हिऱ्याविषयीं संशय राहिला असेल, याकरितां तो व साद ह्या उभयतांनाहीं तूं एकदां येथें घेऊन ये, म्हणजे माझा जामदार तो त्यांना दाखवील. असें झालें म्हणजे सादी याची पक्की खात्री होईल कीं, दरिद्री मनुष्य श्रमावांचून व थोडक्या वेळांत धनवान् होण्यास पैसाच सदोदित कारणीभूत होतो असें नाहीं; आणखी तुला मी असें सांगतों कीं, ही सर्व गोष्ट तूं आमच्या जामदाराला सांग, म्हणजे तो ती लिहून घेईल, आणि तो हिरा आणि ती एकत्र ठेवील.'

असें बोलून कालिफानें खोजा हसन, शिदी नूमान, बाबा अबदल्ला या त्रिवर्गास ' आतां तुम्हापाशीं कांहीं काम राहिलें नाहीं, व तुमच्या हकीकती ऐकून मी फार खुष झालों,' असें आपलें डोकें हालवून दर्शविलें. त्यावरून त्यांनीं त्यांस साष्टांग नमस्कार घालून [illegible] घेतली.

# अलीबाबा व चाळीस चोर यांची गोष्ट.

इराण देशांतील कोणे एके शहरांत दोन भाऊ रहात असत. एकाचें नांव कासिम व दुसऱ्याचें नांव अलीबाबा. त्यांचा बाप मरण पावला त्या वेळीं त्याजपाशीं थोडीशी जी काय पुंजी होती ती त्यानें त्या उभयतांस सारखी वांटून दिली. यावरून सकृद्दर्शनीं एखाद्यास असें वाटेल कीं, ह्या उभयतांची स्थिति सारखी असावी. पण वास्तविक प्रकार तसा नव्हता; कारण, ईश्वरी संकेत कांहीं निराळाच होता.

कासिम यानें जी बायको केली, तिचा बाप तिच्या लग्नानंतर थोड्याच दिवसांनीं मरण पावला. त्याला तिजखेरीज दुसरें कोणीही नसल्यामुळें त्याची सर्व मालमत्ता, म्हणजे एक मोठें दुकान, अनेक प्रकारचा पुष्कळ माल भरलेली एक वखार, व बराच रोख पैसा, हीं तिला मिळालीं. त्यायोगानें एकाएकीं कासिम हा, त्या शहरांत जे मोठमोठे श्रीमंत व्यापारी होते, त्यांच्या बरोबरीचा झाला, व सुखानें कालक्रमणा करूं लागला.

अलीबाबा ह्याची स्थिति कासिम याच्या अगदीं उलट होती. त्यानें जी बायको केली,ती त्याचप्रमाणें दरिद्री होती.तीं एका भिकार झोंपड्यांत रहात असत. अलीबाबा याची संपत्ति काय ती तीन खेंचरें हीच होती. तो रानांतील लांकडें तोडून त्यांवर वाहून आणी व तीं विकून त्यांवर आपल्या कुटुंबाचा निर्वाह करी.

एके दिवशीं अलीबाबा हा रानामध्यें लांकडें तोडून तीं खेचरा-वर भरण्याच्या तयारींत असतां, बऱ्याच अंतरावर धुळीचे लोट त्याच्या दृष्टीस पडले, व ते आपल्याकडेसच येत आहेत असें त्याला दिसलें. तेव्हां तें काय आहे म्हणून त्यानें निरखून पाहिलें, तों घोडस्वारांची टोळी दौडत येत आहे असें त्याच्या नजरेस पडलें.

त्या देशांत जरी चोरांचा उपद्रव कधीं माहीत नव्हता, तरी अलीबाबा याला वाटलें कीं,' हे कदाचित् चोरच असतील;नसतील म्हणून कशावरून ? तेव्हां आतां ह्या खेंचरांचें काय होणार असेल तें होवो ! पण आपला जीव तरी निदान वांचवावा,' असा निश्चय करून तो एका झाडावर चढला. त्या झाडाच्या फांद्या मोठमोठ्या व अगदीं एकमेकींच्या जवळ असून पानांनीं गच्च भरून गेलेल्या होत्या. तसेंच त्या जमिनीपासून फारच थोडया अंतरावर होत्या. तो त्या फांद्यांच्या अगदीं मध्यें जाऊन बसला. तो त्या ठिकाणीं कोणालाही दिसण्यासारखा नसून त्याला मात्र बाहेरचें सर्व दिसत असे. ह्या झाडाशेजारीं एक लहान पण उंच असा डोंगर होता. त्याला लागून दुसऱ्या टेंकडया वगैरे कांहींएक नव्हतें. तो डोंगर त्या झाडापेक्षां पुष्कळच उंच असून अगदीं सुळासारखा नीट गेलेला असल्यामुळें, व त्याजवर खबदाडें व तीक्ष्ण धारेचे खडक अतिशय असल्यामुळें त्यावर चढून जाणें बहुतेक अशक्य होऊन गेलें होतें.

ते घोडेस्वार चांगले जवान, बळकट व धिप्पाड असून त्यांजपाशीं हत्यारेंही फार उत्तम प्रकारचीं होतीं. ते त्या डोंगराच्या पायथ्याशीं आले. आणि तेथें घोडयांवरून खालीं उतरले. अलीबाबानें ते मोजले तों ते चाळीस भरले. त्यांच्या चेहऱ्यामोहऱ्यांवरून व त्यांच्या जवळचीं हत्यारें व सामानसुमान यांवरून ते खास दरवडेखोर असावे असा अलीबाबानें तर्क केला. तो त्याचा तर्क कांहीं खोटा नव्हता. ते लोक खरोखरच दरवडेखोर होते. ते तेथल्या जवळच्या प्रदेशांत बिलकुल उपद्रव न करितां दूर कोठें तरी लूट करीत आणि ह्या ठिकाणीं एकत्र जमत. आपण केलेला तर्क खरा याविषयीं अलीबाबा याची पुढील गोष्टीवरून तर पुरी खात्री झाली.

त्या लोकांनीं आपापल्या घोडयाचे लगाम काढिले व त्यांना झाडेंझुडपें वगैरेंना बांधून टाकिलें,आणि प्रत्येकानें बरोबर चंदीचा एकेक तोबरा आणिलेला होता तो आपल्या घोडयाला दिला. नंतर सर्वांनीं आपल्याजवळच्या कातडयाच्या थैल्या हातांत घेतल्या. त्या इतक्या

जड दिसल्या कीं,त्यांत सर्व सोनें-रुपें भरलेलें असावें असें अल्लीबाबा ह्यास दिसून आलें.त्यांच्यापैकीं जो सर्वांत अल्लीबाबाच्या जवळ होता, तो त्यांचा नाईक असावा असें त्याला वाटलें.तो आपली थैली घेऊन त्या झाडाखालीं आला, आणि झुडपामधून त्या डोंगरापाशीं जाऊन त्यानें ' तिळा,उघड. ' असे शब्द उच्चारिले. ते अल्लीबाबाला स्पष्ट ऐकूं आले. नायकानें ते शब्द उच्चारतांच एक दार खट्‌दिशीं उघडलें. त्यांतून त्यानें आपले सर्व लोक आंत घालविले व नंतर आपण गेला. तो जातांच दार आपोआप बंद झालें.

ते चोर त्या डोंगराच्या आंतील गुहेंत जाऊन कांहीं वेळ गेल्यावर अल्लीबाबा ह्याच्या मनांत आलें कीं, आपण हळूंच झाडावरून उतरून येथून पळून जावें. पण फिरून त्याला वाटलें कीं, न जाणों, कदाचित् ह्या लोकांपैकीं एखादा अगर सर्वजण इतक्यांत बाहेर येऊन आपण त्यांच्या दृष्टीस पडल्यास ते आपणाला पकडतील. असें त्याला भय पडल्याकारणानें तो तसाच झाडावर बसून राहिला. एकदां असेंही त्याच्या मनांत आलें कीं, आपण खालीं उतरून या लोकांचे दोन घोडे धरावे, व त्यांपैकीं एकावर बसावें आणि आपलीं खेचरें पुढें घालून व दुसऱ्या घोड्याचा लगाम हातीं धरून त्यांसह दौडत शहरास निघून जावें. पण हें साधलें तर बरें, नाहींपेक्षां प्राणांशीं गांठ पडणार आहे; यास्तव असला कांहींएक विचार उपयोगी नाहीं, असें समजून त्यानें स्वस्थ बसणें हा निर्भय मार्गच पसंत केला.

शेवटीं त्या गुहेचें दार पुनः उघडलें, आणि ते चाळीस चोर बाहेर पडले. त्यांचा नाईक जातांना सर्वांच्या मागून गेला होता, पण येतांना सर्वांच्या अगोदर आला. ते सर्वजण बाहेर आल्यावर त्यानें ' तिळा, लाव. ' असें म्हटलें, व लागलीच तें दार बंद झालें. हेही शब्द अल्लीबाबा ह्याला पूर्वीप्रमाणेंच स्पष्ट ऐकूं आले. नंतर सर्वजण आपापल्या थैल्या पाठीवर टाकून, आणि घोड्यांना लगाम घालून त्यांवर बसले. सर्वांची निघण्याची तयारी झाली असें पाहू-

तांच नाईक त्यांच्या पुढें झाला, आणि ते सर्व आल्या वाटेनें माघारे चालले.

ते गेल्यावर अलीबाबा लागलींच झाडावरून खालीं उतरला नाहीं. कारण, तो मनांत म्हणाला, कदाचित् ते कांहीं विसरले असून त्याकरितां जर इतक्यांत परत आले, तर मला पकडतील. म्हणून ते अगदीं लांब जाऊन त्याला दिसतनासे होत तोंपर्यंत तो तेथून हालला नाहीं. ते दिसेनातसे झाल्यावरही कांहीं वेळ तो झाडावर राहिला, नंतर तो खालीं आला तेव्हां त्या चोरांच्या नायकानें गुहेचें दार उघडण्याकारितां व बंद करण्याकारितां जे शब्द उच्चारले होते, ते आपण उच्चारले असतां त्याप्रमाणें घडतें कीं नाहीं, हें पाहण्याची त्याला इच्छा झाली. त्यावरून, जिकडे तें दार होतें तिकडे तो गेला. तें त्याच्या दृष्टीस पडतांच त्यासमोर उभा राहून तो म्हणाला, ‘ तिळा, उघड. ’ त्यानें याप्रमाणें म्हणतांच तावडतोब तें दार उघडलें. अली बाबा ह्याला वाटलें होतें कीं, आंतील जागा अगदीं अंधारी व भयाण असेल, पण ती खूप उजेडाची व ऐसपैस असून तळघराच्या आकाराची व मनुष्यकृतीनें केलेली अशी आहे असें जेव्हां त्याला दिसून आलें, तेव्हां त्याला मोठें आश्चर्य वाटलें. तींत जो उजेड पडत असे तो त्या डोंगराच्या माथ्यावर जें भोंक होतें त्यांतून पडत असे. हें भोंकही मनुष्यकृतीचेंच होतें. असो; त्या ठिकाणीं सर्व प्रकारची सामग्री, मोठमोठ्या किंमतीचे रेशमी व इतर प्रकारच्या कापडांचे गठ्ठे एकावर एक रचलेले, आणि सोन्यारुप्याच्या नाण्यांच्या शेंकडों थैल्या व मोकळे ढीग त्याच्या दृष्टीस पडले. हें सर्व पाहून अलीबाबा याला वाटलें कीं, ही गुहा हजारों वर्षांपासून चोरांचे परंपरेनें चालत आलेलें ठिकाण असावें.

अलीबाबा यानें आतां पुढें काय करावयाचें याविषयीं लागलाच निश्चय केला. तो गुहेंत गेला, व तो जातांच तिचें दार बंद झालें. ह्या गोष्टीची त्याच्या मनाला मुळींच धास्ती पडली नाहीं;

कारण तें दार उघडण्याची किल्ली त्याला ठाऊक होती. तो आंत गेल्यावर त्यानें इकडे तिकडे कांहींएक न पहातां, ऐन माल म्हणजे सोन्याच्या ज्या थैल्या भरलेल्या होत्या, त्या उचलण्यास आरंभ केला. त्या आपल्या खेंचरांच्यानें जितक्या नेववतील असें त्याला वाटलें तितक्या त्यानें भराभर बाहेर काढल्या. नंतर त्या खेंचरांना त्यानें तेथें आणलें आणि त्यांवर त्या सर्व थैल्या भरल्या. थैल्या भरून झाल्यावर त्यानें त्यांवर लांकडें भरलीं. हें काम त्यानें असें बेमालूम केलें कीं, खेंचरांवर लांकडाशिवाय दुसरें कांहीं आहे अशी कोणास बिलकूल शंका येऊं नये. हें झाल्यावर तो गुहेच्या दारा समोर उभा राहिला, आणि त्यानें ' तिळा, लाव. ' असें म्हणतांच तें दार बंद झालें.

नंतर तो मोठ्या त्वरेनें शहरास निघून गेला. तो घरीं येऊन पोंहोंचल्यावर त्यानें आपलीं खेंचरें अंगणांत उभीं केलीं, आणि फाटक बंद करून घेतलें. नंतर त्यानें खेंचरांवरचीं लांकडें काढून टाकिलीं आणि थैल्या घरांत नेऊन, बायको खाटेवर बसली होती तिच्यापुढें मांडल्या.

त्याच्या बायकोनें थैल्या हालवून पाहिल्या, तेव्हां त्यांत सर्व सोनें भरलेलें आहे असें तिला आढळून आलें. यावरून आपल्या नवऱ्यानें चोरी केली असावी, असा तिच्या मनांत संशय आला. तो तिचा संशय इतका दृढ झाला कीं, थैल्या आणण्याचें संपतां-क्षणींच ती त्यास म्हणाली, 'कायहो, तुम्हीं, हें काय चो–' ती इतकें म्हणत आहे तों, अलीबाबा तिला म्हणाला, 'हं गप्प रहा; भिण्याचें कांहींएक कारण नाहीं. चोरांना लुटलें असतां जर ती चोरी होत असेल तर मला चोर म्हण. एरवीं तर मी कांहीं चोर नाहीं. तूं अंमळ थांब, म्हणजे मला हें द्रव्य कसें मिळालें त्याची सर्व हकीकत मी तुला सांगतों. ती तूं ऐकलीस म्हणजे मजविषयीं तुझ्या मनांत जी वाईट कल्पना आली आहे ती समूळ नाहींशी होईल. ' असें म्हणून त्यानें त्या सर्व थैल्या जमिनीवर ओतल्या. त्यांचा एवढा मोठा ढीग झाला



त्यानें त्या सर्व थैल्या जमिनीवर ओतल्या. [पान ४३०

कीं, तो पाहून अलीबाबाच्या बायकोचे डोळे दिपून गेले! नंतर त्यानें अथपासून इतिपर्यंत तिला तो रानांतला सर्व वृत्तांत सांगितला; व शेवटीं, ही गोष्ट कानाच्या कोंपऱ्यांसही कळतां कामा नये असें त्यानें तिला फार फार बजावून सांगितलें.

अलीबाबाच्या बायकोच्या मनांत आलेली कांक्षा नाहींशी होऊन, तिला आपलें नशीब उघडल्याचा मोठा आनंद झाला. तिनें तो सर्व पैसा मोजण्याचें मनांत आणिलें. अलीबाबा म्हणाला, 'अग, तुला का वेड लागलें आहे? तुझ्याच्यानें हें द्रव्य कधींच मोजवणार नाहीं! मी आतां एक खळगा खणतों, आणि त्यांत हें असेंचें असेंच पुरून टाकितों.' बायको म्हणाली, 'पण हें किती आहे याचा साधारण अजमास तरी आपण पाहूं. तुम्ही खळगा खणा, तोंपर्यंत मी शेजारच्या घरून एक लहानसें माप आणून त्यानें हें मोजून टाकितें.' अलीबाबा ह्यानें उत्तर केलें, 'तुझा हा विचार कांहीं उपयोगाचा नाहीं; माझें ऐकशील तर तूं ह्या गोष्टीचा नाद सोडून दे. बरें, मोज बापडी पाहिजे तर; पण तुला सांगतों कीं, ही गोष्ट तिसऱ्याच्या कानीं मात्र जाऊं देऊं नको.'

याप्रमाणें नवऱ्याची परवानगी होतांच, तिचा दीर म्हणजे अलीबाबाचा भाऊ कासिम याचें घर जवळच होतें, तेथें ती धांवत धांवतच गेली. तो त्या वेळीं घरीं नव्हता. तिनें त्याच्या बायकोस म्हटलें, 'बाई, तुमचें एखादें माप क्षणभर मला द्या बरें.' तिनें तिला विचारलें, 'कोणतें पाहिजे? लहान का मोठें?' अलीबाबाच्या बायकोनें उत्तर केलें, 'लहानच पाहिजे.' जाऊ म्हणाली, 'थांबा अंमळ, मी आंतून घेऊन येतें.'

अलीबाबाची भावजय माप आणायाला आंत गेली, तेव्हां आपल्या जावेला कसलें धान्य मोजावयाचें आहे हें आपणाला कळावें म्हणून तिनें त्या मापाच्या बुडाला थोडेंसें मेण चिकटविलें, आणि तें बाहेर घेऊन आली. तें तिनें अलीबाबाच्या बायकोपाशीं

दिलें आणि ती म्हणाली, 'तुम्हांला फार वेळ मीं उभें केलें याबद्दल मला वाईट वाटतें; पण काय करूं ? तें मेलें सांपडेनाच लौकर ! '

अलीबाबाची बायको माप घेऊन घरीं आली. तिनें त्या थैलींतील सर्व पैसा मोजून त्याचा खाटेच्या जवळच ढीग केला. इतकें होत आहे तों अलीबाबानें खळगा खणून तयार केला. त्याच्या बायकोनें किती मापें भरलीं तें त्यास सांगितलें. तीं चांगलीं पुष्कळ भरलीं हें पाहून, उभयतांनाही मोठा संतोष झाला. अलीबाबा तें द्रव्य खळग्यांत भरीत असतां त्याची बायको, आपण किती चोख रीतीनें व वेळचे वेळीं काम करणारी आहों हें आपल्या जावेस दर्शविण्याकारितां लागलीच तें माप तिला परत देण्यासाठीं तिच्या घरीं गेली. त्याच्या बुडाला एक मोहोर चिकटली होती, तें तिच्या लक्षांत आलें नाहीं. ती जावेपुढें माप ठेवून तिला म्हणाली, 'हें घ्या बाई तुमचें माप, फार वेळ ठेविलें नाहीं हो ! म्हटल्याप्रमाणें लागलीच आणून दिलें. पण खरोखर, आज तुम्हीं कीं नाहीं बाई, माझें मोठेंच काम केलें. तुमचे मजवर मोठे उपकार झाले. '

अलीबाबाची बायको पाठमोरी झाली न झाली तों कासिम ह्याच्या बायकोनें मापाच्या बुडाकडे पाहिलें. तेव्हां त्याला मोहोर चिकटलेली पाहून ती पराकाष्ठेची विस्मित झाली. तिच्या अंतःकरणांत लागलाच मत्सर उत्पन्न झाला. ती म्हणाली, 'काय ? अलीबाबापाशीं मोहोरा आणि त्या मापानें मोजण्याइतक्या ? इतक्या त्या भिकारड्याला मिळाल्या तरी कोठून ! ' तिचा नवरा घरीं नव्हता हें पूर्वीं सांगितलेंच आहे. तो दुकानीं गेलेला असून नित्याप्रमाणें संध्याकाळीं घरीं यावयाचा होता. त्याच्या बायकोला हें वर्तमान सांगण्याविषयीं अतिशय उत्कंठा लागल्यामुळें तो केव्हां घरीं येतो असें तिला झालें. ती एकेक घटका तिला केवळ युगाप्रमाणें भासूं लागली !

कासिम घरीं आल्यावर ती त्याला म्हणाली, ' अहो, तुम्हांला वाटतें कीं, मीच कायतो मोठा श्रीमंत. ' पण मी खचीत सांगतें,

तुम्हांला ही केवळ भ्रांत आहे. भावोजी तुमच्यापेक्षां लाखपटीनें श्रीमंत आहेत ! त्यांच्यापाशीं द्रव्य इतकें आहे कीं, ते तें मापानें मोजीत असतात ! ' कासिम म्हणाला, ' तूं काय म्हणतेस तें मी समजलों नाहीं. नीट स्पष्ट सांग. ' त्यावरून तिनें आपण केलेली कपटयुक्ति सर्व त्याला सांगून ती मोहोरही त्याला दाखविली. ती इतकी जुनी दिसत होती कीं, ती कोणच्या राजाच्या वेळची असावी हें सुद्धां समजण्याची पंचाईत होती !

कासिम ह्याला आपल्या भावाच्या उत्कर्षाविषयीं आनंद व्हावा तो न होतां उलट त्याच्या संपत्तीविषयीं त्याच्या मनांत हेवा उत्पन्न झाला. त्याला त्या रात्रीं झोंपदेखील आली नाहीं. उजाडतांच तो अलीबाबा याजकडे गेला. अलीबाबा याचा तो भाऊ खरा, पण त्याच्याशीं तो भावाप्रमाणें मुळींच वागत नसे; एवढेंच नाहीं, तर त्याला भाऊ असें म्हणण्याचीही त्याला लाज वाटत असे. ती श्रीमंत बायको त्याला मिळाल्यापासून इतका त्याच्या वृत्तींत पालट पडला होता ! असो. तो अलीबाबा ह्यास म्हणाला, ' अलीबाबा, तूं फारच आंतल्या गांठीचा आहेस रे ! तूं बाहेर लोकांना कंगालपणा दाखवितोस ! आणि घरांत मापानें मोहोरा मोजीत असतोस!' अलीबाबा म्हणाला, ' भाऊ, तूं काय म्हणतोस हें मीं मुळींच समजलों नाहीं ! काय तें स्पष्ट बोल.' कासिम त्याला ती मोहोर दाखवून म्हणाला, ' आतां माझ्यापाशीं चोरूं नको. असल्या किती मोहोरा तुजजवळ आहेत तें सांग. तुझ्या बायकोनें काल माझ्या घरून माप आणिलें होतें त्याला ही मोहोर चिकटून आलेली होती.'

यावरून अलीबाबाच्या लक्षांत आलें कीं, आपण जी गोष्ट मुद्दाम गुप्त ठेवण्याचा यत्न केला होता, ती आपल्या बायकोच्या हटवादीपणामुळें कासिम व त्याची बायको ह्या दोघांनाही कळली; पण झाल्या गोष्टीस उपाय नाहीं असें समजून त्यानें आपलें मन किंचितही अस्थिर न होऊं देतां सर्व गोष्ट आपल्या भावास सांगितली; आणि हें सर्व प्रकरण गुप्त ठेवण्याकरितां त्यानें त्याला आपल्या

द्रव्याचा कांहीं अंश देऊं केला. त्यावरून कासिम ह्याला अधिकच स्फुरण चढलें; आणि तो मोठ्या डौलानें म्हणाला, ' अं:, तें तर मी तुझ्यापासून घेतल्यावांचून राहणारच नाहीं. पण शिवाय जेथून तूं हें द्रव्य आणिलेंस, ती जागा कोठें आहे, तें ठिकाण व तेथल्या सर्व खाणाखुणा तूं मला सांगितल्या पाहिजेस; कारण, मला वाटेल तेव्हां तेथें जाण्यास अडचण पडतां कामा नये. हें जर तूं मला न सांगशील, तर ही गोष्ट मी कोतवालाला जाहीर करीन. तसें झालें म्हणजे तुला आणखी जास्त द्रव्य मिळण्याची तर गोष्ट एकीकडे राहिली, पण जें मिळालेलें आहे तेंही जाईल; आणि जाहीर केल्याबद्दल माझें इनाम मला मिळेलच; त्यांत कांहीं खोटें नाहीं ! '

अलीबाबानें, आपल्या निर्दय भावाच्या धमकीला भिऊन नव्हे, तर आपल्या मूळच्या सरळ स्वभावास अनुसरून, त्याला जी जी हकीगत पाहिजे होती ती सर्व त्याला सांगितली; तसेंच, त्या गुहेचें दार उघडण्याकरतां व लावण्याकरतां जे शब्द उच्चारायाला पाहिजे होते तेही सांगितलें.

कासिम ह्याला ह्याहून कांहीं जास्त नको होतें. त्यानें अलीबाबा फिरून गेला नाहीं तों आपण जाऊन गुहेंतलें सर्व द्रव्य आणण्याचा निश्चय केला. तो दुसरे दिवशीं मोठ्या पहाटेस उठला आणि दहा खेचरांच्या पाठीवर मोठमोठ्या पेट्या चढवून तीं घेऊन निघाला. तो मनांत म्हणाला, ' सध्यां एवढींच पुरेत. पुढें अंदाज दिसेल त्याप्रमाणें आणखी नेतां येतील. 'अलीबाबानें त्याला सांगितलेला रस्ता त्यानें धरिला, व लौकरच तो त्या डोंगरापाशीं येऊन पोहोंचला. तो त्यानें शेजारच्या झाडांच्या व इतर खुणांवरून तत्काळ ओळखिला. तो गुहेच्या दारापाशीं आला, व त्यानें 'तिळा, उघड.' असें म्हणतांच दार उघडलें, व तो आंत जातांच बंद झालें. त्यानें गुहेंत इकडे तिकडे फिरून पाहिलें, तेव्हां अलीबाबाच्या सांगण्यावरून तेथल्या संपत्तीची जी त्याला कल्पना झाली होती, त्यापेक्षां ती पुष्कळच अधिक आहे असें त्याला दिसून आलें. तो इतका परा-

काष्ठेचा लोभी होता कीं, आपल्या नेत्रांची तृप्ति करून घेण्याकरितां सर्व दिवसभर तो ती संपत्ति पहात राहिला असता; पण आपणाला खेचरांवर भरून नेववेल तितकें द्रव्य न्यावयाचें आहे हा विचार त्याच्या मनांत आल्यामुळें त्याचा निरुपाय झाला. मग त्याला उचलण्यासारख्या ज्या थैल्या होत्या त्यांपैकीं कित्येक त्यानें घेतल्या आणि तो दारापाशीं आला. पण दार उघडण्याकरितां 'तिळा, उघड.' असें जें म्हणावयाचें त्याच्याऐवजीं 'जावा, उघड.' असें तो म्हणाला! तेव्हां अर्थातच दार बिलकूल न हालतां जसेंच्या तसेंच राहिलें! आपणाला आतां एवढी मोठी संपत्ति मिळणार हे विचार त्याच्या मनांत एकसारखे घोळत असल्यामुळें ' तीळ ' या नांवाचा त्याला विसर पडून गेला. तो परा-काष्ठेच्या चिंतेंत पडला. त्यानें दुसऱ्याही पुष्कळ धान्यांचीं नांवें घेतलीं. पण त्यांचा काय उपयोग! जें हवें होतें तें त्याला आठवेना व दार कांहीं हालेना!

असें हें अकल्पित संकट प्राप्त झाल्यामुळें कासिम हा अगदीं गांगरून गेला, व पुढें काय करावें हें त्याला सुचेना. ' तीळ ' हा शब्द आठवण्याकरितां त्यानें अतिशय प्रयत्न केला, पण व्यर्थ. त्या शब्दाचा त्याला इतका विसर पडला कीं, जसा काय तो त्यानें जन्मांत कधीं ऐकलाच नव्हता! शेवटीं निराशेनें त्यानें हातांत घेतलेल्या थैल्या जमिनीवर फेंकून दिल्या; आणि गुहेंत इकडून तिकडे व तिकडून इकडे घिरट्या घालूं लागला. त्याच्या मनाची स्थिति लागलीच इतकी पालटून गेली कीं, ज्या द्रव्याकरितां कांहीं वेळापूर्वीं तो अगदीं प्राण टाकीत होता, तेंच त्याला आतां दृष्टीस नकोसें झालें!

असो. अशा प्रकारें कासिम हा अगदीं गाय होऊन आपल्या भावी परिणामाविषयीं दुःख करीत राहिला असतां, दोन प्रहरच्या सुमारास ते चोर पळत आपल्या गुहेकडे येऊं लागले. ते कांहीं अंत-रावर असतांच त्यांना पाठीवर पेट्या असलेलीं कासिम च्याचीं खेचरें डोंगराशेजारीं उभीं होतीं तीं दिसलीं. त्यावरून, कांहीं तरी दगा

आहे असा त्यांनीं अगोदरच तर्क केला. ते भरधांव घोडे टाकीत गुहेजवळ येऊन ठेपले. कासिम यानें खेंचरें बांधलीं नव्हतीं. सबब तीं त्या चोरांच्या घोड्यांच्या टापांना बुजून धूम पळत सुटलीं व हां हां म्हणतां दिसतनाशीं झालीं. त्या चोरांना त्यांचा पाठलाग करून दुसरें कांहींएक करावयाचें नव्हतें, तर फक्त तीं कोणाचीं आहेत एवढाच तपास लावावयाचा होता. तेव्हां त्यांच्यापैकीं कांहींजण डोंगराभोंवतीं फिरून त्याचा तपास करूं लागले; व बाकीचे आपल्या नायकासह हातांत नागव्या तरवारी घेऊन थेट गुहेच्या दारापाशीं आले. नायकानें 'तिळा, उघड.' असें म्हणतांच दार तत्काळ उघडलें.

कासिम ह्याला गुहेंत पावलांचा आवाज ऐकूं आल्याबरोबर, हे खास चोरच येत आहेत व आपला मृत्यु आतां समीप आला आहे, असें सहज समजून आलें. तथापि, जीव बचावण्याविषयीं एकवार प्रयत्न करून पहावा असा त्यानें निश्चय केला. त्यासाठीं तो दारापाशीं अगदीं तयार होऊन उभा राहिला. आणि जो ' तीळ ' शब्द आठवण्याकरितां त्यानें इतका वेळ व्यर्थ यत्न केला होता, तो त्याच्या कानीं पडून दार उघडतांच तो जोरानें उडी मारून बाहेर आला, आणि त्यानें नायकाला तर जमिनीवर पाडलें; पण बाकींच्यापुढें त्याचें काय चालतें! त्यांनीं तत्काळ आपल्या तरवारी त्याजवर चालवून एका क्षणांत त्याचा प्राण घेतला!

हें झाल्यानंतर प्रथम ते चोर गुहेंत गेले. कासिम ह्यानें दारापाशीं आणून टाकलेल्या थैल्या त्यांनीं उचलल्या, आणि जेथच्या तेथें ठेविल्या. अलीबाबानें पूर्वीं ज्या थैल्या नेल्या होत्या, त्या गेल्याचें त्यांच्या लक्षांत देखील आलें नाहीं; कारण, तेथें शेंकडों थैल्या पडल्या होत्या, त्यांतून दहा वीस गेल्या काय आणि आल्या काय त्यांची तेथें कसली दाद? असो. नंतर ते सर्व चोर एकत्र बसून त्यांनीं या प्रकरणाचा विचार चालविला. त्यावरून त्यांच्या असें लक्षांत आलें कीं, हा मनुष्य आंत गेला खरा, परंतु त्याला बाहेर कांहीं येतां आलें नाहीं. तथापि, तो आंत कसा गेला असावा ह्या-

विषयीं त्यांना कांहीं तर्क करितां येईना. त्यांनीं अशी कल्पना केली कीं, डोंगराच्या माथ्यावर जें भोंक आहे, त्यांतून तो कदाचित् आंत गेला असावा, पण ती जागा किती उंच व चढण्यास किती अवघड ह्याचा विचार त्यांच्या मनांत येतांच असें होणें अशक्य आहे असें त्यांना वाटलें. शिवाय तो वर चढून गेल्याच्या कांहीं खुणाही त्यांना आढळल्या नाहींत; यामुळें तर त्या गोष्टीविषयीं त्यांना संशयच राहिला नाहीं. ते म्हणाले,'हा दारांतून आंत आला असें म्हणावें, तर तें उघडण्याची युक्ति त्याला माहीत असल्यावांचून तसें होणें नाहीं; व ती त्याला माहीत असण्याचा मुळींच संभव नाहीं.' सारांश, तो कोणत्या रीतीनें आंत गेला असावा ह्याची कल्पना कोणालाही होईना. त्यांची अशी खात्री होती कीं, दार उघडण्याची युक्ति आपणांखेरीज इतरांना मुळींच माहीत नाहीं, कारण अलीबाबानें झाडावरून आपलें बोलणें ऐकिलें ही गोष्ट त्यांच्या स्वप्नींही नव्हती! तथापि, आपलें द्रव्य सुरक्षित राहील अशी तजवीज करणें फार अगत्याचें आहे ही गोष्ट त्यांच्या मनांत पक्की बाणून गेली. सबब त्यांनीं असा विचार केला कीं, कासिम याच्या मुडद्याचे चार भाग करून गुहेच्या दाराच्या आंतल्या दोन्ही बाजूंकडे दोन दोन असे टांगून ठेवावे, म्हणजे इतःपर जर कोणी असेंच आंत शिरण्याचें धाडस केलें तर त्याला भय वाटून तो पळून जाईल. मग तत्काळ त्याप्रमाणें त्यांनीं केलें; व मुडद्याची घाण नाहींशी होईपर्यंत परत यावयाचें नाहीं असा ठराव केला. नंतर दार बंद करून ते घोड्यावर बसले आणि आपल्या वाटमारीच्या उद्योगास चालते झाले.

इकडे रात्र फार झाली तरी कासिम अजून येत नाहीं, असें पाहून त्याच्या बायकोला मोठी काळजी उत्पन्न झाली. ती घाई-घाईनें अलीबाबा याजकडे गेली आणि म्हणाली, ' भावोजी, आज सकाळपासून ते रानांत गेले असून कोणत्या कामाकरितां गेले आहेत हें तुम्हाला ठाऊक असेलच. ते आतां येतील, मग येतील, अशी मी केव्हांपासून पांखरासारखी वाट पहात आहे. आतां रात्र पडली

तरी ते अजून येत नाहींत, यावरून त्यांजवर कांहीं संकट गुजरलें कीं काय म्हणून मला मोठी काळजी उत्पन्न झाली आहे !' कासिम याशीं अलीबाबा याचें जें जोलणें झालें होतें, त्यावरून तो आज रानांत गेला असेल ह्याविषयीं संशय नाहीं असें अलीबाबास वाटल्यावरून, आपणही आणखी आज गेलों असतां त्याला वैषम्य वाटेल असें समजून तो त्या दिवशीं रानांत गेला नव्हता तो कासिम याच्या खोडसाळपणाच्या वर्तनाची त्याच्या बायकोला लेशही ओळख न देतां म्हणाला, ' तूं कांहीं भिऊं नको; कासिम हा वाटेनें आपण कोणाच्या दृष्टीस न पडावें म्हणून आज बुद्ध्या बरीच रात्र होईपर्यंत येणार नाहीं. '

कासिम याच्या बायकोच्या लक्षांत आलें कीं, ती गोष्ट उघड-कीस न येऊं देण्याविषयीं आपल्या नवऱ्याला फार जपलें पाहिजे ही गोष्ट खरीच आहे. त्यावरून अलीबाबा जें काय बोलला तें पुष्कळ अंशीं संभवनीय आहे असें तिला वाटलें, व तिला बराच धीर आला. नंतर ती घरीं आली, व मध्यरात्र होईपर्यंत नवऱ्याची वाट पहात राहिली. मध्यरात्र जेव्हां उलटून गेली, तेव्हां मात्र तिचा धीर अगदीं सुटला, आणि ती रडावयाला लागली. तशांत तिला ती गोष्ट फोडण्याची चोरी, यामुळें तिला मोठ्यानें रडण्याची पंचाईत झाली; व या कारणामुळें तर तिचें दुःख दुप्पट झालें ! तिला पश्चात्ताप होऊन ती म्हणूं लागली कीं, ' मला चांडाळणीला आपल्या दिराच्या व जावेच्या कामांत हात घालण्याची ही दुष्ट बुद्धि कोणीकडून झाली कोण जाणे !' ती सर्व रात्रभर दुःख करीत व मुळमूळ रडत बसली, आणि सकाळीं उठून तशीच अलीबाबा याजकडे आली. तिला आपल्या येण्याचें कारण सांगण्याची गरजच पडली नाहीं; कारण, तें तिच्या डोळ्यांतील अश्रूंवरूनच अली-बाबाच्या लक्षांत आलें !

अलीबाबा तिच्या विनंतीची वाट न पाहतां लागलाच उठला, आणि कासिम याचा शोध करण्याकरितां आपलीं तीन खेचरें

घेऊन रानांत चालता झाला. तो डोंगराच्या अगदीं जवळ येऊन पोहोंचला, तथापि त्याला कासिम व त्याचीं खेंचरें यांचा कांहींच पत्ता लागेना; तेव्हां तो आपल्या मनांत चरकला. नंतर तो दाराजवळ येऊन पाहतो तों रक्ताचे थेंब तेथें पडलेले त्याच्या दृष्टीस पडले. त्यावरून तर कासिम याची धडगत नाहीं असें त्याला खास वाटलें. नंतर पूर्ववत् ' तिळा, उघड. ' हे शब्द त्यानें उच्चारिले, तों लागलीच गुहेचें दार उघडलें. दाराच्या तोंडाशीं कासिम याच्या शरीराचीं चार शकलें टांगून ठेवलेलीं पाहतांच त्याच्या हृदयांत धडकी भरली, व अंगावर रोमांच उभे राहिले ! असो.

कासिम हा जरी त्याच्याशीं कधींही बंधुप्रेमानें वागला नव्हता, तरी तें मनांत न आणतां तो कसा झाला तरी आपला प्रत्यक्ष भाऊ आहे, यासाठीं त्याचा उत्तरविधि करणें हें आपलें कर्तव्य आहे असें समजून तो तत्काळ त्या उद्योगास लागला. तो गुहेंत गेला, आणि तेथलीं दोन चिरगुटें घेऊन त्यांत त्यानें तीं प्रेताचीं शकलें एकेकांत दोन दोन अशीं बांधिलीं. नंतर तीं गांठोडीं एका खेंचराच्या पाठीवर घालून त्यांत काय आहे हें दिसण्यांत न यावें अशाकरितां त्यानें त्यांवर लांकडें भरलीं. बाकीच्या दोन खेंचरांवर त्यानें मोहोरांच्या थैल्या लादून त्यावरही तशींच लांकडें भरलीं. मग दार बंद करून तो परत जावयाला निघाला. आपणाला कोणाच्या दृष्टीस पडतां कामा नये असें जाणून तो रात्र होईपर्यंत रानाच्या बाहेर न पडतां तसाच त्याच्या तोंडाशीं थबकून राहिला, आणि बरीच चांगली रात्र झाल्या-वर शहरांत गेला. घरीं येऊन पोहोंचतांच त्यानें मोहोरांच्या थैल्यांनीं लादलेलीं दोन खेंचरें अंगणांत उभीं केलीं, आणि कासिम याची काय स्थिति झाली हें बायकोस थोडक्यांत कळवून, त्या खेंचरांच्या थैल्या काढून घेऊन त्यांची व्यवस्था लावण्याविषयीं तिला सांगि-तलें. नंतर तिसरें खेंचर तो आपल्या भावाच्या घरीं घेऊन गेला.

त्यानें दाराला थाप मारतांच एका दासीनें येऊन तें उघडलें. तिचें नांव मार्ग्याना असें होतें. ती मोठी चतुर व धूर्त असून मोठ-

मोठ्या धाडसांच्या कामांतही हटकून यश येईल अशा प्रकारच्या युक्त्या काढण्यांत फार वस्ताद होती. अलीबाबा ह्याला हे तिच्या आंगचे गुण माहीत होते. ती अंगणांत येतांच खेंचरावरचीं ओझीं त्यानें उतरलीं, आणि मार्ग्याना हिला एकीकडे बोलावून तिला तो म्हणाला, ' मार्ग्याना, आतां जी कांहीं गोष्ट मीं तुला सांगणार आहें, ती बाहेर न फुटूं देण्याविषयीं तुला पराकाष्ठेची खबरदारी घेतली पाहिजे; कारण ती गोष्ट फुटली असतां माझा व तुझ्या धनिणीचा सर्वस्वीं नाश होणार आहे. ह्याहून तुला आणखी जास्त सांगत नाहीं, व सांगण्याचें कारणही नाहीं. कासिम ह्याला रानांत चोरांनीं ठार मारिलें असून त्याचें प्रेत या दोन गांठोड्यांत बांधलेलें आहे. असा तो अपघातानें जरी मेला आहे, तरी तो जसा काय आपल्या मरणानेंच मेला असें लोकांना दिसून येईल अशी तजवीज करून त्याचें उत्तरकार्य यथाविधि करणें हें आपलें काम आहे. तर तूं आतां प्रथम आपल्या धनिणीकडे जा, व मला तिच्याशीं कांहीं बोलावयाचें आहे म्हणून सांग आणि तिच्याशीं मी जें काय बोलेन तें तूं लक्षपूर्वक ऐक. ' तेव्हां मार्ग्याना आपल्या धनिणीकडे गेली आणि अलीबाबा तिच्या मागोमाग गेला. कासिम ह्याच्या बायकोनें त्यास पाहतांच मोठ्या उतावळीनें म्हटलें, ' भावोजी, त्यांची काय खबर आहे ? तुमच्या चर्येवरून तर मला कांहीं ठीक चिन्ह दिसत नाहीं ! ' अलीबाबा म्हणाला, ' वहिनी, तूं मध्यें कांहींएक न बोलतां मी काय म्हणतों तें शेवटपर्यंत ऐकून घेण्याचें कबूल केल्यावांचून माझ्यानें तुला कांहींएक उत्तर देववत नाहीं. कारण, जो कांहीं एकंदर प्रकार घडला आहे, तो कानाच्या कोपऱ्यासही कळूं न देणें हें मला व त्याचप्रमाणें तुलाही अत्यंत आवश्यक आहे. ' कासिम याची बायको म्हणाली, ' हाय हाय ! तुमच्या बोलण्यावरूनच मला कल्पना होते कीं, ते कांहीं जिवंत नाहींत. तरी पण ही गोष्ट गुप्त ठेवणें आवश्यक आहे हें मीं पूर्ण-

पणें जाणतें; व त्याकरितां मीं आपलें दुःख आंवरून धरतें. सांगा तर मग आतां काय असेल तें!'

नंतर अलीबाबानें आपण घरून निघाल्यापासून कासिम याचें प्रेत घेऊन येईपर्यंत घडलेली सर्व हकीकत आपल्या भावजयीला सांगितली. मग तो तिला म्हणाला, ' वहिनी, आतां आणखी एक गोष्ट मी तुला सांगतों, तिजपासून तुला जास्तच दुःख होणार आहे; कारण तशा प्रकारची गोष्ट ऐकण्याचा प्रसंग आपल्यावर येईल हें तुझ्या स्वप्नींही नसेल! असो; गोष्ट सांगावयाची इतकीच कीं, आपल्या दुर्दैवानें जें काय घडावयाचें तें घडलें; त्यास आतां उपाय नाहींच. पण तुला आहे त्या स्थितींत सुख होण्याकरितां, मला जो कांहीं थोडाबहुत पैसा देवानें दिला आहे तो व तुजजवळचा असा एकत्र करून, तुझ्याशीं निका लावावा असा माझा विचार आहे. मी तुला खात्रीपूर्वक सांगतों कीं, माझी बायको तुझ्याशीं कधींही स्पर्धा करणार नाहीं, व आपण एकत्र सुखानें नांदूं. ही गोष्ट तुझ्या पसंतीस येत असेल तर कासिम हा आपल्या मरणानें मेला असें लोकांत दिसेल अशी कांहीं तरी युक्ति आपणांला केली पाहिजे. हें काम मार्ग्यांना हिजकडे सोंपवावें हें मला बरें दिसतें. शिवाय माझ्याकडून होण्यासारखें असेल तें मी करीनच.'

कासिम याच्या बायकोनें विचार केला कीं, ह्या वेळीं अली-बाबाच्या म्हणण्यास रुकार द्यावा यांतच शहाणपणा आहे. आणि वास्तविक पाहतां त्यांत तिचें कांहींएक वाईट नव्हतें; उलटा फाय-दाच होता. कारण, कासिम याचें द्रव्य पुष्कळ होतें खरें, पण अलीबाबा याजपाशीं त्याहून पुष्कळच जास्त होतें; व त्याला ती गुहा सांपडल्यामुळें आणखीही मिळण्याचा संभव होता. असो; तेव्हां या सर्व गोष्टींचा विचार करून, तिनें त्याचें बोलणें अमान्य केलें नाहीं; इतकेंच नव्हे, तर आपल्या दुःखाचें परिमार्जन होण्यास वास्तविक हेंच साधन आहे असें तिनें मानलें. तिच्या नेत्रांतून जे खळखळ अश्रु चालले होते ते तिनें पुसले. आणि नवऱ्याकरितां

जो अतिशय विलाप ती करीत होती तो कमी केला; व यावरून अलीबाबाचें म्हणणें आपल्याला कबूल आहे असें तिनें दर्शविलें. मग अलीबाबा तेथून उठला, आणि मार्ग्यांना हिला आपलें काम फार सावधगिरीनें बजावण्याविषयीं पुन्हां पुन्हां सांगून खेचर घेऊन परत आपल्या घरीं आला.

मार्ग्यांना त्याच वेळीं निघून एका हकिमाकडे गेली. तो हकीम कांहीं एक प्रकारच्या औषधाच्या वड्या तयार करीत असे. त्यांच्या योगानें मनुष्य दुखण्यानें अगदीं अत्यवस्थ होऊन पडला असला तरी त्याला गुण येतो अशी प्रसिद्धि होती. त्या वडया तिनें त्या हकिमापाशीं मागितल्या. हकिमानें विचारलें, 'कासिमभाईच्या घरीं कोण आजारी आहे'? तिनें दुःखाचा सुस्कारा टाकून उत्तर केलें, 'काय सांगू! कासिमभाई स्वतःच आजारी आहेत! त्यांना काय होतें तें कांहींच समजत नाहीं! तें कांहीं खात नाहींत व बोलतही नाहींत!' असें बोलून मार्ग्यांना हिनें त्याजपासून वडया घेतल्या, आणि ती घरीं आली. दुसरे दिवशीं सकाळीं फिरून ती त्याच हकिमाकडे गेली, व मनुष्य अगदीं शेवटच्याच पंथांत असला तर त्याला देण्याकरितां तो जो एक प्रकारचा अर्क तयार करीत असे, तो तिनें त्याजपाशीं मागितला. तो त्यानें दिला. तेव्हां ती म्हणाली, 'हाय हाय! ह्या औषधाचाही कालच्याप्रमाणेंच गुण न येतां माझा धनी श्वास गमावणार असें मला त्याच्या स्थितीवरून दिसतें! अल्ला काय घडवील तें खरें!'

इकडे अलीबाबा आणि त्याची बायको हीं त्या दिवशीं पुष्कळ वेळां आपल्या घरून कासिम याचे घरीं जातांना लोकांच्या दृष्टीस पडलीं असून त्यांच्या मुद्रा फार खिन्न दिसत होत्या. त्यावरून त्या दिवशीं संध्याकाळीं कासिम याची बायको व मार्ग्यांना दासी यांनीं कासिम मेला म्हणून जो आकांत केला, त्याचें कोणालाही आश्चर्य वाटलें नाहीं.

दुसऱ्या दिवशीं मोठ्या सकाळीं मार्ग्याना ही एका चांभाराकडे गेली. त्या चांभाराचें नांव बाबा मुस्तफा असें होतें. तो म्हातारा असून त्याचा स्वभाव मोठा रंगेल होता. तो आपलें दुकान सर्वांच्या अगोदर उघडीत असे. मार्ग्याना हिनें त्याला सलाम करून त्याच्या हातावर एक मोहोर ठेविली. ती पाहून बाबा मुस्तफा म्हणाला, ' आज तर बोवा सकाळच्या प्रहरीं चांगलीच बोहनी झाली ! बरें, सांगा तुमचें काय काम आहे तें; मी तें करण्यास तयार आहें. '

मार्ग्याना हिनें उत्तर केलें, ' बाबा मुस्तफा, तूं आपलें शिवण्याचें सामान घेऊन मजबरोबर चल. पण बोवा, माझी एवढी अट आहे कीं, तुला जेथें मी घेऊन जाणार आहे, तेथें पोंचण्यापूर्वी मी तुझे डोळे बांधीन हें तुला कबूल असलें पाहिजे. ' हें ऐकून बाबा मुस्ताफा जरा कांकूं करूं लागला. तो म्हणाला, ' काय बाई? तुम्ही मला कांहीं अनीतीचें किंवा लोकांत हलकेपणा आणणारें काम करूं सांगतां कीं काय ?' मार्ग्याना हिनें त्याच्या हातावर दुसरी मोहोर ठेवून म्हटलें, ' या अल्ला ! बाबा मुस्तफा ! तुला कोणतेंही अनीतीचें किंवा हलकेपणा आणणारें काम मी सांगेन असें कधींही होणार नाहीं ! या माझ्या बोलण्यावर तूं भरंवसा ठेव आणि मनांत कांहींएक किंतु न आणतां मजबरोबर चल. '

हें ऐकून बाबा मुस्तफा हा उठून मार्ग्याना हिजबरोबर चालता झाला. तिनें संकेतस्थळीं पोहोंचतांच एका रुमालानें त्याचे डोळे बांधिले आणि तसाच त्याला कासिम याच्या घरीं ज्या खोलींत त्याचें प्रेत ठेविलें होतें तेथें ती घेऊन गेली. नंतर तिनें त्याचे डोळे सोडून त्यास म्हटलें, 'बाबा मुस्तफा, तूं आतां जलदी कर, आणि हे चारी तुकडे एकत्र शिवून टाक. हें काम तूं केलेंस म्हणजे मी तुला आणखी एक मोहोर देईन. '

बाबा मुस्तफा यानें तें काम उरकल्यावर मार्ग्याना हिनें कबूल केल्याप्रमाणें त्यास तिसरी मोहोर दिली. आणि ' ही गोष्ट कोणापाशींही बोलूं नको ' असें त्यास पुन्हां पुन्हां बजावून सांगितलें.

नंतर तिनें त्याचे डोळे बांधिले, आणि पूर्वीं ज्या ठिकाणीं तसेंच केलें होतें, तेथें त्याला घेऊन गेली. तेथें पोहोंचतांच तिनें त्याचे डोळे सोडिले आणि त्याला घरीं जाण्यास परवानगी दिली. तो नजरेआड होईपर्यंत ती तशीच त्याजकडे पहात राहिली; कारण, तिला संशय आला कीं, न जाणो, मी पुढें कोठें जातें व काय करतें हें पहाण्याकारितां हा कदाचित् परत येईल. असो; मग तो दिसेनासा झाल्यावर ती घरीं गेली.

घरीं जातांच मार्ग्यांना हिनें कासीम याच्या प्रेतास स्नान घालण्याकारितां पाणी तापत ठेविलें. तें तापत आहे तों अल्लीबाबा आला. त्यानें त्या प्रेतास स्नान घातलें. व त्यांत रीतिप्रमाणें मसाला वगैरे करून त्याजभोंवतीं वेष्टन घातलें. इतक्यांत ज्या सुताराला त्यानें प्रेताकरितां पेटी तयार करून देण्यास सांगितलें होतें, तोही आला. तेव्हां मार्ग्यांना हिनें त्या सुताराच्या नजरेस कांहीं कमजास्त प्रकार येऊं नये म्हणून, दरवाज्यापाशींच ती पेटी त्याजपासून घेतली, आणि त्याचे पैसे चुकते करून त्याला लावून दिलें. नंतर तिनें व अल्लीबाबानें मिळून तें प्रेत पेटींत घातलें, आणि अल्लीबाबानें तिला चुका मारून ती बंद केली. मग सर्व तयारी झाली म्हणून इमामास कळविण्याकारितां मार्ग्यांना ही मशिदींत गेली. मशिदींत ज्या लोकांचें काम प्रेताला स्नान घालण्याचें होतें, त्यांनीं 'स्नान घालण्यास येतों' म्हणून म्हटलें, पण मार्ग्यांना म्हणाली, 'तें कांहींएक राहिलें नाहीं. आम्हीं सर्व तयारी केली आहे.'

मार्ग्यांना परत येते न येते तों इमाम व मशिदींतील इतर काजी हे कासिम याच्या येथें येऊन थडकले. मग शेजारीं राहणाऱ्या चार गृहस्थांनीं प्रेताची पेटी उचलली व ती स्मशानाकडे चालविली. त्यांच्यापुढें इमाम हा प्रार्थनास्तोत्रें म्हणत चालला. मार्ग्यांना ही कासिम याची दासी असल्यामुळें तीही प्रेताच्या मागून मोठमोठ्यानें रडत व ऊर बडवीत चालली. ह्या सर्वांच्या मागून अल्लीबाबा व कासिम

यांचे कित्येक इष्टमित्र चालले. ही मंडळी खांदेकऱ्यांना विसांवा देण्याकरितां मधूनमधून प्रेताला खांदा देत असे.

इकडे घरीं कासिम याची बायको आपल्या पतीकरितां शोक करीत बसली होती. त्या लोकांच्या चालीप्रमाणें तिच्या शेजारणी-पाजारणी सर्व तिच्या घरीं जमल्या, व तिच्याबरोबर रडत बसल्या. त्या कल्लोळामुळें सर्व आळी दणाणून गेली.

अशा प्रकारें, कासिम ह्याचा जो दुःखदायक शेवट झाला त्याची वार्ता अलीबाबा, त्याची बायको, कासिम याची बायको आणि मार्ग्यांना, या चौघांखेरीज कोणालाही न कळतां तें सर्व प्रकरण एकदांचें पार पडलें.

नंतर चारपांच दिवसांनीं अलीबाबानें आपल्या घरांत जीं कांहीं दहावीस मडकींगाडगीं वगैरे होतीं तीं व चोरांच्या गुहेंत सांपडलेला ऐवज हीं आपल्या भावजयीच्या घरीं नेलीं. हा ऐवज त्यानें अर्थातच कोणाच्या नजरेस न पडावा म्हणून रात्रींचा वाहून नेला. पुढें थोडक्याच दिवसांनीं आपल्या भावजयीशीं निका लावण्याचा त्यानें आपला निश्चय लोकांत प्रगट केला. असा निका लावण्याचा प्रचार त्या लोकांमध्यें सर्वत्र असल्यामुळें त्या गोष्टीचें कोणासही आश्चर्य वाटलें नाहीं.

अलीबाबाचा मुलगा एका व्यापाऱ्याकडे नोकरीस होता. ती नोकरी नुकतीच त्यानें सोडिली होती. अलीबाबानें कासिम याचें दुकान त्याच्या हवालीं करून त्यास सांगितलें कीं, ' तूं जर व्यवस्थेनें व हुशारीनें वागलास, तर मी आपल्या स्थितीप्रमाणें खर्च करून लवकरच तुझें लग्न करून देईन. '

याप्रमाणें अलीबाबा याचें चांगलें बस्तान बसून तो सुखानें कालक्रमणा करूं लागला. आतां त्याची पुढील हकीकत तूर्त तशीच ठेवून त्या चाळीस चोरांची हकीकत पुढें चालवूं.

ते चोर नेमलेल्या वेळीं त्या गुहेकडे आले, आणि तिचें दार उघडून पाहतात तों कासिम याचें प्रेत तेथें नसून तेथल्या थैल्यां-

पैकीं कांहीं थैल्याही नाहींतशा झाल्या आहेत असें त्यांच्या दृष्टीस पडलें. ह्या गोष्टीचा त्यांना पराकाष्ठेचा विस्मय वाटला. त्यांचा नाईक म्हणाला, ‘ गड्यांनो, आपलें हें सर्व प्रकरण बाहेर फुटलें ह्यांत संशय नाहीं; आतां जर या गोष्टीस लौकर कांहीं उपाय योजिला नाहीं, तर आपला खचीत नाश होऊन, आपल्या वाड-वडिलांनीं व आपण अतिशय मेहनतीनें व अनेक प्रकारचीं संकटें सोसून जें हें द्रव्य मिळविलें आहे, त्याला आपण मुकूं. आतांपर्यंत घडलेल्या सर्व प्रकारावरून हें स्पष्ट होतें कीं, जो चोर आपण मारला, त्याला गुहेचें दार उघडण्याची युक्ति ठाऊक असून तो बाहेर येण्याच्या बेतांत होता; इतक्यांत सुदैवेंकरून आपण आलों, यामुळें त्याचा डाव फसला; तसेंच त्याचा मुडदा ज्याअर्थी येथून नाहींसा झाला, व त्याचप्रमाणें आपला कांहीं पैसाही गेला, त्याअर्थी त्याला दुसरा कोणी सांथीदार असावा हेंही पण उघड दिसतें. आतां, ह्या दोघांखेरीज तिसऱ्याला मात्र ही गोष्ट माहीत असेल असें मानण्याला कांहींएक कारण दिसत नाहीं. असो; ह्या दोघां-पैकीं एक तर आपण खपाविलाच आहे, आतां दुसरा राहिला, त्याची तेवढी वाट लाविली म्हणजे झालें. ती लावण्याच्या तजविजीस मात्र आपणांला ताबडतोब लागलें पाहिजे; बिलकूल दिरंगाई लावतां उपयोगी नाहीं. कां, कसें काय तुम्हांला काय वाटतें ? ’

नायकाचें बोलणें सर्वांना पसंत पडून त्यांनीं निश्चय केला कीं, सगळ्या गोष्टी एकीकडे ठेवून आधीं त्या मनुष्याचा तपास लावण्याच्या उद्योगास लागावयाचें, आणि त्याची पुरती शांतिपुष्टि करीपर्यंत त्याचा पिच्छा सोडावयाचा नाहीं.

नाईक म्हणाला, ‘ शाबास शूरांनो, शाबास ! तुमचें हें दिलदार भाषण ऐकून मला फार आनंद झाला. तुमचा पराक्रम व धैर्य यांचा मला जो अनुभव आला आहे; त्यावरून तुम्ही दुसरी गोष्ट सांगाल असें मला वाटलेंच नव्हतें ! असो. आतां प्रथम तुमच्यांपैकीं जो कोणी धीट, चतुर व खटपटी असेल, त्यानें परदेशी मुशाफराचा वेष

घेऊन शहरास जावें, आणि हरप्रयत्न करून, कोणी एखादा मनुष्य एकाएकीं मरण पावल्याविषयीं लोक बोलतात कीं काय, ह्याचा छडा काढावा; आणि तो लागल्यास सदरहू मनुष्य कोण होता व कोठें रहात होता ह्याविषयीं माहिती मिळवावी. हीच गोष्ट सर्वांना अत्यंत महत्त्वाची आहे; कारण, जेथें आपण आज इतके दिवस गुप्त रीतीनें राहिलों व पुढेंही तसेंच राहिलों असतां आपला मोठा फायदा होणार आहे, तेथें आपण उघड उघड जाऊन जी कांहीं गोष्ट करणार तिजबद्दल पुढें आपल्याला पश्चात्ताप करावयास लागला तर मग काय उपयोग? यास्तव, जो कोणी हें काम अंगावर घेईल त्यानें अतिशय सावधगिरीनें वागावें व आपल्याला खोटी बातमी देऊन फसवूं नये; कारण, त्या योगानें आपला सर्वस्वी नाश होण्याचा संभव आहे; म्हणून मी तुम्हांला असें विचारतों कीं, त्या मनुष्याच्या हातून हें काम तडीस न गेलें तर त्याला देहांत शिक्षा असणें वाजवी आहे कीं नाहीं?'

हें नायकाचें भाषण ऐकून इतरांचा त्यावर अभिप्राय काय पडतो तो ऐकण्याची वाट न पाहतां त्यांपैकीं एक असामी एकदम मोठ्या आवेशानें उठून म्हणाला, 'मला ही गोष्ट कबूल आहे, व हें काम तडीस नेण्याकरितां जीवावर उदार होण्यांत मी मोठें भूषण मानितों; मात्र इतकेंच कीं, मला कदाचित् यश न आलें तर, यानें मंडळीकरितां मेहनत करण्यांत कसूर केली, किंवा हा धैर्याचा कोता होता, असा मात्र दोष तुम्हीं मजवर ठेवूं नये.'

नाईक व इतर लोक यांनीं त्या मनुष्याचें भाषण ऐकून त्याची मोठी वाहवा केली व त्याजवर तें काम सोंपाविलें. नंतर त्यानें आपला वेष अशा प्रकारें पालटला कीं, तो दरवडेखोरांपैकीं आहे असा अंदेशा कोणालाही येऊं नये. मग रात्र होतांच तो सर्वांचा निरोप घेऊन शहरास यावयास निघाला व दिवस उगवण्याच्या संधीस तेथें येऊन पोहोंचला. तो शहरांत जरा इकडे तिकडे फिरला, व कर्मधर्मसंयोगानें बाबा मुस्तफा याच्याच दुकानीं प्रथम गेला.

बाबा मुस्तफा हा आपली आरी वगैरे काढून उद्योगास लागण्याच्या बेतांत होता, तों त्या चोरानें त्याला सलाम केला आणि तो त्याच्या शेजारीं जाऊन बसला. बाबा मुस्तफा हा फार म्हातारा झालेला होता, सबब त्या चोरानें त्यास म्हटलें, ' कायहो बाबा, तुम्ही इतके लवकर उठून काम करावयाला बसतां. पण तुम्हाला या वेळेस चांगलें दिसतें का ? मला तर वाटतें कीं, स्वच्छ उजेडांत देखील तुम्हाला टांका घालावयाला चांगलें दिसत असेल कीं नाहीं कोण जाणे. '

बाबा मुस्तफा म्हणाला, ' तुम्ही कोठलें असाल ते असा; परंतु तुम्हांला मजविषयीं माहिती नाहीं असें दिसतें. अहो, मी फार म्हातारा झालों आहे, यावर तुम्ही जाऊं नका ! माझी दृष्टि इतकी चांगली आहे कीं, एखाद्या ऐन पंचविशींतल्या मनुष्याची तशी नसेल ! तुम्हाला खोटें वाटेल. थोडयाच दिवसांपूर्वीं मीं ह्याहूनही अंधाऱ्या जागेंत एक प्रेत शिवलें ! '

हें बाबा मुस्तफाच्या तोंडचे शब्द ऐकून त्या चोराला पराकाष्ठेचा आनंद झाला. तो मनांत म्हणाला,'प्रथमदर्शनींच आपल्याला चौकशी करायाला न लागतां या मनुष्याकडून हवी ती माहिती मिळाली, ह्यावरून आपलें काम फत्ते होणार यांत संशय नाहीं. ' मग बाबा मुस्तफा याच्या बोलण्याचें आपल्याला आश्चर्य वाटलेंसें दाखवून तो म्हणाला, 'काय? प्रेत शिवलें म्हणून तुम्ही म्हणतां? प्रेत शिवण्याचें कारण काय ? अहो, प्रेत नसेल, प्रेतावरचा खेंडा असेल तुम्हीं शिवला तो ! ' बाबा मुस्तफानें उत्तर केलें, ' छे हो ! मीं म्हटलें तेंच खरें. प्रेतच मीं शिवलें. तुमच्या मनांत मीं त्यासंबंधानें आणखी जास्त बोलावें असें आहेसें दिसतें; पण तुमची खात्री असूं द्या कीं, यापुढें एक अक्षरही त्यासंबंधानें तुम्हाला मजकडून कळणार नाहीं ! '

हें ऐकून त्या चोराची पुरती खात्री झाली कीं, आपल्याला ज्या गोष्टीचा पत्ता पाहिजे होता तो लागला, यांत काडीमात्र संशय नाहीं. मग त्यानें आपल्या खिशांतून एक मोहोर काढली आणि ती

बाबा मुस्तफाच्या हातावर ठेवून त्यास म्हटलें, ‘ मला तुमची गुप्त गोष्ट कळण्याची इच्छा मुळींच नाहीं; आणि यदाकदाचित् तुम्ही ती सांगितली, तरी ती मजकडून बाहेर फुटणार नाहीं याविषयीं तुमची खात्री असूं द्या. हें असो; पण तुम्ही तें प्रेत जेथें शिवलें, तेवढें घर जर मला दाखवाल तर तुमचे मजवर महदुपकार होतील ! ’

बाबा मुस्तफानें ती मोहोर परत करण्याकरितां त्याजपुढें करून म्हटलें, ‘ तुमचें म्हणणें मान्य करण्याची जरी माझी इच्छा असली, तरी तिचा कांहींएक उपयोग नाहीं हें तुम्ही खचीत समजा. कारण ज्यानें मला प्रेत शिवण्याकरितां नेलें, त्यानें मला प्रथम मध्येंच एके ठिकाणीं नेऊन तेथें माझे डोळे बांधिले, आणि नंतर मला त्या घरांत नेलें; आणि तेथून परत आणिलें तेंही पहिल्याप्रमाणेंच. म्हणून, तुम्ही म्हणतां तें होणें अगदीं अशक्य आहे. ’

चोरानें उत्तर केलें, ‘ चिंता नाहीं, तुमचे डोळे बांधून जिकडून तुम्हाला नेलें तो रस्ता तुमच्या थोडा ध्यानांत असेलच. तर ज्या ठिकाणीं तुमचे डोळे बांधिले तेथें तुम्ही मला घेऊन चला म्हणजे मी तुमचे डोळे बांधितों, आणि तेथून तुम्ही कसकसें वळून कोण-कोणत्या रस्त्यांनीं गेलां तें जें कांहीं थोडेंबहुत तुम्हाला आठवत असेल, तसें आपण जाऊन प्रयत्न करून पाहूं; मग सांपडलें घर तर बरेंच, नाहींपेक्षां तुमचा कांहीं उपाय नाहीं, आणि माझाही नाहीं ! पण माझें असें आहे बोवा, कीं कोणाचे श्रम कोणी फुकट घेऊं नये; म्हणून तुमच्या श्रमाबद्दल आणखी एक मोहोर मी तुम्हांला देतों. ’ असें म्हणून त्यानें त्याच्या हातांत दुसरी मोहोर ठेविली.

त्या दोन मोहोरा पाहून बाबा मुस्तफाच्या तोंडाला पाणी सुटलें. तो कांहींएक न बोलतां बराच वेळ आपल्या हातांत त्या घेऊन त्यांजकडे पहात राहिला; व आतां कसें करावें, असा त्याला मोठा विचार पडला. शेवटीं म्हणतात ना, ‘ द्रव्येण सर्वे वशाः ’ त्या-प्रमाणें त्याची बुद्धि फिरून त्यानें त्या मोहोरा आपल्या खिशांत टाकिल्या आणि तो त्या चोरास म्हणाला, ‘ तो रस्ता मला बरोबर

सांगतां येईल अशी मला खात्री वाटत नाहीं; तथापि तुमच्या मर्जीसाठीं मी यत्न करून पहातों. ' हें ऐकून त्या चोराला मोठा आनंद झाला. मग बाबा मुस्तफा उठला व मार्ग्यानां हिनें जेथें त्याचे डोळे बांधिले होते, तेथें त्याला घेऊन गेला. तो त्यास म्हणाला, ' येथेंच माझे डोळे बांधिले होते, व मी तोंड करून उभा आहे, तिकडेच पुढें मला नेलें. ' हें ऐकून त्या चोरानें चटकन् आपल्या हातांतल्या रुमालानें त्याचे डोळे बांधिले. नंतर थोडी यानें त्याला वाट सांगून व थोडी त्यानें याला सांगून ते कासिम याचे घरापाशीं म्हणजे आतां अलीबाबा रहात होता तेथें आले. त्या ठिकाणीं येऊन पोहोंचतांच बाबा मुस्तफा म्हणाला, ' थांबा; मी याच्यापुढें गेलों असें मला वाटत नाहीं. ' त्यावरून त्या चोरानें त्याचे डोळे न सोडितां, आपल्या खिशांत मुद्दाम खडू आणिलेला होता तो लागलीच काढिला, आणि त्या घराच्या दरवाज्यावर कांहीं खूण केली. नंतर बाबा मुस्तफाचे डोळे सोडून, ' हें घर कोणाचें आहे ? असें त्यानें त्यास विचारिलें. ' त्यानें उत्तर केलें, ' मी ह्या महल्ल्यांत रहात नसल्यामुळें त्याची मला कांहीं माहिती नाहीं. '

बाबा मुस्तफाकडून यापेक्षां कांहीं जास्त माहिती मिळत नाहीं असें पाहून त्या चोरानें त्यास सलाम करून त्याला आपल्या दुकानीं जाण्यास सांगितलें, आणि आपण तसाच रानांत निघून गेला. त्याला अर्थातच वाटलें कीं, आतां सर्व मंडळी आपली पाठ थोपटल्यावांचून राहणार नाहींत !

इकडे काय झालें कीं, बाबा मुस्तफा व चोर हे निघून गेल्यावर मार्ग्यानां ही कांहीं कामाकरितां बाहेर गेली. ती परत आली तों चोरानें दरवाज्यावर जी खडूची खूण करून ठेविली होती, तिजकडे तिची नजर गेली. तेव्हां ती मनांत म्हणाली, ' ही जी येथें दरवाज्यावर खूण केलेली आहे तिचा अर्थ काय असावा बरें ? कोणी तरी माझ्या धन्याच्या वाईटावर आहे असें दिसतें; अथवा कदाचित रस्त्यांतल्या रिकामटवळ्या पोरांचाही हा खेळ

असेल. कांहीं असो, पण आपण सावधगिरी ठेवावी हें चांगलें.' असा विचार करून, तिनें शेजारच्या त्याच बाजूकडील इकडच्या दोन तीन घरांच्या व तिकडच्या दोन तीन घरांच्या दरवाज्यांवर खडूच्या तशाच खुणा करून ठेविल्या. तथापि याबद्दल तिनें आपल्या धन्यास अगर धनीणीस कांहींएक खबर दिली नाहीं.

इकडे तो चोर परत रानामध्यें आपल्या मंडळीकडे गेला, आणि आपण फत्ते करून आल्याची सुवार्ता त्यानें त्यास सांगितली. तो म्हणाला, 'मित्रहो, मला वेळच अशी कांहीं उत्तम लागली होती कीं, फक्त ज्या एकाच मनुष्याला त्या गोष्टीची माहिती, तोच मला प्रथमदर्शनीं भेटला!' असें म्हणून त्यानें बाबा मुस्तफाच्या संबंधाचें सर्व वर्तमान त्यांस सांगितलें. तें ऐकून सर्वांस फारच आनंद झाला. नंतर नाईक त्या मनुष्याच्या कर्तबगारीबद्दल त्याची फार स्तुति करून सर्वांस उद्देशून म्हणाला, 'गड्यांनो, आपणाला आतां दिरंगाई लावतां कामा नये. उठा आपलीं हत्यारें कोणाला न दिसतील अशा रीतीनें घेऊन तयार व्हा. आपला कोणाला संशय न येण्यासाठीं आपण शहरांत एकदम न जातां एक एक, दोन दोन, असें जाऊं, आणि शहराच्या चौकांत चार पांच इकडच्या बाजूंस, चार पांच तिकडच्या बाजूंस, असें जमूं. नंतर आपणाला आज आनंदाची खबर देणारा हा जवान आणि मी, असें तें घर एकदां पाहून येऊं; म्हणजे मग आपल्याला पुढील बेत ठरवावयास ठीक पडेल.'

नायकाचा हा बेत सर्वांना पसंत पडून ते लागलेच सज्ज झाले. ते दोन दोन, तीन तीन मिळून निघाले, व प्रत्येकजण एकमेकां पासून बऱ्याच अंतरानें चालत असल्यामुळें यांच्या कटाचा कोणास तिळमात्रही संशय न येतां ते शहरांत नेमलेल्या ठिकाणीं जाऊन पोहोंचले. नाईक व सकाळीं गेलेला तो हेर हे सर्वांच्या मागून आले. अलीबाबाचें घर ज्या पेठेंत होतें तेथें तो हेर नायकाला घेऊन गेला. ते रस्त्यानें चालले असतां, मार्ग्यांना हिनें ज्या

घराच्या दरवाज्यांवर खडूच्या खुणा केलेल्या होत्या त्यांपैकीं पहिलें घर त्यांच्या नजरेस पडतांच; 'तेंच आपल्या वैऱ्याचें घर आहे' असें त्यानें नायकाला सांगितलें. पण आपला कोणाला अंदेशा येऊं नये म्हणून ते तेथें न थांबतां तसेंच हळुहळूं पुढें चालले; तों दुसऱ्या घरच्या दरवाज्यालाही तशीच व त्याच ठिकाणीं खडूची खूण केलेली त्यांच्या दृष्टीस पडली! तेव्हां नायकानें त्या हेराला विचारलें, 'कोणचें तें घर? मागचें कां हें?' त्यावरून तो बुचकळ्यांत पडून गेला, व काय उत्तर द्यावें हें त्याला सुचेना; व व पुढें जेव्हां आणखीही पांच सहा घरांच्या दरवाज्यांवर अगदीं तशाच प्रकारच्या खुणा केलेल्या त्यांना आढळल्या, तेव्हां तर त्या हेराचा जो कांहीं घोंटाळा होऊन गेला तो सांगतां पुरवत नाहीं! तो नायकास म्हणाला, "मी शपथपूर्वक सांगतों कीं, मीं जी खूण केली, ती एकाच दरवाज्याला केली; असें असतां आणखी ह्या तशाच प्रकारच्या खुणा कोणीं केल्या, हें कांहींच मला समजत नाहीं! तसेंच, यांपैकीं मी केलेली खूण कोणती, हेंही पण मला आतां सांगतां येत नाहीं!'

आपला यत्न निष्फळ झाला असें पाहून नाईक हा, शहराच्या चौकांत जेथें त्याची मंडळी घिरटया घालीत होती तेथें ताबडतोब गेला; आणि जो मनुष्य प्रथम त्याला भेटला, त्यास त्यानें सांगितलें कीं,' आपला यत्न व्यर्थ झाला,तर आतांच्या आतां सर्वांनीं गुहेकडे चलावें.' याप्रमाणें सांगून तो स्वतः पुढें झाला; व बाकीचे लोक जसे आले होते तसे त्याच्या मागून निघून गेले.

ते सर्व रानामध्यें एकत्र जमल्यावर नायकानें परत येण्याचें सर्व कारण त्यांस सांगितलें. तेव्हां पूर्वीच्या ठरावाप्रमाणें, त्या हेराला मरणाची शिक्षा असावी, असें सर्वानुमतें ठरलें. त्यानें स्वतःलाही 'आपण घ्यावी तितकी काळजी घेतली नाहीं सबब आपण गुन्हे-गार आहों,' असें कबूल केलें, आणि त्याचें डोकें उडविण्याकरितां

ज्या मनुष्याची योजना झाली होती, त्यापुढें त्यानें तें मोठ्या दिल-दारीनें हजर केलें.

तथापि कांहीं झालें तरी आपल्या वैऱ्याचा सूड घेतल्यावांचून इलाज नाहीं; कारण, तसें न केलें तर त्यापासून आपल्याला फार धोका आहे, असें समजून त्या लोकांपैकीं आणखी एक असामी उठला, आणि मी हें काम हटकून तडीस नेतों, असें म्हणाला. तें सर्वांना मान्य होऊन त्यांनीं त्याला जावयास परवानगी दिली. त्यानें पहिल्या मनुष्याप्रमाणेंच बाबा मुस्तफा याची मूठ दाबिली व त्यानें त्याला अलीबाबाचें घर दाखविलें. तेव्हां त्यानें कोणाच्या दृष्टोत्पत्तीस न येईल अशा ठिकाणीं अलीबाबाच्या दरवाज्यावर कावेची खूण केली, आणि तो परत गुहेकडे चालता झाला.

इकडे, तो चोर गेल्यावर थोडक्याच वेळानें, कांहीं कामाकरितां बाहेर गेलेली मार्ग्याना परत आली, तों दरवाज्यावरची ती कावेची खूण तिच्या नजरेस पडली. तिची तीक्ष्ण नजर व विलक्षण चलाखी यांपुढें ती कसली छपली जाते ! ती पाहतांच, तिनें पूर्वीप्रमाणेंच आपल्या मनाशीं विचार करून शेजारच्या इकडच्या बाजूच्या कांहीं दरवाज्यांना व तिकडच्या बाजूच्या दरवाज्यांना तसल्याच प्रकारच्या व त्याच ठिकाणीं कावेच्या खुणा केल्या.

इकडे तो चोर रानांत आपल्या मंडळीकडे आला, आणि 'आपण खूप सावधगिरी केली आहे' अशी बढाई मिरवूं लागला. तो म्हणाला, 'या वेळेस तर आपलें काम होण्याविषयीं शंकाच नको !' त्यावरून नाईक व बाकीचे लोक ह्यांनाही वाटलें कीं, आतां आपला वैरी खास जिवंत रहात नाहीं. मग ते लागलेच पूर्वीप्रमाणेंच शहरांत गेले. पण तो हेर व नाईक हे दोघे जों अलीबाबाच्या घरापाशीं आले, तों तें ओळखण्याची त्यांनी पूर्वीप्रमाणेंच पंचाईत पडली ! त्यावरून नाईक अतिशय संतापून गेला, आणि तो हेर आपल्या पूर्वीच्या सोबत्याप्रमाणेंच अगदीं गोंधळून गेला.

याप्रमाणें नाईक व त्याचे लोक यांना फिरून हिरमुसलें तोंड

करून रानांत जावें लागलें, व त्या हेराच्या हातून काम शेवटास गेलें नाहीं म्हणून त्यालाही आपल्या दोस्ताच्या भेटीस जाण्याची तयारी करावी लागली. त्यानें बिलकूल 'ना नू' न करितां आपल्या नशिबीं आलें होतें तें निमूटपणें भोगलें.

नायकानें असा विचार केला कीं, आपल्या वैऱ्याच्या घराचा थांग लावण्याचे कामीं आपल्या टोळींतले दोन जवान आज नाहीं-तसे झाले, आणि यापुढेंही आपण तें काम त्यांजवरच सोंपाविलें तर कदाचित् आणखीही कित्येक नाहींतसे होतील. तर हें उपयोगाचें नाहीं. हे लोक लठ्ठालठ्ठीच्या कामाला मात्र चांगले, अकलेच्या कामांत यांचा कांहींएक उपयोग नाहीं; यास्तव हें काम आपणच जातीनिशीं अंगावर घ्यावें हा उत्तम मार्ग होय.'

याप्रमाणें त्याचा निश्चय ठरल्यावर तो बाबा मुस्तफा याच्याकडे आला, व त्याच्या साहाय्यानें त्यानें अलीबाबाचें घर शोधून काढिलें. तेथें कांहीं निशाणी वगैरे करण्याच्या भरीस तो मुळींच पडला नाहीं तर त्या घरावरून पांच चार वेळां जाऊन येऊन त्याच्या खाणाखुणा त्यानें इतक्या चांगल्या रीतीनें बघून घेतल्या कीं, त्याविषयीं भ्रांति पडण्याची त्यास मुळींच शंका राहिली नाहीं.

आपल्याला जो कांहीं शोध पाहिजे होता तो लागला असें पाहून नायकाला मोठें समाधान वाटलें; व तो त्याच पावलीं रानांत निघून गेला. मंडळी त्याची वाट पाहूनच होती. त्यांना तो म्हणाला, 'गडथांनो, आतां तुमच्या शत्रूचीं शंभर वर्षें भरलीं असें खास समजा. मीं तें घर अगदीं पक्कें ध्यानांत ठेवलें आहे, व रस्त्यानें येतां येतां पुढें कसें काय करावयाचें त्याचीही योजना करून ठेविली आहे; ती मी तुम्हांला सांगतों. तिच्याहून जास्त चांगली युक्ति कोणाला सुचेल तर त्यानें ती सुचवावी.' मग त्यानें आपण केलेली योजना त्यास सांगितली व ती त्यांस पसंत पडली. नंतर त्यानें त्यांना आसपासच्या गांवीं जाऊन एकोणीस खेचरें व अड-

तीस मोठमोठे बुधले—त्यांपैकीं एक तेलानें भरलेला व बाकीचे रिकामे—याप्रमाणें खरेदी करून आणण्यास सांगितलें.

दोन तीन दिवसांत त्या चोरांनीं खेंचरें व बुधले विकत आणिले.

बुधल्यांचीं तोंडें बेताचीं मोठीं करविलीं. नंतर एकएक बुधल्यांत एकएक असामी जरूरीपुरतीं हत्यारें देऊन बसविला. त्यांना आंत हवा येण्याकरितां त्यानें त्या बुधल्याची शिवण ठिकठिकाणीं उसविली; आणि कोणास कांहीं संशय येऊं नये म्हणून, ज्या एके बुधल्यांत तेल भरलें होतें, त्या तेलानें बाहेरून ते सगळे बुधले माखून टाकिले.

याप्रमाणें तयारी झाल्यानंतर त्या एकोणीस खेंचरांवर सदतीस चोर घातलेले बुधले व एक तेलाचा बुधला असे अडतीस बुधले नायकानें चढविले. नंतर तो खेंचरें घेऊन निघाला, आणि संकेताप्रमाणें दिवेलागणीला शहरांत येऊन दाखल झाला. तो अलीबाबाच्या दरवाज्यापाशीं आला, तों अलीबाबा आयताच ओट्यावर हवा खात बसलेला त्याच्या दृष्टीस पडला. नायकानें आपलीं खेंचरें उभीं केलीं आणि त्यास म्हटलें, ‘ उद्यांच्या बाजारांत विकण्याकरितां मीं तेल भरून आणिलें आहे. मी फार लांबून आल्यामुळें अगदीं थकून गेलों आहे; व आतां रात्रही झाली आहे, यामुळें उतरण्याला जागा मिळण्यास मला फार त्रास पडणार आहे. तर आपण तसदी सोसून रात्रची रात्र मला आपल्या येथें राहायाला जागा द्याल, तर आपले मजवर फार उपकार होतील. ’

अलीबाबा यानें त्या चोरांच्या नायकाला रानांत जरी पाहिलें होतें व त्याचें बोलणेंही ऐकिलें होतें, तरी तो या वेळीं त्याला बिलकूल ओळखूं आला नाहीं. तो म्हणाला कांहीं चिंता नाहीं. रात्रच्या रात्र खुशाल रहा; घर तुमचें आहे. ’ असें म्हणून त्यानें दरवाजा उघडून त्यास खेंचरें आंत घेऊन येण्यास सांगितलें, आणि लागलीच अबदल्ला नांवाच्या आपल्या गुलामाला हांक मारून तो म्हणाला, ‘ अबदल्ला, यांच्यावरचे बुधले उतरले म्हणजे यांना तबेल्यांत नेऊन बांध, व यांना चंदी व वैरण घाल. ’ नंतर तो मार्ग्यांना

दासीकडे जाऊन तीस म्हणाला, , ' आज आपल्या येथें पाहुणे आले आहेत, त्यांच्याकरितां कांहीं गोडधोड कर व त्यांच्या आंथरुणापांघरुणाची तजवीज ठेव. '

अलीबाबा इतकेंच करून राहिला नाहीं, तर खेंचरांवरचे बुधले उतरून त्यांची व्यवस्था लावल्यावर नाईक हा तेथेंच कोठें रात्रीं निजण्याकारितां जागा पहातो आहे असें पाहून तो त्यास म्हणाला, ' वाहवा ! तुम्ही का येथें अंगणांत पडून रहाणार ? छिः तें कधींही होणार नाहीं ! चला, जेवणाची तयारी होईपर्यंत आपण दिवाणखान्यांत गप्पा मारीत बसूं. जेवण झालें म्हणजे आमची दासी तुम्हांला बिछाना घालून देईल त्यावर तुम्ही स्वस्थ निजून रहा. ' नाईक म्हणाला, ' माफ करा. इतकी तसदी आपल्याला देणें मला प्रशस्त दिसत नाहीं. ' त्याच्या या बोलण्याचा वास्तविक अर्थ निराळाच होता. त्याला वाटलें कीं, आपण जर आंत निजलों तर आपला बेत सिद्धीस नेण्यास आपल्याला अडचण पडेल, व म्हणून तो त्या गोष्टीची होईल तितकी टाळाटाळ करूं पहात होता पण अलीबाबा ऐकेनाच, तेव्हां त्याला त्याच्या म्हणण्यास रुकार देणें भाग पडलें.

नंतर त्या हरामखोराला अलीबाबानें दिवाणखान्यांत नेलें, व तेव्हांपासून जेवण होईपर्यंत त्यानें त्याच्याशीं इकडच्या तिकडच्या पुष्कळ अघळपघळ व मोकळ्या मनानें गप्पा मारिल्या. जेवण झाल्यावर तो नायकास म्हणाला, ' तुम्ही आज सारा दिवस चालून दमलां आहां, तर आतां जाऊन निजा. ' असें म्हणून तो उठला, आणि स्वयंपाकघरांत मार्गीना होती, तिकडे जाऊन तिला त्यानें सांगितलें कीं, ' उद्यां सकाळीं दिवस उगवण्यापूर्वीं मला स्नान करावयाचें आहे. तेव्हां त्याची सर्व तयारी ठेवण्याविषयीं अबदल्ला यास सांग; व स्नान झाल्यानंतर मला पिण्याकारितां छानदार रसाही आतांच्या आतांच करून ठेव. ' याप्रमाणें तिला ताकीद देऊन तो निजावयास गेला.

अल्लीबाबा उठला त्याच वेळीं नाईकही उठून त्याजबरोबर खालीं आला; आणि अल्लीबाबा आंत मार्ग्याना हिजकडे गेला तों हा खेंचराकडे जाण्याच्या मिषानें अंगणांत निघून आला. मग अल्लीबाबा निजावयास गेला असें पाहून तो हळूंच प्रत्येक बुधल्यापाशीं जाऊन म्हणाला, 'मी ज्या खोलींत निजतों आहे तेथून मी खडे फेंकीन. ते वाजल्याबरोबर तुम्ही आपल्याजवळ जे अणकोचीदार सुरे घेतलेले आहेत त्यांनीं बुधले फोडून बाहेर या; इतक्यांत मी तुमच्याकडे येईन.' याप्रमाणें सांगून तो आंत गेला. तेव्हां मार्ग्याना हिनें दिवा घेऊन जिथें त्याचा बिछाना घातला होता ती खोली त्याला दाखविली, आणि त्याला कांहीं हवें नको विचारून ती परत आली. नायकानें कोणाला आपल्याबद्दल संशय येऊं नये म्हणून दिवा मालवून टाकिला, व पहिली झोंप झाल्याबरोबर आपल्या उद्योगाला उठण्याच्या तयारीनें पांघरूण घेऊन तो स्वस्थ निजून राहिला.

इकडे मार्ग्याना हिनें अल्लीबाबाच्या स्नानाची तायरी ठेवण्याविषयीं अबदल्ला यास सांगून आपण रसा तयार करण्याच्या कामास लागली. तो अर्धा तयार होतो इतक्यांत दिव्यांतील तेल सरल्यामुळें तो विझला. ती तेलाच्या भांड्यांत पहाते तों त्यांतलेंही तेल संपलें होतें. तेव्हां अबदल्ला तिला म्हणाला, 'आतां अंधेरांतून जाऊन कोठींतील तेल अथवा मेणबत्ती आणण्याची खटपट करण्यापेक्षां बाहेर तलाचे बुदले पडले आहेत त्यांतून थोडेसें आणीनास परतें!'

मार्ग्याना म्हणाली, 'शाबास अबदल्ला! तूं या वेळेस माझा त्रास चुकाविलास यांत संशय नाहीं.' नंतर अबदल्ला निजावयास चालता झाला व मार्ग्याना ही तेलाचें भांडें घेऊन, बुधले ओळीनें लाविलेले होते त्यांपैकीं पहिल्या बुधल्यापाशीं आली तों आंतील चोरानें 'वेळ झाली का?' असें हळूच विचारिलें.

तो चोर जरी हळूं बोलला, तरी तें मार्ग्याना हिला चांगलें ऐकूं आलें. त्या प्रसंगीं दुसरें कोणी मनुष्य असतें तर, बुधल्यांतून मनु-

च्याचा आवाज ऐकूं आल्याबरोबर अतिशय घाबरून जाऊन त्यानें मोठ्यानें किंकाळी फोडली असती; व त्यापासून अर्थातच भयंकर परिणाम झाला असता; पण मार्ग्यानाचें धैर्य व प्रसंगावधान हीं कांहीं अलौकिक होतीं, यामुळें तो अनर्थ टळला.

मार्ग्याना हिनें विचार केला कीं, अलीबाबा व त्याच्या घरचीं सर्व माणसें ह्यांच्यावर हा मोठा कठिण प्रसंग आलेला आहे, तर त्याजबद्दल बोभाटा न करितां मोठ्या सावधगिरीनें त्याचें निवारण करण्याचा कांहीं उपाय योजिला पाहिजे. ती मोठी चलाख बुद्धीची असल्यामुळें तिला तेव्हांच उपाय सुचला. मग तिनें हुबेहूब नायकाच्या सारखा आवाज काढून त्या बुधल्यांत असलेल्या चोरास जबाब दिला कीं, ‘ नाहीं, अजून थोडा अवकाश आहे. ’ ती दुसऱ्या बुधल्यापाशीं गेली, तों त्यांतूनही पहिल्याप्रमाणेंच सवाल झाला, व त्यासही तिनें तोच जबाब दिला. अशा प्रकारें ती सदतीस बुधल्यांपाशीं गेली; तेव्हां प्रत्येकांतून तोच सवाल तिला झाला व तिनें त्यास तोच जबाब दिला.

शेवटीं अडतिसाव्या बुधल्यापाशीं ती आली; पण त्यांतूल सवाल वगैरे कांहींएक झाला नाहीं; कारण, त्यांत तेल भरलेलें होतें.

ह्या सर्व प्रकारावरून मार्ग्याना हिच्या लक्षांत आलें कीं, आपला धनी अलीबाबा ह्यानें जो व्यापारी म्हणून रात्रची रात्र राहून घेतला तो मुळींच व्यापारी नसून हें एकंदर अडतीस चोर त्यानें आज घरांत घेतले आहेत, व यांपैकीं आंतला मनुष्य बाकीच्यांचा नाईक आहे. मग तिनें जलदी करून आपल्याजवळचें तेलाचें भांडें त्या शेवटच्या बुधल्यांतल्या तेलानें भरलें आणि ती स्वयंपाकघरांत आली. नंतर तिनें दिवा लावला, व एक मोठी थोरली कढई घेऊन ती फिरून त्या तेलाच्या बुधल्यापाशीं आली. ती कढई तिनें तेलानें भरली व चुलाणांत मोठमोठे ओंडे घालून खूप मोठा जाळ केला, व त्यावर तिनें तें तेल कढत ठेविलें. तें खूप सळसळल्यावर आंतला

चोर भाजून मरून जाईल इतकें तें तिनें प्रत्येक बुधल्यांत नेऊन ओतिलें.

मार्ग्याना हिनें हें काम मोठ्या धैर्यानें व किंचित्‌ही बोभाटा न करितां शेवटास नेल्यावर ती परत स्वयंपाकघरांत आली, आणि तिनें दार बंद केलें. नंतर मोठा थोरला जाळ जो तिनें केला होता तो कमी करून रसा काढण्यापुरता तेवढा ठेविला, व दिवा मालवून, पुढें काय प्रकार होतो तो स्वयंपाकघराच्या खिडकींतून पाहण्याकरितां ती तशीच गुपचिप बसून राहिली.

नंतर अर्धी घटका लोटली नाहीं तों नाईक उठला, आणि खिडकी उघडून पहातो तों चोहोंकडे दिवे वगैरे मालविले असून सर्व सामसूम झालें आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्यावरून त्यानें पूर्वीच्या संकेताप्रमाणें आपल्या साथीदारांस इशारा करण्याकरितां खिडकींतून खडे फेंकिले. त्यांपैकीं कित्येक बुधल्यांना लागले, कारण त्यांचा आवाज स्पष्ट ऐकूं आला. मग त्यानें कानोसा घेऊन पाहिलें, पण बुधल्यांतल्या मंडळींची कांहीं हालचाल ऐकूं न आल्यामुळें त्याला फारच आश्चर्य वाटलें. तेव्हां त्यानें फिरून आणखी एक दोन वेळां खडे फेंकिले. पण पूर्ववत्‌ बुधले आपले जसेचे तसे! हें पाहून तो अतिशय घाबरला, आणि तसाच पाय न वाजवितां खालीं अंगणांत आला. तो पहिल्या बुधल्यापाशीं गेला, आणि त्याचें झांकण काढून आंतील चोरास ( तो अर्थात्‌ जिवंत आहे असें समजून ), ‘ तुला झोंप लागली आहे कीं काय ? ’ असे विचारूं लागला, तों त्याला वस्सादिशीं त्या कढलेल्या तेलाची घाण आली! त्यावरून त्यानें ताडिलें कीं, अलीबाबास ठार मारून त्याचें घर लुटण्याचा जो आपण बेत केला होता तो खास फुटला. मग त्यानें सर्व बुधले क्रमानें उघडून पाहिले, तों त्यांतील एकूणएक असामींचे मुडदे पडलेले त्याच्या नजरेस पडले; आणि शेवटचा म्हणजे तेलाचा बुधला जेव्हां त्यानें रिकामा झालेला पाहिला, तेव्हां हा सर्व प्रकार कसकसा घडला असावा याची त्यानें सहज कल्पना केली. आपला

बेत फसला असें पाहून तो पराकाष्ठेचा खिन्न झाला, आणि अंगणाच्या भिंतीवरून पलीकडल्या बागेंत उडी मारून तेथून त्यानें आपली सुटका करून घेतली.

बराच वेळ झाला तरी नाईक परत येत नाहीं, व अंगणांत असल्याचीही कांहीं हालचाल ऐकूं येत नाहीं, असें पाहून माग्यांना हिनें तर्क केला कीं, दरवाज्याला कुलूप असल्यामुळें त्यानें भिंतीवरून उडी मारून बागेंतून पोबारा केला असावा. मग आपल्या धन्याचें व त्याच्या कुटुंबाचें रक्षण करण्याचें काम उत्तम प्रकारें शेवटास गेलें असें पाहून तिला मोठा आनंद झाला, व ती आपल्या खोलींत जाऊन स्वस्थ निजली.

सकाळीं दिवस उगवण्यापूर्वीं अलीबाबा उठला, आणि शौचमुखमार्जन वगैरे करून स्नानास गेला. त्याला रात्रीं घडलेल्या विलक्षण गोष्टीची वार्ताही माहीत नव्हती. कारण, माग्यांना हिला त्या वेळीं एकएक पळ सोन्याचें होतें, सबब ती त्या वेळेस त्यास उठवावयास गेली नाहीं. पुढें जेव्हां सगळी वारासार झाली, तेव्हां तिनें विचार केला कीं, आतां उगीच ह्याची झोंप मोडून तरी काय करावयाचें आहे ?

अलीबाबा ह्याला स्नानाला पाणी व कपडे वगैरे देण्यास अबदल्ला होताच. त्याचें स्नान होऊन कपडे घालून आला तो दिवस उगवला तेव्हां अंगणांतले बुधले जसेचे तसे पडलेले पाहून, तो व्यापारी अजून आपला माल घेऊन बाजारांत कसा गेला नाहीं, याचें त्याला मोठें आश्चर्य वाटलें. त्यानें माग्यांना हिला त्याचें कारण विचारलें. ती म्हणाली, ' महाराज, तुमचें व तुमच्या कुटुंबाचें देव रक्षण करो ! तुम्ही मला जें काय विचारितां त्याचें उत्तर देण्यापूर्वीं मी तुम्हाला कांहीं दाखवितें, तेवढें आधीं पहा, म्हणजे मी काय सांगतें तें चांगलें तुमच्या लक्षांत येईल ! '

असें म्हणून तिनें त्याला पहिल्या बुधल्यापाशीं नेलें, आणि, ' यांत तेल आहे कीं काय तें पहा. ' असें ती म्हणाली. तो जों

डोकावून पाहतो तों आंत मनुष्य ! त्यावरून तो एकदम दचकला आणि मागें सरला; व 'हें काय बोवा लचांड !' असें मोठ्यानें ओरडला. मार्ग्याना म्हणाली, 'महाराज, भिऊं नका; त्या मनुष्यापासून तुम्हाला अगर दुसऱ्या कोणालाही इजा होणें शक्य नाहीं. तो मेलेला आहे.' अलीबाबा म्हणाला, 'अग मार्ग्याना, हें प्रकरण तरी काय ? मला तर कांहींच समजत नाहीं !' मार्ग्याना म्हणाली, 'मी तें सर्व तुम्हाला सांगतें. पण तुम्ही जरा हळू बोला. कारण याविषयीं वार्ता बाहेर फुटणें अगदीं उपयोगाचें नाहीं. प्रथम तुम्ही या एकूणएक बुदल्यांत काय आहे तें बघा पाहूं !'

त्यावरून अलीबाबा एकेक बुधल्यांत डोकावून पाहूं लागला, तों सर्व मुडदेच मुडदे त्याच्या दृष्टीस पडत चालले ! शेवटच्या बुधल्यांत मात्र तेल असून तें बरेंच कमी झालें आहे असें त्याला दिसून आलें. याप्रमाणें सर्व बुधले पाहून झाल्यावर तो आपल्या ठिकाणीं फार आश्चर्यचकित होऊन स्तब्ध राहिला. ही भानगड असावी तरी काय, याचा त्याला कांहींच तर्क होईना ! त्याची मति अगदीं गुंग होऊन गेली ! तो त्या बुधल्याकडे पाही, व फिरून मार्ग्याना हिजकडे पाही. असा तो भांबावल्यासारखें करूं लागला. मग जरा मन स्थिर झाल्यावर तो म्हणाला, 'पण त्या व्यापाऱ्याचें काय झालें ?'

मार्ग्याना हिनें उत्तर केलें, 'अहो, व्यापारी कसला तो ? पक्का तोतया. खरोखर कोण होता तें मी तुम्हाला सर्व सांगतें. पण तुमचो रसा घ्यावयाची वेळ झाली आहे, तर तो तुम्ही अगोदर घ्या. नाहीं तर तुमची प्रकृति बिघडेल. चला कसे घरांत ?'

त्यावरून अलीबाबा आपल्या खोलींत गेला, व मार्ग्याना ही स्वयंपाकघरांतून रसा घेऊन त्याजकडे आली. पण ती गोष्ट ऐकण्याची त्याला फारच उतावळी झाल्यामुळें तो तिला म्हणाला, 'मी रसा इतक्यांत घेत नाहीं. अगोदर तें सर्व गूढ मला स्पष्ट करून सांग.'

तेव्हां माग्र्याना हिनें रात्रीं घडलेली इत्थंभूत हकीकत त्यास सांगितली; आणि ती म्हणाली, ' दोनतीन दिवसांपूर्वी माझ्या मनांत आलेंच होतें कीं, कोणा दुष्टाची आपल्या घरावर नजर आहे. पण त्या वेळीं मला त्या गोष्टीचें विशेष महत्त्व न वाटून मीं तुम्हांला सांगितलें नाहीं. तथापि, मीं आपल्याकडून सावधागिरी केलेली होती. ' नंतर दरवाज्यावर प्रथम खडूची व पुढें कावेची अशा खुणा केलेल्या पाहून, त्याचा कांहीं उपयोग होऊं नये म्हणून आपण काय खुबी केली होती तो सर्व प्रकार तिनें त्याला सांगितला. मग ती म्हणाली, ' ह्या दोन्ही गोष्टी जुळवून पाहिल्या असतां असें दिसतें कीं, हा सर्व त्या रानांतल्या चोरांचा कट असावा. त्यांच्यापैकीं दोघेजण कमी झाले असावे असें दिसतें; व कदाचित् ते असले तरी एकंदर आतां ते तिहींपेक्षां जास्त राहिले नाहींत. ह्या सर्व हकीगतीवरून तुमच्या जिवावर ते उठले होते हें स्पष्ट दिसतें व त्यांच्यापैकीं एकूणएकाची वाट लागेपर्यंत तुम्ही फार सावधागिरीनें राहिलें पाहिजे. मीही तुमच्या बचावाकरितां आपल्याकडून होईल तितकी खबरदारी ठेवतेंच; कारण तें माझें कर्तव्यकर्मच आहे. '

तिचें हें बोलणें ऐकून अलीबाबा ह्याला मोठा गहिंवर आला. आणि तो तिला म्हणाला, ' माग्र्याना, तुझे आज मजवर जे उपकार झाले आहेत त्यांचें वर्णन करणें केवळ अशक्य आहे ! तूंच होतीस म्हणून आज माझा जीव वांचला ! हे तुझे उपकार मी पूर्णपणें लौकरच फेडीन; पण सध्यां मी तुला इतकेंच सांगतों कीं, ह्या वेळेपासून मीं तुला दास्यमुक्त केलें आहे. तुझ्याप्रमाणेंच मलाही वाटतें कीं, त्या चाळीस चोरांनींच माझा जीव घेण्याकरितां ही सर्व खटपट केलेली होती. पण परमेश्वरानें तुला बुद्धि व सामर्थ्य देऊन तुजकडून माझें संरक्षण करविलें हे त्याचे मजवर अनंत उपकार आहेत. याप्रमाणें पुढेंही तो माझें संरक्षण करून जे चोर बाकी राहिले आहेत त्यांचे बेत निष्फळ करील व पूर्वीप्रमाणें त्यांचीही वाट लावून ह्या मानवरूपी राक्षसांपासून जगाला सोडवील, अशी

मला आशा आहे. बरें असो, सध्यां हे मुडदे गाडून टाकावयाचें काम पहिल्यानें केलें पाहिजे; व तें अगदीं गुप्तपणें झालें पाहिजे. याकरितां मी स्वतःच अबदल्ला ह्याला मदतीस घेऊन तें करून टाकितों.'

अलीबाबा ह्याची बाग फार मोठी असून तिच्या शेवटीं मोठमोठीं पुष्कळ झाडें होतीं. ह्या झाडांखालीं तो व त्याचा गुलाम ह्या दोघांनीं मिळून एक मोठा खाडा खणला, आणि बुधल्यांतून तीं प्रेतें काढून त्यांत टाकून दिलीं, व वरतीं ती माती लोटून जमीन पहिल्यासारखी केली. बुधले व त्यांत जीं हत्यारें होतीं तीं अलीबाबानें घरांत लांब एकीकडे नेऊन ठेविलीं, आणि खेंचरांचें त्याला कांहीं काम नव्हतें म्हणून त्यानें तीं एकेक, दोनदोन याप्रमाणें गुलामाबरोबर बाजारांत पाठवून विकून टाकिलीं. अशा प्रकारें त्यानें सर्व जिकडच्या तिकडे केलें.

इकडे तो चोरांचा नाईक पराकाष्ठेचा खिन्न होऊन परत रानांत गेला. तो गुहेपाशीं गेला, तों त्याला एकट्याला त्या भयाण जागेंत उभें देखील राहवेना! त्याला आपल्या सोबत्यांच्या भयंकर परिणामाच्या दुःखाचा उमाळा येऊन तो म्हणाला, 'माझ्या जीवास जीव देणाऱ्या शूरांनो, तुम्ही कोठें गेला! तुमच्या वांचून मी आतां काय करूं! तुमच्यावर एकाएकीं घाला पडून तुमचा असा दुःखकारक शेवट होण्यासाठीं का रे मीं तुम्हांला आपल्या संगतीस घेतलें? तुम्ही आपल्या तरवारी हातांत घेऊन शौर्यानें लढत असतां प्राणास मुकला असतां तर मला एवढें वाईट वाटलें नसतें! आतां तुमच्यासारखे पराक्रमी लोक पुनः मला मिळतील काय? आणि जरी मिळतील असें समजून मी ते मिळविण्याच्या उद्योगास लागलों, तरी त्याचा काय उपयोग? माझी पहिल्यासारखी जमात होईपर्यंत, जो माझा हाडवैरी येथून चोरी करून जाऊन गबर होऊन बसला आहे, तो माझ्या मागें येऊन हें अपार द्रव्याचें भांडार सर्व लुटून नेईल! तर हें कांहीं कामाचें नाहीं;

मला सर्व गोष्टी एकीकडे ठेवून त्या चांडाळाचा जीव अगोदर घेतला पाहिजे. तें काम जरी इतक्या मर्दांच्या मदतीनें मला शेवटांस नेतां आलें नाहीं, तरी मी धैर्य सोडीत नाहीं. मी एकटा तें पार पाडीन; व अशा प्रकारें हें द्रव्य जाण्याची भीति नाहींशी झाली म्हणजे, माझ्यामागें त्याचें संरक्षण करण्यास व तें पुढें पिढ्यान्‌पिढ्या पुरण्यासाठीं त्यांत आणखी भर घालण्यास मी त्याला नवीन अधिकारी करून ठेवीन.' असा त्यानें निश्चय केल्यानंतर तो सिद्धीस कसा न्यावा याविषयीं लागलीच एक छानदार युक्ति त्यानें काढिली. तेव्हां पुढील जयाच्या आशेनें त्याला मोठा आनंद होऊन त्या रात्रीं त्याला स्वस्थ झोंप लागली.

दुसरे दिवशीं सकाळीं तो उठला, आणि रात्रीं योजना करून ठेवल्याप्रमाणें आपल्या उद्योगास लागला. तो मोठ्या श्रीमान् व्यापाऱ्याचा वेष घेऊन शहरांत आला, व एका भटारखान्यांत उतरला. अल्लीबाबाच्या घरांत घडलेल्या मागें सांगितलेल्या गोष्टीचा शहरांत बोभाटा झाला असावा असें त्याला वाटून, त्याविषयीं लोक काय म्हणतात त्याचा सुगावा काढण्याकरितां, शहरांत नवीन हालहवाल काय आहे याविषयीं त्यानें भटारखान्याच्या मालकापाशीं चौकशी केली. त्यानें याला पुष्कळ गोष्टी सांगितल्या, पण ह्याच्या मनांतील गोष्टीशीं त्यांचा कांहींएक संबंध नव्हता. यावरून त्याच्या लक्षांत आलें कीं, अल्लीबाबानें हें सर्व प्रकरण गुप्त ठेविलें आहे, कारण आपणाला द्रव्याचा खजिना सांपडला आहे हें जर लोकांना कळलें, तर तें आपणाला घातक होईल असें त्याला वाटलें असावें. तेव्हां तो मनांत म्हणाला, 'हें एक बरेंच झालें; कारण, त्या ठिकाणची तेथील द्रव्याची माहिती जितकी गुप्त राहील तितका आपला फायदाच आहे. आतां ज्या एका इसमाला ती माहिती झालेली आहे, तेवढा एकदां नाहींसा केला म्हणजे फिरून आपण पूर्वीप्रमाणें निर्वैर झालों तर हा बार होईल तितका लौकर उडवून दिला पाहिजे.

नंतर त्यानें एक घोडा विकत घेतला आणि रानांत कित्येक खेपा करून गुहेंतलें नानाप्रकारचें उंची कापड तो घेऊन आला. हा माल कोठून आणिला हें लोकांस कळूं न देण्याविषयीं त्यानें अतिशय खबरदारी ठेविली होती. तो माल हवा तेवढा आणिल्यावर त्यानें एक मोठें दुकान भाड्यानें घेतलें, व त्यांत तो विकण्याकरितां ठेविला. हें दुकान कासिम ह्याच्या दुकानाच्या म्हणजे जें अलीबाबानें नुकतेंच आपल्या मुलाच्या स्वाधीन केलें होतें त्याच्या समोर होतें.

नायकानें आपलें नांव ख्वोजा हुसेन असें लोकांत प्रसिद्ध केलें. कोणीही मनुष्य नवीनच एखाद्या व्यापारांत शिरला म्हणजे तो जसा इतर व्यापाऱ्यांशीं मोठ्या सभ्य रीतीनें व मिळून मिसळून वागतो, त्याप्रमाणें ख्वोजा हुसेन यानेंही केलें. तेव्हां अलीबाबाचा मुलगा सुशिल, आनंदवृत्ति व बोलूनचालून आणि दिसण्यांतही मोठा गोड असल्याकारणानें, व ख्वोजा हुसेन याला त्याच्याशीं पुष्कळ वेळां संभाषणाचा प्रसंग आल्याकारणानें त्या उभयतांचें लौकरच अतिशय संघट्टन पडलें.

अलीबाबा आपल्या मुलाच्या दुकानांत वारंवार येत असे. एके दिवशीं ख्वोजा हुसेन हा तेथें असतां अलीबाबा आला. त्यास ख्वोजा हुसेन यानें ओळखिलें, आणि 'हे गृहस्थ तुमचे कोण?' असें त्यानें त्याच्या मुलास विचारलें. त्यानें 'हे माझे वडील आहेत.' असें सांगितलें; त्यावरून ख्वोजा हुसेन हा त्या मुलाचें आपल्यावर प्रेम जडण्याकरितां हरप्रयत्न करूं लागला. तो त्याला मोठ्या ममतेनें कुरवाळी. केव्हां केव्हां त्याला कांहीं आणून देई व पुष्कळ वेळां त्याला आपल्या येथें जेवावयाला व फराळाला घेऊन जाई. सारांश, जशा प्रकारें ख्वोजा हुसेन यानें अलीबाबा ह्याच्या मुलास अगदीं आपलेंसें करून टाकिलें.

अलीबाबाच्या मुलाला वाटलें कीं, ख्वोजा हुसेन हा आपल्यावर इतकें प्रेम करितो व त्याचा जीव आपल्यासाठीं इतका तिळतिळ

तुटतो, असें असतां आपल्याकडून त्याचा कांहींच सत्कार होत नाहीं हें बरोबर नाहीं. त्याच्या मनांत त्याला एकदां आपल्या घरीं मेजवानीस बोलवावें असें होतें. सबब हा आपला बेत त्यानें आपल्या बापास कळविला, व तो म्हणाला, ' त्या गृहस्थाला आपण लौकरच एखादे दिवशीं बोलवावें हें मला बरें दिसतें. '

अलीबाबा ह्यानें मोठ्या आनंदानें ती गोष्ट कबूल केली. तो त्यास म्हणाला, ' ठीक आहे; उद्यां शुक्रवार आहे, तेव्हां दुकानें बंदच राहणार आहेत, तर तूं व तो गृहस्थ असे उद्यां संध्याकाळीं फिरावयाला निघा, आणि परत येतांना इकडून या. नंतर तसाच त्या गृहस्थाला घरांत बोलाव, व त्या बेतानें मी मार्ग्यांना हिला सांगून भोजनाची तयारी ठेवितों. त्याला मुद्दाम बोलावण्यापेक्षां असें सहजासहजीं घडवून आणिलें असतां त्यांत एक प्रकारची मौज आहे. '

याप्रमाणें संकेत ठरल्यावर दुसरे दिवशीं अलीबाबाचा मुलगा खोजा हुसेन यास बरोबर घेऊन फिरावयास निघाला. ते येतां येतां अलीबाबाच्या घरापाशीं आले. तेव्हां अलीबाबाच्या मुलानें दरवाजा ठोठावला; व तो खोजा हुसेन यास म्हणाला, ' हेंच आमचें घर. तुम्ही मजवर लोभ करतां हें मीं तीर्थरूपांस सांगितल्यावरून, तुमच्या मुलाखतीची त्यांना फार इच्छा झाली आहे. तर कृपा करून आंत चला, आणि घटकाभर त्यांची तुमची बैठक होऊं द्या. '

ह्या खोजा हुसेनाला हेंच पाहिजे होतें! त्याचा उद्देश असा होता कीं, कोणत्या तरी युक्तीनें अलीबाबाच्या घरीं जाण्याची संधि म्हणून आपल्या जिवाला तर धक्का न पोंहोंचेल व बाहेर बोभाटा न होईल अशा रीतीनें त्याला ठार मारून आपला कार्यभाग उरकून घ्यावा. तथापि बाह्यात्कारी आपली सात्त्विक वृत्ति दाखविण्याकरितां त्यानें फार आढेवेढे घेतले. व ' आजच्यानेंच काय झालें आहे, पुढें कधीं येईन, ' असें तो म्हणूं लागला. इतक्यांत एका गुलामानें येऊन दरवाजा उघडला.

तेव्हां अलीबाबाच्या मुलानें, 'कसेंही करून या वेळेस आलेंच पाहिजे,' असें म्हणून त्याचा हात धरून आंत नेलें.

अलीबाबानें खोजा हुसेन याचा मोठा सत्कार केला व त्याच्या येण्यानें आपल्याला फार आनंद झाला असें दर्शविलें. तो त्यास म्हणाला, 'तुम्ही माझ्या मुलावर लोभ करितां याबद्दल मी तुमचा फार फार आभारी आहें. तशांत तो अजून लहान आहे; त्याला जगाचा अनुभव नाहीं; यास्तव तुम्ही त्याला शिकवणीच्या गोष्टी सांगून शहाणा करीत आहां, हे तुमचे मजवर फारच मोठे उपकार आहेत.'

खोजा हुसेन यानेंही अलीबाबाच्या चांगुलपणाविषयीं त्याची ओतप्रोत स्तुति करून म्हटलें, 'तुमच्या मुलाला जरी अजून पोक्त मनुष्यासारखा जगाचा अनुभव नाहीं, तरी मी खचीत सांगतों कीं, त्याच्या अंगीं चातुर्य, समयसूचकता, आर्जवशक्ति इत्यादि गुण चांगले वसत असल्यामुळें, इतर लोकांना आपल्या अनुभवाचा जितका उपयोग होतो, तितका किंबहुना जास्त, याला त्या गुणांचा उपयोग होत आहे.' मग उभयतांच्या आणखी कांहीं इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर, खोजा हुसेन म्हणाला, 'बरें, येतों तर आतां.' अलीबाबा म्हणाला, 'अहो, इतक्यांत कोठें चालला? माझ्या मनांत तुम्ही आज आपल्या पंक्तीचा लाभ मला द्यावा असें आहे. माझी आपली मीठभाकरच आहे, पण मी ती खाण्याविषयीं प्रेमभावानें विनंति करीत आहे; तर माझ्या विनंतीचा अव्हेर होणार नाहीं अशी मला उमेद आहे.' खोजा हुसेन म्हणाला, 'तुमच्या प्रेमभावाविषयीं तर माझी पूर्ण खात्री आहे. पण तुम्ही मला हा आग्रह करूं नका, येवढें माझें तुमच्यापाशीं मागणें आहे. तुमचा शब्द खालीं पाडावा अशा उद्देशानें मी म्हणतों असें नाहीं, तर त्याला कांहीं कारण आहे; व तें तुम्हांला कळलें म्हणजे तुम्हीही माझें म्हणणें कबूल कराल.'

अलीबाबा म्हणाला, 'काय बोवा, असें कारण तरी काय आहे तें कळूं द्या तर खरें!' खोजा हुसेन यानें उत्तर केलें, 'कारण

इतकेंच आहे कीं, मीठ घातलेला पदार्थ मीं वर्ज्य केलेला आहे. तेव्हां यावरून तुमच्या पंक्तीस बसून मी काय खाणार तें तुम्हीच पहा बरें.' अलीबाबा म्हणाला, ' अं: एवढेंच ना ! मग त्यांत काय आहे ? आमच्या येथें मुळीं अशी चाल आहे कीं, पदार्थ शिजल्यावर मग त्यांत मीठ घालावयाचें, तर तुमच्यापुरते पदार्थ मीठ घालण्यापूर्वी एकीकडे काढून ठेवायला सांगतों म्हणजे झालें, मग तर कांहीं हरकत नाहीं ना ? बसा तर मग. मी इतक्यांत घरामध्यें याप्रमाणें ताकीद देऊन येतों. '

असें म्हणून अलीबाबा स्वयंपाकघरांत मार्ग्याना हिजकडे गेला, आणि त्यानें तिला तसें करण्यास सांगितलें. आपल्या धन्याची आज्ञा शिरसामान्य करण्यापलीकडे मार्ग्याना हिला दुसरें कांहीं माहीत नव्हतें; तथापि त्याचें सांगणें तिला मोठें चमत्कारिक वाटून ती त्याला म्हणाली, ' असला आळणी जेवणारा मनुष्य कोठचा तुम्हीं आणिलेला आहे ? ' अलीबाबा म्हणाला, ' अग, असें म्हणूं नको; तो चांगला संभावित गृहस्थ आहे. त्याला मीठ नको तर आपलें तरी काय जातें ? त्याला संतोष होईल तें आपल्याला करावयाचें.' मार्ग्याना पुढें काय बोलते ? तिला धन्यानें सांगितल्याप्रमाणें करणें भाग पडलें. तथापि हा असला मनुष्य आहे तरी कोण हें एकदां पहावें अशी तिला इच्छा झाली. मग अबदल्ला व ती ताटें मांडीत असतां तिनें खोजा हुसेन याजकडे पाहिलें, तों त्याचा वेष जरी अगदीं निराळा होता तरी, हा त्या चोरांचा नाईक आहे असें तिनें तात्काळ ओळखिलें. मग तिनें त्याजकडे निरखून पाहिलें तों त्याच्या झग्याच्या आंतल्या बाजूस कटथार छपवून ठेविलेली तिच्या दृष्टीस पडली. तेव्हां ती मनांत म्हणाली, ' हां आतां मी समजलें ! ह्या हरामखोर मनुष्यानें माझ्या धन्याचा खून करण्याचा बेत केलेला आहे; आणि म्हणूनच हा त्याच्या पंक्तीस बसून मीठ खात नाहीं ! बरें, काय चिंता आहे ? या राजश्रीचा पक्का समाचार घेईन तरच मी नांवाची मार्ग्याना होईन ! '

मार्ग्यांना व अबदल्ला या दोघांनीं भोजनाचे सर्व पदार्थ दिवाण-खान्यांत ठेविले, व अबदल्ला वाढावयास उभा राहिला. आतां मार्ग्यांना हिला तूर्त कांहीं काम नव्हतें, तेव्हां तितक्या वेळांत आपल्या मनांत योजिलेलें अत्यंत धाडसाचें काम शेवटास नेण्याची तिनें तजवीज केली. इतक्यांत जेवण होऊन फळफळावळ आण-ण्याची वेळ झाली म्हणून अबदल्ला सांगावयास आला. तेव्हां मार्ग्यांना तीं घेऊन गेली, व अबदल्ला यानें ताटें उचलल्यावर तिनें तीं मंडळींपुढें ठेविलीं,तसेंच मद्याच्या कुप्या व पेले हीं हीं तेथें ठेवून देऊन ती अबदल्ला याला घेऊन जेवण्याकरितां म्हणून खालीं गेली.

फळफळावळ खाणें झाल्यावर मद्य पिण्याची वेळ झाली. तेव्हां खोजा हुसेन मनांत म्हणाला, 'आतां बरीक आपला हेतु सिद्धीस नेण्याला आपल्याला चांगली संधि आली आहे. या दोघां बापलेकांना मी आग्रह करून मद्य पाजीन, आणि ते दिवाणे झाले म्हणजे अली-बाबाच्या पोटांत कट्यार खुपसून त्याचा प्राण घेईन. त्याच्या मुलाला आपल्या बापाचें रक्षण करण्याची शुद्ध राहते कसची ! तो मढ्यासारखा गुंग होऊन पडेल ! त्याला तर हात लावण्याचें आप-ल्याला कारणच नाहीं. मग खालचीं चाकरमाणसें वगैरे निजलीं म्हणजे पूर्वीप्रमाणें आपण बागेच्या वाटेनें निघून जाऊं म्हणजे झालें !'

पण इकडे मार्ग्यांना हिनें खोजा हुसेन याचा दुष्ट हेतु अगोदरच जाणून तो त्याला सिद्धीस नेण्यास संधि सांपडूं दिली नाहीं. तिनें कलावंतिणीसारखा पोषाख केला, व रुप्याच्या मुलाम्याचा एक कंबरपट्टा घालून त्याला त्याच प्रकारची एक कट्यार खोंवून दिली. याप्रमाणें तिनें केल्यावर ती अबदल्ला यास म्हणाली, 'तूं आपली खंजिरी घे, आणि आपण एरवीं एखादे वेळीं जशी गम्मत करितों, तशीच आज घटकाभर करून आपल्या येथें पाहुणे आले आहेत त्यांना करमणूक करूं.'

अबदल्ला हा खंजिरीवर थाप देत देतच वरतीं गेला. त्याच्या मागून मार्ग्यांना आली, व तिनें दारांतून मोठ्या आदबीनें त्या

तिघांस सलाम केला. मार्ग्यांना हिच्याशीं आपल्या धन्याला कांहीं बोलावयाचें आहे असें अबदल्ला याच्या लक्षांत येऊन त्यानें खंजीरी वाजविण्याचें बंद केलें. तेव्हां अलीबाबा म्हणाला, 'मार्ग्यांना, आंत ये आणि शेठजींना आपलें कौशल्य दाखीव. ते तुझ्याविषयीं काय म्हणतात तें पाहूं.' नंतर खोजा हुसेन याजकडे वळून तो म्हणाला, 'हजरत, तुमच्याकारितां खर्च करून मी हें कारितों असें कांहीं तुम्ही समजूं नका; हें सगळें आमच्या घरचेंच आहे. हा आमचा गुलाम आहे व ही दासी आहे. यांच्या करमणुकीपासून तुम्हांला खचीत आनंद होईल असें मला वाटतें.'

हें आणखी गाण्याबजावण्याचें लचांड मध्यें आलें असें पाहून खोजा हुसेन हा जरा खिन्न झाला. त्याला वाटलें कीं, याच्या योगानें आपला डाव साधत नाहीं. पण तो मनांत म्हणाला, 'कांहीं चिंता नाहीं. आतां नाहीं तर दुसरे एखादे वेळेस घेतां येईल! याची आपली मुलाखत झालीच आहे, तर आतां तशी संधि आणण्याला अडचण कांहींच राहिली नाहीं.' म्हणून मनांतून जरी ती गोष्ट त्याला नको होती, तरी बाह्यात्कारी त्यानें अलीबाबा याचे आभार मानिले, आणि तो म्हणाला, 'तुमची ज्यांत खुषी त्यांत माझी आहेच.'

अलीबाबा आणि खोजा हुसेन यांचें बोलणें संपलें असें पाहून अबदल्ला यानें खंजिरीवर थाप चढवून एक छानदार गाणें गाण्यास आरंभ केला व मार्ग्यांना हिनें नृत्य करण्यास आरंभ केला. ती त्या कलेंत अगोदरच निष्णात होती, व त्या प्रसंगीं तर तिनें अशी कांहीं बहार करून सोडिली कीं, तें पाहून पाहिजे तो मनुष्य मान डोलविता! पण हें सर्व खोजा हुसेन याला काय होय! त्याच्या मनांत दुसरेच विचार घोळत असल्यामुळें त्याचें तिकडे बिलकुल लक्ष नव्हतें!

याप्रमाणें मोठ्या चातुर्यानें वगैरे निरनिराळ्या तऱ्हेनें पुष्कळ वेळ नृत्य केल्यावर, आपल्या पट्ट्याला अडकाविलेली कट्यार तिनें

काढिली; आणि ती हातांत घेऊन नाचूं लागली. यांत तर तिनें आपलें कसब इतकें कांहीं विलक्षण रीतीनें दाखविलें कीं, यापुढें आतांपर्यंतची तिची कर्तबगारी कांहींच नव्हती असें दिसून आलें. नानाप्रकारें अंगविक्षेप करणें, हळू, सारख्या अंतरावर, व ढबदार रीतीनें पावलें टाकणें, तरतऱ्हेचे घेर धरणें इत्यादि गोष्टींत तिनें केवळ कमाल करून सोडिली! केव्हां केव्हां ती हातांतली कटथार जणुं काय कोणाच्या छातींत खुपसणार कीं काय असें तिनें दाखवावें; व केव्हां केव्हां आपल्याच छातींत ती भोंसकणार असें दाखवावें. सरतेशेवटीं अगदीं थकून गेल्याचें मिष करून तिनें अबदल्ला याच्या हातून ती खंजिरी घेतली आणि तमाशांत पैसे मागण्याकारितां जसें तबक लोकांपुढें करितात, त्याचप्रमाणें तिनें ती खंजिरी उलटी धरून त्या मंडळीपुढें ती आली.

अलीबाबानें एक मोहोर खंजिरींत टाकिली व त्याच्या मुलानेंही तसेंच केलें. खोजा हुसेन यानेंही मार्ग्यांना आपल्याकडे येत आहे असें पाहून आपल्या खिशांत हात घातला; इतक्यांत मार्ग्यांना हिनें मनांत निश्चय केल्याप्रमाणें मोठें धैर्य करून ती कटथार त्याच्या उरांत इतकी जोरानें खुपसली कीं, त्यासरसा तो गतप्राण होऊन खालीं पडला!

मार्ग्यांना हिचें हें विलक्षण कृत्य पाहून अलीबाबा व त्याचा मुलगा हे घाबरून मोठ्यानें ओरडले. अलीबाबा म्हणाला, 'अग, चांडाळणी, हें तूं काय केलेंस? आज तूं माझा व माझ्या कुटुंबाचा सर्वस्वीं नाश करून टाकिलास!' मार्ग्यांना म्हणाली, 'हें मी तुमचा नाश करण्याकारितां केलें नाहीं; बचावाकारितां केलें.' नंतर खोजा हुसेन याचा झगा वर करून व त्यानें आंत लपवून ठेविलेली कटथार त्यास दाखवून ती म्हणाली, 'हें पाहिलेंत ना काय तें? केवढा अनर्थ आज होणार होता बरें! याचा चेहरा नीट निरखून पहा, म्हणजे हाच तो त्या चाळीस चोरांचा नाईक असून तेल विकण्याकारितां म्हणून बुधले घेऊन आलेला होता असें तुम्हाला दिसून

येईल. तुमच्या येथें मीठ न खाण्याचा जो त्यानें बहाणा केला, त्यावरूनच त्याच्या मनांत कोणता हेतु होता हें उघड होत नाहीं काय ? अशा प्रकारचा मनुष्य आपल्या येथें जेवावयास येणार हें तुम्हीं मला सांगितलें तेव्हांच मला संशय आला, आणि तो संशय खरा होता याविषयीं तुमची खात्री झालीच आहे. '

याप्रमाणें मार्ग्यांना हिनें दुसऱ्यांदा आपला जीव वांचविला असें पाहून अलीबाबानें तिचे अतिशय उपकार मानले. त्यानें तिला पोटाशीं धरून म्हटलें, ' मार्ग्यांना, मीं तुझी दास्यापासून मुक्तता केली त्या वेळीं, तुझे उपकार पूर्णपणें लौकरच फेडीन म्हणून जें तुला वचन दिलें होतें, तें पुरें करण्याकरितां मी तुला आपली सून करितों. ' नंतर आपल्या मुलाकडे वळून तो म्हणाला, ' मुला, तूं माझी आज्ञा कधींही मोडली नाहींस; तर या वेळीं मार्ग्यांना हिला मी दिलेलें वचन पुरें करण्यास तूं मागेंपुढें पाहणार नाहींस अशी मला खात्री आहे. खोजा हुसेन यानें माझा जीव घेण्याच्या हेतूनें तुझ्याशीं स्नेह जोडला हें तुझ्या लक्षांत आलेंच आहे व तो त्याचा हेतू सिद्धीस जाता तर तुलाही त्यानें जिवंत ठेविलें असतें असें मला वाटत नाहीं. असो. तर सारांश काय कीं, मार्ग्यांना हिचें पाणिग्रहण केल्यानें तूं आपल्या कुटुंबाचा आसरा कायम केलास असें होईल. ' अलीबाबाच्या मुलानें तत्काळ ती गोष्ट मान्य केली. ती त्यानें बापाचें ऐकिलें पाहिजे म्हणूनच केवळ केली असें नाहीं, तर ती त्यालाही मनापासून आवडली म्हणून केली.

असो. मग खोजा हुसेन म्हणजे तो चोरांचा नाईक याचें प्रेत त्यांनीं त्याच्या साथीदारांच्या शेजारीं नेऊन पुरलें. हें इतक्या गुप्त रीतीनें त्यांनीं केलें कीं, पुढेंही पुष्कळ वर्षेंपर्यंत त्या प्रकरणाची गंधवार्ता देखील लोकांना कळली नाहीं; व त्यानंतर जरी ती कळली, तरी तिची उठाठेव करण्याला कोणाला कांहीं कारण नव्हतें.

नंतर थोड्याच दिवसांनीं अलीबाबा ह्यानें आपला मुलगा व मार्ग्यांना या उभयतांचा विवाह विधिपूर्वक केला. या गोष्टीचें खरें

कारण कोणालाही समजलें नाहीं. त्यांना असें वाटलें कीं, मार्ग्यीना हिच्या अंगच्या गुणांकडेच लक्ष देऊन अलीबाबा ह्यानें ही गोष्ट केली असावी; व त्याबद्दल त्यांनीं त्याची स्तुति केली. हें पाहून अलीबाबा ह्याला फार आनंद झाला. पुढें अलीबाबा पुष्कळ दिवसपर्यंत चोरांच्या गुहेकडे गेला नाहीं; कारण, ते सदतीस चोर व त्यांचा नाईक मिळून अडतीस असामी ठार झाले. तथापि बाकींचे दोन कदाचित् जिवंत असतील अशी शंका त्याच्या मनांत आल्यामुळें त्याला तिकडे जाण्याचें धैर्य होईना.

मग एक वर्षभरपर्यंत आपल्याला कांहींएक त्रास झाला नाहीं असें पाहून, त्या चोरांचा मागमूस आतां राहिला नाहीं असें अलीबाबा यास वाटलें. यासाठीं कारण पडल्यास आपलें संरक्षण आपल्याला करतां यावें अशी तजवीज करून, घोड्यावर बसून तो तिकडे जावयास निघाला. तो गुहेपाशीं आला तेव्हां तिच्या आसपास घोड्याच्या अगर मनुष्यांच्या पावलांच्या खुणा कोठेंही त्याला दिसल्या नाहींत. मग तो घोड्यावरून उतरला, व त्यानें त्याला झाडाशीं बांधिलें. नंतर गुहेच्या दाराशीं येऊन, 'तिळा, उघड.' असें म्हणतांच दार उघडलें. तो आंत गेला तों फक्त कापडाचे गठ्ठे खेरीजकरून आपण पूर्वीं पाहिलेलें सर्व जेथच्या तेथें आहे असें त्याला आढळलें. गठ्ठे कमी झाले ते तोतया ख्वाजा हुसेन आपल्या दुकानांत घेऊन गेला असेल असा त्यानें तर्क केला. या सर्व गोष्टीवरून, त्या चाळीस चोरांचा समूळ नाश झाला, व गुहेचें दार उघडण्याची युक्ति सर्व जगांत आपणाशिवाय दुसऱ्या कोणासही माहीत नसल्यामुळें तिच्यांतील सगळ्या द्रव्याचे आपण मालक झालों, याविषयीं त्याला बिलकूल भ्रांत राहिली नाहीं.

पुढें एके वेळीं अलीबाबानें आपल्या मुलाला बरोबर आणून गुहेचें दार उघडण्याची युक्ति त्याला सांगितली. ती तशीच पुढें त्याच्या पुत्रपौत्रादिकांना कळत जाऊन त्या द्रव्याचा उपयोग त्यांनीं फार चांगल्या प्रकारें केला; व शहरांत मोठमोठ्या हुद्यांचीं कामें त्यांना मिळून, तीं त्यांनीं शहाणपणानें व नेकीनें चालविलीं, आणि सुखानें कालक्रमणा केली.

---

# बगदादचा व्यापारी अली खोजा ह्याची गोष्ट.

बगदादचा नामांकित कालीफ हरून् अल्रशीद ह्याच्या कारकीर्दींत त्या शहरांत अली खोजा ह्या नांवाचा कोणीएक व्यापारी रहात असे. तो फार श्रीमंत नव्हता व फार गरीबही नव्हता. त्यानें लग्न वगैरे कांहीं केलेलें नव्हतें व तो आपल्या वडिलोपार्जित घरांत स्वतंत्रपणें व व्यापारांत नाशिबानें जो कांहीं नफा मिळेल त्यांत संतोष मानून राहत असे. अशा प्रकारें सुखांत त्याचा आयुष्यक्रम चालला असतां असें झालें कीं, लागोपाठ तीन रात्रीं एक वृद्ध व पूज्य मनुष्य त्याच्या स्वप्नांत येऊन, त्याला मक्केची यात्रा न केल्याबद्दल फार रागें भरला.

या स्वप्नामुळें अली खोजा याचें चित्त फार अस्वस्थ झालें. तो धर्मनिष्ठ मुसलमान असल्यामुळें, मक्केची यात्रा करणें आपल्याला आवश्यक आहे हें तो जाणून होता. पण 'आपण पडलों एकटें, आपलें घरदार, दुकान व त्यांतील माल वगैरेंची व्यवस्था पाहण्याला दुसरें कोणी नाहीं, यामुळें आपल्याकडून यात्रा करणें घडत नाहीं त्यास आपला काय उपाय ?' असें तो मनांत म्हणत असे. तथापि असें म्हणून तो उगीच बसत नसे; तर गरीबगुरीबांस खैरात करून व दुसरीं पुण्यकर्में करून त्या यात्रेचें श्रेय मिळविण्याचा तो यत्न करीत असे. परंतु एकसारखीं तीन रात्रीं स्वप्नें पडल्यामुळें ती गोष्ट त्याच्या मनाला फार खाऊं लागली, व त्याला असें वाटलें कीं, 'आपण अजूनही स्वस्थ बसलों तर कदाचित् आपणावर एखादें संकट गुदरून आपला सर्वस्वीं नाश होईल. सबब, आतां हें काम लांबणीवर टाकावयाचें नाहीं,' असा निश्चय करून त्यानें आपलें दुकान व घरांतील सर्व सामानसुमान हीं विकून टाकिलीं. व्यापाराच्या शिल्लक असलेल्या मालापैकीं कांहीं मक्केस नेला असतां तेथें तो चांगल्या दरानें जाऊन त्यांत आपल्याला बराच फायदा होईल

असें त्यास वाटल्यावरून, त्यानें तो थोडासा ठेवून बाकीचा सर्व विकून टाकिला; व घराला एक भाडेकरी पाहून तेंही त्याच्या ताब्यांत दिलें.

याप्रमाणें व्यवस्था केल्यावर, बगदादची इतर यात्रेकरू मंडळी निघतांच त्यांच्याबरोबर निघण्याची त्यानें तयारी केली. वाटखर्चा-करितां वगैरे जो पैसा लागावयाचा तो त्यानें काढून ठेवल्यावर त्याजपाशीं एक हजार मोहोरा शिल्लक राहिल्या; त्या बरोबर बाळ-गण्याचा त्रास करण्यापेक्षां येथेंच कोठें सुरक्षित स्थळीं ठेवाव्या हें बरें, असें त्यास वाटून त्यानें त्याप्रमाणें त्या ठेवण्यासाठीं एक युक्ति योजली. त्यानें एक डेरा आणिला, आणि त्यांत त्या हजार मोहोरा प्रथम भरून नंतर त्यानें त्यांवर आलिव नांवाची एक प्रकारचीं फळें भरलीं. नंतर त्यानें त्या डेऱ्याचें तोंड बंद केलें, आणि कोणा एका सावकाराशीं त्याचा चांगला स्नेह होता, त्याजकडे तो घेऊन गेला. तो त्या सावकारास म्हणाला, ' भाई, मी थोडक्या दिवसांत मक्केच्या यात्रेस जाणार हें तुम्हांला माहीत आहेच. मजजवळ एक आलिवांनीं भरलेला डेरा आहे, तेवढा मी येईपर्यंत तुम्ही आपल्या घरीं ठेवाल तर मजवर तुमचे फार उपकार होतील. ' सावकारानें उत्तर केलें, ' ठीक आहे. ही कोठीची किल्ली घ्या, आणि तुम्हीच आपल्या हातांनीं तो डेरा तिजमध्यें वाटेल त्या ठिकाणीं ठेवून द्या. तुम्ही परत येईपर्यंत तो जशाचा तसा तेथें राहील. त्याला कोणी हातही लावणार नाहीं. '

अली खोजा यानें याप्रमाणें त्या हजार मोहोरा आपल्या मतें सुरक्षित स्थळीं ठेवून दिल्यावर, त्याला मागची कसलीही काळजी राहिली नाहीं. मग यात्रेकरू मंडळी निघाली त्या दिवशीं त्यानें आपलें वाटेचें सर्व सामानसुमान एका उंटावर भरलें, व त्याच उंटावर बसून तो त्यांजबरोबर निघाला. तो मक्केस सुरक्षितपणें पोहोंचला व महंमदी धर्मात सांगितलेले संस्कार करण्याकरितां पृथ्वीच्या प्रत्येक भागांतून येणारे हजारों मुसलमान लोक ज्याच्या दर्शनास

जातात असें जें तेथलें काबा या नांवाचें मुसलमानी धर्माचें अत्यंत पवित्र स्थान, त्याचें दर्शन इतर यात्रेकरूमंडळीसहवर्तमान त्यानें घेतलें. नंतर यात्रेसंबंधीं जे काय विधि करावयाचे ते केल्यावर बरोबर आणिलेला माल विकण्यासाठीं त्यानें तो बाजारांत मांडला.

अली खोजा याचा माल फारच उत्तम व शेलका असल्यामुळें, रस्त्यानें दुसरे दोन व्यापारी चालले होते त्यांची त्याकडे सहज नजर जाऊन तो त्यांच्या मनांत इतका भरला कीं, त्यांना जरी तो खरेदी करावयाचा नव्हता, तरी ते बराच वेळपर्यंत त्याकडे पहात उभे राहिले. नंतर ते आपल्या रस्त्यानें जाऊं लागले असतां त्यांपैकीं एकजण दुसऱ्यास म्हणतो, ‘ या व्यापाऱ्याच्या मालाला येथें जरी चांगला भाव येणार आहे तरी केरो येथें हा नेला असतां यावर किती किफायत होईल हें जर याला समजलें, तर हा खाचित येथें न विकतां केरो येथें तो नेऊन विकील. ’

त्या व्यापाऱ्याच्या तोंडचे हे शब्द अली खोजा याच्या कानीं पडले, तेव्हां आपला माल या ठिकाणीं न विकतां केरो येथेंच नेऊन विकावा असें त्याच्या मनांत आलें. खेरीज मिसर देशांतील मोठमोठ्या नामांकित इमारती व इतर अप्रतिम चिजा ह्यांचें वर्णन त्यानें फार ऐकिलें होतें, यास्तव एकवार तो देश पहावा अशी त्याची इच्छा होती. तेव्हां अनायासें एकांत दोन कामें होतील असें समजून त्यानें मिसर देशास जाण्याचा निश्चय केला. मग त्यानें आपला माल फिरून बांधिला आणि बगदादेस परत न येतां कित्येक व्यापारी मिसर देशास चालले होते, त्यांजबरोबर तोही निघाला. केरो येथें पोहोंचल्यावर थोडक्याच दिवसांत त्याचा सर्व माल विकून गेला, व त्यांत त्याला संभव होता त्यापेक्षां पुष्कळच जास्त फायदा झाला. त्या एकंदर पैशाचा त्यानें दुसरा माल खरेदी करून तो दमास्कस येथें नेऊन विकण्याचा बेत केला. दमास्कस येथें जाणारे व्यापारी लोक निघावयास सुमारें दीड महिना अवकाश होता, त्या वेळांत अली खोजा यानें केरो शहरांत जें जें म्हणून

पहाण्यासारखें होतें, तें सर्व पाहून घेतलें. खेरीज तिकडचे प्रसिद्ध मनोरे व नील नदीच्या दोन्ही कांठचीं कित्येक मोठमोठीं प्रख्यात शहरेंही त्यानें पाहिलीं.

दमास्कस येथें जात असतां मध्यें यरुशलेम शहर लागलें. तेथें व्यापारी मंडळीचा मुक्काम पडला. तेव्हां तेथल्याही पवित्र स्थानाचें दर्शन अली खोजा यास घ्यावयास सांपडलें. मक्का येथील काबा खेरीज करून मुसलमानी धर्माच्या सर्व पवित्र स्थानांमध्यें हें स्थान अत्यंत श्रेष्ठ होय; व त्यावरूनच यरुशलेम शहराला ' पवित्र नगर ' हें नांव प्राप्त झालें आहे.

असो. नंतर ही मंडळी दमास्कस येथें जाऊन पोहोंचली. अली खोजा याला तें शहर केवळ नंदनवनच भासलें. त्याच्या सभोंवतालचीं हिरवींगार कुरणें, त्यांमधून वहाणारे स्वच्छ पाण्याचे झरे, मोठमोठे व सुंदर बागबगीचे, इत्यादिकांची अत्यंत रमणीय शोभा पाहून त्याला इतका कांहीं पराकाष्ठेचा आनंद झाला कीं, या स्थळाविषयीं इतिहासांतून जें वर्णन आढळतें तें कांहींच नाहीं, असें त्यास वाटलें. सारांश, त्या ठिकाणीं त्याचें मन फारच रमलें, व पुष्कळ दिवस त्यानें तेथें मुक्काम केला. नंतर तो बगदादेस परत येण्यास निघाला; व थोडक्याच दिवसांत अलेप्पो शहरास येऊन पोहोंचला. तेथेंही त्यानें कांहीं दिवस मुक्काम केला. नंतर त्यानें युफ्रेतीस नदी उतरून मोसल शहराचा रस्ता धरला व तेथून जवळच्या रस्त्यानें बगदादेस येण्याचा बेत केला.

अलेप्पो शहरापासून मोसल शहरापर्यंत ज्या व्यापाऱ्यांच्या सोबतीनें अली खोजा हा आला होता, त्या व्यापाऱ्यांचा व त्याचा मोठा स्नेह जमला होता. सबब मोसल येथें आल्यावर त्यांनीं त्याला अशी गळ घातली कीं, तुम्ही येथून परभारें बगदाद येथें न जातां शिराज शहरापर्यंत आम्हांबरोबर या, व तेथून मग बगदादेस जा. ते व्यापारी बोलून चालून फारच चांगले असून त्यांची वागणूक मोठी सभ्यपणाची होती, यामुळें अली खोजा त्यांना फार मान

देत असे. तेव्हां त्यांचा शब्द त्याला मोडवेना. खेरीज शिराजपर्यंत गेल्यानें त्याला व्यापारांत नफाही चांगला होण्याचा संभव होता. अशा दोन्ही कारणांवरून त्या व्यापाऱ्यांबरोबर जाण्याचा त्याचा निश्चय झाला. त्यांनीं त्याला आपल्याबरोबर सुलतानिया, री, कोम, काश्चन, इस्पाहन, व तेथून शिराज इतक्या शहरीं नेलें. तेथून त्यांजबरोबर तो रमतरमत हिंदुस्थानांतही आला, आणि नंतर फिरून शिराज येथें गेला; आणि तेथून मग ताबडतोब बगदादेस निघून गेला. ह्या एकंदर प्रवासांत त्याचीं सात वर्षें गेलीं.

अल्ली खोजा यानें बगदाद येथें ज्या सावकाराच्या घरीं आपला तो आलिवांचा डेरा ठेवून दिला होता. त्याला इतके दिवसपर्यंत अल्ली खोजा याची किंवा त्या डेऱ्याची मुळींच आठवण झाली नाहीं. पण अल्ली खोजा शिराजहून बगदादेस यावयास निघाला असतां इकडे असें झालें कीं, तो सावकार एके दिवशीं संध्याकाळीं जेवावयास बसला असतां सहज निघतां निघतां आलिवांची गोष्ट निघाली. त्यावरून त्याच्या बायकोनें त्याला म्हटलें, 'खरेंच, मला आज कितीएक दिवस आलिवें खावींशीं वाटताहेत. याकरितां एकदां थोडीं आणाल तर बरें होईल.' नवरा म्हणाला, 'तूं आतां आलिवांची गोष्ट काढिलीस त्यावरून, अल्ली खोजा सात वर्षांपूर्वीं मक्केस निघून गेला त्या वेळीं त्यानें आपल्या कोठींत आलिवांचा एक डेरा आणून ठेविला आहे, त्याची मला आठवण झाली. इतक्या दिवसांत अल्ली खोजाचें कांहींच वर्तमान कळलें नाहीं; फक्त, ज्या व्यापारी मंडळीबरोबर तो गेला होता, त्यांनीं तो मक्केहून मिसर देशास गेला इतकें सांगितलें. तेव्हांपासून आजपर्यंत त्याचा कांहींच पत्ता नाहीं, यावरून तो मरण पावला असावा असें अनुमान होतें. तर त्यानें ठेविलेलीं आलिवें अजून चांगलीं असलीं तर तीं आपणाला खाण्यास काय हरकत आहे? मला एक ताट आणि मेणबत्ती लावून दे पाहूं; मी कोठींत जातों. आणि त्यांतून थोडीं घेऊन येतों. तीं कशीं काय लागतात तें आपण पाहूं.'

त्या सावकाराच्या बायकोनें आपल्या नवऱ्यास म्हटलें, 'अहो असलें गैरविश्वासाचें काम करण्यास तुमचें मन घेतें तरी कसें?' छीः, असें कराल तर तुम्हाला देवाची शपथ आहे! विश्वासानें एखाद्यानें कांहीं वस्तु आपल्या स्वाधीन केली असतां तिचा अभिलाष करण्यासारखें नीच कृत्य कोणतेंही नाहीं, हें तुम्हांला मीं सांगावें असें नाहीं. तुम्ही म्हणतां कीं, आज सात वर्षें झालीं तरी अल्ली खोजा परत आला नाहीं, यावरून तो मरण पावला असावा; पण तो मिसर देशास गेल्याची तुम्हांला खबर लागली आहे, तसा तो आणखी पुढें कोठें गेला नसेल म्हणून कशावरून? तो मेल्याची बातमी ज्या अर्थी आपल्याला कळली नाहीं, त्या अर्थी तो कदाचित् उद्यांच येथें येऊन उभा राहील, आणि आपला डेरा मागूं लागेल; नाहीं म्हणून कशावरून सांगावें? त्याच्या जिनसेची अफरातफर झालेली त्याच्या नजरेस आली तर त्यांत आपणाला किती हलकेपणा येणार आहे बरें? मी साफ सांगतें, मला त्याचीं तीं आलिवें दृष्टीस नकोत; मी त्यांना शिवणार देखील नाहीं! मीं उगीच आपली गोष्ट निघाली म्हणून सहज म्हटलें. शिवाय त्या आलिवांना आज सात वर्षें होऊन गेलीं म्हणून म्हणतां, तेव्हां तीं आतां खाण्यालायक असतील असें तुम्हाला वाटतें तरी का? त्यांना बुरा चढून जाऊन तीं नासून गेलीं असतील! तेव्हां त्या डेऱ्याला मुळीं हातच लावूं नये हें बरें.'

ती बिचारी बायको इतकें बोलली तरी त्यापासून कांहींएक उपयोग झाला नाहीं. तिच्या नवऱ्याच्या डोक्यांतलें तें वेड म्हणून कसें तें जाईचना! त्यानें बायकोच्या बोलण्याकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं! तो तसाच उठला, आणि एक ताट व मेणबत्ती लावून घेऊन कोठींत गेला. तो जाऊं लागला तेव्हां फिरून त्याच्या बायकोनें एकवार त्याला म्हटलें, 'तुम्ही हें करतां खरें, पण संभाळा हो! या कामांत माझें अंग मुळींच नाहीं; तेव्हां याबद्दल पुढें कांहीं धोंगडें अंगावर आलें तर त्याबद्दलचा दोष मजकडे नाहीं!'

असो. सावकारानें कोठींत जाऊन डेऱ्याचें तोंड मोकळें केलें, तों आलिवें बुरसून गेलेलीं त्याच्या नजरेस पडलीं. पण तीं तळा-पर्यंत सगळीं तशींच झालीं आहेत कीं काय हें पाहण्याकरितां त्यानें थोडींशीं ताटांत काढून घेतलीं; आणि वाकींचीं लवकर निघावीं म्हणून तो डेरा हालवूं लागला, तों कांहीं मोहोरा वर आल्या. हें पाहून त्याला मोठें आश्चर्य वाटलें. मग आणखी किती मोहोरा आंत आहेत हें पाहण्याकरितां त्यानें आंत डोकावलें. तेव्हां त्याला आढळून आलें कीं, आतां आलिवें फारशीं शिल्लक नसून बाकी राहिलेलें बहुतेक सर्व बावनकशी सोनें आहे! मग त्यानें ताटांत काढून घेतलेलीं आलिवें लागलींच परत डेऱ्यांत टाकलीं, आणि त्याचें तोंड बंद करून तो परत आपल्या बायकोकडे आला. तो तिला म्हणाला, 'अग, तूं म्हटलेंस तें खरेंच. तीं आलिवें सगळीं बुरसून गेलीं आहेत. मीं विनाकारण डेऱ्याचें तोंड उघडण्याची खटपट केली. असो. पण मी त्याचें तोंड जसेंचें तसें फिरून बंद करून ठेविलें आहे. तेव्हां आतां अल्ली खोजा जरी परत आला, तरी डेरा कोणी उघडला होता असें त्याच्या लक्षांत येणार नाहीं.' त्याची बायको म्हणाली, 'माझें तुम्हीं ऐकलें असतें तर बरें झालें नसतें? आतां ईश्वर करो,आणि आपल्या अंगावर कांहीं न येवो म्हणजे झालें!'

सावकारानें आपल्या बायकोच्या बोलण्याकडे पूर्वींप्रमाणेंच ह्या वेळेसही बिलकूल लक्ष दिलें नाहीं. तो मोठा लोभी असे, त्यामुळें अल्ली खोजा याच्या द्रव्याचा अभिलाष करण्याचें त्याच्या मनांत आलें व अल्ली खोजा कदाचित् परत आलाच, तर त्याला बेमालूम रीतीनें कसा फसवावा याविषयीं विचार एकसारखा सर्व रात्र त्याच्या मनांत घोळत होती. मग दुसरे दिवशीं सकाळीं उठून तो बाजारांत गेला. नंतर अल्ली खोजानें जीं आलिवें आपल्या डेऱ्यांत भरलीं होता तीं त्यानें त्यांतून काढून घेऊन फेंकून दिलीं, आणि त्यांतील मोहोरा काढून घेऊन आपण आणिलेलीं

नवीं आलिवें त्यामध्यें भरलीं; आणि पूर्वींप्रमाणें त्याचें तोंड बंद करून तो जेथच्या तेथें होता तसा ठेविला.

याप्रमाणें त्या सावकारानें हें अत्यंत नीचपणाचें कृत्य केल्यावर सुमारें एक महिन्यानें अली खोजा हा परत बगदादेस आला. त्यानें आपलें घर भाड्यानें दिलेलें असल्यामुळें, तो भाडेकरी दुसरी जागा पाहून घर खालीं करीतोंपर्यंत तो एका धर्मशाळेंत जाऊन राहिला.

दुसरे दिवशीं अली खोजा हा त्या सावकाराकडे गेला. तेव्हां त्यानें त्याचा मोठा आदरसत्कार करून त्याच्या भेटीमुळें आपल्याला अत्यानंद झाला असें दर्शविलें. तो त्यास म्हणाला, 'भाई, तुमचा इतके दिवस कांहींच समाचार न कळल्यामुळें तुमची भेट बहुतेक आतां दुर्लभच असें आम्हांला वाटूं लागलें होतें. पण बरें झालें, तुम्ही आपलें सुखरूप येऊन आम्हांला भेटला!'

याप्रमाणें त्यांचे कुशलप्रश्न वगैरे झाल्यावर अली खोजा यानें सावकारापाशीं आलिवांचा डेरा मागितला, व तो आजपर्यंत संभाळण्याची तुम्हीं तसदी घेतली हे मजवर तुमचे फार उपकार झाले, असें त्यानें त्यास म्हटलें. सावकार त्यास म्हणाला, 'भाई, यांत उपकार ते कसले? तुमचा डेरा आमचे येथें राहिल्यानें आम्हांला त्याचें ओझें सोसावें लागलें कीं काय? मी तुमच्या ठिकाणीं असतों तर तुम्हींही मजकरितां एवढें केलें असतें. बरें असो; घ्या ही कोठीची किल्ली. तुमचा डेरा तुम्हीं ठेविला होता, तेथें तो तसाच आहे. आपला घेऊन जा.'

अली खोजा कोठींत गेला, आणि डेरा तेथून घेऊन आला. त्यानें कोठीची किल्ली सावकाराच्या स्वाधीन केली आणि त्यास सलाम करून तो धर्मशाळेंत परत आपल्या बिऱ्हाडीं आला. नंतर त्यानें डेऱ्याचें झांकण काढिलें. आणि जितक्या खोल मोहोरा ठेविल्या होत्या, तितका त्या डेऱ्यांत त्यानें हात घातला. परंतु हाताला त्या लागेनात, हें पाहून तो मनांत चपापला; पण फिरून त्याला वाटलें कीं, कदाचित् आपला अजमास चुकला असेल. मग तावडतोब त्या

गोष्टीचा उलगडा करण्याकरितां त्यानें आपल्या बरोबरचीं ताटें, थाळें वगैरे काढून त्यांत त्या डेऱ्यांतील सर्व आलिवें ओतलीं, आणि डेरा पालथा केला, तों खरोखरच एकही मोहोर त्यांत नाहीं! तेव्हां तो पराकाष्ठेचा आश्चर्यचकित होऊन गेला; आणि हात व डोळे वर आकाशाकडे करून म्हणाला, 'ज्याला मी आपला परममित्र असें समजतों, त्याच्या हातून असें अधमपणाचें कृत्य घडूं शकेल काय?'

अल्ली खोजा याला एकाएकीं आपलें एवढें मोठें नुकसान झालेलें पाहून फार दुःख झालें. तो त्या सावकाराकडे परत आला आणि त्यास म्हणाला, 'भाई, मी गेलों न गेलों तोंच परत आलों याचें तुम्हाला आश्चर्य वाटूं देऊं नका. मी कबूल करतों कीं, मीं जो तुमच्या कोठींतून आलिवांचा डेरा नेला तो माझाच आहे; पण त्या आलिवांत मीं हजार मोहोरा ठेविल्या होत्या, त्या मला सांपडल्या नाहींत. कदाचित् तुम्हाला त्याची गरज लागून तुम्ही त्या खर्च केल्या असल्यास कांहीं चिंता नाहीं. त्या माझ्या येथें असल्या काय, आणि तुमच्या येथें असल्या काय, एकच. परंतु त्या सुरक्षित असल्या म्हणजे झालें. तर आतां माझी तुम्हांस इतकीच विनंति आहे कीं, काय वास्तविक प्रकार असेल तो मला सांगून माझें मन स्वस्थ करा, आणि माझ्या रकमेबद्दल मला पावती द्या. मग तुम्हाला सवड सांपडेल तेव्हां माझी भरपाई करा; त्याबद्दल माझें कांहींएक म्हणणें नाहीं.'

अल्ली खोजा लागलींच परत येईल हें त्या सावकाराला ठाऊकच होतें; तेव्हां त्याला काय उत्तर द्यावयाचें तें त्यानें अगोदरच योजून ठेविलें होतें. तो अल्ली खोजा यास म्हणाला, 'दोस्त अल्ली खोजा, तुम्हीच सांगा बरें ज्या वेळेस आलिवांचा डेरा तुम्हीं मजकडे आणिला त्या वेळेस मीं त्याला हात तरी लावला काय? तुमच्या हातीं मी कोठीची किल्ली दिली कीं नाहीं? आणि तुम्हीं स्वतः तो जेथें नेऊन ठेविला तेथच्या तेथें तो होता तसाच बंद केलेला तुम्हाला आढळला कीं नाहीं? तेव्हां तुम्हीं त्यांत मोहोरा ठेविल्या असल्या तर तुम्हाला

त्या सांपडल्या पाहिजेत! तुम्हीं मला सांगितलें कीं, त्यांत आलिवें आहेत; व मलाही तें खरें वाटलें. यापेक्षां मला या प्रकरणाची जास्त कांहींएक माहिती नाहीं. तुम्ही माझें बोलणें खरें माना अगर नका मानूं; पण मी तुम्हाला सांगतों कीं, मीं तुमच्या डेऱ्याला हात लाविला नाहीं.'

बऱ्या बोलानें हा मनुष्य बधेल तर पहावें, म्हणून अली खोजा यानें आपला होता तेवढा प्रयत्न केला. तो त्या सावकारास म्हणाला, 'भाई, मी वास्तविक सांगतों कीं, मला तंटयाबखेडयांचा मनापासून कंटाळा आहे; याकारितां हें प्रकरण तुम्ही निकराला पोहोंचविण्यास मला भाग न पाडाल तर फार चांगलें होईल. त्यांत तुमची अप्रतिष्ठा होईल व मला वाईट वाटेल, याशिवाय दुसरें कांहीं नाहीं. आपण व्यापारी लोकांनीं, कितीही नुकसान झालें तरी तें सोसून अब्रूचें संरक्षण होईल असें वर्तन केलें पाहिजे हें तुम्हांस सांगायाला पाहिजे असें नाहीं. असो; तर मी शेवटची एकच गोष्ट तुम्हाला सांगतों कीं, तुम्ही आपलाच जर हेका धरून बसाल, तर निरुपायास्तव मला तुमच्यावर फिर्याद करण्याची पाळी येणार आहे. पण फिरून आणखी तुम्हाला मी सांगतों कीं, तसें करणें केवळ माझ्या जिवावर येईल. कारण आपलें थोडें नुकसान झालेलें पुरवलें, पण सरकारदरबार करणें होईल तितकें टाळावें, अशी माझी नेहमीं मनापासून इच्छा असते.'

सावकारानें उत्तर केलें, 'हें पहा, तुम्ही मजपाशीं आलिवांचा डेरा आणून ठेविला ही गोष्ट निर्विवाद आहे. बरें तुम्हींच आपला तो पाहून घेतला आणि बिऱ्हाडीं नेला हेंही तुम्ही कबूल करतां. असें असतां आतां तुम्ही मजपाशीं हजार मोहोरा मागतां, तेव्हां हें मजवर तुम्ही निवळ बालंट घेतां, हें पाहिजे तो सांगेल. तुम्हीं डेऱ्यांत मोहोरा ठेविल्या हें मला सांगितलें होतें तरी? त्यांत आलिवें होतीं हें देखील तुम्ही सांगितलें म्हणून मला माहीत! तुम्हीं मला तीं दाखविलीं होतीं थोडींच! असो. एकंदरीनें तुम्हीं मला हजार

मोहोरांचा गंडा घालूं पाहतां आं! शाबास अल्ली खोजा, बरेच उपकार फेडलेत! त्या डेऱ्यांत आणखी हिरे व मोत्यें ठेविलीं होतीं म्हणून नाहीं म्हणालां! भल्या गृहस्था, आतां उगीच हुजत घेत बसूं नको. मुकाट्यानें चालता हो. एथें रिकामा बाजार भरविण्याचें काम नाहीं!'

त्या दोघांचें बोलणें चाललें असतां तेथें आधींच पुष्कळ लोक जमले होते, व तो सावकार शेवटीं जेव्हां हुमरीतुमरीवर आला, तेव्हां तर तेथें लोकांची खूपच गर्दी जमली. त्यांत कित्येक त्या पेठेंतले व्यापारीही आले होते. त्यांनीं त्या दोघांच्या तंट्याचें कारण समजून घेऊन तो मिटविण्याचा प्रयत्न चालविला. त्यांनीं अल्ली खोजा याचें सर्व म्हणणें ऐकून घेतल्यावर त्याच्या प्रतिपक्ष्यास, 'तुमचें यावर काय म्हणणें आहे तें कळूं द्या.' असें म्हटलें.

त्यानें उत्तर केलें, 'अल्ली खोजा याचा डेरा मी आपल्या कोठींत ठेविला होता हें मी कबूल करतों. पण मीं शपथ वाहून सांगतों कीं, मीं त्याला हातदेखील लाविला नाहीं. त्यांत आलिवें आहेत असें त्यानें मला सांगितलें तेवढेंच काय तें मला माहीत आहे; याहून कांहीं नाहीं असें असून हा मनुष्य विनाकारण मजवर तुफान घेत आहे, व माझ्या घरांत येऊन माझी अप्रतिष्ठा करीत आहे. हें तुम्ही सर्व पाहात आहां, व याबद्दल तुम्हांला साक्ष द्यावी लागेल.'

हें भाषण ऐकून अल्ली खोजा फारच संतापला, आणि त्या सावकाराच्या दंडाला हात घालून म्हणाला, 'तुमची अप्रतिष्ठा मी करीत नाहीं, तुम्हीच ती आपल्या हातानें करून घेत आहां; व ज्या अर्थी तुम्हीं असें निंद्य आचरण केलें आहे, त्या अर्थी तुम्हाला न्यायासनापुढें उभें करून शपथ घ्यावयास लावणें मला भाग आहे. पाहूं तर आतां काजीच्या समोरही तुम्हास अशीच निव्वळ लबाडी सांगण्याचा धीर होतो कीं काय तो!'

अल्ली खोजा याचें भाषण ऐकून तो सावकार निरुत्तर झाला; कारण जो खरा मुसलमान आहे, त्याजवर कांहीं वाईट काम केल्याचा

आरोप आला असून जर तो ' मीं तें केलें नाहीं ' असें म्हणत असेल तर त्याला 'शपथेवर तूं असें सांग' असें म्हटलें असतां त्यानें तें ऐकिलें पाहिजे. नाहीं तर त्याला नास्तिक म्हणतील. तेव्हां याप्रमाणें त्या सावकाराला दुसरी तोडच न राहिल्यामुळें तो अली खोजा यास म्हणाला,'ठीक आहे, माझ्याही मनांत तेंच होतें. आतां पाहूं कोण खरा आणि कोण खोटा ठरतो तो!'

अली खोजानें त्या सावकारास काजीपुढें म्हणजे न्यायाधीशापुढें नेलें; आणि ' या मनुष्यानें विश्वासघात करून माझ्या हजार मोहोरा घेतल्या. ' अशी त्याजपुढें फिर्याद केली. काजीनें त्यास विचारलें, ' तुझे कांहीं साक्षीदार आहेत काय ? ' त्यानें उत्तर केलें, ' मीं इतकी खबरदारी घेतली नाहीं; कारण मला वाटलें कीं, हा आपला मित्र आहे, तेव्हां याच्या हातून लबाडी कदापि होणार नाहीं. '

सावकारानें पूर्वीं त्या व्यापाऱ्यासमोर जें काय आपल्या तर्फेनें सांगितलें होतें तेंच ह्या वेळींही सांगितलें, आणि तो म्हणाला, ' मी शपथेवर सांगतों कीं, मीं याच्या मोहोरा मुळींच घेतल्या नाहींत; एवढेंच नव्हे, पण मजपाशीं त्या ठेविल्या होत्या हेंदेखील मला माहीत नाहीं! ' त्यावरून काजीनें त्याजकडून रीतीप्रमाणें शपथ घेवविली, आणि त्यास दोषमुक्त म्हणून सोडून दिलें.

काजीनें याप्रमाणें न्याय केल्यामुळें आपल्याला विनाकारण एवढी ठोकर सोसावी लागणार, हें पाहून अली खोजा ह्यास फारच वाईट वाटलें. त्यानें काजीस असें स्पष्ट बोलून दाखविलें कीं, ' हा न्याय बरोबर झाला नाहीं. मी आतां खालिफाकडे अर्ज करितों; तेथें माझा न्याय बरोबर होईल. ' काजीला वाटलें कीं, हा कसला खालिफाकडे अर्ज करितों; याचा पक्ष खोटा ठरल्याकारणानें याला संताप आला आहे, यामुळें हा असा बोलत आहे; आणि खालिफाकडे अर्ज केला तर करीना खुशाल, आपल्याला त्याची डर कशाला पाहिजे! आपल्याला जें वास्तविक दिसलें तें आपण केलें. हो, उगीच साक्षीपुरावा असल्याबांचून एखाद्याला शिक्षा द्यावयाची कीं काय?'

आपली सरशी झाली व आपल्याला आयतीच एवढी मोठी रक्कम पचली याबद्दल अली खोजा याच्या प्रतिपक्ष्यास मोठा आनंद होऊन तो निघून गेला. इकडे अली खोजा घरीं गेला, व त्यानें एक अर्ज तयार केला; आणि दुसरे दिवशीं कालीफ हा दुपारचा निमाज पढून परत जात असतां त्यानें त्याला रस्त्यांत गांठिलें, व अर्ज घेणारा कामगार त्याच्यापुढें चाललेला होता, त्याच्या हातांत त्यानें आपला अर्ज दिला.

कालीफ हा निमाज पढून राजवाड्यांत परत आल्यावर त्याजपुढें अर्जांची सुनावणी होत असते असें अली खोजा यास माहीत होतें. त्यावरून तो दरबारांत गेला, आणि सुनावणी करणारा कामगार कालिफाच्या महालांतून अर्जांची सुनावणी करून येईपर्यंत तेथें थांबला. तो कामगार आल्यावर त्यानें अली खोजा ह्यास दुसरे दिवशीं कोणत्या वेळीं हजर व्हावयाचें तें सांगून, प्रतिवादीसही त्या वेळेस हजर असण्याविषयीं हुकूम पाठविण्याकरितां त्याचा ठावाठिकाण विचारून घेतला.

कालीफ हरून् अल्रशीद हा, आपला मुख्य वजीर जाफर व जनानखान्यांतील मुख्य खोजा मश्रूर यांस बरोबर घेऊन शहराचा बंदोबस्त यथास्थित आहे कीं नाहीं हें पक्केपणीं समजण्याकरितां कित्येक वेळां वेष पालटून टेहळणी करीत फिरत असे, असें अनेक वेळां सांगितलेलें आहेच. या त्याच्या संप्रदायाप्रमाणें त्या दिवशीं संध्याकाळीं तो फिरावयास निघाला असतां रस्त्यांत कांहीं गलबला त्यास ऐकूं आला. त्यावरून, तें काय आहे हें समजून घेण्याकरितां, तो गलबला ऐकूं आला त्या घरापाशीं तो गेला. त्या घराचा दरवाजा लावलेला होता त्याच्या फटींतून त्यानें पाहिलें, तों आंतील अंगणांत दहा बारा मुलें जमून कांहीं खेळ खेळण्याच्या बेतांत आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें.

हीं मुलें कसला खेळ खेळतात हें पहावें अशी कालिफास इच्छा झाली. यासाठीं दरवाज्याजवळ एक बांक पडलेलें होतें त्यावर तो

बसला, आणि फटींतून खेळ पाहूं लागला. त्या मुलांपैकीं जो अति-शय चलाख व हुशार मुलगा होता, तो म्हणाला, ' चला आपण काजीची नक्कल करूं. हा मी काजी झालों. आतां अली खोजा व ज्यानें त्याला हजार मोहोरांना फसविलें तो सावकार, हे दोघे येऊं द्या माझ्यासमोर. '

हे त्या मुलाचे शब्द ऐकून कालिफाला अली खोजाच्या अर्जाची आठवण झाली, व त्यामुळें त्या मुलांच्या खेळाकडे त्याचें ज्यास्तच लक्ष लागलें.

अली खोजा व सावकार ह्यांच्यांतील तंटा शहरांत इतका मह-शूर झालेला होता कीं मुलाबाळांच्या तोंडीं देखील जिकडे तिकडे त्याचीच चर्चा चाललेली असे. यास्तव, त्या संबंधाचा खेळ खेळ-ण्याची योजना सर्व मुलांस पसंत पडून प्रत्येकानें कोणकोणतें सोंग घ्यावयाचें त्याचा त्यांनीं ठराव केला. त्या मुलानें काजीचें काम पतकरलें, याबद्दल कोणींही आपली नाखुषी दर्शविली नाहीं. नंतर काजीची ऐट आणून तो आपल्या जाग्यावर बसला, व जो मुलगा चोपदार झाला होता, त्यानें वादी व प्रतिवादी यांस त्याच्या समोर आणून उभें केलें. याप्रमाणें त्या खटल्याची नक्कल सुरू झाली.

काजी अली खोजास म्हणाला, ' या सावकारावर तुमची काय फिर्याद आहे ? '

अली खोजा यानें काजीस लवून सलाम केला, आणि आपली सर्व हकीकत त्यास निवेदन करून शेवटीं तो म्हणाला, ' हें सर्व ध्यानीं आणून माझें जें विनाकारण एवढें मोठें नुकसान होत आहे तें न होईल असा या प्रकरणाचा निकाल करणार काजीसाहेब समर्थ आहेत. '

नंतर काजी सावकाराकडे वळून त्यास म्हणाला, 'अली खोजा याचा पैसा तूं कां परत देत नाहींस ? ' यावर खऱ्या सावकारानें शहरच्यां काजीसमोर जें कांहीं सांगितलें होतें तेंच ह्यानेंही

सांगितलें आणि आपल्या म्हणण्याच्या खरेपणाबद्दल शपथ वाहण्यास तयार झाला.

काजी म्हणाला, ' थांब अंमळ; मला तो अलिवांचा डेरा अगोदर पाहिला पाहिजे. ' नंतर तो वादीकडे वळून म्हणाला, ' तूं डेरा आणिला आहेस काय ? ' त्यानें उत्तर केलें 'नाहीं.' काजी म्हणाला, ' जा तर, ताबडतोब तो घेऊन ये. '

अली खोजा यानें बाहेर जाऊन आल्यासारखें करून एक डेरा काजीपुढें ठेविला, आणि प्रतिवादीपाशीं जो ठेविला होता व त्यानें तो परत दिला तो हाच, असें त्यानें म्हटलें. काजीनें ' हाच काय तो डेरा ? ' असें सावकारास विचारलें. त्यानें नाहीं म्हटलें नाहीं. त्यावरून ती गोष्ट त्यानें कबूल केली असें दिसलें. त्यावरून काजीनें तो डेरा उघडण्याविषयीं हुकूम केला. तेव्हां अली खोजानें त्याचें झांकण काढलें. काजीनें त्यांत पाहिलेसें करून म्हटलें, ' हीं आलिवें फार चांगलीं दिसताहेत. त्यांची रुचि कशी काय आहे तेवढी पाहिली पाहिजे.' असें म्हणून तो त्यांतून एक आलिव घेऊन तें चाखलेंसें करून म्हणाला, 'हीं तर फारच उत्कृष्ट आहेत. वाहवा ! सात वर्षांचीं आलिवें इतकीं चांगलीं असणें ही मोठी विलक्षण गोष्ट दिसते ! एक दोघे आलिवांचा व्यापार करणारे इसम बोलवा पाहूं ? अशा गोष्टीच्या संबंधानें त्यांचें मत घेणें रास्त आहे. ' काजीच्या तोंडांतून हे शब्द निघतांच दोन मुलगे व्यापारी म्हणून त्याच्या पुढें येऊन उभे राहिले. त्यांस काजीनें सवाल केला, ' तुम्ही आलिवांचा व्यापार करतां ? ' त्यांनीं म्हटलें, ' होय सरकार. ' काजी त्यांस म्हणाला, ' तर आलिवें किती वर्षेंपर्यंत चांगलीं राहतात, सांगा पाहूं. ' व्यापाऱ्यानें उत्तर केलें, ' तीं किती जरी जपून ठेविलीं, तरी दोन वर्षांवर चांगलीं रहात नाहींत. तीन वर्षांनंतर तर त्यांची चवही जाते व रंगही जातो. ' काजीनें फिरून सवाल केला, ' बरें तर, ह्या डेऱ्यांतलीं आलिवें किती वर्षांचीं असावीं तें सांगाल ? '

त्या व्यापाऱ्यांनीं डेऱ्यांत डोकावून त्यांतलीं एक दोन आलिवें

चाखलींसें केलें. आणि ते म्हणाले, ' हीं नवीं असून फार चांगलीं आहेत.' काजी म्हणाला, 'तुम्हांला बरोबर परीक्षा झाली नाहीं. अल्ली खोजा म्हणतो कीं, मीं हीं आलिवें सात वर्षांपूर्वी डेऱ्यांत ठेविलेलीं आहेत, आणि तुम्ही म्हणतां, तीं नवीं आहेत, हें कसें ? '

व्यापाऱ्यांनीं उत्तर केलें, ' सरकार, आम्ही खात्रीनें सांगतों कीं, तीं यंदाचींच आहेत; आपण याविषयीं यत्किंचितही शंका मनांत आणूं नये. हें आम्हीच म्हणतों असें नाहीं, तर ह्या बगदाद शहरांत आज शेंकडों व्यापारी आहेत, त्यांपैकीं पाहिजे त्याला आपण विचारलें असतां तो असेंच सांगेल, अशी आमची पक्की खातरी आहे'.

आरोपी सावकार ह्या व्यापाऱ्यांच्या विरुद्ध कांहीं बोलणार होता, पण काजीनें त्यास बोलूं दिलें नाहीं. तो म्हणाला, ' चप रहा, एक शब्द सुद्धां बोलूं नको. तूं दगलबाजी केलीस याविषयीं बिलकुल संशय नाहीं. तुला याबद्दल फांशी दिलें पाहिजे. ' हें ऐकून सर्व मुलांनीं मोठ्या आनंदानें टाळ्या पिटल्या, व आरोपीस फांशीं चढविण्याकरितां त्यास पकडून घेऊन जाऊं लागले. एवढें झाल्या-वर त्यांनीं आपला खेळ संपविला.

काजी झालेल्या मुलाचा शहाणपणा व न्याय करण्याचें चातुर्य पाहून कालीफ हरून अल्‌रशीद याला किती आश्चर्य वाटलें हें सांगतां पुरवत नाहीं. तो आपल्या जाग्यावरून उठला, आणि जाफर वजीरही एवढा वेळपर्यंत चाललेलें सर्व ऐकत होता त्यास म्हणाला, ' या खेळाविषयीं तुम्हांला कसें काय वाटतें ? ' जाफर यानें उत्तर केलें, ' राजाधिराज, खरोखर इतक्या लहान वयाच्या मुलाच्या अंगीं एवढें शहाणपण पाहून मला पराकाष्ठेचें नवल वाटतें!'

कालीफ म्हणाला, ' पण ह्याच खटल्याचा निकाल उद्यां मज-पुढें व्हावयाचा आहे हें तुम्हांला माहीत आहे काय ? खऱ्या अल्ली खोजानें आजच मजकडे अर्ज आणून गुजरला आहे; तर या प्रकरणांत ह्याहून ज्यास्त योग्य न्याय करितां येईल असें तुम्हांला वाटतें ?' वजिरानें उत्तर केलें, 'राजाधिराज, या मुलाच्या तोंडून

जशी आपण गोष्ट ऐकिली तशीच जर ती वास्तविक घडली असेल, तर या प्रकरणाचा याहून जास्त योग्य न्याय कोणत्याही प्रकारें करतां येणार नाहीं असें मला वाटतें.' कालीफ म्हणाला, 'तर ह्या घराची खूण लक्षांत ठेवा; कारण ह्या खटल्याचा निकाल त्या मुलाकडूनच उद्यां मी आपल्या समक्ष करविणार आहे. याकरितां त्यास घेऊन जाण्यासाठीं तुम्हाला येथें आलें पाहिजे. तसेंच त्या दगलबाज सावकाराला ज्या काजीनें दोषमुक्त म्हणून सोडून दिलें, त्यालाही येण्याविषयीं हुकूम करा, म्हणजे हा मुलगा न्याय कसा करतो तो पाहून तरी त्याला आपलें काम योग्य रीतीनें बजाविण्याची अक्कल येईल! त्याचप्रमाणें अली खोजा याला आपला आलिवांचा डेरा आपल्याबरोबर घेऊन येण्याविषयीं कळवून, आलिवांचा व्यापार करणाऱ्या दोन असामींनाही हजर राहण्याविषयीं हुकूम करा.'

याप्रमाणें वजिरास हुकूम करून कालीफ तेथून चालता झाला. त्याला त्या दिवशीं लक्षांत ठेवण्यासारखी दुसरी कोणतीही गोष्ट आढळली नाहीं.

दुसरे दिवशीं, ज्या घरीं तो मुलांचा खेळ चालला होता, तेथें जाफर वजीर गेला, आणि 'या घराचा मालक कोण?' म्हणून त्यानें चौकशी केली. परंतु तो घरीं नसल्यामुळें त्याची बायको बाहेर आली. तिला वजिरानें विचारलें, 'बाई, तुम्हाला कांहीं मुलगे आहेत काय?' तिनें उत्तर केलें, 'तिघे आहेत.' असें म्हणून तिनें त्या मुलांस त्याच्यापुढें आणून उभें केलें. वजिरानें त्यांस विचारिलें, 'मुलांनो, काल तुम्ही खेळत होतां त्या वेळेस काजी कोण झाला होता?' तेव्हां सर्वांत वडील जो होता त्यानें 'मी झालों होतों' असें म्हटलें. पण असें विचारण्याचें कारण काय हें त्याला माहीत नसल्यामुळें, त्याला भय पडून त्यानें तोंड गोरेंमोरें केलें. वजीर त्यास म्हणाला, 'मुला, चल मजबरोबर; कालीफ महाराजांनीं तुला बोलाविलें आहे.'

वजीर मुलाला बरोबर घेऊन जातो असें पाहून त्याच्या आईला मोठी धास्ती पडली; आणि 'कालीफ महाराजांनीं त्याला कशाकरितां बोलाविलें आहे ?' म्हणून तिनें वजिराला विचारिलें. वजीर तिला म्हणाला, 'बाई, तुम्ही कांहीं भिऊं नका. तुमचा मुलगा आतां दोन घटकांच्या आंत परत येईल; व कालीफ महाराजांनीं त्याला कशाकरितां बोलाविलें आहे तें तोच तुम्हाला सांगेल. तें ऐकून तुम्हाला मोठा हर्ष वाटेल.' मुलाची आई म्हणाली, 'असें आहे काय ? तर मग त्याला चांगला पोषाख घालूं द्या. कारण कालीफ महाराजासमोर अशा मळकट कपड्यानिशीं जाणें बरोबर नाहीं.' वजिरानें म्हटलें, 'ठीक आहे, घाला पोषाख.'

मग त्या बाईनें त्या मुलाला चांगला पोषाख घातल्यावर वजीर त्यास बरोबर घेऊन गेला, आणि अल्ली खोजाचा खटला निघण्याचे वेळीं त्यानें त्याला कालिफासमोर उभें केलें.

कालिफापुढें जातांच मुलगा जरा घाबरला, तेव्हां त्याला धैर्य येण्याकरितां कालीफ म्हणाला, 'मुला, असा इकडे ये. अल्ली खोजा व ज्यानें त्याला हजार मोहोरांना फसविलें तो सावकार ह्या उभयतांमधील तंटा काल ज्यानें निवडिला, तो तूंच ना ? त्या वेळीं तुला मीं पाहिलें, व तुझें सर्व बोलणें ऐकिलें. तेणेंकरून मला मोठा संतोष झाला.' मुलानें नम्रतेनें उत्तर केलें, 'राजाधिराज, होय, मीच तो.' कालीफ म्हणाला, बरें तर; ये. माझ्या शेजारीं बैस. खरा अल्ली खोजा व तो सावकार हे आतां तुझ्या दृष्टीस पडतील.'

नंतर कालिफानें त्या मुलाचा हात धरून त्याला आपल्या शेजारीं सिंहासनावर बसविलें, आणि वादीप्रतिवादींस पुकारण्याविषयीं हुकूम केला. त्यांना पुकारतांच ते आले, व त्यांनीं कालिफास साष्टांग नमस्कार घातला. ते उठून उभें राहिल्यावर त्यांना कालीफ म्हणाला, 'तुम्हांला आपल्या तर्फेनें जें काय बोलावयाचें असेल तें बोला. हा मुलगा तुमचा सर्व खटला ऐकून घेईल, व तुमचा न्याय निवडील. त्याजकडून कांहीं चूक झाल्यास मी सुधारून घेईन.'

कालिफाचा हुकूम होतांच वादी व प्रतिवादी हे अनुक्रमें आपापल्या तर्फेनें जें बोलावयाचें तें बोलले. पण तो सावकार जेव्हां शपथ घेऊं लागला तेव्हां मुलगा त्यास म्हणाला, 'थांब अंमळ. तो आलिवांचा डेरा प्रथम आम्हांला पाहिला पाहिजे.'

हें ऐकतांच अली खोजा यानें आलिवांचा डेरा कालिफापुढें ठेविला, आणि त्याचें झांकण काढिलें. कालिफानें तीं आलिवें नीट लक्षपूर्वक पाहिलीं, आणि त्यांतून एक घेऊन तें चाखिलें. नंतर आदले दिवशीं हजर राहण्यास सांगितलेल्या दोघां व्यापाऱ्यांना बोलाविलें, व त्यांना त्यांची परीक्षा करण्यास त्यानें सांगितलें. त्यांनीं सांगितलें कीं, 'हीं फार चांगलीं असून याच वर्षाचीं आहेत.' त्या मुलानें त्यास म्हटलें, 'अली खोजानें हीं सात वर्षांपूर्वीं या डेऱ्यांत ठेविलीं आणि तुम्ही म्हणतां हीं यंदाचीं आहेत, हें कसें ?' तेव्हां खेळांतल्या व्यापाऱ्यांनीं जसें उत्तर दिलें होतें, तसेंच त्यांनींही दिलें.

सावकारास जरी स्पष्ट दिसून आलें कीं, या व्यापाऱ्यांच्या साक्षीवरून आपणांवर गुन्हा पक्का शाबीद झाला, तरी आपल्या तर्फेनें थोडेंबहुत बोलण्याचा त्यानें प्रयत्न केला. पण त्या मुलानें त्याला फांशीची शिक्षा न सांगतां कालिफाकडे वळून म्हटलें, 'राजाधिराज, मी काल खेळांत फांशीची शिक्षा दिली खरी, पण याला शिक्षा द्यावयाची ती देण्याचा अधिकार आपला आहे; माझा नाहीं.'

सावकाराच्या लबाडीविषयीं कालिफाची पक्की खातरी झाली होती, सबब त्यानें त्याचा शिरच्छेद कराविण्याकारितां त्यास कोतवालाच्या हवालीं केलें. त्यानें अली खोजाचा पैसा कोठें ठेविला होता हें कबूल केलें व तो त्याचा त्यास मिळाला. कालिफानें काजीस, 'योग्य न्याय कसा करावा हें या मुलापासून शीक.' असें सांगून त्या मुलाला प्रेमानें आलिंगिलें, आणि त्याला शंभर मोहोरांची एक थैली बक्षीस देऊन घरीं जाण्यास परवानगी दिली.

---

# तीन बहिणींची गोष्ट.

खुसरुशाह या नांवाचा इराणचा एक प्रख्यात पातशाह होऊन गेला. त्याला शहरांत कोठें काय चाललें आहे हें वेष पालटून गुप्तपणें पाहण्याचा फार नाद असे. त्यानें आपल्याप्रमाणेंच आपले कामगार वेष पालटवून आपल्याबरोबर घ्यावे, व शहरच्या निरनिराळ्या भागांत टेहेळणी करीत फिरावें. त्या वेळीं अनेक विलक्षण गोष्टी त्याच्या पाहण्यांत येत. त्यांत मुख्यत्वेंकरून, तो गादीवर बसल्यावर प्रथमतःच फिरावयास गेला असतां जी एक गोष्ट घडली, तिची हकीकत फारच चमत्कारिक आहे.

त्या दिवशीं दीड प्रहर रात्रीचे सुमारास पातशाह आपल्या मुख्य वजिरासह शहरांत फिरत असतां, जेथें बहुतकरून साधारण प्रतीचेच लोक रहात असत अशा मोहल्यांत आला. तो रस्त्यानें चालला असतां एका घरांत मोठमोठ्यानें कोणी बोलत आहेत असें त्यानें ऐकल्यावरून त्या घरापाशीं तो गेला. त्यानें दाराच्या फटींतून पाहिलें तों आंत दिवा जळत असून तिघी बहिणी माच्यावर बसून गोष्टी बोलत आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्यांपैकीं सर्वांत जी वडील होती तिच्या बोलण्यावरून त्यांच्या संभाषणाचा विषय त्यास कळून आला. ती म्हणाली, ‘ पातशहाचा जो बांकनीस आहे, तो मला नवरा मिळावा अशी माझी इच्छा आहे. कारण, तसें झाल्यानें मला राजवाड्याच्या कोठींतील हवा तो जिन्नस मिळत जाईल. ’ नंतर ती आपल्या बहिणींना म्हणते, ‘काय ग, तुमची कशी इच्छा आहे?’ तेव्हां मधली बहीण म्हणते, ‘ माझी इच्छा अशी आहे कीं, पातशाहाचा आचारी मला नवरा मिळावा; म्हणजे मला नेहमीं पातशाहाच्या खाशा पंक्तीचें जेवण मिळत जाईल. ’ मग ती आपल्या वडील बहिणीस उद्देशून म्हणते, ‘ ताई, एकंदरीनें तुझी आणि माझी इच्छा बहुतेक सारखीच आहे, नाहीं बरें ?’

या तिघी बहिणींपैकीं सर्वांत धाकटी जी होती, ती फारच

रूपवती असून तिच्या अंगीं मोहकपणा व चातुर्य हीं तिच्या दोघी बहिणींपेक्षां जास्त होतीं. तिची जेव्हां बोलण्याची पाळी आली, तेव्हां ती म्हणाली ' इच्छाच करावयाची तर मग हलक्यासलक्या गोष्टींची का करावी ? माझी इच्छा विचाराल तर पातशाहाची पट्टराणी व्हावें अशी आहे. त्याच्यापासून मला असा पुत्र व्हावा कीं, त्याच्या डोक्याच्या एका बाजूचे केंस सोन्याचे व दुसऱ्या बाजूचे रुप्याचे असावे; तो रडतांना त्याच्या डोळ्यांतून जीं आसवें पडतील तीं मोत्यें असावीं; आणि हंसतांना त्याचे ओंठ नवीन उमललेल्या गुलाबाच्या कळीप्रमाणें दिसावे. ' त्या तिघी बहिणींचा हा संवाद ऐकून पातशाहास मोठा चमत्कार वाटला. त्यांत विशेषेंकरून शेवटीं जी बोलली तिच्या बोलण्याचा तर त्याला अतिशयच चमत्कार वाटला. तेव्हां त्यानें त्या प्रत्येकीची इच्छा तृप्त करण्याचा मनांत निश्चय केला. हें त्यानें वजिरास न बोलून दाखवितां फक्त त्यास एवढेंच सांगितलें कीं, ' या घराची खूण लक्षांत ठेवा; व उद्यां ह्या तिघी बहिणींना हुजूर घेऊन या. '

त्याप्रमाणें दुसरे दिवशीं मुख्य वजीर त्या घरीं गेला, आणि त्या तिघी बहिणींस पातशाहाचा हुकूम कळवून राजवाड्यांत घेऊन आला. त्यांस पातशाहासमोर आणल्यावर पातशाह त्यांस म्हणाला, ' तुम्ही काल रात्रीं आनंदांत गोष्टी बोलत असतां प्रत्येकीनें आपआपली इच्छा अमुक अमुक आहे असें म्हटलें. त्याची तुम्हाला आठवण असेलच. तर तें सर्व मला पुनः सांगा. मजपाशीं कांहींएक चोरतां कामा नये हें मात्र लक्षांत ठेवा; कारण, मी तुमच्यापासून सर्व काढून घेतल्यावांचून राहणार नाहीं ! '

हें पातशाहाचें बोलणें ऐकून त्या तिघी बहिणी पराकाष्ठेच्या विस्मित होऊन गेल्या; कारण, आपलें बोलणें पातशाहाच्या कानीं पडलें असेल हें त्यांच्या गांवींही नव्हतें ! लाजेनें त्यांनीं खालीं माना घातल्या व त्यांच्या गालांवर लाली आली; आणि तेणेंकरून त्यांच्या चेहऱ्यांत एक प्रकारची विशेष खुमारी दिसूं लागली. त्यांत विशेषें-

करून, सर्वांत धाकटी जी होती ती फारच देखणी असल्यामुळें पातशाहाचें मन तिच्या ठिकाणीं अगदीं तल्लीन होऊन गेलें. स्त्रियांचा स्वभाव मूळचाच लाजाळू, त्यांत आणखी आपल्या बोलण्याच्या योगानें पातशाहास राग आला असेल कीं काय ही त्यांना भीति; या दोन गोष्टींमुळें त्यांना बोलण्यास धैर्य येईना. त्या स्तब्ध राहिल्या असें पाहून पातशाह त्यांस म्हणाला, 'तुम्हाला भिण्याचें बिलकुल कारण नाहीं. तुम्हांला येथें कोणत्याही प्रकारची तसदी पोहोंचेल अशी तुम्ही शंकासुद्धां मनांत आणूं नका. तुम्हांला जो मीं प्रश्न केला, त्यापासून तुम्हांला भीति वाटेल असें मला मुळींच वाटलें नव्हतें. असो. तुम्ही आतां सर्व भीति सोडून द्या. तुमची प्रत्येकीची इच्छा काय आहे, ती मला माहीत आहे; व ती मी आतांच्या आतां पूर्ण करणार.' नंतर सर्वांत धाकट्या बहिणीला उद्देशून तो म्हणाला, 'माझी पट्टराणी होण्याची तुझी इच्छा आहे, त्याप्रमाणें मी तुझ्याशीं विवाह करतों.' मग दुसऱ्या दोघींना उद्देशून तो म्हणाला, 'तुमच्या दोघींच्या इच्छेप्रमाणें तुमचींही लग्नें आमचा वांकनीस व आचारी यांजबरोबर अनुक्रमें लावून देतों.'

हें पातशाहाचें बोलणें ऐकून सर्वांत धाकटीनें पातशाहास आपली कृतज्ञता दर्शविण्याकरितां त्याच्या पायांवर डोकें ठेविलें. तें पाहून बाकीच्या दोघींनींही तसेंच केलें. नंतर धाकटी पातशाहास म्हणाली, 'राजाधिराज, माझी इच्छा अमुक आहे असें जें मीं म्हटलें, तें केवळ विनोदानें म्हटलें. आपण जी मजवर कृपा करतां तीस मी कोणत्याही प्रकारें योग्य नाहीं व मी आपल्या अविचारीपणाच्या भाषणाबद्दल या पायांपाशीं क्षमा मागतें. बाकीच्या दोघीही असेंच कांहीं बोलणार होत्या. पण पातशाहानें त्यांस बोलूं दिलें नाहीं. तो म्हणाला, 'तुमचें हें बोलणें मीं कांहीं ऐकावयाचा नाहीं. तुमच्या प्रत्येकीच्या इच्छेप्रमाणें गोष्टी घडल्याच पाहिजेत!'

मग पातशाहानें म्हटल्याप्रमाणें ते तिन्ही विवाहसमारंभ त्याच दिवशीं करण्यांत आले. पण यांच्यांत अर्थात् मोठा फरक दृष्टीस

पडला. धाकटीचा विवाह पातशाहाच्या इतमामाप्रमाणें मोठ्या थाटानें झाला. बाकीचे दोन, त्याचा वांकनीस व आचारी यांच्या योग्यते-प्रमाणें झाले.

ह्या लग्नाच्या योगानें त्या दोघी वडील बहिणी व धाकटी बहीण यांच्या पदवींत जें महदंतर पडून गेलें, त्याच्या योगानें त्या दोघींना अतिशय वाईट वाटलें. त्यांना संभव नसतां त्यांच्या इच्छेप्रमाणें गोष्टी घडून आल्या याबद्दल जो त्यांना आनंद व्हावा, तो न होतां, त्यांच्या मनांत आपल्या धाकट्या बहिणीविषयीं मत्सर उत्पन्न झाला. त्याच्या योगानें त्या आपल्या स्वतःच्या सुखास अंतरल्या, व त्यांच्या बहिणीस अत्यंत दुःख व क्लेश भोगावे लागले. पात-शाहानें दोन्ही वडील बहिणी टाकून धाकटीला पसंत केलें,यासंबंधानें त्या दोघींना आपआपलें मनोगत एकमेकींस कळविण्यास लग्नाचे पूर्वी अवसरच सांपडला नाहीं; कारण लग्नांचा निश्चय ठरल्यावर तीं होण्यास अवकाश इतका थोडा होता कीं, त्याकरितां त्यांना स्वतांना जी कांहीं तयारी करावयाची होती ती करतां करतांच त्यांना पुरेसें झालें ! नंतर कांहीं दिवसांनीं हमामखान्यांत जेव्हां त्या दोघींची गांठ पडली, तेव्हां प्रथमतः यासंबंधानें त्या दोघींचा संवाद सुरू झाला. वडील बहीण मधल्या बहिणीस म्हणते, ' काय ग, आपली धाकटी बहीण पातशाहाची पट्टराणी झाली आहे, त्यासंबं-धानें तुला कसें काय वाटतें ! ती पदवी तिला प्राप्त होण्याइतकी तिची योग्यता आहे काय ? ' मधलीनें उत्तर केलें, ' ताई, खरेंच विचारशील तर पातशाहा तिला जो एवढा भुलला, तो तिचें काय पाहून भुलला हें मला मुळींच समजत नाहीं ! अहाहा ! काय पण तें माकडासारखें तोंड ! आणि तें फेंदरें नाक ! तिच्या अंगीं पातशाहाचें मन आकर्षून घेण्यासारखें कांहीं तरी होतें बरें ? ती तुझ्यापेक्षां तरुण आहे एवढेंच पाहून पातशाहानें तिला वरिलें असेल तर हा त्यानें योग्य विचार केला असें तुला वाटतें ? मला

तर वाटतें कीं, त्यानें तुला पसंत करावयाचें होतें. त्याच्या पाणिग्रहणास तूंच सर्व प्रकारें योग्य होतीस.'

वडील बहीण मधल्या बहिणीस म्हणते, 'माझी एकपरी गोष्ट राहूं दे. पण पातशाहानें जरी तुला वरिलें असतें, तरी मला त्यांत कांहीं-एक वाईट वाटलें नसतें. पण त्या हिडीस कारटीला त्यानें वरिलें याचें मला अतिशय वाईट वाटतें! असो. कांहीं चिंता नाहीं; मी याबद्दल तिचा सूड घेतल्यावांचून राहणार नाहीं आणि माझ्याप्रमाणेंच तुझाही या गोष्टींत संबंध असल्यामुळें तूंही मला सहाय्य करशील, अशी माझी खात्री आहे. आपण अशी कांहीं तरी तोड काढूं कीं, जेणेंकरून तिची अगदीं फटफजीती होईल, व ती जी एकाएकीं एवढ्या उंच पदास चढली आहे, तेथून एकदम खालीं येईल!'

याप्रमाणें त्या दोघी दुष्ट बहिणींचा बेत झाल्यावर त्या एकमेकींस वारंवार भेटून खलबतें करीत, व आपल्या धाकट्या बहिणीचें मातेरें करण्यास काय युक्ति करावी याचा विचार करीत. त्यांनीं पुष्कळ युक्त्या योजिल्या, पण त्या सिद्धीस नेण्यास अनेक अडचणी आहेत असें त्यांस दिसून आल्यावरून त्यांनीं त्या नापसंत केल्या. त्या तिला वारंवार जाऊन भेटत, व तिच्या थोर भाग्याच्या संबंधानें आपल्याला अतिशय आनंद झाला असें बाह्यात्कारीं तिला दर्शवीत. ती फार साधी बायको असून तिला छक्केपंजे मुळींच माहीत नव्हते; यामुळें त्यांचें कपट तिच्या लक्षांत न येऊन ती त्यांच्याशीं मोठ्या ममतेनें व अगदीं बरोबरीच्या नात्यानें वागे.

पुढें कांहीं महिन्यांनीं धाकटी बहीण म्हणजे पातशाहाची राणी ही गरोदर राहिली. त्यामुळें पातशाहास व इतर सर्व लोकांस मोठा आनंद होऊन त्या आनंदाप्रीत्यर्थ शहरांत कित्येक दिवस मोठा उत्सव चालला होता. तिच्या दोघी बहिणीही तिजकडे येऊन त्यांनीं बाह्यात्कारीं तिला आपला आनंद प्रदर्शित केला; आणि त्यांनीं तिला अशी गळ घातली कीं, तूं बाळंत होशील त्या वेळेस आपल्या शुश्रूषेस आम्हांशिवाय दुसऱ्या कोणालाही ठेवूं नको.' तिनें उत्तर

केलें, ' तुमच्यासारखीं मायेचीं माणसें मला मिळाल्यावर मला मग आणखी काय पाहिजे ? पण ही गोष्ट केवळ माझ्याच मर्जीवर अवलंबून नसल्यामुळें मला तुम्हांला होय म्हणवत नाहीं. तुम्ही ममतेनें एवढें मला म्हणाला याबद्दल मी तुमची फार आभारी आहें. पण सरकार जी आज्ञा करतील ती मला ऐकिली पाहिजे, याकरितां तुम्ही आपल्या नवऱ्याकडून कोणी दरबारी मनुष्यामार्फत याबद्दल खटपट करवा; आणि सरकारांकडून जर मला विचारणें झालें, तर तुम्हांला ठेवण्याचें मी पसंत करीन एवढेंच नाहीं, पण ही निवड फारच उत्तम केली म्हणून त्यांच्याकडूनही त्यांची पसंती मिळवीन.

त्या दोघी बहिणींच्या नवऱ्यांनीं आपल्या बायकांच्या सांगण्याप्रमाणें दरबारांतल्या आपल्या कांहीं पुरस्कर्त्यांकडून पातशाहाकडे वशिला बांधला. त्या लोकांनीं मोठी खटपट करून ती गोष्ट एथपर्यंत आणून पोहोंचविली कीं, मी या गोष्टीचा विचार करतों, ' असें पातशाहानें त्यांस सांगितलें. नंतर एके वेळीं पातशाहाचें राणीबरोबर संभाषण चाललें असतां तो तिला म्हणाला, ' तुझ्या बाळंतपणाचे वेळीं तुझ्या शुश्रूषेकरितां बाहेरचीं कोणीं माणसें ठेवावयाचीं त्यापेक्षां तुझ्या बहिणींनाच ठेविलें तर बरें असें मला वाटतें. पण ही गोष्ट सर्व प्रकारें मी तुझ्या मर्जीवर ठेवितों. तूं होय म्हणशील तर मी त्यांना ठेवीन. ' हें पातशाहाचें बोलणें ऐकून राणीस फारच आनंद झाला. ती म्हणाली, ' महाराज, माझें कांहींएक म्हणणें नाहीं, आपण जीं माणसें ठेवाल तीं मला कबूलच आहेत. परंतु आपण कृपा करून माझ्या बहिणींना ठेवण्याचा विचार मनांत आणिला हे मजवर आपले मोठे उपकार आहेत; कारण माझ्याकरितां त्यांना आपण हा मोठा मानच दिला असें मी समजतें; आणि मला हेंही बोलून दाखविल्यावांचून रहावत नाहीं कीं, परक्या माणसांपेक्षां त्या माझ्याजवळ असल्या म्हणजे मला जास्त आनंद व सुख होणार आहे. '

यावरून पातशाहानें त्या दोघी बहिणींस आपल्या राणीचें सुइण-

काम करण्यास नेमिलें हें पाहून त्यांना मोठा हर्ष झाला; कारण त्यांनीं आपल्या मनांत जो दुष्ट हेतु योजिला होता, तो सिद्धीस जाण्यास त्यांना त्या योगानें चांगली सोय झाली. तेव्हांपासून त्या दिवसांतून कित्येक वेळां राजवाड्यांत जाऊन राणीशीं पुष्कळ वेळपर्यंत गोड गोड गोष्टी बोलत बसूं लागल्या, व तिजविषयीं आपल्याला फार काळजी आहे असें तिला बहुत प्रकारें दर्शवूं लागल्या.

राणीला नऊ महिने पुरे झाल्यावर ती सुरक्षितपणें बाळंत होऊन तिला अत्यंत सुंदर व सूर्यासारखा तेजःपुंज पुत्र झाला; पण त्याचें तें अप्रातिम सौंदर्य व नाजुकपणा पाहून त्या पाषाणहृदय बहिणींस त्याची दया आली नाहीं! त्यांनीं लागलीच त्या कोमल बालकाला एका पटकुरांत गुंडाळलें व एका पाटींत घालून, राणी बाळंत झाली होती त्याच खोलीच्या जवळून एक कालवा गेलेला होता त्यांत ती पाटी टाकून दिली; आणि त्यांनीं मुद्दाम एक कुत्र्याचें नुकतेंच जन्मलेलें पिल्लूं आणून ठेविलेलें होतें तें राणीस झालें असें प्रसिद्ध केलें. ही खेदकारक वार्ता ऐकून पातशाहास अतिशय वाईट वाटलें व संतापही आला. त्या संतापाच्या आवेशांत त्यानें राणीचें काय केलें असतें हें सांगवत नाहीं; परंतु त्याच्या मुख्य वजिरानें त्याची समजूत घालून त्याला सांगितलें कीं 'या गोष्टी परमेश्वराधीन आहेत; यांत राणीचा कांहींएक अपराध नाहीं. तर आपण तिजवर विनाकारण क्रोध करूं नये.' हें ऐकून पातशाहाचा कोप शांत झाला, आणि त्यानें त्या गोष्टीचा जास्त विचार केला नाहीं; असो.

'तो कालवा, तेथून जवळच एक सरकारी बाग होती, तिच्यांतून गेलेला होता. त्यामुळें त्या बालकासहित ती पाटी जी वाहवत गेली, ती कर्मधर्मसंयोगानें, सरकारी बागांवरील मुख्य कामगार कालव्याच्या बांधावरून फिरत होता, त्याच्या दृष्टीस पडली. त्यावरून त्यानें एका माळ्यास हांक मारून त्यास सांगितलें कीं, 'जलदी करून जा, आणि ती पाटी वहात आहे ती इकडे घेऊन ये.

तिच्यांत काय आहे तें मला पाहिलें पाहिजे. ' त्या माळ्यानें बांधावरून खालीं उतरून आपल्या कुदळीनें ती पाटी हलकेंच आपणांकडे घेतली, आणि कामगाराच्या पुढें आणून ठेविली.

त्या पाटींत तें मूल पाहून कामगारास मोठा चमत्कार वाटला, व तें नुकतेंच जन्मलेलें दिसत असून त्याच्या अंगीं एवढी तेजस्विता आहे हें पाहून तर तो अगदीं आश्चर्यचकित झाला. त्याचें लग्न होऊन बरींच वर्षें झालेलीं होतीं, तथापि त्यास संतति मुळींच झाली नव्हती; यामुळें तो फार दुःखी होता. तेव्हां हें मूल आपल्या घरीं घेऊन जावें असा विचार त्याचे मनांत आला. त्यावरून त्या माळ्याच्या डोकीवर त्यानें ती मूल घातलेली पाटी देऊन त्याला आपल्याबरोबर घरीं नेलें. त्याचें घर राजवाड्याशेजारीं जी बाग होती तिच्या फाटकानजीकच होतें. तेथें गेल्यावर तो आपल्या बायकोस म्हणाला, ' अग, आपल्याला संतति नाहीं, तर ईश्वरानें हा मुलगा आपणांस पाठविला आहे, याचा आपण प्रतिपाळ करून याला आपल्या स्वतःच्या मुलाप्रमाणेंच आपणांजवळ बाळगूं. जा तर लवकर, याजकरितां एक दाई पाहून आण. ' त्याच्या बायकोला तो मुलगा पाहून फार आनंद झाला, व त्याची तिनें उत्तम प्रकारें व्यवस्था ठेविली. त्या कामगारानें हें मूल कोठून आलें वगैरेंबद्दल मुळींच चौकशी केली नाहीं. तें पातशाहाच्या वाड्यांतून आलें याविषयीं शंका नाहीं असें त्यास वाटलें, पण त्यानें विचार केला कीं, या प्रकरणांत आपण पडूं नये हें बरें; कारण ही गोष्ट फुटली असतां कोणावर हा अनर्थ गुदरेल याचा नेम नाहीं !

नंतर दुसरे वर्षीं राणीस असाच दुसरा पुत्र झाला, पण तिच्या निर्दय बहिणींना त्याचीही दया न येऊन त्यांनीं त्यास पूर्वींप्रमाणेंच पाटींत घालून कालव्यांत सोडून दिलें, आणि राणीस एक मांजर झालें असें उठविलें. सुदैवेंकरून तो सरकारी बागांवरील कामगार त्या वेळींही कालव्याच्या बाजूनें हिंडत होता, त्याच्या दृष्टीस ती पाटी पडून त्यानें पूर्ववत् ती आपल्या बायकोकडे नेवविली, आणि

आंतील मूल बायकोच्या स्वाधीन करून पहिल्या मुलाप्रमाणेंच त्याची चांगली जोपासना करण्याविषयीं तिला सांगितलें. हा दुसरा मुलगा आपल्याला देवानें दिला याविषयीं तिला मोठा हर्ष वाटून, नवऱ्यानें सांगितल्याप्रमाणें तिनें मोठ्या आनंदानें केलें.

या वेळीं पातशाहास पूर्वींपेक्षांही फार संताप आला, व त्या संतापाचा राणीवर भयंकर परिणाम झाला असता, परंतु त्याच्या मुख्य वजिरानें मोठ्या युक्तीनें त्याचा कोप शांत केला, व तेवढी वेळ कशी तरी पार पाडिली.

राणी फिरून तिसऱ्या खेपेस गरोदर राहिली व तिला कन्या झाली. त्या राक्षसिणींनीं या मुलीचीही दशा तिच्या भावांप्रमाणेंच करून टाकिली! कारण त्यांनीं असा निश्चय केला होता कीं, राणीची पुरती दुर्दशा करून तिला अगदीं नीच स्थितींत आणून पोहोंचावि-ल्याशिवाय रहावयाचें नाहीं. या मुलीच्या संबंधानेंही असा चमत्का-रिक योग घडून आला कीं, तीही त्या बागेवरील कामगाराच्या दृष्टीस पडून, तिचें त्यानें तिच्या दोघां भावाप्रमाणें उत्तम प्रकारें पालनपोषण केलें.

राणीच्या बहिणींनीं या वेळीं एक तिसरीच तऱ्हा काढिली. त्यांनीं तिला एक लांकडाचा तुकडा झाला असें सांगितलें!

हा विलक्षण प्रकार पाहून पातशाह पराकाष्ठेचा क्रोधाविष्ट झाला. तो म्हणाला, ' ही स्त्री नव्हे; हें दुश्चिन्ह घरांत शिरलें आहे! हिला जर मीं यापुढें जिवंत ठेविली, तर माझ्या घरांत असले विचित्र प्रकार किती घडतील कोण जाणे! छिः हें कांहीं कामाचें नाहीं. हिला जगांतून नाहींशीच केली पाहिजे. ' असें म्हणून त्यानें तिचा शिरच्छेद करण्याविषयीं मुख्य वजिरास हुकूम केला.

हा देहान्तशिक्षेचा हुकूम फिरविण्याविषयीं मुख्य वजीर व दरबा-रचे इतर मंत्री वगैरे यांनीं पातशाहाची अतिशय पायधरणी केली. वजीर म्हणाला, ' महाराज, मी थोडेंसें बोलतों इकडे कृपा करून लक्ष द्यावें. देहदंडाची शिक्षा जी कायद्यानें ठरविली आहे, ती फक्त

अपराध करणारासच ठरविली आहे. दुर्दैवेंकरून आजपर्यंत जे हे तीन विलक्षण प्रकार झाले, त्यांत राणीनें कोणताही अपराध केला असें होत नाहीं. अशा गोष्टी शेंकडों स्त्रियांच्या संबंधानें घडलेल्या नेहमीं ऐकूं येतात. ह्या स्त्रियांबद्दल सर्वांना दुःख वाटतें, पण त्यांना कोणी शिक्षा करीत नाहीं. कारण त्या शिक्षेस पात्रच नाहींत. याकरितां, महाराज, आपल्या पायांशीं आमची एवढीच विनंति आहे कीं, राणीस आपण मरणाची शिक्षा देऊं नये, फार झालें तर आपण तिचा त्याग करावा. आपण तिचा त्याग केल्यावर तिला जे दुःखांत दिवस काढावे लागतील, तीच तिला मोठी शिक्षा आहे ! '

हें वजिराचें बोलणें ऐकून पातशाहाच्या हृदयांत प्रकाश पडला; व राणीस मृत्यूची शिक्षा दिली असतां केवळ अन्याय होईल असें त्यास वाटलें. मग तो वजिरास म्हणाला, ' ठीक आहे; मी तिला मरणाची शिक्षा देत नाहीं; पण दुसरी अशी शिक्षा देतों कीं, जीपेक्षां तिला मरणच बरें वाटेल ! तुम्ही शहरांतील मुख्य मशिदीच्या दारापाशीं एक तुरुंगासारखी लहानशी झोंपडी तयार करवा. तिच्या खिडक्यांना लोखंडी गज असावे. त्या झोंपडींत त्या सटवीला अगदीं जाडेभरडे कपडे नेसायाला व पांघरायाला देऊन ठेवा; व शहरांत अशी दवंडी फिरवा कीं, मशिदींत निमाज पढण्याकरितां जाणाऱ्या प्रत्येक मुसलमानानें तिच्या तोंडावर थुंकावें; व जो कोणी असें करणार नाहीं त्याला हीच शिक्षा करण्यांत येईल. हा हुकूम बरोबर अमलांत येतो कीं नाहीं हें पाहण्याकरितां त्या ठिकाणीं मुद्दाम शिपाई ठेवा. '

पातशाह हे शेवटचे शब्द अशा आवेशानें बोलला कीं, त्याजपुढें वजिराच्यानें एक चकारशब्दही काढवला नाहीं; मग पातशाहाच्या हुकुमाप्रमाणें झोंपडी बांधल्यावर राणीच्या बाळंतपणास एक महिना होतांच तिला त्या झोंपडींत ठेवून दिलें, व तिच्या कपाळीं जें काय आलें होतें तें तिला भोगावें लागलें. ती मनांत पक्कें जाणून होती कीं, मजकडे कांहींएक अपराध नाहीं; व यामुळें दुर्दैवेंकरून आलेल्या

प्रसंगास ती मोठ्या धैर्यानें सादर झाली. तिचें धैर्य पाहून सर्व विचारी लोकांस मोठें आश्चर्य वाटलें व तिची दया आली. मात्र तिच्या बहिणींचा हेतू पूर्णपणें सिद्धीस गेल्यामुळें त्यांना तेवढा पराकाष्ठेचा आनंद झाला.

राणीचे दोघे पुत्र व कन्या या तिघांस बागावरील कामगार व त्याची बायको यांनीं केवळ आपल्या पोटच्या मुलांप्रमाणें मोठ्या ममतेनें वाढविलें. तीं जसजशीं मोठीं होत चाललीं, तसतसा त्यांच्या उच्च कुळाचा अंकुर त्यांच्या ठायीं दृष्टीस पडूं लागला. रस्त्यांत भटकणाऱ्या भिकारी पोरांच्या खेळांकडे त्यांचें मुळींच लक्ष जात नसे; तर त्यांच्या वागणुकींत अशीं कांहीं चिन्हें दिसून येत कीं, तशीं राजकुलांतील मुलांखेरीज इतरांच्या ठायीं कधींही दिसावयाचीं नाहींत. या कारणामुळें तर तो कामगार व त्याची बायको यांना त्यांचें फारच कौतुक वाटूं लागलें, व ती त्यांस अगदीं जीव कीं प्राण करूं लागलीं. त्यांनीं वडील मुलाचें नांव बहामन, धाकट्याचें पर्विज, आणि मुलीचें नांव परीजादी अशीं ठेविलीं. यांपैकीं पहिलीं दोन नांवें, प्राचीन काळीं इराण देशांत जे मोठे नामांकित पातशाह होऊन गेले त्यां- पैकीं कित्येकांचीं असून, परीजादी हें नांव त्याच देशांतील कित्येक राण्या व राजकन्या यांचीं होतीं.

राजपुत्र जरासे मोठे झाल्यावर बागांवरील कामगारानें त्यांना लिहिणें वाचणें शिकविण्याकरितां शिक्षक ठेविले. ते दोघे मुलगे आपले धडे शिकत असतां त्यांची बहीण परीजादी ही मोठ्या उत्सुकतेनें त्यांच्यापाशीं जाऊन बसूं लागली, व तिला कोणी न शिकवितां नुसतें आपल्या भावांचें ऐकून ऐकूनच ती थोडेंसें शिकली. तिची ती शिकण्याविषयींची उत्सुकता पाहून बागांवरील कामगारानें त्याच शिक्षकांस तिलाही शिकविण्यास ठेविलें. तिची बुद्धि मोठी विलक्षण असल्यामुळें थोडक्याच दिवसांत तिनें आपल्या भावांची बरोबरी केली.

तेव्हांपासून पुढें ते दोघे राजपुत्र व त्यांची बहीण हीं तिघें भूगोल, इतिहास, काव्य, व गहन विषयांचीं शास्त्रें सुद्धां एकाच गुरूपाशीं शिकत असत. त्या तिघांचीही बुद्धि अतिशय चलाख असल्यामुळें थोडयाच वेळांत तीं त्या विषयांत इतकीं प्रवीण झालीं कीं, तें पाहून त्यांच्या सर्व शिक्षकांनीं तोंडांत बोटें घातलीं ! त्यांनीं स्पष्ट बोलून दाखविलें कीं, 'आणखी कांहीं दिवस जर हीं असाच अभ्यास चालवितील, तर आमच्या जवळची सर्व पुंजी संपेल'. अभ्यास करावयाचा नसे त्या वेळेस राजकन्या गावयास व वाद्यें वाजविण्यास शिके. तिचे भाऊ घोडयावर बसण्याचा अभ्यास करूं लागले तेव्हां तीही त्यांच्या बरोबर घोडयावर बसून जाऊं लागली व त्यांच्याप्रमाणेंच भरधांव घोडा टाकण्यास व तिरंदाजी वगैरे करण्यास शिकली.

याप्रमाणें तीं मुलें सर्व प्रकारच्या विद्यांत मोठी निष्णात झाल्यामुळें त्यांचा पालनकर्ता जो बागावरील कामगार त्याला अतिशय आनंद झाला. तो इतका कीं, त्यांच्याकरितां त्यानें आणखी लागेल तो खर्च करण्याचा निश्चय केला. त्याचें हल्लींचें घर फार लहान व गैरसोईचें असल्यामुळें त्यानें शहरानजीक एक उत्तम हवाशीर जागा विकत घेतली. तेथें त्यानें एक मोठा छानदार टोलेजंग वाडा बांधला. तो तयार झाल्यावर तो आपलें काम संभाळून मधूनमधून कांहीं दिवस सर्व माणसांसुद्धां तेथें जाऊन रहात असे. त्यानें आपल्या वाडयाच्या योग्यतेप्रमाणेंच त्यांत सामानसुमानही श्रीमंती थाटाचें भरिलें. नंतर त्यानें इराण देशांतील मोठमोठया उमरावांच्या बागांप्रमाणें कित्येक रमणीय बागा आपल्या वाडयासभोंवतीं तयार करविल्या. त्याचप्रमाणें त्यानें राजपुत्र व राजकन्या यांस शिकार करण्याकरितां एक मोठा शिकारखानाही तयार करविला.

नंतर कांहीं दिवसांनीं तो कामगार पातशाहाकडे गेला, आणि त्यानें त्याजपाशीं असा अर्ज केला कीं, 'महाराज, मीं आपल्या पायांपाशीं बहुत दिवसपर्यंत चाकरी केली; आतां मला वार्धक्य येत

चालल्यामुळें माझी अशी विनंति आहे कीं, मला चाकरीचा राजीनामा देऊन बाकी राहिलेले आयुष्याचे दिवस स्वस्थपणें घालविण्यास कृपा करून परवानगी द्यावी.' पातशाहानें मोठ्या संतोषानें त्याचा अर्ज मान्य केला. कारण त्यानें पुष्कळ वर्षेंपर्यंत, म्हणजे त्याच्या बापाच्या वेळेपासून तों तहत या वेळेपर्यंत, फार इमानेंइतबारें नौकरी केली होती. पातशाह त्यास म्हणाला, 'तुम्हाला आतां राहिलेले दिवस सुखांत घालविण्यास मी मोठ्या खुषीनें रजा देतों; परंतु तुमच्या बहुत दिवसांच्या नोकरीबद्दल तुम्हाला कांहीं तरी इनाम द्यावें असें माझ्या मनांत आहे; तर तुम्हाला काय पाहिजे तें सांगा.' कामगारानें उत्तर केलें, 'महाराज, आपले व आपल्या तीर्थरूपांचे मजवर आजपर्यंत अगणित उपकार झाले आहेत. यास्तव मला आतां आणखी कशाचीही अपेक्षा नसून फक्त आपली मजवर कृपा आहे तशीच ती शेवटपर्यंत रहावी, एवढेंच आपणांपाशीं मागणें आहे.'

याप्रमाणें त्या कामगारानें आपल्या चाकरीचा राजीनामा दिल्यावर तो आपल्या नवीन वाड्यांत जाऊन राहिला. पुढें कांहीं दिवसांनीं त्याची बायको मरण पावली; व तिच्यानंतर तोही पांचसहा महिन्यांनीं मरण पावला. तो इतका कांहीं चमत्कारिक रीतीनें एकाएकीं मरण पावला कीं, त्याला त्या तिघां मुलांना त्यांच्या जन्माची खरी खरी हकीकत कळविण्यासही अवकाश सांपडला नाहीं.

राजपुत्र बहामन आणि पर्वीज व त्यांची बहीण परीजादी यांना कामगारच आपला बाप आहे असें अर्थात् वाटत होतें. यामुळें त्यांना त्याच्याबद्दल अतिशय दुःख झालें, व त्यांनीं बापाप्रमाणेंच त्याचें उत्तरकार्य वगैरे केलें. त्यानें आपल्यामागें जें कांहीं त्यांच्याकरितां ठेविलें होतें, तेवढ्यांत तीं संतुष्ट असून तिघेंही एका दिलानें रहात असत. राजपुत्रांनीं पातशाहाच्या दरबारीं कांहीं हुद्यांचीं कामें मिळविण्याविषयीं खटपट केली असती तर तीं त्यास सहज मिळालीं असतीं. पण त्यांचें त्या गोष्टीकडे लक्षच नव्हतें.

एके दिवशीं हे दोघे राजपुत्र शिकारीस गेले होते, व त्यांची बहीण घरीं होती. त्या वेळीं त्यांच्या दाराशीं एक म्हातारी जोगीण आली, आणि ती निमाज पढण्याची वेळ असल्यामुळें, मला निमाज पढण्यास आंत येऊं द्या, असें दारावरील चाकरास म्हणाली. चाकरानें राजकन्येकडे जाऊन, ' त्या बाईला येण्यास परवानगी देऊं काय ? ' असें तिला विचारलें. ती त्यास म्हणाली, ' तिला आंत घेऊन ये, आणि आपली निमाज पढण्याची जागा दाखवून दे. ' नंतर आपल्या दोघी दासींस ती म्हणाली, ' तिचा निमाज पढून झाल्यावर आपला सर्व वाडा व त्याच्या भोंवतालच्या बागा तिला दाखवा आणि नंतर तिला मजकडे घेऊन या. ' चाकरानें जोगिणीस आंत बोलाविलें, व निमाज पढण्याची जागा दाखवून दिली. निमाज पढून ती बाहेर आली, तों राजकन्येच्या दोघी दासी तेथें उभ्याच होत्या. त्यांनीं तिला तो वाडा व बाग पाहण्याविषयीं विनंति केली. तिनें त्याबद्दल त्यांचे आभार मानिले, व ती त्यांच्यामागें चालली. तिनें तें वाड्याचें सुंदर काम व तेथील उत्तम व्यवस्था पाहून मोठा आनंद दर्शविला. नंतर त्या दासींनीं तिला बागांत नेलें. त्या बागांची शोभा व रचना पाहून ती इतकी खूष झाली कीं, अशा प्रकारच्या बागा मीं कधींही पाहिल्या नाहींत, असें तिनें बोलून दाखविलें. बागा पाहणें झाल्यावर तिला दासींनीं राजकन्येकडे नेलें. राजकन्या त्या वेळीं वाड्यांतील मुख्य दिवाणखान्यांत बसलेली होती. त्या दिवाणखान्याचें नकशीकाम, तेथील चकचकाट आणि भारी किंमतीचें तेथें असलेलें सामान हीं पाहून तर त्या जोगिणीचे डोळे अगदीं दिपून गेले !

जोगीण दिवाणखान्यांत येतांच राजकन्येनें कोचाकडे बोट करून तिला म्हटलें, 'बाई, या; क्षणभर येथें मजजवळ बसा; तुम्हासारख्या ईश्वरभक्तिपरायण स्त्रीच्या दर्शनाचा लाभ मला झाल्यामुळें मला अतिशय आनंद झाला आहे. तुम्हांला पाहून मला असें वाटतें कीं, जगांतील सर्व माणसांनीं तुम्हांसारखेंच व्हावें ! '

ती जोगीण कोचावर नीट टेकून न बसतां त्याच्या एका टोंकावर बसली. पण राजकन्येनें उठून तिचा हात धरून तिला आपल्याजवळ आणून बसविलें. ती राजकन्येस म्हणाली, ' मुली, मला इतका मानसन्मान कशाला पाहिजे? परंतु तूं या घराची धनीण पडलीस याकरितां तूं सांगशील तें मला ऐकिलें पाहिजे! ' याप्रमाणें त्या दोघी बसताहेत तों राजकन्येच्या एका दासीनें एका चिनी तबकांत कांहीं पुऱ्या व फळफळावळ आणली, व त्यांच्यापुढें एका चौरंगावर ती ठेवून दिली.

राजकन्येनें त्यांतून एक पुरी घेतली आणि ती जोगिणीच्या हातांत देऊन तीस म्हणाली, ' खा बाई, तुम्ही बऱ्याच लांबून आलां आहां असें वाटतें. यामुळें तुम्हांला भूक लागली असेल. ' जोगिणीनें उत्तर केलें, ' मुली, मला असले श्रीमंती पदार्थ खाण्याची संवय नाहीं, व इच्छाही नाहीं; पण तुजसारख्या धार्मिक व उदार स्त्रीच्या द्वारें देवानें ज्याअर्थी ते मला दिले, त्याअर्थी मी ते खाण्यास अनमान करीत नाहीं. '

जोगिणीचा फराळ चालला असतां राजकन्येनेंही थोडासा फराळ केला. नंतर फराळाकडे बोट करून ती जोगिणीस म्हणाली, 'यांपैकीं तुम्हांला जीं आवडत असतील तीं खा. ' तीं त्या दोघींनीं खाल्ल्यावर त्या पाणी प्याल्या. हें चाललें असतां राजकन्येनें तिला इकडच्या तिकडच्या पुष्कळ गोष्टी विचारल्या; व शेवटीं, ' आमचा हा वाडा तुम्हांला कसा काय वाटतो? ' असा तिनें प्रश्न केला.

जोगिणीनें उत्तर केलें, ' मुली, खरोखरच हा वाडा अतिशय सुंदर असून याच्यांतील सामानसुमानाची उत्कृष्ट व्यवस्था आणि टापटीप हीं पाहून मला अतिशय समाधान वाटलें. तसेंच, हा वाडा बांधण्याला जागाही बांधणारानें उत्तम पाहिली यांत संशय नाहीं; कारण, येथें हवापाणी वगैरे चांगलें असून निवांतपणाचीही सोय आहे हें एक विशेष आहे; आणि मुली, याच्या सभोंवतालच्या बागा पाहून तर मला जो आनंद झाला तो बोलूनही दाखवितां येत नाहीं!

तथापि या ठिकाणीं आणखी तीन वस्तु जर असतील, तर हें स्थळ जगांत केवळ अप्रतिम होईल!' राजकन्या म्हणाली, 'बाई, त्या तीन वस्तु कोणत्या हें मला सांगाल तर तुमचे मजवर फार उपकार होतील. त्या मिळविण्याकरितां कितीही प्रयास पडले तरी चिंता नाहीं, पण त्या मिळविल्यावांचून मी कधींही राहणार नाहीं.'

जोगिणीनें उत्तर केलें, 'मुली त्या तीन वस्तु ह्याः—एक, बोलणारा पक्षी; त्याला बुलबुल केझर म्हणतात. त्या पक्ष्याला गातांही येतें. त्याचा असा चमत्कार आहे कीं, तो गाऊं लागला म्हणजे आसमंताद्भागाचे सर्व पक्षी त्याच्यापाशीं येतात, आणि त्यास सूर द्यावयास लागतात. दुसरी वस्तु गाणारें झाड; त्याला जितकीं पानें आहेत त्यांच्यांतून निरनिराळ्या प्रकारचे सूर निघून फारच मनोहर गायन चाललेलें असतें; व तें कधींही बंद होत नाहीं. तिसरी वस्तु सोनेरी रंगाचें पाणी; त्याचा असा चमत्कार आहे कीं, त्याचा एक थेंब बागेमध्यें एखाद्या डोणींत टाकिला असतां तो एका क्षणांत वाढत जाऊन एकदम ती डोण भरते, आणि तिच्या मध्यभागीं कारंजाच्या फवाऱ्यासारखा प्रवाह चालतो. तो कधींही बंद होत नसून, डोणींतलें पाणी बाहेर वाहून न जातां सदोदित तितकेंच राहतें!'

राजकन्या म्हणाली, 'बाई, हें तुम्ही मला सांगितलें याबद्दल मी तुमचें किती म्हणून उपकार मानूं! या वस्तु फारच लोकोत्तर असून अशा वस्तु जगांत असतील हें माझ्या स्वप्नींही नव्हतें. असो; या वस्तूंची ज्या अर्थी तुम्हांला माहिती आहे, त्या अर्थी त्या कोठें आहेत हेंही तुम्हाला ठाऊक असेलच; तर त्यांचें ठिकाण तेवढें कृपा करून मला सांगा.'

जोगिणीनें उत्तर केलें, 'मुली, मी जर हें तुझें म्हणणें मान्य न करीन, तर तूं माझें जें एवढें आज आगतस्वागत केलेंस त्यास मी अपात्र ठरून, शिवाय माझ्या पदरीं कृतघ्नपणाचा दोष येईल. मी मोठ्या आनंदानें त्यांची माहिती तुला सांगतें. या तिन्ही वस्तु

एकाच ठिकाणीं असून या देशाच्या हिंदुस्थानाकडील बाजूच्या सीमेवर आहेत. त्या आणण्याकरितां ज्या मनुष्याला तूं पाठविशील त्यानें तुमच्या ह्या वाड्यापासून नीट समोर जो मोठा रस्ता जात आहे, त्या रस्त्यानें वीस दिवसांची मजल करून जावें. विसावे दिवशीं त्याला जो मनुष्य भेटेल त्यास त्यानें या तिन्ही वस्तूंची माहिती विचारावी म्हणजे तो त्याला ती सांगेल.' इतकें बोलून ती जोगीण तेथून उठली, आणि राजकन्येचा निरोप घेऊन चालती झाली.

बोलणारा पक्षी, गाणारें झाड, व सोनेरी रंगाचें पाणी ह्यांच्या विचारांत राजकन्या परीजादी हिचें मन इतकें गढून गेलें होतें कीं, ती जोगीण केव्हां गेली हें तिला समजलें देखील नाहीं! त्या वस्तूं-विषयीं ती जोगिणीला आणखी कांहीं जास्त माहिती विचारणार होती, व त्यासंबंधानें ती प्रश्न करणार, पण इतक्यांत जोगीण कोठें दिसेना; त्या वेळीं ती निघून गेली हें तिच्या लक्षांत आलें! असो; तिला वाटलें कीं, जोगिणीनें सांगितलेल्या माहितीवरूनच येवढें जोखमीचें काम अंगावर घेणें हें बरोबर नाहीं; यास्तव कांहीं जास्त खुलासेवार माहिती मिळेल तर बरें. तथापि तिला तिनें परत बोलावून न आणावितां तिनें जें काय सांगितलें होतें तेवढें फिरून चांगलें लक्षांत आणून तें पक्कें स्मरणांत ठेविलें. त्या वस्तु प्राप्त झाल्या असतां आपल्याला अतिशय आनंद होईल असें तिला वाटलें; परंतु कदाचित् यत्न सफळ न झाल्यास आपली निराशा होईल हाही विचार तिच्या मनांत आला, व त्यामुळें तिचें मन खिन्न झालें.

अशा प्रकारें राजकन्येचें मन त्या विचारांत अगदीं गढून गेलें असतां तिचे भाऊ पारधीहून परत आले. ते थोरल्या दिवाणखान्यांत गेले तों आपली बहीण नेहमींप्रमाणें आनंदांत व हुशारींत नसून तिची चर्या खिन्न झालेली आहे व ती खालीं मान घालून बसलेली आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें. तें पाहून त्यांना फारच आश्चर्य वाटलें.

राजपुत्र बहामन म्हणाला, ' ताई, आज तुझा नेहमींचा आनंद व उल्हास कोणीकडे गेला ? तुला बरें वाटत नाहीं काय ? कां तुजवर कांहीं संकट गुदरलें ? किंवा तुझा कोणी अपमान केला ? काय असेल तें स्पष्ट सांग; म्हणजे तुला समाधान वाटण्याचा आम्हीं कांहीं उपाय करूं. तुझा कोणीं अपराध केला असल्यास आम्ही आतांच्या आतां त्याची खोड मोडून टाकतों ! '

राजकन्या कांहींएक उत्तर न करितां तशीच खालीं मान घालून राहिली. मग अंमळशानें वर डोकें करून तिनें भावांकडे पाहिलें. पण तिनें त्यांना, ' मला कांहींएक झालें नाहीं, ' इतकेंच उत्तर केलें, आणि फिरून खालीं मान घातली.

राजपुत्र बहामन म्हणाला, ' ताई, तूं आमच्याशीं नीट कां बोलत नाहींस ? आमच्याशीं तूं कोणतीही गोष्ट आजपर्यंत चोरली नाहींस, असें असतां आजच तुझी वृत्ति अशी कां फिरली ? आम्हांला येथून जाऊन कांहीं फारसा वेळ झाला असें नाहीं, तेव्हां इतक्यांत तुझ्या स्थितींत जो एवढा पालट झाला, तो खचीत कांहीं कारणावांचून झाला नाहीं. मला कांहींएक झालें नाहीं, असें तूं आम्हांला जें उत्तर दिलेंस, त्यानें आमचें समाधान झालें नाहीं; व तुजपासून खरी गोष्ट समजल्यावांचून आमच्या मनाला स्वस्थता कधींही वाटणार नाहीं. आपल्या तिघांत लहानपणापासून जो कांहीं ऐक्यभाव आहे तो मोडण्याचा विचार तुझ्या मनांत आला असेल तर मात्र गोष्ट निराळी; एरवीं तूं आमच्यापाशीं कांहींएक गोष्ट चोरून न ठेवितां जें काय घडलें असेल तें सर्व खुलासेवार आम्हांस सांगितलें पाहिजेस!'

आपल्या भावाच्या तोंडचे हे शेवटचे शब्द ऐकून राजकन्येस फार वाईट वाटलें. कारण, आपला बहिणभावंडांचा एकोपा मोडावा ही गोष्ट तिच्या स्वप्नींही नव्हती. म्हणून बहामन याच्या मनाचा जो भलताच ग्रह झालेला होता तो ताबडतोब नाहींसा करण्याकरितां ती त्यास म्हणाली, ' दादा, मला कांहींएक झालें नाहीं असें जें मीं मघांशीं तुला म्हटलें, त्यांत माझा हेतु—ती गोष्ट तुम्हांला फारशी महत्त्वाची

नाहीं इतकेंच सांगण्याचा होता. मला मात्र ती महत्त्वाची आहे, आणि ती मीं तुम्हांला न सांगितली तर तुमच्याविषयीं माझ्या मनांत दुजाभाव उत्पन्न झाल्याची ज्याअर्थीं तुला शंका येणार आहे, त्या अर्थीं मला ती गोष्ट तुम्हांला सांगितली पाहिजे. दादा, आपल्याला आजपर्यंत वाटत होतें कीं, आपला हा वाडा सर्व प्रकारें उत्तम असून त्यांत कोणत्याही गोष्टीची उणीव नाहीं. पण त्यांत तीन वस्तूंची उणीव आहे, असें मला आज कळून आलें. तेवढी उणीव काढून टाकली असतां सर्व जगांत हें स्थळ केवळ अप्रतिम होणार आहे! त्या तीन वस्तु कोणत्या तर, बोलणारा पक्षी, गाणारें झाड, आणि सोनेरी रंगाचें पाणी, ह्या होत. नंतर त्या तीन वस्तूंच्या अंगच्या अलौकिक गुणांचें वर्णन करून ती म्हणाली, 'आज एक जोगीण येथें आली होती, तिच्या तोंडून मला हें कळलें. या वस्तु कोणत्या ठिकाणीं सांपडतील व तेथें जाण्याला रस्ता कोणता हेंही तिनें मला सांगितलें. आतां कदाचित् तुम्हांला वाटेल कीं, या तीन वस्तु केवळ क्षुल्लक असून त्यांच्या योगानें आपल्या वाड्याला जास्त शोभा किंवा पूर्णता ती काय येणार आहे? तसेंच, आपला वाडा आहे त्यांत उत्तम असून त्या वस्तूंपासून आपलें कांहीं आज अडलें आहे असें नाहीं! असें तुम्हांला वाटेल तर वाटो. पण माझ्या मनानें तर असें घेतलें आहे कीं, त्या वस्तु आपल्याला अवश्य मिळाल्या पाहिजेत; आणि त्या न मिळाल्या तर माझ्या चित्तास कधींही समाधान होणार नाहीं. म्हणून, तुम्हांला त्या वस्तूंचें महत्त्व वाटो वा न वाटो, तुम्ही मला या संबंधानें साहाय्य अवश्य करा; आणि त्या वस्तु आणण्याकारितां कोणत्या मनुष्याची योजना करावी तें मला सांगा.'

राजपुत्र बहामन म्हणाला, 'ताई, तुझ्या मनांत जी गोष्ट करावयाची आली ती आमच्याही मनांत आलीच असें समज. या तीन वस्तु आपल्याला प्राप्त व्हाव्या अशी तुझी इच्छा आहे ना? ठीक आहे; आमचीही पण तशीच इच्छा आहे! हें केवळ आम्ही तुझ्याकरितां म्हणतों असें नाहीं, खरोखरच त्या वस्तूंकडे आमचें मन

अतिशय वेधलें आहे. मी म्हणतों असें पर्विज यालाही वाटत असेल अशी माझी खात्री आहे. हें काम फार महत्त्वाचें आहे, याकरितां तें करण्याचें मीच आपल्या अंगावर घेतों. तूं मला तें ठिकाण आणि त्याचा रस्ता एवढें सांग, म्हणजे मी उद्यांच तेथें जाण्याकरितां निघतों.'

राजपुत्र पर्विज म्हणाला, 'दादा, आपल्या घरांत तूं सर्वांत वडील व मुख्य असून तूं इतके दिवस बाहेर जावेंस हें बरोबर नाहीं. मला वाटतें कीं, तूं आपला जाण्याचा बेत रहित करून मला जाण्यास परवानगी द्यावीस. ताईचें सुद्धां माझ्याप्रमाणेंच मत असेल असें खचीत वाटतें. मी गेलों असतां फार सोईचें होईल, व मी तें काम तुझ्याप्रमाणेंच तडीस नेईन अशी मला उमेद आहे.' राजपुत्र बहामन म्हणाला, 'पर्विज, तूं म्हणतोस तें सगळें खरें, व माझ्या-प्रमाणेंच तूं हें काम शेवटास नेशील अशी माझीही खात्री आहे पण तें करण्याचा मींच निश्चय केला आहे; तेव्हां मलाच जाऊं दे. तूं आणि ताई घरीं रहा, आणि येथली सर्व व्यवस्था पहा.' नंतर बहामन यानें निघण्याची सर्व तयारी केली, आणि जोगिणीनें परीजादी हीस जें काय सांगितलें होतें तें त्यानें तिच्या तोंडून नीट ऐकून घेऊन रस्त्याच्या वगैरे सर्व खाणाखुणा पक्क्या लक्षांत ठेविल्या.

दुसरे दिवशीं उजाडतांच राजपुत्र बहामन हा निघाला. त्या वेळीं पर्विज व परीजादी यांनीं त्यास आलिंगन दिलें, व त्याचें कल्याण चिंतून त्याला निरोप दिला. तो घोड्यावर बसून चालूं लागला तों राजकन्येच्या मनांत एकाएकीं कांहीं विचार येऊन ती त्यास म्हणाली, 'दादा, प्रवासांत मनुष्याला किती हाल भोगावे लागतात याचा मीं हा वेळपर्यंत विचार केला नव्हता. प्रवास ही एक मोठी जिवावरची गोष्ट आहे. तेव्हां तूं गेलास तर तुझ्यावर कोणतें संकट गुजरेल आणि कोणतें नाहीं याचा काय नेम आहे? म्हणून मी तुला विनयपूर्वक सांगतें कीं, तूं आपला माघारा फीर कसा! आपल्याला एवढें जिवावरचें काम मुद्दाम अंगावर घेण्याची कांहीं

गरज नाहीं. दुर्दैवेंकरून तुजवर एखादा कठिण प्रसंग आला असतां त्यापासून होणाऱ्या तुझ्या वियोगाचें दुःख सोसण्यापेक्षां, बोलणारा पक्षी, गाणारें झाड, आणि सोनेरी रंगाचें पाणी हीं मला मिळालीं नाहींत तरी पुरवलीं !'

परीजादी हिच्या मनांत एकाएकीं असें भय उत्पन्न झालेलें पाहून राजपुत्र बहामन याला मोठा चमत्कार वाटला, आणि हंसूंही आलें. तो म्हणाला, 'माझा निश्चय झाला तो झाला. आतां तो फिरावयाचा नाहीं. याकरितां तूं मला आतां मोडता घालूं नको. प्रवासांत संकटें येतात असें तूं म्हणालीस, पण तीं जे कोणी दुर्दैवी असतात त्यांजवरच येतात. आतां कदाचित् मी त्या दुर्दैवी मनुष्यांपैकींच असेन; पण दुर्दैवी मनुष्यापेक्षां दैववान् मनुष्येंच जगांत फार आहेत, त्या अर्थीं मी कदाचित् दैववानही असेन, नाहीं कोणीं म्हणावें ? तथापि काय केव्हां घडेल याचा कांहीं नियम नाहीं; याकरितां या कामीं कदाचित् माझा नाशही होण्याचा संभव आहे. तर मी सुरक्षित आहें किंवा नाहीं हें तुला समजण्याकरितां मी तुजपाशीं कांहीं साधन देऊन ठेवितों. याहून या वेळेस माझ्यानें कांहींएक जास्त करवत नाहीं.'

असें म्हणून बहामन यानें आपल्या खिशांतून एक चाकू काढिला आणि तो राजकन्येच्या हातीं देऊन तो म्हणाला, 'मी सुखरूप आहें किंवा नाहीं हें समजण्याची जेव्हां जेव्हां तुला इच्छा होईल, तेव्हां तेव्हां तूं हा चाकू उघडून पहात जा. हा आतां आहे त्याप्रमाणें तुला स्वच्छ दिसला म्हणजे मी जिवंत आहे असें तूं समज. पण त्यांवर रक्ताचे थेंब पडलेले जर तुला दिसले, तर मी मरण पावलों असें समजून मला स्वर्गीय सुख प्राप्त होण्याकरितां तूं परमेश्वराची प्रार्थना कर.'

इतकें बोलून राजपुत्र बहामन यानें पुनः एकवार आपल्या बहिणीचा व भावाचा निरोप घेतला, आणि तडक आपला रस्ता धरला. तो सडकेला लागला तेव्हां उजव्या डाव्या बाजूंकडे जे रस्ते

गेलेले होते त्यांकडे न वळतां नीट हिंदुस्थानच्या दिशेनें एकसारखा चालला. याप्रमाणें एकोणीस दिवस गेल्यावर विसावे दिवशीं त्याला सडकेजवळ झाडाखालीं एक म्हातारा व विद्रूप असा मनुष्य दिसला. तेथून जवळच एक कंबळीचें झोंपडें होतें, त्यांत तो रहात असे.

त्या मनुष्याच्या भिवया अगदीं बर्फाप्रमाणे पांढऱ्या असून त्याप्रमाणेंच त्याच्या डोक्याचे केंसही होते. त्याच्या मिशा व कल्ले यांच्या योगानें त्याचें तोंड अगदीं झांकून गेलेलें होतें, व त्याची दाढी त्याच्या पायांपर्यंत लोंबत होती. त्याच्या हातापायांचीं नखें खूपच वाढलेलीं होतीं आणि त्याच्या डोक्यावर छत्रीसारखी एक मोठी टोपी होती. त्यानें आपल्या अंगाभोंवतीं एक चटई गुंडाळून घेतली होती. तिच्याखेरीज दुसरें कोणतेंही वस्त्र त्याच्या अंगावर नव्हतें.

हा म्हातारा मनुष्य फकीर असून यानें पुष्कळ दिवसांपासून जगाचा त्याग केला होता, व तो निरंतर ईश्वरसेवेंत आपलें आयुष्य घालवीत होता. तो आपल्या शरीराची मुळींच काळजी बाळगीत नसे. यामुळें आतां सांगितलेल्या प्रकारची त्याची स्थिति होऊन गेली होती.

राजपुत्र बहामन हा त्या दिवशीं सकाळपासून आपल्याला कोण मनुष्य भेटतो याची वाटच पहात होता, कारण त्याला ज्या ठिकाणीं जावयाचें होतें, तेथील माहिती त्या दिवशीं त्याला मिळावयाची होती. तेव्हां तो फकीर दृष्टीस पडतांच राजपुत्र आपल्या घोड्या-वरून उतरला, आणि घोड्याचा लगाम धरून त्याजपाशीं गेला. तो त्यास सलाम करून म्हणाला, 'बाबाजी, परमेश्वर तुम्हांला दीर्घायु करून तुमच्या मनकामना पूर्ण करो!'

फकीर हा राजपुत्रास उलट सलाम करून कांहीं शब्द बोलला, पण ते राजपुत्रास मुळींच समजले नाहींत. असें होण्याचें कारण, त्या मनुष्याच्या मिशा व कल्ले यांच्या योगानें त्याचें तोंड अगदीं

झांकून गेलें आहे हें असावें असें राजपुत्रास वाटून त्यानें आपल्या खिशांतून एक कात्री काढिली आणि आपल्या घोड्याला एका झाडाशीं बांधून तो त्या मनुष्यास म्हणाला, ‘ फकीरबाबा, मला तुमच्याशीं कांहीं बोलावयाचें आहे. तुमच्या मिशा व कल्ले यांनीं तुमचें तोंड अगदीं झांकून गेल्यामुळें तुमचा शब्द उमटत नाहीं. याकरितां तुमची परवानगी असेल तर तुमच्या मिशा व कल्ले हीं दोन्हीं थोडीशीं मी कातरतों. त्याचप्रमाणें तुमच्या भिवयाही अतिशय लांब वाढल्या आहेत, आणि तुमची दाढी तर तुमच्या पायापर्यंत लोंबत आहे, यामुळें तुम्ही केवळ अस्वलासारखे दिसतां, याकरितां त्याही मी कातरून टाकतों. ’

फकिरानें राजपुत्राच्या म्हणण्यास आपली संमति दिली. मग त्यानें त्याचे केस जितके कातरावेसें वाटलें तितके कातरल्यावर त्याचा चेहरा चांगला दिसूं लागला, व तो खरोखरी जितका म्हातारा होता तितका म्हातारा नाहीं असें भासूं लागलें. राजपुत्र त्यास म्हणाला, ‘ फकीरबाबा, मजजवळ जर आरसा असता तर तुम्ही किती चांगले व तरुण मनुष्यासारखे दिसतां हें तुम्हाला मला दाखवितां आलें असतें. आतां तुम्हांला मनुष्याचें रूप आलें, पण यापूर्वीं तुम्ही मनुष्य आहां कीं कोण आहां हें सुद्धां कळण्याची पंचाईत होती ! ’

राजपुत्राचें हें ममतेचें व साधेभोळें वर्तन पाहून फकीरास मोठा आनंद झाला; आणि तो हास्यवदन करून त्यास म्हणाला, ‘महाराज, तुम्ही कोणीही असा; परंतु तुम्हीं जें हें आज माझें मोठें काम केलें, त्याबद्दल तुमचे मजवर फार उपकार झाले. तुमचे उपकार फेडण्याकरितां माझ्या हातीं जें काय असेल तें मी करण्यास तयार आहें. तुम्ही मुद्दाम येथें जे उतरलां ते कांहीं तरी कामाकरितां उतरलां असाल यांत संशय नाहीं; तर तें काम कोणतें तें मला सांगा, म्हणजे त्यासंबंधानें मजकडून होईल तेवढें सहाय्य मी तुम्हाला करीन. ’

राजपुत्रान उत्तर केलें, ' फकीरबाबा, मी फार लांबून आलों असून, ' बोलणारा पक्षी ' ' गाणारें झाड ' व ' सोनेरी रंगाचें पाणी ' या तीन वस्तूंचा शोध करीत आहे. त्या तेथून जवळच कोठें आहेत असें मला कळलें आहे; पण त्या अमुक ठिकाणींच आहेत हें मला ठाऊक नाहीं. याकरितां तुम्हाला जर त्या ठिकाणची माहिती असेल तर तेथें जाण्याचा रस्ता तेवढा मला दाखवून द्या, म्हणजे त्या ठिकाणीं मला अचूक जातां येऊन माझे इतक्या दिवसांच्या प्रवासाचे श्रम फुकट जाणार नाहींत. '

राजपुत्राचें हें बोलणें ऐकून फकीराची मुद्रा उदास दिसूं लागली, व तो खालीं मान घालून कांहीं उत्तर न देतां स्तब्ध राहिला. हे पाहून राजपुत्रानें त्यास पुनः म्हटलें, ' बाबाजी, माझ्या प्रश्नाचें तुम्हीं कांहींच उत्तर दिलें नाहीं, याकरितां फिरून मी तुम्हांला विनंती करितों कीं, मीं जें काय विचारलें त्याची तुम्हाला माहिती आहे किंवा नाहीं तेवढें मला सांगा; कारण, नसली तर मी आपला वेळ फुकट घालवीत येथें बसत नाहीं; दुसरीकडे जाऊन मला शोध केला पाहिजे. '

हें ऐकून फकीरानें मौन सोडिलें; आणि तो राजपुत्रास म्हणाला, ' महाराज, तुम्ही मला जी माहिती विचारिली, ती मला ठाऊक आहे; परंतु तुम्हाला प्रथम पाहिल्याबरोबर तुमच्याविषयीं माझ्या मनांत जी ममता उत्पन्न झाली—व जी तुम्ही माझ्या उपयोगी पडल्यामुळें विशेष वृद्धिंगत झाली—तिच्यामुळें ती माहिती तुम्हाला सांगावी किंवा नाहीं याचा मला मोटा विचार पडला आहे ! ' राजपुत्र म्हणाला, ' कां बरें ? ती सांगावयास तुम्हाला कोणती हरकत आहे ? त्यांत तुम्हाला शंका कसली आली ?' फकीरानें उत्तर केलें, ' हें पहा, तुम्ही जें काम आपल्या अंगावर घेऊं पहात आहां, तें तुम्हाला वाटतें त्याहून फार कठिण आहे. तुमच्यासारखेच पुष्कळ शूर व धैर्यवान् पुरुष आजपर्यंत येथें आले व त्यांनीं तुम्हाप्रमाणेंच माहिती मला विचारली. त्यांना, तुम्ही ह्या

कामांत पडूं नका, असें मी पुष्कळ प्रकारें सांगितलें; परंतु ते आपला हेका धरून बसल्यामुळें मला नाइलाजास्तव त्यांस रस्ता दाखवून देणें भाग पडलें. पण त्यांपैकीं एकाचाही प्रयत्न सिद्धीस न जातां ते सर्व प्राणांस मुकले ! म्हणून जर तुम्हाला आपल्या जिवाची कांहीं काळजी असेल, तर तुम्ही माझें ऐका, आणि यापुढें न जातां आला तसे परत जा ! '

हें फकीराचें बोलणें राजपुत्रास मुळींच रुचलें नाहीं. तो त्यास म्हणाला, ' तुम्ही मला जें कांहीं सांगतां तें माझ्या हिताचें सांगतां हें मी पक्कें जाणतों, व माझ्याकरितां तुम्ही जी कळकळ दाखवितां त्याबद्दल मी तुमचा आभारी आहे. तथापि माझा जो एकदां निश्चय झाला आहे तो कधींही बदलावयाचा नाहीं. मला कोण काय करणार आहे ? मी चांगला हत्यारबंद आहे, व भीति तर मला कळिकाळाचीही वाटत नाहीं ! मला जो कोणी उपद्रव करील त्याची मी एका क्षणांत गच्छंति करून टाकीन ! ' फकीर म्हणाला, ' पण तुम्हाला उपद्रव करणारा एक नाहीं, अनेक आहेत; व त्यांचा असा चमत्कार आहे कीं, ते तुमच्या दृष्टीस पडणार नाहींत ! तेव्हां अशा अदृश्य शत्रूंशीं लढून तुम्ही आपला बचाव कसा करणार ? ' राजपुत्रानें उत्तर केलें, ' तें कांहीं असो. तुम्ही मला कितीही सांगितलें तरी माझा निश्चय ढळावयाचा नाहीं. याकरितां तुम्हाला माझी इतकीच विनंति आहे कीं, तो रस्ता ज्याअर्थीं तुम्हाला माहीत आहे, त्याअर्थीं तुम्ही तो मला सांगण्यास अनमान करूं नका. '

फकीरास जेव्हां दिसून आलें कीं, या मनुष्यास आपण हिताची गोष्ट सांगत असतां हा ऐकत नाहीं, व हा हट्टानें पुढें जाणारच, तेव्हां त्यानें आपल्याजवळच्या झोळींतून एक कटोरा काढिला, आणि तो राजपुत्राच्या हातांत देऊन म्हटलें, 'महाराज, तुम्ही ज्याअर्थीं माझें न ऐकतां आपलाच हेका चालविणार, त्याअर्थीं तुम्हाला रस्ता दाखवून देण्याची तजवीज करणें मला भाग आहे. तुम्ही घोड्यावर बसा आणि हा कटोरा आपल्यापुढें टाका. तो आपोआप

तुमच्यापुढें सरकत जाईल, व एका पर्वताच्या पायथ्यापाशीं थांबेल. तो थांबला म्हणजे तुम्ही घोड्यावरून खालीं उतरा, आणि घोड्याच्या मानेवर लगाम टाकून द्या. म्हणजे तुम्ही परत येईपर्यंत तो त्या जागेवरून हालणार नाहीं. नंतर तुम्ही पर्वत चढावयाला लागा. तुम्ही चढत असतां तुमच्या उजव्या व डाव्या बाजूंकडे तुम्हाला कित्येक मोठमोठे काळे दगड दिसतील, आणि चोहों बाजूंकडून नानातऱ्हेचे वाईट शब्द तुमच्या कानीं येतील. ते ऐकून तुमचें धैर्य खचेल, व यापुढें आपण चढून जाऊं नये असें तुम्हाला वाटेल. हीच काय ती आणीबाणीची वेळ आहे. यावेळीं तुम्हांला अगदीं भितां कामा नये, व मुख्यत्वेंकरून मागें वळून पाहतां कामा नये. कारण तुम्ही मागें वळून पाहिलें कीं, लागलीच एका क्षणांत तुमच्या दोहों बाजूंकडच्या काळ्या दगडांप्रमाणें तुम्ही दगड बनून जाल ! हे सर्व दगड, तुमच्यासारख्याच ज्या हट्टी पुरुषांनीं हा जिवावरचा प्रयत्न केला, त्यांचेच बनलेले आहेत ! असो; या संकटांतून तुम्हीं ईश्वरकृपेनें पार पडलां तर पर्वताच्या शिखरावर चढून जा, म्हणजे त्या ठिकाणीं एक पिंजरा तुमच्या दृष्टीस पडेल, त्या पिंजऱ्यांतच तुम्हीं जो बोलणारा पक्षी म्हणतां तो आहे; व त्यालाच तुम्ही गाणारें झाड व सोनेरी रंगाचें पाणी हीं कोठें आहेत, हें विचारा, म्हणजे तो तुम्हाला सांगेल. याहून आतां जास्त कांहीं तुम्हाला मला सांगावयाचें नाहीं. तुम्हाला जें काय मी सांगितलें तें नीट ध्यानांत धरून मध्यें येणाऱ्या संकटांतून तुम्ही पार पडलां, म्हणजे मग तुम्हाला कशाचीही भीति नाहीं. पण फिरून मी तुम्हाला सांगतों कीं, हें घडणें अगदीं अशक्य आहे. तुम्ही विनाकारण आपला जीव धोक्यांत घालूं नका.- अजून तुम्हीं आपल्या मनाशीं नीट विचार करा. मग याउपरही तुमचें मन नच वळेल, तर तुम्हाला पुरतीच आकाबाई आठवली आहे असें मी समजतों !'

राजपुत्रानें उत्तर केलें, ' बाबाजी, तुम्ही पुनः पुनः मोठ्या कळकळीनें मला बोध करितां हे तुमचे मजवर मोठे उपकार आहेत.

पण काय करूं ? माझें मन त्या तीन वस्तु प्राप्त करून घेण्याकडे इतकें लागलें आहे कीं, त्या न मिळाल्या तर आपलें जिणें व्यर्थ असें मला वाटत आहे! असो; पण तुम्ही मला जें काय सांगितलें आहे तें मी पूर्णपणें लक्षांत ठेवून त्याचप्रमाणें वर्तणूक करीन, म्हणजे तर मला कशाचीही भीति नाहींना? मला खचीत वाटतें कीं, जी आणीबाणीची वेळ म्हणून तुम्ही म्हणालां, ती मी धैर्य धरून पार पाडीन, व आपला मनोरथ पूर्ण करून पुनः लौकरच सुखरूप तुमच्या भेटीस येईन.' फकीर म्हणाला, 'तुम्ही सुखरूप फिरून माझ्या दृष्टीस पडलां, तर मी आपल्याला मोठा भाग्यवान समजेन! पण तें कसें घडेल याविषयींच मला मोठी शंका आहे. असो. देव तुमचें रक्षण करणार समर्थ आहे!'

याप्रमाणें त्या दोघांचें बोलणें झाल्यावर राजपुत्रानें फकीरास लवून सलाम केला, आणि तो घोड्यावर बसला. नंतर फकीरानें दिलेला कटोरा त्यानें आपल्या पुढें टाकला. तो इतका भराभर सरकत चालला कीं, राजपुत्राला त्याच्याबरोबर जाण्याकरितां आपला घोडा भरधांव फेंकावा लागला. कटोरा पर्वताच्या पायथ्याशीं पोहोंचतांच थांबला. मग राजपुत्र घोड्यावरून उतरला, आणि त्यानें त्याचा लगाम त्याच्या मानेवर टाकिला, तेव्हां तो जागच्या जागीं बांधून टाकल्याप्रमाणें उभा राहिला. राजपुत्रानें पर्वताकडे लक्षपूर्वक पाहिलें, तों चढणीच्या रस्त्याच्या दोहों बाजूंस शेंकडों काळे दगड त्याच्या दृष्टीस पडले. तो पांचचार पावलें चढून गेला तोंच फकीरानें सांगितल्याप्रमाणें शब्द त्याच्या कानीं पडूं लागले. प्रथम त्याला असे शब्द ऐकूं आले "हा मूर्ख मनुष्य चालला आहे कोठें? याला काय पाहिजे आहे? याला प्रतिबंध करा; जाऊं देऊं नका!' नंतर, 'धरा याला, ठार मारा!" हे शब्द ऐकूं आले. पुढें, "हा दरवडेखोर मारेकरी आहे!" असे मेघगर्जनेप्रमाणें भयंकर शब्द त्याला ऐकूं आले; व शेवटीं, "नाहीं नाहीं; त्या बिचाऱ्याला कशाला उगीच त्रास देतां? जाऊं द्या त्याला! तो पिंजरा आणि पक्षी

त्यालाच मिळावयाचे आहेत!" असे उपरोधोक्तीचे शब्द त्याच्या कानीं पडले.

याप्रमाणें सतत व जास्त भयंकर असे शब्द जरी होऊं लागले तरी राजपुत्र न घाबरतां कांहीं वेळपर्यंत वर चढत गेला. पण पुढें जेव्हां त्या आवाजाचा अतिशय कल्लोळ होऊन गेला, तेव्हां त्याचें धैर्य अगदीं खचून जाऊन त्याचे हातपाय थरथर कांपूं लागले, आणि त्याच्यानें पुढें पाऊल टाकवेना. तेव्हां फकीरानें सांगितलेली गोष्ट त्याच्या लक्षांत न राहून, तो खालीं उतरण्याकरितां मागें वळला. मग काय विचारतां? तत्क्षणीं तो काळा फत्तर बनून गेला! त्याच-प्रमाणें त्याच्या घोड्याचीही स्थिति झाली.

राजपुत्र बहामन हा प्रवासास गेल्या दिवसापासून, त्याची बहीण परीजादी ही, त्यानें दिलेला चाकू नेहमीं आपल्या कंबरपट्ट्यांत बाळ-गीत असे, व दिवसांतून कित्येक वेळां तो उघडून आपला भाऊ खुशाल आहे कीं नाहीं हें पाहात असे. याप्रमाणें आजपर्यंत तिला त्याची कुशलवार्ता समजून मोठें समाधान वाटत असे. राजपुत्र पर्विज ह्यालाही तिच्याप्रमाणेंच आपल्या भावाचें कुशल समजण्याची अतिशय उत्सुकता असे, यामुळें त्याच्या सांगण्यावरूनही कित्येक वेळां ती तो चाकू उघडून पहात असे. सारांश, अशा प्रकारें घटके-घटकेनें तीं त्याचा समाचार समजून घेत.

राजपुत्र बहामन याची दुःखकारक स्थिति ज्या दिवशीं झाली, त्या दिवशीं संध्याकाळीं पर्विज व परीजादी हीं बोलत बसलीं असतां पर्विज यानें परीजादीस म्हटलें, 'ताई, तो चाकू एकदां उघड बरें, दादाचें काय वर्तमान आहे तें पाहूं.' त्यावरून राजकन्येनें चाकू काढून तो उघडला, आणि पहाते तों त्यावर रक्ताचे थेंब पडलेले आहेत! तें पाहून तिला इतकें अपरिमित दुःख झालें कीं, तिनें एकदम चाकू जमिनीवर फेंकून दिला. ती म्हणाली, 'हाय, हाय! दादा, मीच तुझ्या मरणास कारण झालें! आतां तूं कोठून माझ्या दृष्टीस पडशील? किती तरी मी अभागी! तो बोलणारा पक्षी,

गाणारें झाड, आणि सोनेरी रंगाचें पाणी यांची गोष्ट तुला सांगण्याची मला कोणीकडून बुद्धि झाली! आमचा वाडा चांगला आहे कां वाईट आहे, व त्यांत कांहीं उणीव आहे कीं काय, हें त्या जोगिणीला विचारून मला काय करावयाचें होतें! ती चांडाळीण येथें आली नसती तरी बरें झालें असतें! अग अवदसे, तुझा जो मीं येवढा पाहुणचार केला, त्याचें हेंच फळ तूं मला दिलेंस काय? मला वाटतें, ज्या तीन वस्तु प्राप्त करून घेण्याच्या प्रयत्नांत माझा भाऊ मरण पावला, त्या खरोखर जगांत कोठें असतील असें संभवत नाहीं! थेरडे, तूं उगीच कांहीं तरी बात झोंकून दिलीस! पण काय करूं? तूं मला अशी भारून टाकली आहेस कीं, त्या वस्तु प्राप्त करून घेण्याचें वेड माझ्या डोक्यांतून अजूनही जातच नाहीं!'

राजपुत्र बहामन याच्या मरणाच्या दुःखकारक वार्तेमुळें राजपुत्र पर्विज यालाही आपल्या बहिणीप्रमाणेंच पराकाष्ठेचें दुःख झालें. परंतु त्या तीन वस्तु प्राप्त करून घेण्याविषयींची तिची इच्छा अद्यापि कमी झाली नाहीं असें पाहून तो तीस म्हणाला, 'ताई, दादाकरितां आतां आपण कितीही शोक केला तरी त्याजपासून कांहीं उपयोग नाहीं. आपण कितीही रडलों व दुःख केलें, तरी तो आतां पुनः जिवंत होत नाहीं! ईश्वरालाच ती गोष्ट आवडली, तेथें आपला काय उपाय?' सर्व गोष्टी त्याच्या इच्छामात्रेंकरून होणाऱ्या आहेत. याकरितां तो ठेवील तसें राहणें आपल्याला भाग आहे. त्या जोगिणीला तूं लबाड कां म्हणतेस? तिनें सांगितलेल्या तीन वस्तु जगांत नसतील असें कशावरून? तूं तिचें एवढें आदरातिथ्य केलेंस, असें असतां तुला उगीच आपल्या पदरचें कांहीं सांगून ती फसवील असें कसें होईल? मला वाटतें, दादाच्या मृत्यूचें कारण त्याच्याकडून कांहीं चूक झाली असावी, अथवा आपल्याला जिची कल्पना करितां येत नाहीं अशी कांहीं गोष्ट घडली असावी, हें होय. याकरितां आपण आपला हेतु सिद्धीस नेण्याचा विचार रहित करूं नये. त्या कामाकरितां प्रथमतः मी जाण्यास तयार होतों, त्याप्रमा-

णेंच अजूनही आहे. दादाच्या मृत्यूमुळें माझें मन तिकडे जाण्यास यत्किंचितूही कचरत नाहीं; उद्यांच मी चालता होणार.'

एक भाऊ गेला तो गेला, पण आणखी दुसरा न जावा म्हणून राजकन्या परीजादी हिनें पर्विज यास न जाण्याविषयीं पुष्कळ प्रकारें सांगितलें. पण त्याचा पक्का निश्चय झालेला होता, यामुळें तिनें त्यास समजावणीच्या ज्या अनेक गोष्टी सांगितल्या, त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. त्यानें निघण्यापूर्वीं आपल्या भावाप्रमाणेंच, आपण जिवंत आहों किंवा नाहीं हें तिला समजण्याकरितां एक शंभर मोत्यांचा सर तिजपाशीं दिला आणि तिला सांगितलें, 'या सरांतील मोत्यें तूं सरकवलीं असतां सरकतील तर मी जिवंत आहे असें समज, आणि जर तीं जेथल्या तेथें गच्च बसलीं, तर दादाप्रमाणेंच माझीही अवस्था झाली असें समज.' मग तो तिला म्हणाला, 'तथापि ही दुसरी गोष्ट कधींही घडणार नाहीं व मी सुखरूप येऊन तुला भेटेन, अशी मला पूर्ण खात्री आहे.'

याप्रमाणें राजपुत्र पर्विज हा निघाला. विसावे दिवशीं, त्याच्या भावाला जो फकीर भेटला. तोच त्यालाही भेटला. पर्विज त्याजपाशीं गेला आणि त्यास सलाम करून, बोलणारा पक्षी, गाणारें झाड, आणि सोनेरी रंगाचें पाणी, या तीन वस्तु कोठें आहेत म्हणून त्यानें त्यास विचारलें. फकीरानें, बहामन यास त्या तीन वस्तु मिळविण्याच्या कामीं मोठमोठीं संकटें येतील वगैरे जें सांगितलें होतें, तेंच यासही सांगितलें. आणि म्हटलें, 'या संकटांतून पार पडण्याची आशा करणें अगदीं व्यर्थ आहे. तुमच्यासारख्याच तोंडवळ्याचा एक तरुण मनुष्य नुकता येथें आला होता, व मीं त्यास या कामांत न पडण्याविषयीं पुष्कळ प्रकारें सांगितलें असतां त्यानें माझें ऐकिलें नाहीं, आणि शेवटीं फशीं पडला! तशीच तुमचीही गत होणार; म्हणून माझें ऐकाल तर तुम्ही या गोष्टीच्या भरीस अगदीं पडूं नका!'

पार्वेज यानें उत्तर केलें, ' फकीरबाबा, तुम्ही कोणाविषयीं ही गोष्ट सांगतां तें मी समजलों. तो माझाच वडील भाऊ होता, व तो या प्रयत्नांत मरण पावला याची मला अगोदरच बातमी कळली आहे. पण त्याला काय झालें हें मला कळलें नाहीं. ' फकीर म्हणाला, ' तें मला काय विचारतां ! अहो, तो काळा फत्तर बनून गेला ; व ज्या ज्या लोकांनीं आजपर्यंत हा प्रयत्न केला, त्या सर्वांची गत अशीच झाली ! म्हणून मी सांगतों कीं तुम्ही उगीच आपला जीव धोक्यांत घालूं नका. परंतु तुमच्या बोलण्यावरून तुमचा निश्चय ढळावयाचा नाहीं असें मला दिसतें. तर तुम्ही इतकें करा कीं माझ्या सांगण्याप्रमाणें तरी वागा, नाहींपेक्षां तुमच्या भावाप्रमाणेंच तुमची गत होईल याविषयीं शंकाच नको ! '

राजपुत्र म्हणाला, ' बाबाजी, मीं तुम्हांकरितां कांहींएक केलें नसतां तुम्ही माझ्या जिवाविषयीं एवढी काळजी करितां हे तुमचे मजवर मोठे उपकार आहेत. पण मी तुम्हांला सांगतों कीं, मीं हें काम अंगावर घेण्यापूर्वींच हें किती अवघड व जिवावरचें आहे याचा पूर्ण विचार केला, व नंतर तें करण्यास प्रवृत्त झालों. याकरितां, आतां कांहीं झालें तरी मी त्याचा पिच्छा सोडावयाचा नाहीं ! तर तुम्हाला माझी आतां एवढीच विनंती आहे कीं, माझ्या भावाला जसा तुम्ही कृपा करून रस्ता सांगून दिला, तसाच मलाही सांगा म्हणजे झालें. मला असा भरंवसा आहे कीं, तुमच्या सांगण्याप्रमाणें वागण्यांत मजकडून यत्किंचित्‌ही अंतर न होऊन मी हातीं धरलेलें काम खात्रीनें शेवटास नेईन. ' फकीर म्हणाला, ' तुम्ही आतां माझें ऐकतच नाहीं, तेव्हां मला तुम्हास वाट दाखवून देण्याची तजवीज करणें भाग आहे ! माझ्यापाशीं एक कटोरा आहे, त्याचा या कामीं तुम्हांस उपयोग होणार आहे. तो मी उठून तुमच्या हातीं दिला असता, पण काय करूं ? माझ्यानें जागचें हालवत नाहीं ! '

हें ऐकतांच राजपुत्र घोड्यावरून खालीं उतरला, आणि फकीराजवळ गेला. तेव्हां त्यानें आपल्या झोळींतून एक कटोरा काढला, व तो पार्वेज

याच्या हातीं देऊन, बहामन यास त्यानें जसें सांगितलें होतें तसेंच यालाही सांगितलें. नंतर तो त्यास म्हणाला, ‘ पर्वतावर जे कांहीं तुम्हांस भयंकर शब्द ऐकूं येतील, त्यांना न भिण्याविषयीं मात्र खबरदारी ठेवा. याप्रमाणें शिखरावर पिंजरा आढळेपर्यंत तुम्ही गेलां म्हणजे पार पडलां असें समजा. ’ असें म्हणून त्यानें त्यास निरोप दिला.

राजपुत्र पार्विज यानें फकीराचे आभार मानिले, व त्यास सलाम करून तो घोड्यावर बसला. नंतर फकीरानें दिलेला कटोरा त्यानें आपल्या घोड्यापुढें टाकला. तो भराभर सरकत चालला, व त्याच्या बरोबरच त्यानें आपला घोडाही चालविला. कटोरा पर्वताच्या पायथ्याशीं पोहोंचतांच थांबला. तेव्हां राजपुत्र घोड्यावरून खालीं उतरला, आणि फकीरानें सांगितलेलें सर्व त्यानें नीट लक्षांत आणिलें. नंतर कांहीं झालें तरी न भितां पर्वताचें शिखर गांठावयाचा निश्चय करून तो चढावयास लागला, पण तो पांचसहा पावलें चढला नाहीं तोंच, ‘ थांब दुष्टा, कोठें चाललास ? तुला तुझ्या ह्या धिटाईबद्दल शिक्षा केली पाहिजे ! ’ असे रागाचे शब्द आपल्या पाठीमागें कोणी बोलत आहेत, असें त्याला ऐकूं आलें.

हे शब्द ऐकतांच, फकीरानें सांगितलेली गोष्ट राजपुत्राच्या लक्षांत न राहून त्यानें आपली तरवार म्यानांतून काढिली, आणि आपल्याला त्रास देणाऱ्यांस एकदम कापून काढण्याच्या इराद्यानें तो मागें वळला. तों तत्काळ तो व त्याचा घोडा हे काळे फत्तर होऊन गेले !

राजपुत्र पार्विज हा गेल्या दिवसापासून त्याची बहीण परीजादी ही दिवसांतून कित्येक वेळां त्यानें दिलेल्या मोत्यांच्या सरांतील मोत्यें हालतात कीं नाहीं हें पहात असे. रात्रीं निजावयाचे वेळीं देखील ती तो सर आपल्या बिछान्याजवळ ठेवी, आणि सकाळच्या प्रहरीं उठतांक्षणींच मोत्यें सरकवून पाही.

ज्या दिवशीं राजपुत्र पर्वेज याची त्याच्या भावासारखीच भयंकर अवस्था झाली, त्या दिवशीं परीजादी ही त्या मोत्यांच्या सरांतील मोत्यें सरकवून पाहूं लागली, तों तीं जागचीं हालेनात! जेथच्या तेथें गच्च बसून गेलीं! हें पाहून आपल्या दुसऱ्याही भावाची दशा पहिल्याप्रमाणेंच झाली असें तिच्या लक्षांत आलें. असा प्रसंग आला असतां पुढें काय करावयाचें याचा विचार तिनें अगोदरच करून ठेविला होता. मग व्यर्थ दुःख करण्यांत वेळ न घालवितां दुसऱ्या दिवशीं सकाळीं तिनें हत्यारबंद जवानाचा वेष घेतला, आणि मी दोन तीन दिवसांनीं परत येईन असें आपल्या चाकर-माणसांस सांगून दोघे भाऊ ज्या मार्गानें गेले होते त्या मार्गानें ती घोड्यावर बसून निघाली.

पारध करण्याच्या संबंधानें राजकन्येला घोड्यावर बसण्याचा चांगला सराव होऊन गेला असल्याकारणानें त्या दूरच्या प्रवासा-पासून जितके श्रम तिला होण्याचा संभव होता तितके झाले नाहींत. ती आपल्या भावांप्रमाणेंच नेमकी विसावे दिवशीं तो फकीर होता त्या ठिकाणीं जाऊन पोहोंचली. त्याच्याजवळ गेल्यावर ती घोड्यावरून खालीं उतरली, आणि घोड्याचा लगाम धरून त्याच्याजवळ जाऊन बसली. तिनें त्यास सलाम केला आणि ती म्हणाली, ‘ फकीरबाबा, मला तुमच्यापाशीं बसून क्षणभर विसावा घेण्याला कृपा करून परवानगी द्या, आणि येथेंच जवळपास कोठें बोलणारा पक्षी, गाणारें झाड, आणि सोनेरी रंगाचें पाणी हीं आहेत म्हणून मीं ऐकिलें आहे, त्यांचें ठिकाण तुम्हांला माहीत असलें तर मला सांगा. ’

फकीर म्हणाला, ‘ अहो, तुमच्या पोषाखावरून तुम्ही पुरुष दिसतां, पण तुमचा आवाज ऐकिल्याबरोबर तुम्ही स्त्री आहां हें मीं ओळखलें. याकरितां त्याप्रमाणें मी तुमच्याशीं बोलतों, बाई, मज गरिबावर कृपा करून तुम्ही येथें आला व मला सलाम केला, हा तुम्ही मला मोठाच मान दिला असें मी समजतों. तुम्ही म्हणतां

त्या वस्तूंचें ठिकाण मला माहीत आहे; पण तें विचारून तुम्हांला काय करावयाचें आहे ? '

राजकन्या म्हणाली, ' फकीरबावा, त्या वस्तूंच्या अंगीं फारच विलक्षण गुण आहेत असें एका जोगिणीनें मला सांगितलें आहे. यामुळें त्या प्राप्त करून घेण्याविषयीं मला पराकाष्ठेची उत्कंठा लागली आहे. ' फकिर म्हणाला, ' बाई, त्या जोगिणीनें तुम्हांस जें सांगितलें तें अगदीं खरें आहे, इतकेंच नव्हे तर तिनें जें तुमच्यापाशीं त्या वस्तूंचें वर्णन केलें असेल तें त्यांच्या अंगच्या गुणाच्या मानानें कांहींच नसेल ! पण बाई, त्या वस्तु प्राप्त होणें अगदीं अशक्य आहे; कारण त्या कामीं एवढीं महान् महान् संकटें येणार आहेत कीं, त्यांतून तुम्हाला पार पडण्याची आशाच नको ! मला वाटतें, तुम्हाला जर हें पूर्वीं कळलें असतें, तर तुम्ही हा भगीरथ प्रयत्न करण्याचें मनांत सुद्धां आणिलें नसतें ! असो; आतां तुम्ही येथून आपल्या परत जा कशा ! उगीच आपला नाश होण्याचा मार्ग सांगण्यास मला भाग पाडूं नका ! '

राजकन्येनें उत्तर केलें, ' फकीरबाबा, मी इतका लांबचा प्रवास करून आलें असतां आपल्या मनांतला हेतु शेवटास न जातां तशीच परत गेलें असतां मला मोठें दुःख होणार आहे. तुम्ही म्हणतां कीं, त्या कामीं महान् महान् संकटें येणार आहेत, तर तीं कोणतीं तीं मला सांगा तर खरीं; तीं ऐकल्यावर त्यांचा मी विचार करीन. आणि त्यांतून पार पडण्याचें सामर्थ्य व धैर्य आपल्या अंगीं आहे असें जर मला वाटलें, तर मी तो उद्योग करीन; नाहींपेक्षां आलें तशी परत जाईन ! '

तेव्हां फकीरानें राजपुत्र बहामन व पर्विज यांस जें काय सांगितलें होतें तें सर्व विस्तारेंकरून तिला सांगितलें; आणि तिनें आपला बेत कसातरी रहित करावा म्हणून थोडी अतिशयोक्तिही केली. राजकन्येनें त्याचें बोलणें नीट लक्षपूर्वक ऐकून घेऊन त्यास म्हटलें, ' यांत मुख्य दोन गोष्टी कठिण आहेत. एक, पर्वतावर जे

कांहीं शब्द ऐकूं येतील त्यांना न भितां पिंजऱ्यापर्यंत चढून जाव-याचें; व दुसरी गोष्ट तेथें जाईपर्यंत मागें म्हणून पहावयाचें नाहीं. या दुसऱ्या गोष्टीच्या संबंधानें म्हणाल तर, माझी मला पक्की खात्री आहे कीं, मीं एकदां मागें न पहाण्याचा निश्चय केला म्हणजे तो कालत्रयीं देखील ढळावयाचा नाहीं! आतां पहिली गोष्ट मात्र जरा पंचायतीची खरी. कारण, मोठमोठ्या शूर व धैर्यवान् लोकांची सुद्धां ते शब्द ऐकून गाळण होईल यांत संशय नाहीं! पण त्याला मीं एक युक्ति योजिली आहे, तिचा उपयोग करतां येईल किंवा नाहीं तेवढें मला सांगा.' फकीर म्हणाला, 'कोणती ती युक्ति?' राजकन्येनें उत्तर केलें, 'मी आपल्या कानांत कापसाचे बोळे घालीन; म्हणजे कितीही भयंकर व मोठमोठे शब्द झाले तरी ते मला फारसे ऐकूं न येऊन विशेष भीति वाटणार नाहीं!'

फकीर म्हणाला, 'बाई, आजपर्यंत जे जे लोक मला त्या ठिका-णचा रस्ता विचारावयास आले, त्यांपैकीं कोणीही तुम्ही म्हणतां या साधनांचा उपयोग केल्याचें मला ठाऊक नाहीं. ते सर्व मरण पावले एवढें मात्र मला माहीत आहे! आतां तुम्हाला आपला छंद पुरवावयाचा असलाच, तर तुम्ही ही युक्ति करून पहा. तिचा उपयोग झाल्यास उत्तम आहे. परंतु शेवटीं एकवार तुम्हाला मी सांगतों कीं, तुम्ही नका उगीच आपला जीव धोक्यांत घालूं!'

राजकन्या म्हणाली, 'फकीरबाबा, माझा बेत रहित होण्याची गोष्ट तर बोलूंच नका! मी आपली जाणारच; व आतां मीं सांगि-तलेल्या युक्तीचा चांगला उपयोग होईल असें मला वाटतें. याकरितां मीं ती करून पाहण्याचा निश्चय केला आहे. आतां फक्त कोणत्या रस्त्यानें जावयाचें तेवढें मला तुम्ही कृपा करून सांगा. याशिवाय आणखी कसलीही तसदी मी तुम्हांला देत नाहीं.' तिनें आपला हट्ट चालवूं नये म्हणून फकीरानें आणखीही आपली पराकाष्ठा करून पाहिली. पण ती ऐकेचना, तेव्हां त्यानें आपल्या झोळींतून एक कटोरा काढला, आणि तो तिच्या हातीं देऊन तिला म्हटलें,

'हा कटोरा घ्या. तुम्ही घोड्यावर बसला म्हणजे हा त्याच्यापुढें टाकून द्या. तो जसजसा जाईल तसतशा तुम्ही त्याच्यामागें जा. तो शेवटीं पर्वताच्या पायथ्यापाशीं थांबेल. तेथें तुम्ही घोड्यावरून उतरा, आणि पर्वतावर चढून जा. आतां बाकीचें सर्व मीं तुम्हाला सांगितलेंच आहे. तें मात्र नीट लक्षांत धरा, आणि त्याप्रमाणें वागण्याविषयीं खबरदारी ठेवा.'

राजकन्येनें फकीराचे आभार मानिले, आणि त्यास सलाम करून ती घोड्यावर बसली. तिनें तो कटोरा घोड्यापुढें टाकिला, व तो पर्वताच्या पायथ्याशीं थांबेपर्यंत ती त्याच्या मागोमाग गेली.

नंतर ती घोड्यावरून उतरली, आणि तिनें आपल्या कानांत कापसाचे बोळे घालून ज्या रस्त्यानें जावयाचें होतें तो नीट तिनें न्याहाळून पाहिला, आणि मोठ्या धैर्यानें व धिमेपणानें ती चढावयास लागली. तिच्या दोघां भावांच्या कानीं आले तसे शब्द तिच्याही कानीं आले, पण तिनें कानांत कापसाचे बोळे घातले होते त्यांचा तिला फार उपयोग झाला. ती जसजशी वर चढली, तसतसे खूपच मोठमोठ्यानें शब्द होऊं लागले; पण त्याचें तिला मुळींच भय वाटलें नाहीं. तिला कित्येक उद्दामपणाचे, उपरोधोक्तीचे व विशेषेंकरून स्त्रियांच्या मनास वाईट वाटण्यासारखे असे शब्द ऐकूं आले. पण त्याच्या योगानें तिला वाईट न वाटतां व तिचें धैर्य न खचतां ती हंसत म्हणाली, 'कांहीं हरकत नाहीं! चालूं द्या; याहूनही नाहीं नाहीं तसले शब्द मला ऐकूं आले तरी मी भीत नाहीं! मला वर चढण्याला उलटें जास्तीच स्फुरण येत आहे!' शेवटीं ती इतकी वर गेली कीं, तिला पिंजरा आणि पक्षी दिसूं लागला. तो पक्षी अगदीं लहान असतांही, त्या वेळेस मोठमोठ्यानें शब्द होत होते, त्याबरोबर तो आपणही ओरडावयास लागला. ते शब्द असे—'दुष्टे, जा येथून; आतां पुढें पाऊल टाकशील तर खबरदार!'

हें ऐकून तर राजकन्येला जास्तीच धैर्य आलें व ती पहिल्यापेक्षां दुप्पट जलदीनें चढूं लागली. शेवटीं ती पर्वताच्या शिखरावर पोहोंचली.

तेथील जमीन अगदीं सपाट होती. ती जलदीनें पक्ष्याच्या पिंजऱ्या-पाशीं गेली, आणि त्यावर थाप मारून म्हणाली, 'पक्ष्या, तूं माझ्या हातीं न लागण्याविषयीं आपल्याकडून होता तितका प्रयत्न केलास, पण शेवटीं मीं तुला आपल्या हस्तगत करून घेतलें! आतां माझ्या हातून सुटण्याची तुला आशाच नको!'

नंतर परीजादी हिनें आपल्या कानांतील कापसाचे बोळे काढून टाकिले. तेव्हां पक्षी तिला म्हणाला, 'बाईसाहेब, माझ्या स्वातंत्र्या-साठीं जे यत्न करीत होते त्यांना मी मदत केली याबद्दल तुम्ही मजवर रागावूं नका. हें पहा, या ठिकाणीं मी जरी पिंजऱ्यांत होतों, तरी मी परतंत्र आहें असें मला मुळींच वाटत नव्हतें; व मी आपल्या असलेल्या स्थितींत मोठें समाधान मानून होतों. परंतु ज्याअर्थीं पर-तंत्रता भोगण्याचें माझ्या नशिबीं आलेंच आहे, त्याअर्थीं भलत्या कोणाच्या हातीं न सांपडतां तुम्हांसारख्या शूर व थोर स्त्रीच्या हातीं मी सांपडलों याचा मला फार आनंद वाटतो. इतःपर मी तुमच्याशीं इमानेंइतबारें वागून तुमच्या हुकुमाबाहेर काडीमात्रही चालावयाचा नाहीं, याविषयीं तुम्ही खात्री ठेवा. तुम्ही कोण आहां हें तुमचें तुम्हांलाच माहीत नाहीं, पण मला माहीत आहे; व प्रसंग आला म्हणजे यासंबंधानें मी इतका कांहीं तुमच्या उपयोगीं पडेन कीं, तुम्ही जन्मभर माझे उपकार विसरणार नाहीं! माझ्या बोलण्या-प्रमाणें माझी कृति आहे किंवा नाहीं याचा तुम्हाला आतांच अनुभव पाहिजे असेल तर, तुम्हांला या ठिकाणीं काय पाहिजे असेल तें सांगा, म्हणजे एक क्षण न लागतां तुम्हाला तें मी प्राप्त करून देतों!'

हें ऐकून राजकन्येला जो कांहीं आनंद झाला त्याचें वर्णन करवत नाहीं! ती म्हणाली, 'पक्ष्या, येथेंच आसपास कोठें सोनेरी रंगाचें पाणी आहे म्हणून मीं ऐकिलें आहे. तें अगोदर कोठें आहे तें मला सांग.' तेव्हां पक्ष्यानें तत्काळ ती जागा तिला दाखवून दिली. राजकन्येनें लागलींच तेथें जाऊन आपल्याबरोबर एक कुपी आणिलेली होती ती त्या पाण्यानें भरून घेतली. नंतर ती पक्ष्याकडे परत आली,

आणि त्यास म्हणाली, ‘ पक्ष्या, येथें गाणारें झाड आहे तेंही मला पाहिजे आहे. ’ पक्षी म्हणाला, ‘ ती तुमच्या मागें झाडी दिसते आहे, तींत तें आहे. ’ हें ऐकतांच राजकन्या झाडापाशीं गेली, तों त्या झाडाच्या पानांच्या मधुर गायनावरून तिनें तें तत्काळ ओळखिलें. पण तें फारच मोठें व उंच होतें, म्हणून ती पक्ष्याकडे परत आली आणि म्हणाली, ‘ पक्ष्या, तें झाड तर फार मोठें आहे; तें मला उपटणार नाहीं व घेऊनही जातां येणार नाहीं.’ पक्षी म्हणाला, ‘तें उपटण्याची कांहीं जरूर नाहीं; त्याचें कलम लागतें.तेव्हां त्याची एक खांदी तोडून घ्या म्हणजे झालें. थोडक्याच दिवसांत त्या खांदीचें मोठें झाड होईल. ’

राजकन्येस जोगिणीनें सांगितलेल्या ह्या तीन लोकोत्तर वस्तु तर प्राप्त झाल्या; पण त्यांच्याकरितां तिचे दोन भाऊ मरण पावले होते, तेवढे पुनः तिला जिवंत व्हावयास पाहिजे होते, तेव्हां ती पक्ष्यास म्हणाली, ‘ पक्ष्या, तूं मजकरितां दोन मोठमोठीं कामें केलींस; पण त्यांहूनही फार महत्त्वाचें एक काम तुला करावयाचें आहे. कोणतें तर, तुझ्यापायीं माझे दोन प्रिय बंधु मरण पावले आहेत; तेवढे फिरून जिवंत होऊन मला भेटतील असें कर. त्यांना बरोबर घेतल्यावांचून मी परत जाणार नाहीं. ’

हें राजकन्येचें म्हणणें मान्य करण्याविषयीं पक्ष्यानें आपली नाखुषी दर्शविली, व पुष्कळ कांकूं केलें. तेव्हां राजकन्या त्यास म्हणाली, ‘ पक्ष्या, तूं माझा बंदा आहेस, व माझ्या हुकुमाबाहेर काडीइतका देखील चालावयाचा नाहीं असें माझ्यापाशीं बोलला आहेस, तें तुझ्या स्मरणांत आहे ना ? तर आतां पहा ! नाहीं होय म्हणशील तर कांहीं उपयोगाचें नाहीं. तूं सर्वस्वीं माझ्या हातांत आहेस ! ’ पक्षी म्हणाला, ‘ बाईसाहेब, मी आपली वाचा असत्य करणार नाहीं. तुम्ही मला जें काय आतां करण्यास सांगतां तें फार अवघड आहे खरें, पण तुमच्याकरितां तें मी करितों. ’ नंतर तो तिला म्हणाला, ‘ येथें कोठें पाण्याचें भांडें दिसतें कां पहा बरें ! ’ राजकन्येनें इकडे

तिकडे पाहिलें; आणि म्हटलें, ' हं, आहे भांडें; आतां पुढें कसें करावयाचें ? ' पक्षी म्हणाला, ' घ्या तें हातांत; आणि पर्वत उतरतांना जे काळे दगड तुमच्या दृष्टीस पडतील, त्या प्रत्येकावर त्यांतलें थोडेंसें पाणी शिंपडा; म्हणजे तुमचे भाऊ पुनः जिवंत होऊन तुम्हांला भेटतील.'

राजकन्येनें तें भांडें, पक्ष्याचा पिंजरा, सोनेरी रंगाच्या पाण्याची कुपी व गाणाऱ्या झाडाची खांदी हीं बरोबर घेतलीं आणि ती खालीं उतरूं लागली. उतरतांना जो जो काळा दगड म्हणून तिच्या दृष्टीस पडला, त्या प्रत्येकावर तिनें आपल्या जवळच्या भांड्यांतलें पाणी शिंपडलें. तेव्हां ते सर्व दगड नाहींसे होऊन त्यांपैकीं कित्येकांच्या ठिकाणीं मनुष्य व कित्येकांच्या ठिकाणीं घोडे हे दिसूं लागले. याप्रमाणें पाणी शिंपडल्यावांचून तिनें एकही दगड ठेविला नाहीं. यामुळें तिचे दोघे भाऊ, त्यांचे घोडे, व त्याचप्रमाणें पूर्वी ज्या दुसऱ्या कित्येक लोकांनीं हा प्रयत्न केलेला होता ते लोक व त्यांचे घोडे, हे सर्व आपआपलें रूप पावले. राजपुत्र बहामन व पर्विज यांना परीजादी हिनें तेव्हांच ओळखिलें, त्याचप्रमाणें त्यांनींही तिला ओळखिलें, आणि तिजपाशीं जाऊन तिच्या गळ्याला एकदम घट्ट मिठी घातली. तिनेंही त्याचप्रमाणें करून आनंदाश्रूंनीं त्यांना भिजवून टाकिलें. ती म्हणाली, ' अरे, बाबांनो, तुम्ही येथें काय करीत होतां ? ' त्यांनीं उत्तर केलें, ' आम्ही निजलों होतों. ' राजकन्या म्हणाली, ' खरेंच ! मी येथें आलें नसतें तर तुम्ही जगाचा अंत होईपर्यंत निजलाच असतां ! अरे, तुम्ही बोलणारा पक्षी, गाणारें झाड, आणि सोनेरी रंगाचें पाणी, हीं आणण्याकरितां येथें आलां हें तुम्हांला आठवत नाहीं का ? तुम्ही आलां त्या वेळेस तुम्हांला येथें चोहोंकडे शेंकडों काळे फत्तर दिसले होते ना ? आतां सांगा बरें ? त्यांतील एक तरी दिसतो का ? हे जे लोक आपापल्या घोड्यांसह येथें दिसत आहेत, ते व त्याचप्रमाणें तुम्ही व तुमचे घोडे हेच ते सर्व काळे दगड झालेले होते ! ' नंतर तिनें आपल्या

जवळचें भांडें त्यांस दाखवून म्हटलें, ' तुम्हां सर्वांचें पूर्वरूप तुम्हांला प्राप्त होण्यास हें पाणीच कारण होय, समजलां ? हें पाणी मी प्रत्येक दगडावर थोडथोडें शिंपडतांच तो दगड नाहींसा होऊन त्या ठिकाणीं मनुष्य किंवा घोडा मला दिसूं लागला. असा कांहीं ह्या पाण्याचा विलक्षण प्रभाव आहे ! ' मग पक्ष्याकडे बोट करून ती म्हणाली, ' हा पक्षी माझ्या हस्तगत झाल्यावर प्रथमतः मी त्यास गाणारें झाड आणि सोनेरी रंगाचें पाणी यांची माहिती विचारली. ती त्यानें सांगितल्याप्रमाणें त्या झाडाचें कलम व सोनेरी रंगाच्या पाण्याची एक कुपी भरून मीं घेतली. नंतर आपला हेतु पूर्ण झाला खरा, पण यांच्याविषयीं आपल्या भावांना आपण मुकलों, तर त्यांना बरोबर घेतल्यावांचून जावयाचें नाहीं असा मी आग्रह धरल्यावरून पक्ष्यानें तुम्हांला जिवंत करण्याचें हें साधन मला दिलें. '

हा वृत्तांत ऐकून राजपुत्र बहामन आणि पर्विज यांनीं आपल्या बहिणीच्या ह्या अत्यंत ममतेच्या कृत्याबद्दल तिचे बहुत प्रकारें आभार मानले. त्याचप्रमाणें पाषाणाचें रूप पावलेल्या ज्या इतर लोकांना तिनें उठविलें होतें, त्यांनींही तिचे अतिशय उपकार मानले. ते तिला म्हणाले, ' हे थोर स्त्रिये, ज्या अलौकिक वस्तूंच्या प्राप्ती-करितां आम्हीं प्रयत्न केले, त्या वस्तु तुला प्राप्त झाल्याबद्दल आमचे मनांत तुजविषयीं मत्सर उत्पन्न झाला नाहीं; येवढेंच नव्हे, तर त्याबद्दल आम्हांला उलटा मोठा आनंद झाला आहे; व त्याचा तुला प्रत्यय येण्यासाठीं आम्ही मोठ्या खुषीनें तुला सांगतों कीं, आम्ही सर्व तुझे दास असून तूं जो हुकूम करशील तो बजावण्यास तयार आहों.'

राजकन्येनें उत्तर केलें, ' सद्‌गृहस्थहो, तुम्ही म्हणतां तशी गोष्ट मुळींच नाहीं. मीं आपल्या भावांना पुनः जिवंत करण्याकरितां जें काय केलें त्यांतल्या त्यांतच तुमचेंही काम झालें; मी मुद्दाम होऊन तुमच्याकरितां कांहींएक केलें नाहीं. ही गोष्ट मी आपल्या भावां-बरोबर जें आतां संभाषण केलें, त्याजकडे जर तुम्ही लक्ष दिलें

असलें तर तुमच्या ध्यानांतही येऊन चुकली असेल. तुम्ही माझे आभार मानले हा तुमचाच मोठेपणा आहे; आणि त्याबद्दल मी उलट तुमचे आभार मानतें. सारांश, तुमची जी दुर्दशा झाली होती ती होण्यापूर्वी तुम्हांस जसें पूर्ण स्वातंत्र्य होतें, तसेंच हल्लीं आहे; त्याहून यत्किंचितूही कमी नाहीं; व परमेश्वरानें माझ्या द्वारें तुम्हाला पूर्व स्थितीस आणून सुखी केलें, याबद्दल मला फार आनंद झाला आहे. असो; आतां आपलें येथें कांहींएक काम राहिलें नाहीं, तर आपण आपापल्या घोड्यावर बसून चालते होऊं. '

असें म्हणून राजकन्या आपल्या घोड्यावर बसावयास गेली. तेव्हां राजपुत्र बहामन यानें तो राघूचा पिंजरा आपल्यापाशीं देण्याविषयीं तिला म्हटलें. ती त्यास म्हणाली, ' दादा, हा पक्षी माझा बंदा आहे; याकरितां मीच ह्यास घेऊन जाणार. तुझी इच्छा असेल तर तूं तें गाणाऱ्या झाडाचें कलम घे. पण मी घोड्यावर बसेपर्यंत येवढा पिंजरा हातांत धर. ' ती घोड्यावर बसल्यावर बहामन यानें पिंजरा तिच्या हातीं दिला, आणि गाणाऱ्या झाडाचें कलम आपल्या हातांत घेतलें. मग पर्विज ह्याजकडे वळून राजकन्या म्हणाली, ' भाऊ, तुझी मर्जी असेल तर सोनेरी रंगाच्या पाण्याची कुपी तूं आपल्यापाशीं घे. ' तेव्हां पर्विज यानें मोठ्या खुषीनें ती घेतली.

मग राजपुत्र बहामन आणि पर्विज हे व इतर सर्व लोक आपापल्या घोड्यावर बसल्यावर सर्वांच्या पुढें कोण होतें हें पाहण्याकरितां राजकन्या थांबली. राजपुत्रांनीं त्या लोकांपैकीं प्रत्येकास त्याविषयीं म्हणून पाहिलें; पण ते म्हणाले, ' या मानास आम्ही मुळींच पात्र नाहीं. तर तो मान आमच्या कल्याणकर्त्रीकडे आहे. आम्ही मागें चालण्यांतच मोठी प्रतिष्ठा व आनंद मानूं. '

ह्याप्रमाणें, ' कोणीही पुढें होत नाहीं ' असें पाहून राजकन्या म्हणाली, ' सद्गृहस्थहो, तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें वास्तविक पाहतां मी मानास पात्र नाहीं. तथापि तुमची जर इच्छा आहे तर मी नाहीं

म्हणत नाहीं. ' असें म्हणून ती पुढें झाली, व राजपुत्रासुद्धां सर्वजण कोणत्याही प्रकारचा भेदाभेद न ठेवितां तिच्यामागून चालले.

याप्रमाणें ही मंडळी चालली असतां त्यांनीं पूर्वी सांगितलेल्या फकीरास भेटण्याकरितां व त्याच्या ममतेच्या उपदेशाबद्दल त्याचे आभार मानण्याकरितां त्याचा शोध केला. पण तो मरण पावला असें त्यांस समजलें. तेव्हां ते पुढें चालले. त्यांपैकीं बहुतेकजण निरनिराळ्या ठिकाणचे असल्यामुळें जसजसा ज्यांचा रस्ता फुटेल तसतसे ते राजकन्या व तिचे भाऊ यांचा मोठ्या आदरानें निरोप घेऊन आपापल्या रस्त्याला लागले. याप्रमाणें ते सर्व लोक जिकडचे तिकडे गेल्यावर राजकन्या व तिचे भाऊ यांनीं जलदी करून आपलें घर गांठलें.

राजकन्या आपल्या वाड्यांत येऊन पोहोंचतांच तिनें थोरल्या दिवाणखान्याच्या खिडकींत त्या बोलणाऱ्या पक्ष्याचा पिंजरा टांगून ठेविला. तो पक्षी गावयास लागल्याबरोबर चोहोंकडचे अनेक प्रकारचे गाणारे पक्षी त्याच्या सभोंवतीं जमून त्याला सूर देऊं लागले. गाणाऱ्या झाडाचें जें कलम होतें, तें राजकन्येनें दिवाण-खान्यानजीकच्या बागेंत लाविलें. त्याला लवकरच मुळें फुटून तें पर्वतावरच्या झाडाएवढें मोठें झालें आणि त्याच्याप्रमाणेंच याच्या पानांतूनही सुंदर गायन होऊं लागलें. आतां सोनेरी रंगाचें पाणी राहिलें. त्याकरितां तिनें एका मोठ्या संगमरवरी पाषाणाची लहा-नशा हौदाएवढी डोण तयार करवून ती त्या बागेच्या मध्यभागीं ठेविली. तिच्यांत तिनें कुपींतलें पाणीं ओतलें, तों एका क्षणांत ती भरून जाऊन तिच्या मध्यभागीं कारंज्याच्या फवाऱ्याप्रमाणें पंधरा हात उंचीचा प्रवाह उत्पन्न झाला. तो एकसारखा त्या डोणींतच पडत असून ती वाहून न जातां तिच्यांतील पाणी जितकेंचें तितकेंच राहिलें.

या अपूर्व वस्तूंच्या संबंधाची हकीकत लवकरच चोहोंकडे पस-रली, व त्या वाड्यांत आणि त्याच्या सभोंवतालच्या बागांत येण्यास

कोणालाही मनाई नसल्यामुळें शेंकडो लोक तो चमत्कार पाहण्या-करितां नेहमीं त्या ठिकाणीं येऊं लागले.

पुढें कांहीं दिवसांनीं राजपुत्र बहामन आणि पर्विज यांचा प्रवा-साचा थकवा नाहींसा होऊन ते हुशार झाल्यावर पूर्ववत् आपल्या नित्यक्रमास लागले. एके दिवशीं ते नेहमींप्रमाणें आपल्या शिकार-खान्यांत शिकारीस न जातां, त्यांच्या वाड्यापासून दोन तीन कोसांवर एक रान होतें तेथें गेले. ते शिकार करीत असतां इराणचा पातशाहाही त्या दिवशीं तिकडेच शिकारीस गेला होता. त्याचे घोडेस्वार पुढें आलेले राजपुत्रांच्या नजरेस पडल्यावरून, तो लव-करच येथें येईल असें त्यांना वाटलें; तेव्हां त्याच्या दृष्टीस न पडावें म्हणून ते शिकार सोडून एका आडवाटेनें परत यावयास निघाले; पण कर्मधर्मसंयोगानें असें झालें कीं, त्याच वाटेनें पातशाहाही येत होता, यामुळें शेवटीं त्याची व ह्यांची गांठ पडलीच. ते झटकन् परतले असते, पण ती वाट इतकी अरुंद होती कीं, मागें वळ-ण्यास मुळींच जागा नव्हती. पातशाहास पाहून राजपुत्र पहिल्यानें अगदीं गोंधळून गेले, पण तितक्यांत त्यांनीं प्रसंगावधान राखून घोड्यांवरून उड्या टाकिल्या आणि पातशाहापुढें साष्टांग नमस्कार घातले. त्यांचे पोषाख व घोडे फारच मौल्यवान् असल्यामुळें पात-शाहास वाटलें कीं, हे आपल्या दरबारी लोकांपैकीं कोणी असावे. त्यानें त्यांस उठावयास सांगितलें, तेव्हां ते मोठ्या दिलदारीनें पण मर्यादेनें त्याच्यापुढें उभे राहिले. पातशाहानें बराच वेळ त्यांच्याकडे नीट न्याहाळून पाहिलें, व त्यांचें विलक्षण तेज पाहून त्याला मोठें आश्चर्य वाटलें. तेव्हां त्यानें तुम्ही कोण व कोठें रहातां असा त्यांस प्रश्न केला. राजपुत्र बहामन म्हणाला, 'महाराज, आम्ही सरकारी बागावरील माजी कामगाराचे मुलगे आहों. आम्ही सरकारच्या पायांपाशीं नौकरी करून राहण्यालायक होईपर्यंत आम्हांला राह-ण्याकरितां त्यानें मरणापूर्वीं नुकताच एक शहरानजीकच वाडा बांधून दिला त्यांत आम्ही राहतों.'

पातशाह म्हणाला, ' तुम्हांला पारधीचा शौक आहे असें मला दिसतें. ' राजपुत्र बहामन यानें उत्तर केलें, ' तो आमचा नेहमींचाच परिपाठ आहे; व सरकारच्या सैन्यांत जे कोणी नौकरी करूं इच्छीत असतील त्या सर्वांनीं पूर्वींपासून चालत आलेल्या रिवाजास अनुसरून या गोष्टींचा परिपाठ ठेवणें जरूर आहे. ' हें समयसूचकतेचें भाषण ऐकून पातशाहास मोठा संतोष वाटला. तो म्हणाला, 'असें जर आहे तर तुम्ही कशी काय पारध कारितां ती मला पाहूं द्या. '

हें ऐकून राजपुत्र घोड्यावर बसले, व पातशाहाच्या मागें चालले. थोडक्याच वेळानें त्यांना कितीएक रानटीं जनावरें आढळलीं. राजपुत्र बहामन हा एका सिंहाच्या मागें लागला, व पर्विज हा एका अस्वलाच्या मागें लागला. त्यांनीं इतक्या विलक्षण वेगानें त्यांचा पाठलाग केला कीं, तें पाहून पातशाहास फारच आश्चर्य वाटलें. त्या दोघांचीही शिकार एकाच वेळीं त्यांच्या आटोक्यांत आली; व त्यांनीं आपल्या तरवारींनीं त्या दोन्हीं जनावरांवर अशा जोरानें वार केले कीं, तीं दोन्हीं एकदम ठार झालीं. हें सर्व पातशाह दुरून पाहात होता. इतक्यांत बहामन हा दुसऱ्या एका अस्वलाच्या मागें लागला; व पर्विज हा एका सिंहाच्या मागें लागला; आणि थोडक्याच वेळांत त्यांनीं त्या दोघांस ठार केलें. ते आणखीही पुढें शिकार हुडकून काढण्याकरितां गेले असते, परंतु पातशाहानें त्यांस लागलीच परत बोलाविलें. ते आल्यावर पातशाह त्यांस म्हणाला, ' वाहवा ! तुम्हांला मीं आणखी दोन घटका परत बोलाविलें नसतें, तर तुम्ही मला पारध करण्याला एकही जनावर राहूं दिलें नसतें ! असो. पण मीं तुम्हाला परत बोलाविलें तें पारध राखून ठेवण्याकरितां नव्हे; तर तुमच्या जिवाच्या रक्षणाकरितां बोलाविलें. कारण, तुमचें अप्रातिम शौर्य पाहून मला अशी खात्री वाटते कीं, तुम्ही एखादे वेळीं आपल्या अतुल पराक्रमाच्या योगानें

माझ्या अतिशय उपयोगीं पडाल; यास्तव तुमचे जीव मला आपल्या स्वतःच्या जिवाप्रमाणें प्रिय आहेत.'

याप्रमाणें पातशाहाची त्या दोघा राजपुत्रांवर फारच मर्जी बसून गेली, व त्यानें त्यास त्याच वेळीं, 'आमच्या बरोबर आमचे घरीं चला,' असें म्हटलें. त्यास राजपुत्र बहामन म्हणाला, 'महाराज, आम्ही इतक्या सन्मानास खरोखर पात्र नाहीं, यास्तव आपण आम्हांस बोलावूं नये, अशी आपल्या पायांपाशीं आमची प्रार्थना आहे.'

आपण यांस एवढें बोलावीत असतां हे नाहीं कां म्हणतात हें पातशाहास समजेना. तेव्हां त्यानें त्या गोष्टीचें कारण त्यास विचारलें. बहामन यानें उत्तर केलें, 'महाराज, आम्हाला एक धाकटी बहीण आहे. ती व आम्ही इतके एकोप्यानें वागतों कीं, आम्ही तिला व ती आम्हांला विचारल्याशिवाय कोणतीही गोष्ट करीत नाहीं.' पातशाह म्हणाला, 'असें काय? तर ह्याबद्दल तुमची जितकी प्रशंसा करावी तितकी थोडीच! बरें, ठीक आहे. आज तुम्ही आपल्या बहिणीला विचारून ठेवा, आणि उद्यां पुनः मी येथें पारधीला येणार आहे, त्या वेळेस तुम्ही या आणि मला काय तें सांगा.'

याप्रमाणें पातशाहाची आज्ञा झाल्यावर राजपुत्र घरीं गेले. पण पारधीचे वेळीं पातशाहाची व आपली भेट झाली व त्यानें आपणांस घरीं बोलविलें आहे हा वृत्तांत आपल्या बहिणीस सांगण्याची त्यांना आठवणच राहिली नाहीं. तथापि त्यानें सांगितल्याप्रमाणें ते दुसरे दिवशीं संकेतस्थळीं जाऊन त्यास भेटण्यास विसरले नाहींत. ते त्याजकडे जातांच पातशाह त्यांस म्हणाला, 'कसें काय! तुम्हीं आपल्या बहिणीला विचारिलेंत का?' हें ऐकतांच राजपुत्र एकमेकांकडे पाहूं लागले व त्यांनीं खालीं माना घातल्या. राजपुत्र बहामन म्हणाला, 'महाराज, आपल्या हुकुमाप्रमाणें बहिणीस विचारण्याची आम्हां दोघांनाही आठवण राहिली नाहीं; याबद्दल आपण क्षमा करावी अशी आमची प्रार्थना आहे.' पातशाह म्हणाला, 'बरें,

आज तरी विसरूं नका, आणि उद्यां काय तें मला जरूर याच ठिकाणीं येऊन कळवा.'

राजपुत्रांना या वेळींही पातशाहानें सांगितलेल्या गोष्टीचें स्मरण राहिलें नाहीं. तथापि तो त्यांस त्याबद्दल कांहींएक म्हणाला नाहीं. पण फिरून आणखी असें न व्हावें म्हणून त्यानें आपल्याजवळच्या एका थैलींतून तीन लहानलहान सोन्याच्या गोटया काढिल्या, आणि त्या बहामन याच्या खिशांत घालून हास्यवदन करून म्हटलें, 'आतां तुम्हांला या गोष्टीचा विसर पडणार नाहीं. कारण तुम्ही कपडे उतरूं लागला म्हणजे ह्या गोटया वाजतील, व त्याच्या योगानें तुम्हाला आठवण होईल.' पातशाहानें म्हटल्याप्रमाणें अगदीं घडून आलें. कारण त्या दिवशींही राजपुत्रांना रात्रीं निजावयाचे वेळेपर्यंत त्या गोष्टीची आठवण नव्हती. पण बहामन हा त्या वेळीं आपला आंगरखा काढूं लागला असतां त्या गोटया वाजल्या, व त्यावरून त्या दोघांना पातशाहानें काय सांगितलें होतें त्याची आठवण झाली. तेव्हां लागलेच ते दोघे परीजादीकडे गेले, आणि त्यांनीं तो सर्व वृत्तांत तिला सांगितला.

तो वृत्तांत ऐकून राजकन्या परीजादी हिला थोडा खेद वाटला. ती भावांस म्हणाली, 'पातशाहाची व तुमची भेट झाली, ही गोष्ट फार चांगली झाली, व तिजपासून तुम्हांला मोठा फायदा होण्याचा संभव आहे. पण ही गोष्ट ऐकल्यापासून माझें मन व्यग्र व दुःखित झालें आहे. तुम्ही माझ्याकरितां त्याजबरोबर जाण्याचें नाकारलें ही माझ्या ठायीं तुमची ममता पाहून मला अतिशय आनंद वाटतो. कारण आपल्या बहिणीपेक्षां आपल्याला पातशाहाची इच्छा अधिक नाहीं असा तुम्ही मनांत विचार केला ही गोष्ट कांहीं सामान्य नव्हे! अशी बहीणभावंडांची प्रीति फारच विरळा! असो; हें तुम्हीं केलें तें बरोबरच केलें. परंतु पातशाहाच्या इच्छेस नकार करण्याचें सोपें नाहीं! तो महासमर्थ प्रभु, त्याचा शब्द मोडण्याची कोणाची प्राज्ञा आहे! बरें, त्याच्या इच्छेप्रमाणें तुम्ही त्याजबरोबर गेला तर तो

तुम्हांला असाच नेहमीं बोलवीत जाईल, व अशा प्रकारें त्याची तुमच्यावर मर्जी बसून तो सदोदित तुम्हांला आपल्यापाशीं ठेवील; आणि असें झाल्यानें माझा व तुमचा वियोग होऊन मला जन्मभर दुःख भोगावें लागणार आहे; याकरितां त्याची इतराजी झालेली पुरवली, पण तुम्हीं त्याच्या म्हणण्यास रुकार देऊं नये असें मला वाटतें. परंतु तिकडूनही पंचाईत आहे; कारण, त्याची तुमच्यावर इतराजी झाली असतां तुमच्या व माझ्याही सुखावर पाणी पडण्याचा संभव आहे! याप्रमाणें माझ्या मनांत जे विचार आले आहेत ते मीं तुम्हांस सांगितले. तर आतां काय करावयाचें तें पोक्त विचार करून केलें पाहिजे. हो—पण आपण कोणता एक विचार ठरविण्याच्यापूर्वी आपल्या बोलणाऱ्या पक्ष्याची मसलत घेऊं, व तो काय म्हणतो तें पाहूं. तो मोठा चतुर व दूरदृष्टि असून त्यानें लागेल त्या वेळेस आपल्याला साहाय्य करण्याचें वचन दिलें आहे.'

तेव्हां राजकन्येनें लागलीच बोलणाऱ्या पक्ष्याचा पिंजरा आणविला, आणि आपल्या भावांसमक्ष सर्व गोष्ट त्यास सांगून, पुढें आतां कसें करावें असें त्यास विचारलें. पक्षी म्हणाला, 'तुमच्या भावांनीं बेलाशक पातशाहाच्या बरोबर जावें; इतकेंच नव्हे, तर त्यालाही आणखी आपल्या घरीं येण्याविषयीं विनंति करावी.'

राजकन्या म्हणाली, 'पण पक्ष्या, आमच्या बहीणभावंडांच्या इतक्या दिवसांच्या प्रीतींत या योगानें कमीपणा येणार आहे.' पक्षी म्हणाला, 'छी छी, ती शंका मुळींच तुम्ही मनांत आणूं नका. या गोष्टीच्या योगानें तुमची प्रीति उलटी वृद्धिंगत होणार आहे.' राजकन्या म्हणाली, 'पण तूं म्हणतोस त्याप्रमाणें झालें असतां पातशाहाच्या मी दृष्टीस पडेन, त्याचें कसें?' पक्ष्यानें उत्तर केलें, 'तुम्ही त्याच्या दृष्टीस पडणें आवश्यकच आहे, कारण त्यापासूनच पुढें तुमचा भाग्योदय होणार आहे!'

नंतर दुसरे दिवशीं राजपुत्र नेमलेल्या ठिकाणीं पातशाहास भेटण्याकरितां गेले. ते त्याच्या दृष्टीस पडल्याबरोबर दुरूनच त्यानें

त्यांस विचारिलें, ' आज तरी तुम्ही आपल्या बहिणीला विचारून आलां आहां काय ? ' हें ऐकून बहामन झट्दिशीं पुढें आला आणि म्हणाला, ' महाराज, आपल्या हुकुमाप्रमाणें करण्यास आम्ही सादर आहों. आमच्या बहिणीनें आम्हांस आपल्या हुकुमाप्रमाणें वर्तन करण्यास मोठ्या खुषीनें परवानगी दिली, एवढेंच नाहीं तर माझ्या विचाराकरितां महाराजांचा हुकूम बजावण्यास तुम्ही उशीर लाविला ही गोष्ट फारच वाईट केली, अशी ती आम्हांस उलटी रागें भरली. आमच्याकडून हा खरोखर आपला अपराध झाला. परंतु आपण त्याबद्दल क्षमा कराल अशी आम्हांला आशा आहे. ' पातशाह म्हणाला, ' अंः, तुम्ही त्याबद्दल मुळींच खेद मानूं नका. तुमच्या ह्या वर्तनाबद्दल मला राग तर आला नाहींच, पण उलटें तें मला अतिशय मानवलें; व मला अशी उमेद आहे कीं, जसजसा तुमचा माझा जास्त परिचय होत जाईल, तसतसा माझ्या ठायीं तुमचा विशेष लोभ जडेल. ' हें पातशाहाचें अनुपम सौजन्य पाहून त्याला काय उत्तर द्यावें हें राजपुत्रास सुचेना. त्यांनीं त्यास आपली कृतज्ञता दर्शविण्याकरितां मोठ्या आदरानें लवून सलाम केला.

मग नेहमींप्रमाणें पातशाह त्या दिवशीं जास्त वेळपर्यंत पारध करीत राहिला नाहीं. हे मुलगे जसे शूर तसे समयचतुरही आहेत असें पाहून त्यांच्याशीं सावकाश व पुष्कळ संभाषण करावें अशी त्याला मोठी उत्कंठा झाली. तो घोड्यावर बसून निघाला, व त्यानें त्या दोघांना आपले घोडे आपल्या दोहों बाजूंस घेण्यास सांगितलें. अशा प्रकारें पातशाहाच्या बरोबर घोड्यावर बसून चालण्याचा मान फक्त मुख्य वजिराखेरीज दुसऱ्या कोणाचाही नव्हता, यामुळें सर्व लोकांस या गोष्टीचें मोठें नवल वाटलें.

याप्रमाणें ही स्वारी शहरांत आली. तेव्हां सर्व लोकांचे डोळे एकसारखे राजपुत्रांकडे लागले. त्यांना पाहण्याकरितां रस्त्यांत इतकी गर्दी झाली कीं, तेथें पाऊल टाकण्यासही रीघ नाहींशी झाली ! ' हे दोघे गृहस्थ कोठचे ? येथले का दुसऱ्या कोठच्या

देशाहून आले ?' असें सर्वजण एकमेकांस विचारूं लागले. ते आणखी असें म्हणूं लागले कीं, 'पातशाहाला जर असे दोन पुत्र असते तर किती चांगलें झालें असतें! परमेश्वरानें त्याच्या राणीवर अवकृपा केली नसती तर त्याचे पुत्र खचीत आज याच वयाचे असते!'

पातशाह राजवाड्यांत आल्यावर त्यानें प्रथमतः राजपुत्रांस वाड्यांतले सर्व मोठमोठे दिवाणखाने व महाल दाखविले. त्यांनीं त्यांचें नकशीकाम, तेथील उत्तम व्यवस्था व तेथें असलेलें उंची सामानसुमान ह्यांची अशा प्रकारें तारीफ केली कीं, तेणेंकरून, ह्या गोष्टी त्यांच्या नेहमींच्या पाहण्यांतल्याच आहेत असें दिसून आलें. मग भोजनाची तयारी झाली. तेव्हां पातशाहानें त्यांना आपल्या शेजारी बसविलें. त्यांनीं प्रथम संकोच दाखविला; पण पातशाहाचा आग्रह पडल्यावरून त्यांना त्यांच्या म्हणण्याप्रमाणें करणें भाग पडलें.

कोणीही मनुष्य एखाद्या मोठ्या ठिकाणीं नवीन गेला असतां त्याला बोलण्याचालण्याचा संकोच वाटणें साहाजिकच आहे. त्याप्रमाणेंच राजपुत्रांसही वाटून ते भोजन चाललें असतां प्रथम आपण होऊन कांहींएक बोलेनात. ती गोष्ट पातशाहाच्या लक्षांत येऊन त्यानें स्वतःच बोलण्यास सुरुवात केली. त्यानें जो जो विषय काढला त्या त्या प्रत्येक विषयाच्या संबंधानें बोलण्यांत राजपुत्रांचें चातुर्य व हुशारी हीं पाहून त्यास फार आल्हाद व आश्चर्य वाटलें. तो मनांत म्हणाला, 'हे माझे स्वतःचे मुलगे असून यांना मीं उत्तम प्रकारचें शिक्षण देऊन तयार केलें असतें, तरी याहून जास्त यांची हुशारी दिसून आली असती असें मला वाटत नाहीं!' सारांश, त्यांच्यापाशीं संभाषण करण्यांत त्याला इतका आनंद वाटला कीं, नेहमींपेक्षां तो पुष्कळ वेळ पानावर बसला. भोजन आटोपल्यावर तो त्यांस आपल्या खासगी बैठकीच्या महालांत घेऊन गेला, व आणखी त्यानें त्यांच्याशीं पुष्कळ संभाषण केलें. शेवटीं तो त्यांस म्हणाला, 'माझ्या राज्यांत इतके चांगले सुशिक्षित, समयचतुर व हुशार तरुण मनुष्य असतील, असें माझ्या स्वप्नींही

नव्हतें ! तुमच्याशीं आज संभाषण केल्यापासून मला जो संतोष झाला, तसा कधींही झालेला मला स्मरत नाहीं. असो; आतां तुम्हांला कांहीं करमणूक होण्याची तजवीज मी करितों.'

हे शब्द पातशाहाच्या तोंडांतून निघतांच, कित्येक गवई व वाद्यें वाजविणारे यांना पूर्वींच तेथें हजर असण्याविषयीं हुकूम झाला होता ते आंत आले, व त्यांनीं घटकाभर मौज करून सोडली. नंतर एक दोन प्रकारचे कांहीं चमत्कारिक खेळ झाले, व शेवटीं त्या देशांतल्या त्या वेळच्या रिवाजाप्रमाणें स्त्री-पुरुषांचे नाच होऊन तो करमणुकीचा प्रकार समाप्त झाला.

इतकें झालें तों संध्याकाळ झाली. तेव्हां राजपुत्रांनीं पातशाहास साष्टांग नमस्कार घातले, व त्यानें आपणांस जो एवढा मान दिला व आपल्यावर अनुग्रह केला, त्याबद्दल त्याचे आभार मानून घरीं जाण्यास हुकूम मागितला. पातशाह त्यास म्हणाला, 'ठीक आहे, आतां तुम्ही जा; पण माझी अशी इच्छा आहे कीं, याप्रमाणेंच तुम्हीं वारंवार येऊन मला आनंद द्यावा. तुमचा सहवास जितका मला जास्त होईल तितका मला जास्त संतोष होणार आहे.'

नंतर ते दोघे राजपुत्र जाण्याकरितां उठून उभे राहिले असतां राजपुत्र बहामन हा पातशाहास म्हणाला, 'महाराज, आपल्या पायांजवळ आमची एक विनंती आहे ती हीच कीं, आपण आमच्या घराकडून रानांत ज्या वेळेस शिकारीस जाल, त्या वेळेस परत येतांना आमच्या घरीं येऊन आपल्या पंक्तीचा लाभ आम्हांस द्यावा. आपली पायधूळ लागण्याच्या योग्यतेचें आमचें घर नाहीं हें खरें, तथापि आपण नाहीं म्हणणार नाहीं, अशी आम्ही आशा करितों. कारण केव्हां केव्हां आपल्यासारखे थोर राजेही एखाद्या गरिबाच्या झोंपडींत जाऊन तेथला पाहुणचार मोठ्या आनंदानें घेतात.' पातशाहानें उत्तर केलें, 'मला खात्री आहे कीं, तुमचें घर खरोखर पहाण्यासारखें असून तुमच्या योग्यतेचेंच असेल. मी मोठ्या आनंदानें तुमच्या येथें येईन, व तुम्हांस पाहून जसा मला पराका-

च्छेचा संतोष झाला; तसेंच तुमची परमयोग्य व मायाळू बहीण पाहिला पाहून मी आपल्या मनाचें समाधान करून घेईन. या गोष्टीला फार अवधि नको. उद्यांच मी तिकडे शिकारीस येतों, व पूर्वीं तुम्हीं ज्या ठिकाणीं मला भेटलां होतां, तेथेंच मला भेटा, म्हणजे आपण सगळे मिळून तुमच्या घरीं जाऊं.'

मग दोघे राजपुत्र आपल्या वाड्यांत आल्यावर पातशाहानें आपला केवढा मान ठेविला वगैरे सर्व वृत्तांत त्यांनीं आपल्या बहिणीस सांगितला. तसेंच त्यालाही आपण येथें येण्याविषयीं विनंति केली असून उद्यांच त्यानें येण्याचें कबूल केलें आहे हेंही तिला सांगितलें.

राजकन्या म्हणाली, 'असें आहे, तर पातशाहाच्या योग्यतेस शोभेल अशी मेजवानीची तयारी आपण केली पाहिजे; व त्याकरितां आपण आपल्या बोलणाऱ्या पक्ष्याची मसलत घ्यावी हें मला बरें दिसतें. पातशाहाच्या आवडीचे कोणते पदार्थ आहेत ते कदाचित् त्याला ठाऊक असतील तर तो आपल्याला सांगेल.' राजपुत्रांस आपल्या बहिणीचा हा विचार पसंत पडला. मग ते निघून गेल्यावर तिनें यासंबंधानें पक्ष्याचा एकांतीं विचार घेतला. ती म्हणाली, 'पक्ष्या, उदईक आपल्या येथें पातशाह येणार असून त्याला आम्ही मेजवानी करणार आहों. तर आम्ही कशी काय व्यवस्था करावी म्हणजे त्याला संतोष होईल तेवढें सांग.'

पक्ष्यानें उत्तर केलें, 'बाईसाहेब, आपल्या येथें चांगले हुशार आचारी आहेत, ते पाहिजे तीं उत्तम पक्कान्नें करतील. पण त्यांमध्यें, मसाला भरलेलीं सगळीं वांगीं करितात, त्याप्रमाणें मोत्यें भरलेल्या कांकड्या पातशाह पानावर बसल्याबरोबर प्रथम त्याच्या दृष्टीस पडतील अशी तजवीज करा.'

राजकन्या आश्चर्य करून म्हणाली, 'काय मोत्यें भरलेल्या कांकड्या! पक्ष्या, तूं काय म्हणतोस याचा विचार केला नाहींस! असलें पक्कान्न कधींच कोणीं ऐकिलेलें नाहीं! पातशाह फार तर ती

एक चमत्कारिक वस्तु आहे म्हणून तिची तारीफ करील. पण आपण त्याला जेवावयास बोलावणार; त्याला मोत्यें पाहून काय करावयाचें आहे? शिवाय इतकीं मोत्यें तरी मी आणूं कोठून?'

पक्ष्यानें उत्तर केलें, 'तुम्ही अशा चिंतेंत पडूं नका. मी आपलें सांगतों तें ऐका. यापासून तुमचें कल्याणच होणार आहे. आतां तुम्हास येऊनजाऊन मोत्यांची काळजी आहे ना? तर तुम्ही इतकेंच करा कीं, उद्यां मोठ्या पहांटेस बागेंत जा, आणि उजव्या हातास प्रथमच जें झाड तुम्हांला आढळेल त्याच्या बुडाशीं खणा, म्हणजे तुम्हाला हवीं तितकीं मोत्यें तेथें सांपडतील!'

पक्ष्यानें सांगितल्याप्रमाणें पहांट होतांच राजकन्या एका माळ्याला घेऊन बागेंत गेली आणि तिनें झाडाच्या बुडाशीं त्याजकडून खणविलें. त्यानें थोडेंसें खणलें तों त्याच्या कुदळीला कांहीं कठिण लागलेंसें त्याला वाटलें. तेव्हां त्यानें माती एकीकडे करून पाहिलें, तों एक हात लांब व तितकीच रुंद अशी सोन्याची पेटी त्याच्या दृष्टीस पडली. ती त्यानें काढिली, व राजकन्येपुढें ठेविली. तिला कुलूप वगैरे कांहीं नसून नुसती कडीच होती. राजकन्येनें ती उघडून पाहिली, तों तींत आपल्याला पाहिजेत तितकीं मोत्यें भरलेलीं तिच्या दृष्टीस पडलीं. तीं मोत्यें पाहून तिला मोठा संतोष वाटला. मग तिनें पेटी बंद केली, व ती काखोटीस घेऊन येऊं लागली. इकडे तो माळी खणलेल्या खड्ड्यांत माती भरून पूर्वींप्रमाणेंच जागा साफ करण्याच्या कामास लागला.

राजकन्या बागेंत गेली त्या वेळेस राजपुत्र बहामन व पर्विज हे नुकतेच उठून पोषाख करूं लागले होते. ते पोषाख करून बाहेर आले, तों राजकन्या बागेंतून सोन्याची पेटी काखोटीस घेऊन येतांना त्यांच्या दृष्टीस पडली. बहामन म्हणाला, 'ताई, तूं मघाशीं बागेंत गेलीस तेव्हां बरोबर कांहीं नेलेलें तर आम्हीं पाहिलें नाहीं; तेव्हां हल्लीं तूं जी ही सोन्याची पेटी आणिली आहेस, ती माळ्याला सांपडून त्यानें का तुजपाशीं दिली?' राजकन्येनें उत्तर केलें, 'छीः,

तसें मुळींच नाहीं. ही पेटी बागेंत जेथें पुरलेली होती तेथें माळ्याला मीं नेलें, व ती जागा त्याजकडून खणवून ही पेटी काढविली. आतां तिच्यांत काय आहे हें जेव्हां तुम्हांला कळेल, तेव्हां तुम्हांला फारच आश्चर्य वाटेल !'

राजकन्येनें पेटी उघडली, तेव्हां तिच्यांत मोत्यें भरलेलीं पाहून त्यांनीं तिला विचारलें, 'ही पेटी आणि मोत्यें अमुक ठिकाणीं आहेत ही माहिती तुला लागली कशी ?' राजकन्येनें उत्तर केलें, 'चला घरांत, मीं तें सर्व तुम्हांला सांगतें.' नंतर घरांत गेल्यावर, आदले दिवशीं तिनें पातशाहास मेजवानी करण्याच्या संबंधानें पक्ष्याचा विचार घेतला असतां त्यानें काय सांगितलें तो सर्व मजकूर तिनें त्यांस कथन केला. त्या वेळीं, मोत्यांनीं भरलेल्या कांकड्या भोजनास तयार करण्यास पक्ष्यानें सांगितल्याबद्दल राजकन्येस जसें नवल वाटलें होतें, तसेंच राजपुत्रांनाही वाटलें. पक्ष्यानें असें करण्यास सांगितलें यांत त्याचा हेतु काय असावा याविषयीं त्यांनीं पुष्कळ तर्क केले, पण त्याचा वास्तविक हेतु त्यांच्या लक्षांत मुळींच आला नाहीं, व तो लक्षांत येण्यासारखाही नव्हता; तथापि त्यानें सांगितल्याप्रमाणें करणें अवश्य आहे असें समजून त्याप्रमाणें करण्याचा त्यांनीं निश्चय केला.

मग राजकन्येनें घरांतील मुख्य आचाऱ्यास बोलाविलें, आणि मेजवानीची तयारी कशी काय करावयाची तें त्यास सांगून म्हटलें, 'याशिवाय आणखी एक चमत्कारिक पदार्थ तुला तयार करावयाचा आहे, तो असा कीं, मसाला भरलेल्या सबंध वांग्यांप्रमाणें कांकड्यांत मोत्यें भरून त्या तयार करावयाच्या आहेत, आणि त्याकरितां हीं मोत्यें तूं आपल्यापाशीं घे.' असें म्हणून तिनें मोत्यांची पेटी त्याजपुढें ठेविली.

आचाऱ्यानें असला विलक्षण पदार्थ कधींच ऐकिलेला नव्हता, यामुळें तो पराकाष्ठेचा विस्मित झाला. तें त्याच्या चर्येवरून राजकन्येच्या लक्षांत आलें. तेव्हां ती त्यास म्हणाली, 'असला पदार्थ

कधीं कोणी ऐकिलेला नाहीं असें समजून तूं मला वेड लागलें कीं काय असें म्हणशील, पण मी चांगली शुद्धीवर असून तुला हें करण्यास सांगितलें आहे हें तूं पक्कें लक्षांत ठेव. हं, जा आतां; कांहीं तरी युक्ति काढून सांगितल्याप्रमाणें कांकड्या तयार कर आणि राहतील तीं मोत्यें मजकडे घेऊन ये.'

आचाऱ्याला आपल्या धनिणीच्या आज्ञेप्रमाणें करणें भाग होतें, यामुळें तो कांहींएक न बोलतां पेटी घेऊन गेला. नंतर राजकन्येनें घरांतील सर्व चाकरमाणसांस, पातशाह आज आपल्या येथें येणार आहे याकरितां जिकडे तिकडे स्वच्छता व उत्तम प्रकारची व्यवस्था ठेवा, असा हुकूम केला.

मग पातशाहानें सांगितल्याप्रमाणें राजपुत्र रानांत गेले, व त्याची वाट पहात राहिले. पातशाह येतांच शिकारीस आरंभ झाला, व ती ऊन होईतोंपर्यंत चालली. नंतर ते परत यावयास निघाले. राजपुत्र बहामन हा पातशाहाच्या बरोबर आपला घोडा घेऊन चालला, व पर्विज वाट दाखविण्याकरितां पुढें झाला. तो वाड्यापासून थोडक्या अंतरावर येतांच पातशाहाची स्वारी आली हें परीजादी हीस अगोदर कळविण्याकरितां जलदी करून आंत आला. पण तिनें पूर्वींच नौकरलोकांस रस्त्यावर उभें करून ती बातमी कळण्याची तजवीज केली होती, यामुळें पर्विज तिजकडे येतो तों तिची सर्व तयारी झालेली होती.

पातशाह वाड्याच्या चौकांत येऊन घोड्यावरून उतरतांच राजकन्येनें येऊन त्याच्यापुढें साष्टांग नमस्कार घातला, व बहामन आणि पर्विज यांनीं हीच ती आमची बहीण असें त्यास सांगितलें.

पातशाहानें स्वतः तिचा हात धरून तिला उभी केली; व तिच्या अंगचें तेज, सौंदर्य व सौकुमार्य पाहून तो अगदीं आश्चर्यचकित होऊन गेला. तो म्हणाला, 'बहीणभावंडें असावीं तर अशींच असावीं. हीं एकमेकांचा विचार घेतल्यावांचून कोणतीही गोष्ट करीत नाहींत हें यांच्या उत्तम शीलास योग्यच आहे.' नंतर तो म्हणाला,

'मुली, तुमचा वाडा सगळा पाहून झाल्यावर मग तुझ्याशीं पुष्कळ संभाषण करावें अशी माझी इच्छा आहे.'

राजकन्या म्हणाली, 'महाराज, आपल्यासारख्या थोरांना पाहण्यासारखें आमच्या घरांत काय असणार आहे! आमच्या-सारख्या गरीबांनाच काय तें योग्य आहे. राजवाड्याची तर गोष्ट दूरच राहिली, पण शहरांत जे साधारण वाडे असतात त्यांचीही याला योग्यता येणार नाहीं!' पातशाह किंचित् हंसून म्हणाला, 'मुली, तूं असें म्हणतेस खरें, पण तसा माझा ग्रह झालेला नाहीं! असो; पण मी आंत जाऊन सर्व पाहिल्यावांचून कांहीं म्हणूं शकत नाहीं.' हे पातशाहाच्या तोंडचे शब्द ऐकतांच राजकन्येनें त्याला आंत नेऊन मुख्य दिवाणखान्याखेरीज सर्व वाडा दाखविला. तो पाहून त्याला फार संतोष वाटला. तो म्हणाला, 'मुली, शहरांतल्या वाड्यांच्या योग्यतेचा हा वाडा नाहीं असें तूं म्हणतेस का? छीः, त्यांची याच्यापुढें कांहींच मातबरी नाहीं असें मी म्हणतों! बरें, चला, आतां आपण बागांत जाऊं. त्याही अशाच प्रेक्षणीय असतील अशी माझी खात्री आहे.'

तेव्हां राजकन्या त्यास बागांत घेऊन गेली. तेथें प्रथमतः सोनेरी रंगाच्या पाण्याची डोण व तींत कारंज्याच्या फवाऱ्यासारखा चाललेला प्रवाह पाहून त्याला मोठाच चमत्कार वाटला. तें पाणी कोठून येत असावें याचा त्यानें पुष्कळ विचार केला, पण तें कांहीं त्याच्या लक्षांत येईना. तेव्हां डोणीच्या जवळ जाऊन नीट पाहिलें म्हणजे तें आपल्या लक्षांत येईल असें त्याला वाटलें.

इतक्यांत, ज्या ठिकाणीं गाणारें झाड लाविलेलें होतें, तेथें राजकन्या त्यास घेऊन गेली. त्यानें पूर्वी कधीं न ऐकिलेलें असें तें अत्युत्कृष्ट गायन त्याला ऐकूं आल्यावरून, हें कोण गात आहे म्हणून त्यानें इकडेतिकडे पाहिलें. मग जेव्हां गाणारें कोणीही नसून गाणें तर स्पष्ट ऐकूं येत आहे असें त्याला दिसून आलें, तेव्हां तो राज-कन्येस म्हणाला, 'मुली हें गाणें कोठून ऐकूं येतें? हे कोणी गंधर्व

कधीं कोणी ऐकिलेला नाहीं असें समजून तूं मला वेड लागलें कीं काय असें म्हणशील, पण मी चांगली शुद्धीवर असून तुला हें करण्यास सांगितलें आहे हें तूं पक्कें लक्षांत ठेव. हं, जा आतां; कांहीं तरी युक्ति काढून सांगितल्याप्रमाणें कांकड्या तयार कर आणि राहतील तीं मोत्यें मजकडे घेऊन ये.'

आचाऱ्याला आपल्या धनिणीच्या आज्ञेप्रमाणें करणें भाग होतें, यामुळें तो कांहींएक न बोलतां पेटी घेऊन गेला. नंतर राजकन्येनें घरांतील सर्व चाकरमाणसांस, पातशाह आज आपल्या येथें येणार आहे याकरितां जिकडे तिकडे स्वच्छता व उत्तम प्रकारची व्यवस्था ठेवा, असा हुकूम केला.

मग पातशाहानें सांगितल्याप्रमाणें राजपुत्र रानांत गेले, व त्याची वाट पहात राहिले. पातशाह येतांच शिकारीस आरंभ झाला, व ती ऊन होईतोंपर्यंत चालली. नंतर ते परत यावयास निघाले. राजपुत्र बहामन हा पातशाहाच्या बरोबर आपला घोडा घेऊन चालला, व पार्वेज वाट दाखविण्याकरितां पुढें झाला. तो वाड्यापासून थोडक्या अंतरावर येतांच पातशाहाची स्वारी आली हें परीजादी हीस अगोदर कळविण्याकरितां जलदी करून आंत आला. पण तिनें पूर्वींच नौकरलोकांस रस्त्यावर उभें करून ती बातमी कळण्याची तजवीज केली होती, यामुळें पर्विज तिजकडे येतो तों तिची सर्व तयारी झालेली होती.

पातशाह वाड्याच्या चौकांत येऊन घोड्यावरून उतरतांच राजकन्येनें येऊन त्याच्यापुढें साष्टांग नमस्कार घातला, व बहामन आणि पर्विज यांनीं हीच ती आमची बहीण असें त्यास सांगितलें.

पातशाहानें स्वतः तिचा हात धरून तिला उभी केली; व तिच्या अंगचें तेज, सौंदर्य व सौकुमार्य पाहून तो अगदीं आश्चर्यचकित होऊन गेला. तो म्हणाला, 'बहीणभावंडें असावीं तर अशींच असावीं. हीं एकमेकांचा विचार घेतल्यावांचून कोणतीही गोष्ट करीत नाहींत हें यांच्या उत्तम शीलास योग्यच आहे.' नंतर तो म्हणाला,

' मुली, तुमचा वाडा सगळा पाहून झाल्यावर मग तुझ्याशीं पुष्कळ संभाषण करावें अशी माझी इच्छा आहे. '

राजकन्या म्हणाली, ' महाराज, आपल्यासारख्या थोरांना पाहण्यासारखें आमच्या घरांत काय असणार आहे! आमच्या-सारख्या गरीबांनाच काय तें योग्य आहे. राजवाड्याची तर गोष्ट दूरच राहिली, पण शहरांत जे साधारण वाडे असतात त्यांचीही याला योग्यता येणार नाहीं! ' पातशाह किंचित् हंसून म्हणाला, ' मुली, तूं असें म्हणतेस खरें, पण तसा माझा ग्रह झालेला नाहीं! असो; पण मी आंत जाऊन सर्व पाहिल्यावांचून कांहीं म्हणूं शकत नाहीं. ' हे पातशाहाच्या तोंडचे शब्द ऐकतांच राजकन्येनें त्याला आंत नेऊन मुख्य दिवाणखान्याखेरीज सर्व वाडा दाखविला. तो पाहून त्याला फार संतोष वाटला. तो म्हणाला, 'मुली, शहरांतल्या वाड्यांच्या योग्यतेचा हा वाडा नाहीं असें तूं म्हणतेस का? छीः, त्यांची याच्यापुढें कांहींच मातबरी नाहीं असें मी म्हणतों! बरें, चला, आतां आपण बागांत जाऊं. त्याही अशाच प्रेक्षणीय असतील अशी माझी खात्री आहे. '

तेव्हां राजकन्या त्यास बागांत घेऊन गेली. तेथें प्रथमतः सोनेरी रंगाच्या पाण्याची डोण व तींत कारंज्याच्या फवाऱ्यासारखा चाललेला प्रवाह पाहून त्याला मोठाच चमत्कार वाटला. तें पाणी कोठून येत असावें याचा त्यानें पुष्कळ विचार केला, पण तें कांहीं त्याच्या लक्षांत येईना. तेव्हां डोणीच्या जवळ जाऊन नीट पाहिलें म्हणजे तें आपल्या लक्षांत येईल असें त्याला वाटलें.

इतक्यांत, ज्या ठिकाणीं गाणारें झाड लाविलेलें होतें, तेथें राजकन्या त्यास घेऊन गेली. त्यानें पूर्वी कधीं न ऐकिलेलें असें तें अत्युत्कृष्ट गायन त्याला ऐकूं आल्यावरून, हें कोण गात आहे म्हणून त्यानें इकडेतिकडे पाहिलें. मग जेव्हां गाणारें कोणीही नसून गाणें तर स्पष्ट ऐकूं येत आहे असें त्याला दिसून आलें, तेव्हां तो राज-कन्येस म्हणाला, ' मुली हें गाणें कोठून ऐकूं येतें? हे कोणी गंधर्व

अदृश्य असून तर गात नाहींत ना?' राजकन्येनें उत्तर केलें, 'महाराज, हें आपल्यासमोर झाड आहे याच्या पानांतून हें गायन चाललें आहे. आपण जरा जवळ जाऊन पाहण्याची तसदी घ्याल तर त्यांतूनच हे सूर निघत आहेत हें आपल्या स्पष्ट लक्षांत येईल.'

त्यावरून पातशाह झाडाच्या अगदीं जवळ गेला. तेव्हां राजकन्या जें काय म्हणाली तें खरेंच असें पाहून त्यास अतिशय आश्चर्य वाटलें. त्या गायनाकडे त्याचें मन इतकें वेधलें कीं, त्याचा तेथून पायच निघेना! तो राजकन्येस म्हणाला, 'मुली, ह्या चमत्कारिक झाडाचें नांव तरी काय? तुला हें बागेंत सहजगत्या आढळलें, कां तुला कोणी नजर दिलें, अथवा कोठच्या दूरदेशाहून तूं मुद्दाम आणविलेंस? बहुधा हें कोठून तरी दूरदेशाहूनच आणविलेलें असावें; कारण अशा चमत्कारिक वस्तूंचा मला मोठा नाद असल्यामुळें, या देशांत जर तें असतें, तर आजपर्यंत सहज माझ्या पाहण्यांत आलें असतें.'

राजकन्येनें उत्तर केलें, 'महाराज, याला गाणारें झाडच म्हणतात, दुसरें नांव याला नाहीं. हें या देशचें नसून येथें कोणत्या रीतीनें आलें तो इतिहास फारच लांब आहे. हें झाड, व तसेंच तें सोनेरी रंगाचें पाणी आणि एक बोलणारा पक्षी आहे तो, हीं सर्व एकाच वेळीं मला मिळालीं. आपण सोनेरी रंगाचें पाणी नीट जवळ जाऊन एकदां पाहिल्यानंतर मग आपल्याला बोलणारा पक्षी मी दाखवीन. आपली मर्जी असल्यास आपण अंमळ विसांवा घेतल्यावर मग मी या तिहींचाही इतिहास आपणांस सांगेन. आपल्याला उन्हाचे फार श्रम झाले आहेत, याकरितां इतक्यांत आणखी जास्त तसदी आपल्याला देणें मला बरोबर वाटत नाहीं.'

पातशाहानें उत्तर केलें, 'मुली, तूं मला ज्या फारच विलक्षण वस्तू दाखविल्यास त्या पाहून मला इतका आनंद झाला आहे कीं, तेणेंकरून माझे सर्व श्रम हरले. तुला मात्र माझ्याकरितां तसदी पडत आहे, याबद्दल मला वाईट वाटतें. असो. आतां आपण सोनेरी रंगाच्या पाण्याकडे जाऊं; आणि नंतर तो बोलणारा पक्षी कसा

काय तो मला दाखीव. तो पाहण्याची मला फार उत्कंठा झाली आहे.'

नंतर सोनेरी रंगाच्या पाण्याच्या डोणीपाशीं तो आला; आणि बराच वेळपर्यंत त्याच्या मध्यभागीं चाललेल्या प्रवाहाकडे पहात स्तब्ध राहिला. शेवटीं तो राजकन्येस म्हणाला, 'मुली, हें पाणी बाहेरून कोठून येत नसून येथल्या येथेंच याचा जो असा प्रवाह चालला आहे, यावरून ही एक अजब चीज आहे,यांत संशय नाहीं.'

राजकन्या म्हणाली, 'महाराज, आपण म्हणतां तसेंच खरें. हें पाणी या डोणींत खालून किंवा बाजूनें कोठूनही येत नाहीं. कारण ही डोण एका सबंध दगडाची असल्यामुळें बाहेरून पाणी येण्यास मुळींच मार्ग नाहीं. पण याचा आणखी चमत्कार असा आपल्याला मी सांगतें कीं, हें पाणी या डोणींत मीं प्रथम फक्त एक कुपीभरच टाकलें असून तें एका क्षणांत आपोआप वाढून सगळी डोण भरली; आणि त्यांत हा प्रवाह उत्पन्न झाला.' पातशाह म्हणाला, 'असें काय? तर मग ही फारच विलक्षण गोष्ट समजावयाची! असो; तूर्त यासंबंधानें इतकेंच पुरें. आतां आपण बोलणाऱ्या पक्ष्याकडे जाऊं.'

नंतर थोरल्या दिवाणखान्याच्या खिडकींत त्या पक्ष्याचा पिंजरा टांगलेला होता तिकडे राजकन्या पातशाहास घेऊन चालली. तेथें जवळच जीं झाडें होतीं त्यांवर गाणाऱ्या पक्ष्यांचे थवेचे थवे मधुर स्वर काढीत व किलबिल करीत बसलेले पातशाहाच्या दृष्टीस पडले. त्यावरून पातशाह राजकन्येस म्हणाला, 'या ठिकाणींच इतके हे पक्षी कां बसले आहेत? बागेंत दुसऱ्या कोठेंही आपल्याला मुळींच आढळले नाहींत.' राजकन्या म्हणाली, 'महाराज, तो पहा दिवाण-खान्याच्या खिडकींत बोलणाऱ्या पक्ष्याचा पिंजरा आहे. त्या पक्ष्याला सूर देण्याकारितां हे सर्व पक्षी चोहोंकडून जमा झालेले आहेत. महाराज, आपण जरा याच्या गाण्याकडे लक्ष द्याल तर

ह्याच्याइतकें मधुर गायन करणारा दुसरा त्रिभुवनांतही नसेल असें आपण म्हणाल !'

नंतर राजकन्या पातशाहास थोरल्या दिवाणखान्यांत घेऊन गेली. पक्ष्याचें गाणें चाललेंच होतें. राजकन्या त्याला म्हणाली, 'पक्ष्या, महाराजांस ताजीम दे.' तेव्हां बोलणाऱ्या पक्ष्यानें तत्क्षणीं आपलें गाणें बंद केलें, व त्याबरोबर इतर पक्षीही स्तब्ध राहिले. मग बोलणारा पक्षी म्हणाला, 'महाराजांचें स्वागत असो! परमेश्वर त्यांची बढती करो, व त्यांना दीर्घायु करो!' पातशाह म्हणाला, 'पक्ष्या, माझ्या कल्याणाविषयीं तूं जी इच्छा प्रकट केलीस, तिजबद्दल मी तुझा आभारी आहे, व तुला पाहून मला इतका आनंद झाला आहे कीं, तो मला बोलूनही दाखवितां येत नाहीं !'

इतक्यांत भोजनाची तयारी होऊन पातशाह भोजनास बसला. त्यानें एक कांकडी घेतली, आणि पाहतो तों तींत मोत्यें भरलीं आहेत ! तें पाहून त्याला पराकाष्ठेचा चमत्कार वाटला. तो आपल्याशीं म्हणाला, 'हा एक बोवा नवीनच प्रकार मी आज पाहतों! या कांकडींत मोत्यें काय म्हणून भरलीं आहेत ! मोत्यें खातात कीं काय ?' मग राजकन्या व तिचे भाऊ यांस उद्देशून तो म्हणाला, 'असें करण्याचा तुमचा उद्देश काय !' इतक्यांत बोलणारा पक्षी म्हणाला, 'महाराज, मोत्यें भरलेल्या कांकड्यांचें आपल्याला येवढें आश्चर्य वाटलें व त्याचा उद्देश काय असें आपण विचारिलें; पण आपल्या राणीला कुत्रें, मांजर, व लांकडाचा तुकडा झाला .याचें आपल्याला कसें आश्चर्य वाटलें नाहीं ? व आपण त्याची कशी चौकशी केली नाहीं ?' पातशाहानें उत्तर केलें, 'सुइणींनीं मला तें खात्रीपूर्वक सांगितलें म्हणून मीं त्याची चौकशी केली नाहीं.' पक्षी म्हणाला, 'महाराज, त्या सुइणी कोण ? राणीच्या दोघी बहिणीच ना ? त्यांना आपण वरिलें नाहीं व त्यांच्या धाकट्या बहिणीला वरिलें, याबद्दल त्यांना मत्सर उत्पन्न होऊन त्यांनीं तिचा सूड घेण्याकरितां आपल्याला ही अगदीं बनावट गोष्ट सांगितली !

आपण त्यांना आतां विचाराल तर त्या खरें काय तें सांगतील! सारांश, हे दोघे मुलगे व ही मुलगी हीं आपलींच अपत्यें असून यांना त्या दोघी चांडाळणींनीं उपजतांच कालव्यांत सोडून दिलें होतें, परंतु सुदैवानें हीं आपल्या बागांवरील माजी कामगारास सांपडून त्यानें त्यांचें पालनपोषण केलें व यांना उत्तम प्रकारचें शिक्षण दिलें.

हें पक्ष्याचें भाषण ऐकून पातशाहाच्या हृदयांत प्रकाश पडला. तो म्हणाला, ' पक्ष्या, तूं म्हणतोस ही गोष्ट अगदीं खरी आहे, यांत संशय नाहीं. हीं मुलें पाहिल्याबरोबर त्यांच्यावर जी माझी पराकाष्ठेची ममता जडून गेली, त्यावरून हीं माझ्याच रक्तमांसापासून झालेलीं आहेत अशी माझी खात्री होते; कारण, त्यावांचून असें होणारच नाहीं! मुलांनो, या माझ्याजवळ, मला तुम्हांला पोटाशीं घेऊं द्या.' असें म्हणून तो लागलाच उठला, आणि त्यानें त्या तिघां मुलांना घट्ट पोटाशीं धरिलें. त्या वेळीं त्याच्या नेत्रांतून टप् टप् टप् आनंदाश्रु गळूं लागले.

नंतर पातशाहानें त्या तिघां मुलांस भोजनास बसविलें व आपणही त्यांजबरोबर भोजनास बसला. भोजन झाल्यावर तो मुलांस म्हणाला, ' मुलांनो, ह्या सर्व वृत्तांतावरून मी तुमचा बाप आहें, हें तर तुमच्या लक्षांत आलेंच. तेव्हां आतां मी आपली राणी म्हणजे तुमची आई हिला येथें घेऊन येतों. तर तिच्या स्वागताच्या तयारीस तुम्ही लागा. '

असें म्हणून पातशाह उठला आणि घोड्यावर बसला, व जलदी करून राजधानींत आला. राजवाड्यांत येतांच त्यानें मुख्य वजिरास बोलाविलें व राणीच्या दोघी बहिणींवर खटला करून त्यांना शिक्षा देण्यास सांगितलें. तेव्हां तत्काळ त्यांना त्यांच्या घरांतून काढून त्यांची निरनिराळी चौकशी केली व त्यांनीं आपले अपराध कबूल केल्यावरून तावडतोब त्यांचा शिरच्छेद करविला. हें सर्व एका तासाच्या आंत झालें.

मग लागलाच पातशाह आपल्या सर्व अमीरउमरावांसह शहरच्या मुख्य मशिदीजवळ राणीस ठेविलें होतें तेथें पायींच गेला. त्यानें तीस स्वतः हातीं धरून बाहेर आणिलें व डोळ्यांत आंसवें आणून तो म्हणाला, ‘ तुझा मीं मोठा अन्याय केला याबद्दल तुझी क्षमा मागून तुझें सांत्वन करण्यासाठीं मी आलों आहें. ज्या तुझ्या दुष्ट बहिणींनीं तुला इतक्या यातना व दुःख भोगावयास लाविलें, त्यांना मीं त्यांच्या अपराधावरून शिक्षा केली. आतां लवकरच तुझे दोघे पुत्र व कन्या यांस मी तुला नेऊन भेटवितों. चल आतां माझ्याबरोबर, आणि मनांतील सर्व विषाद टाकून पूर्ववत् आपल्या ऐश्वर्याचा उपभोग घे.’ इतकें होत आहे तों तेथें शेंकडों लोक जमले, व एका क्षणांत ही आनंदाची बातमी सर्व शहरभर पसरली.

दुसरे दिवशीं राणीस तिच्या योग्यतेप्रमाणें उत्तम पोशाक करण्यास सांगून तिला व दरबारच्या सर्व लोकांना घेऊन पातशाह हा, राजपुत्र व त्यांची बहीण ही रहात होतीं त्या वाड्यांत गेला. पातशाहानें राणीपुढें आपल्या तिघां मुलांस उभें करून म्हटलें, ‘ हीं पहा आपलीं मुलें. ह्यांना पोटाशीं घे. हीं तुझ्या माझ्या योग्यतेचीं आहेत. इतकेंच केवळ नव्हे, तर हीं आपल्याला शोभविणारीं भूषणेंच आहेत.’ अशीं तीं रूपवान् व गुणवान् मुलें पाहून राणीच्या अंतः-करणांत आनंदोदकाचा केवळ सागरच उचंबळला; व त्यांच्याकरितां तिला जें आजपर्यंत दुःख झालें होतें तें सर्व ती विसरून गेली.

राजपुत्र व राजकन्या यांनीं पातशाह, राणी व दरबारची मंडळी यांकरितां त्या दिवशीं मेजवानीचा मोठा थाट केला होता. भोजन आटोपल्यावर पातशाह राणीस बागेंत घेऊन गेला, व त्यानें तीस गाणारें झाड व सोनेरी रंगाचें पाणी यांचा चमत्कार दाखविला. बोलणारा पक्षी तर तिनें भोजनाचे वेळींच पाहिलेला असून त्या वेळीं पातशाहानें तिजपाशीं त्याची ओतप्रोत स्तुति केली होती.

याप्रमाणें सर्व गोष्टींचा शेवट गोड झाला. एकंदर मंडळींसह

पातशाह घोड्यावर बसून राजधानीस यावयास निघाला. राजपुत्र बहामन त्याच्या उजव्या बाजूस, व पर्विज डावे बाजूस, आणि राणी व राजकन्या ह्या त्याच्या मागें या क्रमानें तीं चाललीं. त्यांच्यामागून दरबारचे लोक आपआपल्या योग्यतेप्रमाणें चालले. त्यांना हजारों लोक सामोरे आले होते. त्यांनीं जयजयकार करीत त्यांना शहरामध्यें नेलें. त्या वेळीं राणी, दोघे राजपुत्र व राजकन्या आणि बोलणारा पक्षी यांजकडे सर्व मोठ्या उत्सुकतेनें पहात होते. त्या पक्ष्याचा पिंजरा राजकन्येनें स्वतः आपल्या हातांत घेतला होता. त्याचें जें सुंदर गायन चाललें होतें तें ऐकून, व त्याला सूर देण्याकरितां आलेले हजारों पक्ष्यांचे थवेचे थवे हें पाहून त्यांना अतिशय चमत्कार व आनंद वाटला. याप्रमाणें राजपुत्र बहामन आणि पर्विज व राजकन्या परीजादी हीं मोठ्या थाटानें राजवाड्यांत आल्यावर जिकडे तिकडे आनंदीआनंद होऊन गेला, व त्या रात्रीं राजवाड्यांत आणि सर्व शहरभर दिव्यांचा मोठा चकचकाट केला असून जिकडे तिकडे गाणेंबजावणें, वाद्यांचा गजर वगैरे खुशालीखुशालीच्या प्रकारांखेरीज दुसरें कांहींही ऐकूं आलें नाहीं. हा मोठा उत्सव पातशाहाच्या हुकुमावरून आणखीही पुष्कळ दिवस चालला होता.



# उपसंहार.

याप्रमाणें एक हजार व एक रात्री राणी शाहाजादी हिनें पातशाहास नित्य नव्या व मनोरंजक गोष्टी सांगून बहुत संतुष्ट केलें. तिनें मरणाची भीति न बाळगितां आपण होऊन आपल्याळा वरिलें हें तिच्या अंगचें लोकोत्तर धैर्य, तसेंच तिची अद्भुत स्मरणशक्ति व चातुर्य, हीं पाहून त्याला अतिशय चमत्कार वाटला व आनंद झाला.

वर सांगितल्याखेरीज दुसरेही कित्येक अलौकिक गुण तिच्या अंगीं असलेले पातशाहास माहीत होते; त्यांवरून शेवटीं त्याच्या अंतःकरणास द्रव आला आणि त्यानें तिला क्षमा केली व बोलला, ‘ तुझ्याजवळचा हा चमत्कारिक गोष्टींचा सांठा कधींही संपावयाचा नाहीं अशी माझी खात्री आहे. तूं आजपर्यंत ज्या गोष्टी मला सांगितल्यास, त्या ऐकून मला फार आनंद झाला, व माझा कोप शांत झाला. नित्य नव्या स्त्रीशीं लग्न करून दुसरे दिवशीं तिचा शिरच्छेद करण्याचा मीं नियम केला होता, तो आतां रहित केला आहे. तूं माझ्या पूर्णपणें खात्रीस उतरलीस व तुला मीं आपल्या जन्माची सोबतीण केली आहे. माझ्या हातून आणखी अनेक निरपराधी स्त्रियांचा वध झाला असता, तो तुझ्या योगानें न होऊन त्या स्त्रियांचा जीव वांचविण्याचें महत्पुण्य आज तुला लागलें. ’ पातशाहाच्या या कृपेबद्दल शाहाजादीनें त्याजपुढें साष्टांग नमस्कार घातला व आणखी बहुत प्रकारें त्यास आपली कृतज्ञता दर्शविली.

मुख्य वजीर म्हणजे शाहाजादीचा बाप ह्यास ही आनंदाची बातमी प्रथमतः पातशाहाच्या तोंडूनच कळली. नंतर लागलीच ती सर्व शहरांत व एकंदर राज्यांत चोहोंकडे पसरून पातशाह व त्याची राणी शाहाजादी यांची लोकांनीं फार स्तुति केली व त्यांना दीर्घायुष्य चिंतिलें.

---